# प्रकाशकाचे निवेदन

'आपले वेद : आपली पुराणे' योजनेतील हा चौथा संच आज प्रकाशित होत आहे. या संचात अथर्ववेद, वामनपुराण, वराहपुराण व स्कंदपुराण (दोन भागांत) असे पांच ग्रंथ आहेत. राजकीय व्यवस्थेत महाराष्ट्राबाहेरील प्रदेशात पण सांस्कृतिकदृष्ट्या मराठीच असलेल्या गोव्यात हा संच प्रकाशित होत आहे, याचा मला विशेष आनंद होत आहे.

योजनेचा वाचकवर्ग जेथे जेथे मराठी समाज आहे अशा सर्व ठिकाणी पसरलेला आहे. महाराष्ट्रात सर्वत्र, महाराष्ट्राबाहेर भारतातील जवळ जवळ सर्व ठिकाणी आणि आता भारताबाहेरही अनेक देशांत या योजनेचा वाचकवर्ग अस्तित्वांत आहे. जेथे वाचकवर्ग खूप मोठ्या प्रमाणात आहे, अशी पांच शहरे निवडून तेथे जाऊन प्रकाशनसोहळा साजरा करावा असे मी ठरवले होते. त्याप्रमाणे नाशिक, मुंबई, नागपूर आणि पाठोपाठ चौथ्या संचासाठी पणजीची निवड करण्यात आली. आता पांचवा व शेवटचा संच मात्र पुण्यात प्रसिद्ध होईल. ह्या सर्व प्रकाशनसमारंभांस उपस्थित राहण्याचा संकल्पही अनेकांनी केलेला आहे. आजपर्यंतच्या तीन समारंभांप्रमाणेच चौथ्या समारंभास उपस्थित असणाऱ्या अशा वाचकांची संख्याही खूप मोठी आहे.

या सर्व उद्योगांतून व समारंभांतून मला मिळणारा आनंद हा फार मोठा आहे. 'प्रसाद'ने हाती घेतलेल्या प्रत्येक चांगल्या कामाचे मराठी चिकित्सक वाचकाने कौतुकच केले आहे. त्यामुळेच नवे नवे संकल्प करताना मला त्यांच्या यशाबद्दल कधीही शंका नसते. उलट

वाचकांच्या सक्रिय सहकाराची मनाशी खात्रीच असते. हा विश्वासच माझ्या हातून आणखी असेच भरीव प्रकाशनकार्य करून घेईल व वाचकांच्या प्रेमाने आणि परमेश्वरकृपेने ते सिद्धीस जाईल, याचीही मला खात्री आहे.

या संचाच्या प्रकाशनातही आजपर्यंतच्या सर्व सुहृदांचे मनापासून सहकार्य लाभले आहे व म्हणूनच ठरलेल्या वेळेत हा संच प्रकाशित होत आहे.

मनोहर य. जोशी

# ये हृदयींचें

अथर्ववेद हा वेदांतील चौथा आणि अखेरचा वेद आहे. इतर वेदांच्या मानानें हा वेदसुद्धां तसाच समृद्ध आहे. तसे पाहिलें तर तीन वेदांपेक्षां हा वेद किंचित् सुलभ आहे. शब्दरचना इतर वेदांच्या इतकी प्राचीन आहे असें वाटत नाहीं. कारण कांहीं ऋचा अगदी सहजपणें सार्थ होतात. मागील वेदांच्या रूपांतराच्या वेळीं ज्या अडचणीं आल्या त्या जरी या वेळीं आल्या नाहींत तरी निराळ्याच अडचणींना मात्र सामोरें जावें लागलें.

या वेदांत विविध विषय आलेले आहेत. या विषयांचा परिचय करून देतांना अनेक प्रकारच्या वस्तूंचा किंवा वनस्पतींचा उल्लेख करण्यात आला आहे. विविध औषधींची नांवें वेदकालीन आहेत. त्यांचा प्रस्तुतच्या लोकांना परिचय करून द्यावयाचा तर त्या वनस्पतीचें अगर वस्तूचें प्रचलित नांव जर दिलें तरच त्याचा उपयोग होईल. अन्यथा या नांवाचें आणि वनस्पतींचें गूढ कायम राहील ही जाणीव मला होती. त्यामुळें कांहीं ऋचा मोठ्या प्रयत्नांनी आपल्याशा झाल्या. तरीही माझें अजून त्या बाबतींत समाधान झालेले नाहीं.

या वस्तूंची ज्याप्रमाणें ओळख करून दिलेली आहे, त्याप्रमाणें त्या वस्तूंचा उपयोग काय, प्रक्रिया किंवा प्रयोग काय याचाही परिचय यातील ऋचा करून देतात. असे अनेक प्रयोग या वेदांत समाविष्ट झालेले आहेत. या बाबतींत मला असें वाटतें कीं हे सर्व प्रयोग वस्तूच्या विज्ञान शाखेच्या प्रज्ञावंतांनी हाताळावेत आणि त्याचें सत्यत्व अनुभवावें. अर्थात् एकट्या-दुकट्या प्रज्ञावंताचें हें काम नाहीं. याला अर्थाश्रय, लोकाश्रय

आणि राजाश्रय यांची नितांत आवश्यकता आहे. परंतु खेदानें असें म्हणावें लागतें की त्याच तीन गोष्टींची उणीव वेदाभ्यासी विद्वानांना सतत जाणवते. पूर्वींच्या प्रज्ञावंतांनीं आपलें सर्व आयुष्य खर्च करून जे सिद्धांत निर्माण केले त्याचें गुणावलोकन करणें ही आजची निकड आहे. त्या प्रज्ञावंतांना लोकाश्रय, धनाश्रय, राजाश्रय वगैरेची साथ असल्यानें एक चित्तानें त्यांनीं एकेका विषयाला वाहून घेतलें. आजच्या एवढी वस्तु किंवा उपकरणसुलभता त्या वेळीं होती किंवा नाहीं हे सांगतां येणार नाहीं. परंतु विज्ञानानें प्रभावित झालेल्या आजच्या जगांत उपकरणांची दुर्लभता नाहीं. या सर्वांचा उपयोग वेदांतील सत्य-निश्चयार्थ करावा असें म्हटलें तर तें खासच अप्रस्तुत होणार नाहीं. मी स्वत: प्रयोगशील आहे. काहीं प्रयोग मी केलें. त्याचें यश उल्लेखनीय आहे. शितावरून भाताची परीक्षा करावी त्याप्रमाणें हे कार्य नाहीं. संपूर्ण भाताची परीक्षा केली गेली पाहिजे.

या वेदऋचांचे भाषांतर केवळ शब्द मर्यादेपलीकडे नाहीं. तिच्या अंतरंगांत शिरून प्रयोगपूर्ण भाषांतर करणें हे खरें भाषांतर. परंतु जवळजवळ सहा हजार मंत्रांच्या भाषांतराचें काम तितकेसें सोपे नाहीं. एकेका सूक्ताचा गोषवारा देण्यापलीकडे प्रस्तूत प्रसंगी अधिक काहीं करण्यात आलें नाहीं. ऋग्वेदाचें भाषांतर करतांना सायणाचार्यांचा आणि अन्य प्रज्ञावंतांच्या प्रतिभेंतून निर्माण झालेल्या भाष्यविस्ताराचा उपयोग मला झाला. त्याप्रमाणें सविस्तर भाष्य या वेदाच्या बाबतींत मला उपलब्ध झालें नाहीं. परंतु एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे आणि ती म्हणजे या वेदांत अनेक ऋचा ऋग्वेदांतील आहेत. त्या कांहीं ठिकाणीं जशाच्या तशाच समाविष्ट केल्या आहेत तर कांहीं ठिकाणीं पाठभिन्नता आहे. या पाठभिन्नतेचा आणि ऋग्वेदावरील सायणभाष्याचा विचार करूनच या ऋचांचा अनुवाद केला गेला आहे. ऋग्वेदाप्रमाणेंच प्रत्येक ऋचा अर्थसमृद्ध आहे. या अर्थसमृद्धीचें रूपांतर करणें काल आणि ग्रंथमर्यादेमध्यें बसविणें म्हणजे महान कार्य आहे. त्यामुळेंच प्रत्येक सूक्ताचा गोषवारा स्पष्ट केला आहे. यामध्यें सर्व काहीं समाविष्ट झालें असें मुळीच नाहीं. परंतु वाचकाला सूक्तांचा अत्यल्प कां

होईना परिचय व्हावा एवढीच कांक्षा या रूपांतराच्या मागें आहे.

अनेक वर्षांच्या ज्ञानेश्वरीच्या परिचयामुळें हे रूपांतर शक्य झाले. कारणं या वेदांत समाविष्ट असलेले कांहीं विषय ज्ञानेश्वरीमध्यें आलेले असून ज्ञानदेवांनी तें अनुभवसिद्ध शब्दांनीं ओवीबद्ध केले असल्यानें त्यांच्या ओव्यांचा मागोवा हृद्य वाटावा यांत आश्चर्य नाहीं. त्यांचें ऋण मान्य करणें हेंच त्यांच्या आदराचें प्रतीक आहे.

वाचकांना एकच विनंती कीं, वाचतांना त्यांनीच 'न्यून तें पुरतें' करून वाचावें आणि अनुभवाला आलेल्या न्यूनतेची मला क्षमा करावी.

शके १९०५ गुरुपौर्णिमा
रविवार दिनांक २४ जुलै १९८३.
१२. अद्वैत.
कृतार्थ सह. गृहरचना संस्था
पुणे- सातारा रस्ता. पुणे.
४११०३७.

ज्न. कृ. देवधर



# अथर्ववेदाचा परिचय

## १. नामाभिधान

चार वेदांच्या मालिकेंतील हा अखेरचा वेद. ऋग्वेद किंवा यजुर्वेदानंतर याची रचना झालेली आहे. त्यामुळें ऋग्वेद किंवा यजुर्वेदाचें प्राचीनत्व या वेदाला लाभत नाही. किंवहुना ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद यांना प्राचीन परंपरेंत जो मान आहे त्या मानाने या वेदाचा गौरव कमी आहे. ज्ञानसागर म्हणून महर्षी व्यासांनी वेदांकडे अंगुलिनिर्देश केला. त्या सर्व वेदांचा अभ्यास आणि आचार व्हावा म्हणून त्यांनीच वेदाचे चार भाग केले. त्यांपैकीं अथर्ववेद सुमन्तूकडे दिला. ब्रह्मसांप्रदायाप्रमाणें याचें धुरीणत्व शौनकाकडे जाते. परंतु अथाँगिरसानें या वेदाचें केलेलें अध्ययन किंवा त्यानें तो वेद प्रथम पाहिला म्हणून त्याला अथर्व अशी संज्ञा दिली जाते असाही काहीं ठिकाणीं प्रज्ञावंतांनीं उल्लेख केला आहे. अथर्व हे नाव सर्वांच्या मुखी आहे. परंतु या नावाशिवाय अन्य नावांनीं देखील या वेदाचा गौरव केला जातो. अशी एकूण सात नावें ज्ञात आहेत.

**१. अथर्व वेद**— या वेदाच्या प्रारंभीं शं. नो देवीरभिष्टय, आपो भवन्तु पीतये । शं योरभि स्रवन्तु न: १.६.१।" अशी ऋचा असल्याचा उल्लेख गोपथ ब्राह्मणामध्यें आहे. परंतु पं. सातवळेकर यांनीं मुद्रित केलेल्या संहितेमध्यें मात्र प्रारंभीची ऋचा ॐ ये त्रिषप्ता परियन्ति विश्वा रूपाणि बिभ्रत:

वाचस्पतिर्बला तेषां तन्वो अद्य दधातु मे ।।
अशी आहे. परंतु शौनक संहितेचा तो प्रारंभ आहे. तर गोपथ ब्राह्मणानें उद्धृत केलेली ऋचा पिप्पलाद संहितेचा प्रारंभ आहे.

२. **ब्रह्मवेद**– या नांवाचा उल्लेख अथर्ववेदांतच आहे.
तमृचश्च सामानि च यजूंषि च **ब्रह्म** चानुव्यचलन् । १५-६-८

३. **अंगिरोवेद**– ता उपदिशति **अंगिरसो** वेदः– शतपथ– १३-४-३-८.

४. **अथर्वांगिरसावेद**– हे नांव अथर्ववेदांतच आलेलें आहे.
यस्मादृचो अपातक्षन् यजुर्यस्मादपाकषन् ।
सामानि यस्य **लोमान्यथर्वांगिरसो** मुखं
स्कम्भं तं ब्रूहि कतमः स्विदेव सः ।। १०.७.२०.

५. **भृग्वगिरसां वेद**– एतद् वै भूयिष्ठं ब्रह्म यद् **भृग्वंगिरसः**–
असा गोपथामध्यें उल्लेख आहे.

६. **क्षत्रवेद**– उक्थं जयुस्साम **क्षत्रं** वेद
असें शतपथ ब्राह्मणामध्यें म्हटलें आहे.

७. **भैषज्यवेद**– याचा उल्लेख अथर्ववेदामध्येंच आलेला आहे.
यज्ञं ब्रूमो यजमानमृचः सामानि भेषजा ।
यजूंषि होत्रा ब्रूमस्ते तो मुञ्चन्त्वंसहः ।।
११.६.१४

इतकी नावें असूनही ' अथर्व ' हे नांवच जास्त परिचयाचें आहे. याचें कारण देतांना असें म्हणण्यांत येतें कीं वेदांमधील सर्वाधिक ऋचा अथर्वण नांवाच्या ऋषींच्या आहेत. इतर ऋषींच्या ऋचा आहेत. परंतु ज्याच्या योगें या वेदाला अन्य नांवाचें लेणे लाभलें त्यांच्याही ऋचा या वेदांत आहेत. विशेषतः –

| | |
|---|---|
| अथर्वण | १,७६८ |
| ब्रह्म | ९६७ |
| भृग्वंगिरस | ७६० |
| | ३,४९५ |

एकूण अथर्ववेदांपैकीं निम्म्यापेक्षां अधिक ऋचा या तिघांच्या नांवावर मोडतात. त्यामुळेही या वेदाला त्या ऋषींच्या नावानें संबोधण्यांत येत असेल.

स्वतःचें, समाजाचें किंवा राष्ट्राचें रक्षण करणें ही एक महान क्रिया आहे. हें रक्षण कोणत्या प्रकारें करावें याची चर्चा या वेदांत विस्तारानें आलेली आहे. विशेषतः अरिष्टनाश, राज्यशासन, विजय-साधन, संग्राम, शत्रुनाश वगैरे विषयांची सूक्तें या वेदांत आलेली आहेत. त्यामुळें याला क्षत्रवेद असें नांव देण्यांत आलें असावें,

याचप्रमाणें– आयुष्यवृद्धि, रोगनिवारण, विविध औषधी वन-स्पतींचा त्यांच्या उपयोग-परिणामांसह दिलेला परिचय, कृमिनाश, विषनाश, वगैरे विषयांचें स्पष्टीकरण करणारी सूक्तें या वेदांत समा-विष्ट झालेली आहेत. हा सर्व वैद्यकविधानांतील भाग असल्यानें त्याला भैषजवेद असेही नामाभिधान आहे.

## २ मंत्रविस्तार

अथर्ववेदाच्या पंधरा शाखा आहेत असें काहींचें म्हणणें आहे. परंतु त्यांपैकी आज फक्त दोनच शाखा उपलब्ध आहेत. इतर शाखांची नावें सुद्धां मिळत नाहींत. पिप्पलाद ऋषींच्या नांवावर मोडणारी पिप्पलाद आणि शौनक ऋषींच्या नांवावर मोडणारी शौनकी अशा दोन शाखा आहेत. अन्य शाखा आज तरी उपलब्ध नाहींत. प्रस्तुतचे भाषांतर हे शौनकीय संहितेचें आहे.

ह्या वेदामध्यें ५९८७ ऋचा किंवा मंत्र आहेत. हे सर्व मंत्र वीस काण्डांमध्यें सातशें तीस सूक्तांमध्यें समाविष्ट करण्यांत आलेले आहेत. याचा विस्तार ऋग्वेदाच्या खालोखाल आहे. या मंत्रांची विस्तृत संख्या खालीलप्रमाणें आहे.

| काण्ड क्रमांक | सूक्तें | ऋचा (मंत्र-संख्या) |
|---|---|---|
| १ | ३५ | १५३ |
| २ | ३६ | २०७ |
| ३ | ३१ | २३० |
| ४ | ४० | ३२४ |
| ५ | ३१ | ३७६ |
| ६ | १४२ | ४५४ |
| ७ | ११८ | २८६ |
| ८ | १० | २९३ |
| ९ | १० | ३१३ |
| १० | १० | ३५० |
| ११ | ९ | ३१३ |
| १२ | ५ | ३०४ |
| १३ | ४ | १८८ |
| १४ | २ | १३९ |
| १५ | १८ | २३० |
| १६ | ९ | १०३ |
| १७ | १ | ३० |
| १८ | ४ | २८३ |
| १९ | ७२ | ४५३ |
| २० | १४३ | ९५८ |
| २० | ७३० | ५,९८७ |

विसाव्या काण्डांतील १२७ ते १४३ ही १७ सूक्तें कुन्ताप किंवा खिल सूक्तें म्हणून प्रसिद्ध आहेत. या सतरा सूक्तांत एकूण १९४ ऋचा किंवा मंत्र आहेत. यातील सूक्तें ही ऋग्वेदाप्रमाणें स्तुतिसूक्तेंच आहेत. अथर्ववेदाच्या या १९४ मंत्रांखेरीज जे मंत्र आहेत ते विशिष्ट सूक्तांत समाविष्ट केलेले आहेत. प्रत्येक सूक्ताला नांव आहे. त्या नांवाप्रमाणें

एखाद्या वस्तूची माहिती, तिचा उपयोग, क्रिया, फल, प्रयोग वगैरे गोष्टीनीं ही सूक्तें समृद्ध आहेत.

### ३) विषय

अथर्ववेद सांसारिकांना दिलासा देणारा आहे. यामध्यें स्वतःचें सर्व वाजूनीं रक्षण कसें करतां येईल, वैभव कसें वृद्धिंगत करतां येईल, याचा जसा विचार आहे त्याचप्रमाणें राजा, राज्य, युद्ध, राजधर्म, समाजप्रवोधन वगैरे विषयांचाही विचार आहे. साधारणपणें विचार करतां ज्या विषयांचा विचार यामध्यें आहे त्याचें स्थूल स्वरूप असें आहे.

| | | |
|---|---|---|
| १. अध्यात्म | २. ब्रह्मचर्य | ३. गृहस्थधर्म |
| ४. वानप्रस्थ | ५. संन्यास | ६. आयुर्वर्धन |
| ७. भैष्यज (औषधी) | ८. रोगनिवारण | ९. कृमिनाशन |
| १०. विषनाश | ११. अरिष्टनाश | १२. राज्य-शासन |
| १३. राष्ट्रसंवर्धन | १४. संग्राम | १५. शत्रुनाश |
| १६. मणिधारण | १७. पापनाश | १८. अन्न |
| १९. संपत्ती | २०. अधिदैवत | २१. यज्ञ |
| २२. काल | २३. पशु-संपत्ती | २४. व्यापार |

उपरोक्त विषयांमध्यें तत्त्वज्ञानविषयक मंत्र आहेत. त्याचप्रमाणें, अभिचार, मंत्र-तंत्र, वशीकरण, मंत्रसिद्धी, जादुटोणा, गंडे-दोरे, क्रिया-स्तंभन वगैरे विषयांचाही समावेश आहे. ह्या विषयांबद्दल जे मंत्र आहेत ते सर्व सिद्ध मंत्र असून चांगले परिणामकारी आहेत. अर्थात या मंत्रां-साठीं ज्या क्रिया सांगितल्या आहेत त्यांची माहिती पूर्णत्वानें करून घेतल्याशिवाय त्यांच्या वाटेस जाऊं नये असा इशाराही या ठिकाणीं देण्यांत आला आहे.

औषधी वनस्पती, रोग, त्यांचे स्वरूप आणि परिणाम यांचाही उल्लेख या वेदांत आहे. शस्त्रास्त्रें वापरणें आणि अन्य शस्त्रांचा नाश करणें याबद्दल क्रिया आणि मंत्र या दोहोंचाही समावेश या वेदांत आहे.

### ४) ऋषी

या वेदांतील सूक्तें एकाच ऋषींनीं रचलेली नाहीत. एका सूक्तांत

असलेले एका विषयाचे मंत्र अनेक ऋषींनीं निर्माण केलेले आहेत. अशा एकूण ऋषींचीं संख्या १२९ आहे.

या ऋषीच्या प्रयत्नानें उपासना, कर्म आणि ज्ञान या त्रयीकरितां या वेदाच्या अनुरोधानें संहिता, ब्राह्मण, उपनिषदें आणि आरण्यकें निर्माण झाली.

ब्राह्मण ग्रंथ– गोपथब्राह्मण (यज्ञादि कर्मासाठीं)
उपनिषदें– प्रश्न, माण्डुक्य आणि मुण्डक (ज्ञानासाठीं)
श्रौतसूत्रें– वैतान (उपासना व प्रबोधन कार्य)
गृह्यसूत्रें– कौशिक (सांसारिक-कर्म)
उपवेद– सर्प, पिशाच्च, असुर, स्थापत्य, इतिहास, पुराण. (आचारादि वैदिक क्रियांचें दर्शन) या वेदाची आरण्यकें नाहींत.

## ५) देवता

इंद्र, अग्नि, यम, रुद्र, वगैरे ऋग्वेदांत ज्या देवता आढळतात त्या देवता या वेदांत आहेत. अर्थात ऋग्वेदांतील सर्वच देवतांचा समावेश या वेदांत नाहीं. ऋग्वेदामध्यें या देवतांचें जें दर्शन घडतें तें गौरवी दर्शन या ऋचांच्या माध्यमांतून प्राप्त होत नाहीं.

## ६) अथर्ववेदाचे प्राचीन अभ्यासक

प्राचीन काळापासून अथर्ववेदाचा अभ्यास केला जात आहे. त्यामध्यें ज्यांचा नामगौरव केला जातो अशा नऊ ऋषींचीं नांवें प्राप्त झालेली आहेत.

१) पिप्पलाद, २) वौदा. ३) मौदा, ४) शौनक, ५) जाजल, ६) जलद्, ७) ब्रह्मवदा, ८) देवदर्श आणि ९) चारणवैद्य.

ऋग्वेद किंवा यजुर्वेद यांचा जितक्या प्रमाणांत अभ्यास झाला किंवा होत आहे इतक्या प्रमाणांत अथर्ववेदाचा अभ्यास झालेला नाही किंवा होतही नाहीं. पूर्वीच्या ऋषिवर्यांनीं वेदत्रयीला बहुमान दिला परंतु तो मान अथर्वाला मात्र लाभलेला नाहीं. प्रापंचिक समृद्धतेसाठीं या वेदाचा अधिक सूक्ष्म आणि प्रयोगनिष्ठ अभ्यास होणें अत्यंत जरूर आहे.

(::)

**क्रमबोधिनी–**



# अथर्ववेद

## प्रथम काण्ड

१. **मेधाजनन** (बुद्धीला तीव्रता आणणें)

**ॐ ये त्रिषप्ताः परियन्ति विश्वा रूपाणि बिभ्रतः ।**
**वाचस्पतिर्बला तेषां तन्वो अद्य दधातु मे**
**पुनरेहि वाचस्पते देवेन मनसा सह ।**
**वसोष्पते नि रमय मय्येवास्तु मयि श्रुतम्**
**इहैवाभि वि तनूभे आर्त्नी इव ज्यया ।**
**वाचस्पतिर्नि यच्छतु मय्येवास्तु मयि श्रुतम्**
**उपहूतो वाचस्पतिरुपास्मान् वाचस्पतिर्ह्वयताम् ।**
**सं श्रुतेन गमेमहि मा श्रुतेन वि राधिषि**

या जगतामध्यें, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, तन्मात्रा आणि अहंकार या सात पदार्थांचे प्रत्येकी सत्त्व, रज आणि तम अशा तीन गुणांच्या सानिध्यानें एकतीस प्रकार होतात. या सर्वांच्या देवता या विश्वांत भ्रमण करीत असतात. वाणीचा स्वामी ब्रह्मा, व मनकामना पूरक वसुपति मी अध्ययन केलेल्या ज्ञानाचा विनियोग करण्याची बुद्धी मला देवोत. धनुष्याला लावलेला वाण मागें खेंचला की धनुष्याची दोन्ही टोकें ज्याप्रमाणें धनुर्धाऱ्याकडे वळतात त्याप्रमाणें वेदज्ञान आणि त्यांचा

अ...२

उपभोग, पूर्णांशानें माझ्याकडे येवोत आणि स्थिर होवोत. वाणीचा स्वामी असलेल्या ब्रह्माला आम्ही आवाहन करतो. तो आम्हाला ज्ञानमय करो.

२. **रोगोपशनम्** (रोगनिवारण)

जड आणि चेतन वस्तूंचें पोषण करणारा पाऊस ह्या बाणाचा पिता असून सर्व तत्त्वांनीं युक्त अशी पृथ्वी याची माता आहे. कारण दोघांमुळेंच बाणाचा जन्म होतो. हे इंद्रा, आमचें शरीर दगडाप्रमाणें मजबूत कर, आमच्याशीं विरोध करणाऱ्यांना तूं बाजूला कर आणि त्याचें बल नष्ट कर. उन्हाळ्याच्या दिवसांत विस्तृत वटवृक्षाच्या छायेत गुरे आल्यानें त्यांना सूर्याचा ताप होत नाहीं. त्याप्रमाणें आम्ही तुझ्या छायेखालीं आल्यानें तूं आमच्या शत्रूपासून होणारा त्रास दूर कर. पृथ्वी आणि अंतरीक्ष यांमध्यें तेजोमय अवस्था प्राप्त झाल्यानें कोणतेही दोष राहात नाहीत. (सूर्याच्या प्रकाशांत पृथ्वीवर आणि अंतरीक्षांत असणारे रोगजंतु नाहीसे होतात) त्याप्रमाणें, आमचे रोग, शस्त्राचा आघात किंवा रक्तस्राव नाहीसा कर.

३. **मूत्रमोचन**–

पर्जन्य, मित्र, वरुण, चंद्र, सूर्य, वसु हे बाणाच्या पित्यासमान आहेत. ते सर्व विविध बलयुक्त आहेत. तुझ्या शरीरातील मूत्रादि रोगांना ते दूर करोत आणि या शरीरांत सांचून राहिलेलें मूत्र बाहेर टाकून देवोत. जें मूत्र तुझें मूत्राशय आणि अन्य नाड्यांमध्यें रुद्ध झालेलें आहे तें नाद करीत त्वरित बाहेर पडो. तलावांतून पाणी बाहेर जाण्यासाठीं ज्याप्रमाणें मार्ग खोदून काढतात (मार्गामधील अडथळा दूर करतात) त्याप्रमाणें मूत्राच्या मार्गातील अडथळे मी दूर करतो. समुद्र किंवा तलावांत सांचलेलें पाणी काढून टाकण्यासाठीं मार्ग खोदून वाट करून दिली जाते त्याप्रमाणें तुझ्या शरीरांतील मूत्र बाहेर पडण्यासाठीं मी मार्ग तयार करतो. धनुष्याला लावलेला बाण सोडतांना आवाज करीत ज्याप्रमाणें वेगानें जातो त्याप्रमाणें तुझ्या शरीरांतील मूत्र बाणाप्रमाणें नाद करीत दूर जावो.

४. **अपां-भेषज** (पाणी हे देखील रोगघ्न आणि आरोग्यदायक आहे)

यज्ञकर्त्याच्या माता भगिनीप्रमाणें पाणी, सोमरस, हवनद्रव्य, दूध,

तूप वगैरे द्रव्ये यज्ञासाठीं एकत्रित करण्यांत येतात. सूर्य ज्या पाण्याला स्पर्श करतो तें पाणी निरोगी आणि शक्तिसंपन्न असतें. त्या जलदेवतेला मी आवाहन करीत आहे. या जलानें नद्या, विहिरी आणि तलाव पूर्ण भरतात आणि त्यातील अमृतमय, औषधीयगुणयुक्त आणि पवित्र वाणी आमच्या परिवारांतील गाय, घोडे वगैरे प्राशन करून शक्तिसंपन्न होतात.

५. **अपांभेषज** (हे मंत्र ऋग्वेद १०.९– या अप्सूक्तामध्यें आलेले आहेत. संध्येमध्यें हे मंत्र म्हटले जातात.)

आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ।
यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः । उशतीरिव मातरः
तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथा च नः
ईशाना वार्याणां क्षयन्तीश्चर्षणीनाम् । अपो याचामि भेषजम्

हे उदकानों, तुम्ही सर्व सुख प्रदान करतां. म्हणून आम्हाला सुखाचा उपभोग घेण्यासाठीं, अत्यंत उदात्त आणि अमर तत्त्वांच्या अनुभूतीसाठीं आणि परब्रह्माच्या साक्षात्कारासाठीं समृद्ध करा. माता ज्याप्रमाणें आपल्या बालकाला स्तनपान करविते त्याप्रमाणें तुझें रसरूप सुख आम्हाला प्रदान कर. आमचें अनिष्ट नाश करून तुम्हीं आमचें पालन करतां. रोगनाशक उदकानों, आम्हाला प्रजा निर्माण करण्यासाठीं समर्थ करा. सर्व प्रकारचें धन आणि सर्व सुखसाधनांचे तुम्ही स्वामी आहांत. औषधी गुणांनी ऐश्वर्यवान ठरलेल्या जलाची मी प्रार्थना करतो.

६. **अपांभेषज** (पाण्याच्या सिंचनानें रोगनिवारण आणि शांतिलाभ या सूक्ताच्या पठणानें होतो.)

शं नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये । शं योरभि स्रवन्तु नः
अप्सु मे सोमो अब्रवीदन्तर्विश्वानि भेषजा । अग्निं च विश्वशंभुवम्
आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे३ मम । ज्योक् च सूर्यं दृशे
शं न आपो धन्वन्या३ः शमु सन्त्वनूप्याः ।
शं नः खनित्रिमा आपः शमु याः कुम्भ आभृताः शिवा नः सन्तु वार्षिकीः ४

दिव्य गुणसंपन्न, सर्व औषधींच्या रसाचें भांडार, सर्वांना आनंद प्रदान करणारें पाणी ईश्वर प्राप्तीच्या मार्गात आम्हाला साहाय्यभूत होवोत. औषधीयुक्त आणि अंतिम कल्याण करणारें पाणींच आहे हें सोमानें मला कथन केलें. हे उदकानों, माझे रोग नाहीसे करण्यासाठीं मला तुमच्यातील औषधीय गुण प्रदान करा म्हणजे माझे शरीर पुष्ट होऊन पुष्कळ काळपर्यंत सूर्याचें दर्शन घेवूं शकेन. वाळवंटांत उत्पन्न होणारें पाणी, जलसंपन्न प्रदेशांतले पाणी, विहिरीतलें पाणी, विविध पात्रांत भरून ठेवलेलें पाणी, आणि पर्जन्यापासून प्राप्त झालेलें पाणी आम्हाला सुखद होवो.

७. **यातुधाननाशनम्** (राक्षसांचा नाश)

स्वर्गामध्यें वास करणाऱ्या, प्राण्यांच्या जठरामध्यें वास करून प्राण्यांच्या हालचाली नियमित करणाऱ्या आणि ऐश्वर्यवान अग्ने, ज्या देवतांची स्तुती करून आम्ही त्यांच्यासाठी हवि अर्पण करतो, राक्षसांचा जे नाश करतात त्या देवतांना तूं या ठिकाणी बोलावून आण. ऐश्वर्य-स्वामी इंद्रदेखील आम्ही दिलेल्या घृतयुक्त हवींचा स्वीकार करो. सर्वांना भक्षण करणारे आणि विविध प्रकारें प्राणिमात्रांचा घात करणारे जे दुष्ट राक्षस आहेत त्यांचा तो नाश करो. अग्निदेव राक्षसांना ताप देईल. इंद्र नंतर आपल्या सामर्थ्यानें त्यांना पराभूत करील.असे पराभूत झालेले राक्षस आपला परिचय करून देऊन आत्मसंमर्पण करतील. ज्ञान-रूप, अतींद्रिय ज्ञानसंपन्न आणि उपासनेनें प्रसन्न होणाऱ्या श्रेष्ठ अग्ने, त्या राक्षसांना सांग की माझ्या उपासकांना तुम्ही कोणतीही पीडा करूं नका. तूं अशी आज्ञा दिलेले राक्षस आमच्यासमोर आत्मसमर्पण करतील. हे ज्ञानवान अग्ने, तूं देवदूत आहेस. तूं आमचें कल्याण कर. प्राणिमात्रांचें अकल्याण न करण्यासाठींच तूं जन्म घेतला आहेस. म्हणून हे अग्ने तूं राक्षसांना आमच्या पासून कायमचें दूर कर. दुष्ट राक्षसांना दोरीनें जखडून या ठिकाणी घेऊन ये. म्हणजे इंद्र आपल्या तीक्ष्ण वज्रानें त्यांची शिरें धडावेगळी करील.

८. **यातु-धाननाशन** (राक्षसांचा नाश)

नदी ज्याप्रमाणें पाण्यावरील फेंसाला सखल भागाकडे ढकलते

त्याप्रमाणें देवतांना प्रदान केलेले आमचे हवी दुष्ट राक्षसांना दूर वाहून नेवोत. जो पुरुष अगर जी स्त्री दुसऱ्याला हानी पोहोचेल असे दुष्ट कार्य करील तें कार्य निष्फल होवो. हे अग्ने आणि सोमा, हे दुष्ट कर्म करणारे राक्षस तुम्हाला शरण आले आहेत. हे बृहस्पते, या राक्षसांना तूं तुझ्या नियंत्रणात ठेव. सोमपान करणाऱ्या अग्ने, राक्षसांचें संतान वृद्धिंगत होणार नाही असें कर. त्यांना तूं नष्ट कर. हे ज्ञानवान अग्ने, ब्राह्मणांच्या मंत्रपठणानें तुला जें सामर्थ्य प्राप्त होते त्यानें तूं राक्षसांचा नाश कर. हे राक्षस गुहेंत वास करतात. त्यांची प्रजा त्याच ठिकाणीं वाढते हें तुला ज्ञात आहे. त्या राक्षसकुलांचा तूं नाश कर.

९. **विजय प्रार्थना** (विजयासाठी प्रार्थना)

सर्व तऱ्हेच्या धनाची प्रार्थना करणाऱ्यांना, वसु, इंद्र, पूषन्, वरुण, सूर्य आणि अग्नि धन प्रदान करोत. आदित्य, विश्वेदेव आणि अन्य देवता तेज प्रदान करोत. या तेजानें समृद्ध झाल्यामुळें आमचे शत्रू हीन अवस्थेला येतील. दुःखाचा लवलेशसुद्धां नाही अशा स्वर्गाला आम्हाला ह्या देवता घेऊन जावोत. हे प्रज्ञावंत अग्ने, ज्या दिव्य मंत्रांच्या साह्यानें, इंद्राला तूप, दूध वगैरे हविरन्न प्रदान केलेस त्याच मंत्राच्या प्रभावानें ह्या लोकांना सर्वश्रेष्ठ स्थानावर आरूढ कर. तेजरूप अग्ने, तुझ्या कृपेनें ह्या राक्षसांचें धन, पुण्य, आणि जीवित हरण करण्यास समर्थ झालों. हे अग्ने, यजमानाला तूं दुःखमुक्त करून स्वर्गांत घेऊन जा.

१०. **पाशविमोचन** (बंधनांतून मुक्तता)

वरुण पापी लोकांना शिक्षा करतो, त्यांचें नियमन करतो आणि सत्यभाषी लोकांना वश होतो. आम्ही त्याची स्तुती करून कृपा संपादन करतो. वरुणाच्या क्रोधापासून मनुष्यांना दूर करतो. हे तेजोवान वरुणा, सर्व प्राणिमात्रांमध्यें असलेला क्रोध तुला ज्ञात आहे. अनेक अपराधी पुरुषांना तूं तुझ्या कृपेनें आपलेसें कर आणि त्यांना गतवर्षाचें आयुष्य दे. हे रुग्णा, जिव्हेचा दुरूपयोग करून तूं असत्य बोललास. त्यामुळें वरुणाच्या क्रोधाला तूं पात्र झालास. वरुण त्यांतून तुझी सुटका करो. हे श्रेष्ठ वरुणा, तू आपल्या दूतांना सांग कीं तुझी स्तुती करणाऱ्यांना

तुमचे पाश बांधून न टाकोत. आम्ही तुला प्रदान केलेल्या हविरन्नानें तूं प्रसन्न हो आणि अपराधापासून आमची मुक्तता कर.

११. सुख-प्रसूति

(हातांत भस्म घेऊन तें प्रसवेच्या नाभीकमलाला पहिल्या दोन ऋचा म्हणून लावावें. नंतर त्यापुढील तीन ऋचा म्हणून ओटीपोटाला लावावें आणि सहावी ऋचा म्हणून मांड्यांच्या बाजूनें फुंकरावें. पाण्यानें देखील हे साधता येतें. तत्पूर्वी हा विधी करणाऱ्यानें स्नानादि कर्म करून शुद्ध व्हावें. गायत्री म्हणून पाणी अगर भस्म हातीं घ्यावें आणि वरील-प्रमाणें प्रयोग करावा.)

वषंट् ते पूषन्नस्मिन्त्सूतावर्यमा होतां कृणोतु वेधाः ।
सिस्रतां नार्यृतप्रजाता वि पर्वाणि जिहतां सूतवा उं
चतस्रो दिवः प्रदिशश्चतस्रो भूम्यां उत ।
देवा गर्भं समैरयन् तं व्यूर्णुवन्तु सूतवे
सूषा व्यूर्णोतु वि योनिं हापयामसि ।
श्रथयां सूषणे त्वमव त्वं बिष्कले सृज
नेव मांसे न पीवसि नेवं मज्जस्वाहतम् ।
अवैतु पृश्नि शेवलं शुने जराय्वत्तवेऽव जरायु पद्यताम्
वि ते भिनाद्मि मेहनं वि योनिं वि गवीनिके ।
वि मातरं च पुत्रं च वि कुमारं जरायुणाव जरायु पद्यताम्
यथा-वातो यथा मनो यथा पतन्ति पक्षिणः ।
एवा त्वं दशमास्य साकं जरायुणा पताव जरायु पद्यताम्

पूषन्, अर्यमा आणि वेधा या देवतांना ऋत्विज हवि प्रदान करोत. हे श्रेष्ठ देवतानों, ह्या स्त्रीची प्रसूती सुखमय होऊन तिला शारीरिक पीडा होणार नाहीं असें करा. स्वर्ग, पृथ्वी दिशांच्या प्रमुख

देवता आणि इंद्र यांनी प्रथम हा गर्भ निर्माण केला. आतां या देवता, गर्भाला बाहेर येण्यासाठीं त्याच्यावरील आच्छादन दूर करोत आणि त्याला मुक्त करोत. हे पूषन्, या गर्भाला, गर्भाशयांतून मुक्त कर. आम्ही या गर्भाला लवकर बाहेर येतां यावें म्हणून त्याच्या मार्गावरील आच्छादन दूर करून मार्ग मोकळा केला आहे. हे प्रसूति सहायक देवतानों, प्रसूतीच्या वेळीं तुम्ही या स्त्रीचे शरीर सैल करा. हे मरुता, तूं या गर्भाचें मस्तक योनी मार्गाकडे करून त्याला बाहेर पडण्याची प्रेरणा दे. हे प्रसवे, या गर्भाचा संबंध, मज्जा, मांस, चरबी वगैरे धातूंशीं नसल्यानें तूं त्याला बाहेर काढून टाकणेंच योग्य होय. हे प्रसवे, गर्भ बाहेर पडण्याचा मार्ग, आणि त्याला अडथळा आणणारे अन्य स्नायू मी विस्तृत करीत आहे. या गर्भाला बाहेर काढून तूं माता आणि बालक यांना निरनिराळे कर. वायु आणि मन ज्याप्रमाणें वेगानें जातात किंवा पक्षी आकाशांत उडतांना त्यांना कोणताही अडथळा होत नाहीं त्याप्रमाणें या स्त्रीच्या उदरांत, दहाव्या महिन्यांत पदार्पण केलेला हा गर्भ गर्भवेष्टनासह बाहेर येवो आणि बाहेर येतांच त्याचें गर्भ-वेष्टन बाजूला होवो.

१२. **यक्ष्मनाश** (क्षय रोगाचा नाश)

सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी निर्माण झालेल्या गतिमान आणि बलसंपन्न वायूप्रमाणें, सूर्य गर्जना करणाऱ्या मेघांना बरोबर घेऊन येतो आणि पाऊस पाडतो. हा सूर्य प्राण्यांचे त्रिदोषोत्पन्न रोग नाहींसे करून त्यांना सुख प्रदान करो. शीघ्र गतीनें जाणारा सूर्य तीन प्रकारच्या प्रकाशानें गोचर होवो. आमच्या प्रत्येक अवयवाला दीप्ति प्राप्त करून देणाऱ्या सूर्याची स्तुती करून आम्ही त्याला हवि अर्पण करतो. सूर्याच्या बरोबर त्याच्या परिसरांत असलेल्या देवतांची देखील आम्ही पूजा करतो. शरीरांतील सांध्यांची दुखणी आणि अन्य रोगांनीं जखडलेले लोक सूर्याच्या दीप्तीनें मुक्त होतात. आमच्या अंगांत प्रवेश केलेल्या पर्जन्य जलानें निर्माण होणारा कफ, वायूच्या योगानें उत्पन्न होणारा वात आणि पित्तादि विकृती निर्माण होतांच येणारा ताप सूर्याच्या दीप्तीनें निवृत्त होतो. या रोगांच्या मुक्तीसाठीं वृक्षराजी आणि निर्जन पर्वतांचा आश्रय करावा. प्राणिमात्रांच्या अंगांत मुरलेले रोग शांत होऊन त्यांना

सुख लाभो. माझ्या चारही अंगांमध्यें मुरलेले रोग नाहीसे होऊन मला सुख लाभो.

**१३. विद्युत्** (वीज)

केवळ प्रकाश निर्माण करणाऱ्या विजेला (विद्युत्) कडकडाटासह प्रकाश देणाऱ्या विजेला (स्तनयित्नु) मेघरूपी दगडावर आघात करणाऱ्या विजेला (तडित्) आमचा नमस्कार असो. आततायी लोकांवर विद्युत आघात करते आणि त्यांना दूर फेंकते. हे पर्जन्या, तूं अकाली वर्षाव करीत नाहींस. सज्जनांचे रक्षण करणाऱ्या तुला नमस्कार असो. सर्वांचें तप एकत्र करून, पापावर मेघरूप दगडाचा वर्षाव करतेस. तूं आम्ही आणि आमच्या परिवारास सुख प्रदान कर. अत्यंत उंचीवरून जमिनीवर येणाऱ्या पावसाला आमचें वन्दन असो. तुझ्या मेघरूप वज्राला आमचा नमस्कार असो. गुहेप्रमाणें दुर्गम, तुझ्या नाभी चक्राप्रमाणें गंभीर अंतरीक्षरूपी समुद्र स्थिर होवो. आततायी शत्रूंना बाहेर घालविण्यासाठीं तुझा जन्म आहे. आमचें भय नाहीसे करणाऱ्या विजेला आमचा नमस्कार असो.

**१४. कुलपा कन्या** (कुलाचें हित करणारी स्त्री)

वृक्षाला आलेलें फूल मनुष्य ज्याप्रमाणें आनंदानें ग्रहण करतो त्याप्रमाणें या स्त्रीच्या भाग्याचा आणि तेजस्वितेचा मी स्वीकार करतो. पर्वत ज्याप्रमाणें पृथ्वीवर स्थिर राहातात त्याप्रमाणें ही कन्या आपल्या आई-वडिलांच्या घरी स्थिर होती. सर्व विश्वाचें नियमन करणाऱ्या हे यमराजा ही कन्या आपली आहे. कारण सर्वप्रथम ती तुमच्याकडे आली आणि तेथून आपल्या आई-वडिलांकडे आली. हे श्रेष्ठा, आपली ही कन्या आमच्या कुलाचें रक्षण करणारी आहे. हे कुलपालक आणि कुलवर्धक स्त्रिये, घरामध्ये स्त्रिया आपलें धन झांकून ठेवतात त्याप्रमाणें तुझें भाग्य, असित, गय, आणि कश्यप या ऋषिवर्यांनी आपल्या मंत्राच्या प्रभावानें झाकून टाकलें आहे.

**१५. पुष्टिकर्म** (सांसारिक विकास कार्यं)

सर्व नद्या आणि वायु आम्हाला अनुकूल होऊन वाहात राहोत. आम्हाला आनंद देणारे पक्षी एकमेकांबरोबर आकाशांत विहार करोत.

सर्व देवता माझ्या या यज्ञात येऊन हवि स्वीकारोत. हे देवानों, माझ्या यज्ञांतील हवि तुम्ही स्वीकारावेत म्हणून आम्ही तुम्हाला आवाहन करीत आहोत. या यज्ञकर्त्या यजमानाला, तुम्ही प्रसन्नपणे संतती, पशु आणि अन्य सर्व प्रकारचें धन देऊन ऐश्वर्यवंत करा. ग्रीष्म ऋतूमध्येंसुद्धां क्षीण न होतां नदीचा प्रवाह वाहत राहातो. त्यापेक्षां धन, पशु वगैरेंच्या ऐश्वर्याचा प्रवाह आम्हाला अधिक लाभो. यज्ञासाठीं देण्यांत येणाऱ्या हवींचा प्रवाह आम्हाला गायी, धन, धान्य या रूपांनी प्राप्त होवो.

१६. **शत्रूबाधा** (शत्रूचा त्रास होणें)

मनुष्यमात्रांना त्रास देणारे, रात्रीं आणि अमावस्येच्या दिवशीं अंधारांत भ्रमण करणारे राक्षस आणि पिशाच्च यांच्यापासून अग्नि आमचें रक्षण करो. वरुणानें मला शिसें देऊन सांगितलें कीं हे माझें आहे. ऐश्वर्यवान इंद्रानें हें शिसें मला देऊन सांगितलें कीं देवतांनीं दिलेलें हे शिसें राक्षसांचा संहार करणारे आहे. याचा उपयोग करून तुम्ही आपली इच्छा पूर्ण करा. हे शिसे राक्षस आणि पिशाच्च यांना बंधन करणारे आहे. राक्षस आणि पिशाच्च यांच्या उपद्रवाचा मी धिक्कार करतो. हे राक्षसानों आणि पिशाच्चानों, आमच्या गायी, अश्व आणि आमचा परिवार यांना तुम्ही त्रास दिलांत तर मी शिशाच्या साहाय्यानें तुम्हाला ठार करीन (या ठिकाणीं 'सीस' असा शब्द केवळ शिसें या अर्थी नसून शिश्याची गोळी या अर्थी आहे. या गोळीला वेग दिल्यास ती ज्या ठिकाणीं आदळते त्या ठिकाणी पसरट होऊन अधिक हानी पोहोचविते. उदा. बंदुकीच्या गोळ्या. म्हणजे वेदकालीं देखील अशा गोळ्या सोडणारे एखादे यंत्र असावें)

१७. **रुधिरस्रावनिवृत्ती–धमनीबंधन** (रक्ताचा स्राव होऊ नये म्हणून धमनी बांधून रक्त थांबवणें)

(ज्या ठिकाणाहून रक्तस्राव होत असेल त्या ठिकाणापासून हृदयाच्या बाजूला चार अंगुळे, धमनीवर पाण्यांत भिजवलेला आंगठा दाबून ठेवून या ऋचा म्हणाव्यात.)

अमूर्या यन्ति योषितो हिरा लोहितवाससः ।
अभ्रातर इव जामयस्तिष्ठन्तु हतवर्चसः ॥

तिष्ठावरे तिष्ठ पर उत त्वं तिष्ठ मध्यमे ।
कनिष्ठिक च तिष्ठति तिष्ठादिद्धमनिर्मही ॥
शतस्य धमनीनाम् सहस्त्रस्य हिराणाम् ।
अस्थुरिन्मध्यमा इमाः साकमन्ता अंरसता ॥
परि वः सिकतावती धनूर्बृहत्यक्रमीत् ।
तिष्ठतेलयता सुकम् ॥

या युवतीची लाल रक्त वाहून नेणारी नाडी (धमनी) स्थिर होऊन, त्यांतून वाहणारे रक्त खंडित होवो. भाऊ नसलेल्या बहिणी, पतीकडे न येतां पित्याच्या घरीं वास करतात त्याप्रमाणें या रक्तवाहिन्या आपल्या पित्याच्या घरीं (हृदयांत) स्थिर राहून रक्त न वाहून नेवोत. या शरीराच्या, खालच्या भागांत असणाऱ्या, वरच्या भागातील आणि मध्य भागातील धमन्या स्थिर होवोत. हृदयांतून निघणाऱ्या शंभर नाड्यांच्या सहस्त्रावधि धमन्या रक्त प्रवाह बंद करोत. मूत्राशय आणि उदरस्थ नाड्यांतून रक्त वाहाणें बंद होवो. हे धमन्यानों, तुम्ही तुमचा रक्तप्रवाह बन्द करा आणि जखमी माणसाला सुख प्रदान करा.

## १८. अलक्ष्मीनाश (दारिद्र्यनाश)

पुरुष अगर स्त्री यांच्या भालप्रदेशीं असलेली दारिद्र्यचिन्हें पूर्णपणें नाहीशी होवोत. शरीरांत स्थिरावलेला शत्रू ज्याप्रमाणें शरीराची हानी करतो म्हणून आम्ही त्याचा त्याग करण्याचा प्रयत्न करतो त्याप्रमाणें आमच्या शरीरांत असलेली दुर्भाग्य लक्षणे दूर जाऊन आमच्या संततीच्या उत्कर्षासाठीं सुलक्षणें त्या ठिकाणीं वास करोत. सर्वांना कार्यप्रेरणा देणारा सविता, वरुण आणि अर्यमा या देवता आमचे हात आणि पाय यांमध्यें असलेलीं असौभाग्य चिन्हें दूर करोत. इच्छित फल देणारी शुभ लक्षणें स्थिर होवोत. देवतांनीं आम्हाला सौभाग्य चिन्हें धारण करण्याची प्रेरणा दिली आहे. हे पुरुषा तुझें मन, केंस आणि नेत्र यांमध्यें जी अशुभ चिन्हें आहेत ती या मंत्रानी नाहीशी होवोत. सवितृ देव तुझें कल्याण करो. ललाटस्थानीं दुर्लक्षणें असलेली, हरिणाप्रमाणें किडकिडीत पाय, बैलासारखे दांत गाईप्रमाणें चालणारी आणि विकृत शब्द बोलणारी स्त्री ही दुर्लक्षणी असून या मंत्रानें ती तिची अभाग्य

लक्षणें दूर होवोत.

**१९. शत्रुनिवारण** (शत्रूपासून संरक्षण)

मंत्र-सामर्थ्यासहित चारही बाजूनीं आमच्यावर आघात करण्यासाठीं सोडलेले शत्रूचे बाण आमच्या सन्निध न येवोत. ऐश्वर्यसंपन्न इंद्रा, आमच्यावर सोडलेल्या शत्रूच्या बाणांचा झोत आमच्यापासून दूर राहो. जे बाण सोडलेले आहेत, जे सोडले जात आहेत, असे चारही बाजूंकडून आमच्याकडे येणारे बाण लांब जाऊन पडोत. आमची दिव्य अस्त्रें आणि बाण शत्रूला हतबल करोत. आम्हाला कोणी अंकित करण्याची इच्छा केली तर संहारक रुद्राने आपल्या बाणानीं त्याला विद्ध करावें. अकारण आमचा द्वेष करणाऱ्या शत्रूचा सर्व देव नाश करोत. आमचे मंत्र आमचे संरक्षण करणारे कवच होवोत. आम्हाला कोणी शाप दिला असेल तर आमचे मंत्र त्यांपासून आमची मुक्तता करून आमचें रक्षण करोत.

**२०. शत्रुनिवारण** (शत्रूपासून संरक्षण)

हे सोमा, आमचा शत्रू आपच्या स्त्रीला कधीही प्राप्त न होवो. हे मरुतानों, आम्ही जो यज्ञ करीत आहोंत त्या योगें आम्हाला सुख प्राप्त होवो. या यज्ञानें आम्हाला प्राप्त झालेल्या तेजानें दिपून जाऊन आमचा शत्रू आमच्या समोर न येवो. आम्हाला दुष्कीर्तीचा डाग न लागो. कोणत्याही पापकर्माकडे आमची वृत्ती न वळो. हे वरुणा आमच्या शत्रूनें आमच्यावर सोडलेली शस्त्रें आणि अस्त्रें आमच्यापासून दूर राहोत. आम्हाला ठार मारण्याच्या इच्छेनें आमच्या शत्रूनें सोडलेली अस्त्रें आमच्यापासून दूर राहतील असे कर. आमच्याजवळ असलेल्या शत्रूनें सोडलेली अस्त्रें मला ठार करण्याच्या उद्देशानें येत आहेत त्यांना तूं जाळून टाक. हे वरुणा, तीक्ष्ण शस्त्रास्त्रें आमच्यापासून दूर ठेव. हे इंद्रा तूं सर्वांचा शासक आणि सर्वश्रेष्ठ आहेस. तुझा कधीही पराभव होत नाहीं परंतु तूं मात्र सर्वांना पराजित करतोस. अशा इंद्राच्या उपासकाला देखील त्याच्या शत्रूपासून पराभव सहन करावा लागत नाही. तो मारला जात नाही. इंद्राच्या कृपेनें सर्व शत्रूवर आम्ही विजय प्राप्त करूं.

**२१. शत्रुनिवारण** (शत्रूपासून संरक्षण)

अविनाशी, मंगल फळ प्रदान करणारा, प्रजास्वामीं, मेघांना वृष्टि

करायला लावणारा, शत्रूंचा पराभव करणारा, प्राणिमात्रांचा नियंता आणि सोमप्राशक इंद्र संग्रामात आम्हाला अभय प्रदान करो. हे इंद्रा, आमचा जय व्हावा म्हणून आम्ही शत्रूला ठार मारलें. सैन्यासह आमच्यावर आक्रमण करणाऱ्या शत्रूला तूं थोपवून धर. जो शत्रू आमचें धन आणि क्षेत्र हिरावून घेण्याची इच्छा करतो त्याला अंधःकारमय गुहेंत बंद कर. हे वृत्रनाशका इंद्रा, तूं राक्षसांचा संहार कर. आमचें अकल्याण इच्छिणाऱ्या शत्रूला ठार कर. हे इंद्रा, आम्हाला सर्वोत्तम सुख तूं प्रदान कर. शत्रूच्या अस्त्रांना आमच्यापासून बाजूला कर. आमचा द्वेष करणाऱ्या शत्रूचें मन नाहीसें कर आणि आम्हाला मारण्याची इच्छा करणाऱ्या शत्रूला तूं तुझ्या आयुधांनीं नष्ट कर.

**२२. हृद्रोग नाश-** (हृदयरोगाचा नाश)

अनु सूर्यमुदयतां हृद्द्योतो हरिमा च ते ।
गो रोहितस्य वर्णेन तेन त्वा परि दध्मसि
परि त्वा रोहितैर्वर्णैर्दीर्घायुत्वाय दध्मसि
यथायमरपा असदथो अहरितो भुवत्
या रोहिणीर्देवत्याः गावो या उत रोहिणीः ।
रूपंरूपं वयोवयस्ताभिष्ट्वा परि दध्मसि

शुकेषु ते हरिमाणं रोपणाकासु दध्मसि ।
अथो हारिद्रवेषु ते हरिमाणं नि दध्मसि

हृदय रोगानें व्याप्त झालेल्या पुरुषानें स्वतः खालील प्रमाणे प्रयोग करणें आवश्यक आहे. सूर्योदयापूर्वीं शुचिर्भूत होऊन हिरव्यागार वृक्षांच्या सान्निध्यांत सूर्याचे किरण सूर्योदयापासून २४ मिनिटेंपर्यंत अंगावर पडतील अशा तऱ्हेनें निसर्गाला आपलें कमरेपासून वरचे शरीर आच्छादित न होतां दिसेल असें करावें. गाईच्या दुधाशिवाय अन्य आहार नाही. या प्रमाणे उगवत्या सूर्याचे किरण अंगावर घेऊन खालील चार

ऋचांचा अनेक वेळा पाठ करावा.

हृदयामध्ये होणारी जळजळ आणि अति कामोपभोगामुळे शरीराला आलेले फिकेपण सूर्याकडे जावो. या शरीरांतील हरित्वर्ण (वीष) बाहेर निघून जावो आणि गाईच्या रक्ताप्रमाणें तांबडा वर्ण या शरीराला प्राप्त होवो. हे रुग्णा, जणू गाईच्या रक्ताने मी तुला आच्छादून टाकल्याप्रमाणें तूं रोगरहित व पापरहित हो. देवांची लाल रंगाची कामधेनु आणि पृथ्वीवर रक्तवर्ण गाय मला यौवनानें आच्छादून टाको. त्यामुळें शरीरांत स्वस्थता प्रस्थापित होईल. तुझ्या शरीरांतील हरित्वर्ण पोपट आणि गोपीतनक नांवाच्या पक्ष्यांच्या रंगांत मिसळून जावो.

**२३. श्वेतकुष्टनाश**– (पांढरें कोड नाहीसे करणें)

हळद, रामभंगर आणि इंद्रवारुणि या रात्रीच्या वेळीं पुष्ट होणाऱ्या औषधीं आणि नील नामक औषधी कुष्ठ रोगाने विकृत झालेलें अंग आपल्या रंगासारखे करतात. हे औषधी वनस्पते, तूं श्रेष्ठ आहेस. तूं या कुष्ठ रोगाला दूर कर आणि शरीराला तांबूस रंग लाभू दे. तूं एकदां या पांढऱ्या डागांना दूर केलेस की पुन्हा त्यांचा स्पर्श या शरीराला होणार नाही असें कर. हे नील नामक वनस्पते, तूं ज्या ठिकाणाहून उत्पन्न होतेस ते स्थान काळें आहे इतकेच नव्हे तर ज्याला स्पर्श करतेस त्यालाही काळे करतेस. हे असितवर्णा औषधी, तूं पांढरे डाग अगर शरीराला आलेला पांढरेपणा दूर करतेस. हा कुष्ठ रोग हाडामध्यें मुरलेला, हाड आणि त्वचा यांमध्यें असलेल्या मांसांत मुरलेला असला आणि त्यामुळें शरीरावर पांढरे डाग आले असतील तर ते देखील या मंत्राच्या प्रभावानें दूर होतील.

**२४. श्वेतकुष्ट नाश**– (पांढरे कोड नाहीसे करणें)

हे औषधे, प्रथमतः सुंदर पंख असलेल्या गरुडाच्या शरीराचा तूं एक भाग होतीस परंतु या आसुरी मायेनें गरुडावरोबर युद्ध करून तो भाग जिंकून घेतला आणि त्याला औषधाचें रूप दिलें. ते रूप नील आदि वनस्पतीमध्यें स्थित झालें. या मायेने माणसाच्या शरीरावरील कोड नाहीसें करणारी औषधी म्हणून तिचा उपयोग करून कोड दूर केलें आणि त्या रुग्णाची त्वचा सामान्य माणसाप्रमाणें केली. हे औषधरूप

स्त्रिये, तुझ्या मातेचा पित्याचा आणि तुझा सारखाच रंग होता. त्यामुळें जो जो तुझ्या सान्निध्यांत आला त्याचा रंग तूं तुझ्याप्रमाणें केलास. त्यामुळें कोडाचा रोगी तुझ्या सान्निध्यांत आला तर त्याचे डाग नाहीसे करून तूं तुझ्या रंगाप्रमाणें त्याची त्वचा करतेस. श्यामलवर्णा आणि कुष्टरोग निवारक औषधे तुला या आसुरी मायेनें पृथ्वीवर उत्पन्न केलें. तूं या कुष्टरोगी लोकांचे अंग सामान्यांप्रमाणें कर.

**२५. ज्वरनाशन**– (ताप नाहीसा करणें)

ज्या तापामुळे जीवन असह्य होतें तो ताप यज्ञामध्यें ज्या अग्नीला हविरन्न देऊन उपासना केली जाते तो अग्नि या तापाचें जन्मस्थान आहे. जीवन असह्य करणाऱ्या तापा, तुझ्यावर शिंपडलेल्या पाण्यानें आमचें शरीर सोडून अग्नीच्या बरोबर तूं बाहेर जा. दुःखमय जीवन निर्माण करणाऱ्या तापा, तूं उष्णतामय, शरीर नाश करणारा, आणि अग्नीतून उत्पन्न झालेला असून पुरुषांचें शरीर तूं पांढरे करतोस. त्यामुळें तुला 'कुहू' म्हणतात. आम्ही तुझ्यावर उष्ण पाण्याचें सिंचन करीत आहोत. तूं हे शरीर सोडून अग्नीकडे जा. शरीर तप्त करून कष्ट देणाऱ्या, वरुणाचा पुत्र असणाऱ्या आणि शरीरांत पित्त निर्माण करणाऱ्या तापा, उष्ण पाण्यानें अभिंसिचन केलेल्या शरीराचा तूं त्याग कर. कष्ट देणाऱ्या तापाला माझा नमस्कार असो. तूं रोज किंवा पाठोपाठ एक दिवस आड येणारा आहेस. तुला नमस्कार असो.

**२६. शर्मप्राप्ती** (आनंद प्राप्ती)

हे देवतानों, शत्रूनें आमच्यावर सोडलेली अस्त्रें आणि फेकलेले दगड किंवा यंत्राच्या साह्यानें फेकलेले मोठे पाषाण आमच्यापासून दूर जाऊन पडोत. आकाशात तळपणारा सूर्य आणि सूर्याच्या प्रभावामुळें पृथ्वीकडे वेगानें येणारा पर्जन्य, आमचे मित्र होवोत. हे वरुणा, सूर्याप्रमाणें तूं तेजस्वी आहेस. तुम्ही आम्हाला सर्व प्रकारचें सुख प्रदान करा. हे इंद्रादि देवतांनों, शत्रूच्या त्रासापासून आमचें रक्षण करून आम्हाला सुख प्रदान करा. आमची अनिष्टें आणि अरिष्टें दूर करून आम्ही आणि आमचा परिवार तुम्ही सुखी करा.

**२७. स्वस्त्ययन** (शुभ निवास लाभ)

नागलोकांमध्यें राहाणाऱ्या एकवीस जातींच्या सर्पांच्या साहाय्यानें दुसऱ्याचें अकल्याण करण्याचा विचार करणाऱ्या शत्रूंचे नेत्र आम्ही आच्छादित करतो म्हणजे त्यांना कांहींही दिसणार नाहीं. शिवधनुप्रमाणें शत्रूंचा निःपात करण्याचे सामर्थ्य असलेली आमची सेना युद्धामध्ये चारही बाजूंनीं पुढे जाईल आणि शत्रूचा राजा आणि त्याचा खजिना आपल्या ताब्यांत घेईल. शत्रू आमच्यासमोर येणार नाही. शत्रूचे चतुरंग सैन्यदेखील आमचा पराभव करूं शकणार नाहीं. त्यांचे ऐश्वर्य नाहीसे होईल. हे श्रेष्ठ वीरांनों, तुम्ही तुमच्या ठरलेल्या ठिकाणी त्वरेने जा. तुम्हाला जी इच्छा असेल ती इच्छा पूर्ण करणाऱ्या पुरुषांप्रत तुम्ही जा. आमचें सैन्य शत्रूपर्यंत पोहोचल्यावर देवी इंद्राणी त्या सेनेचे सर्व बाजूंनीं रक्षण करील.

**२८. रक्षोघ्नम्** (राक्षसी बुद्धीच्या लोकांचा विनाश करणें)

राक्षसांचा नाश करणारा व स्वर्गामध्यें निवास करणारा अग्नि, कठोर वाणीनें त्रास देणाऱ्या, हिंसक, दुसऱ्याचें उणेपण पाहून त्याला पीडा देणाऱ्या आणि उद्वेगकारक राक्षसांना भस्मसात करून या महापुरुषाजवळ आगमन करीत आहे. हे अग्ने, दुसऱ्याच्या उणेपणामध्यें आनंद मानणाऱ्या पीडाकारक राक्षसांना आणि पिशाच्चांना तूं भस्म करून टाक. प्राणिमात्रांचें अकल्याण करणाऱ्या राक्षसींना देखील तूं जाळून टाक. जी राक्षसी हिंसा करण्याची इच्छा ठेवून सतत पापकर्म करते, कठोर वाणीनें दुसऱ्याला इजा होईल असे बोलते आणि पुत्र-पौत्रादि संतती, त्याचे रूप, अन्न, आणि त्यांचे सामर्थ्य हरण करते, आमच्या परिवारांतील बालकें, बालिका आणि पुरुष यांना खाण्यासाठी पुढें सरसावते, भक्षण करते ती राक्षसी आपले केंस ओढून मृत्यूशी झुंजत असतांना मृत्यूच्या स्वाधीन होवो किंवा आपसांत युद्ध करतां करतां जीवनशून्य होवो.

**२९. राष्ट्राभिवर्धन** (राष्ट्राचा विकास)

हे ब्रह्मणस्पते ज्या समृद्धिदायक कर्मांचा इंद्र आश्रय करतो त्या महान कर्मांनीं राष्ट्राचा विकास कर. अश्व, गज, वगैरे ऐश्वर्यासह हे

राष्ट्र समृद्ध कर. हे श्रेष्ठानों, आमच्या शत्रूंना तुम्ही पराजित करा. आमचे अनेक प्रकारचे शत्रू आहेत. त्यांचा रणक्षेत्रांत पराभव करा. जीवांना आपल्या कर्तव्याची प्रेरणा देणाऱ्या सवितृ देवानें तुम्हाला ऐश्वर्यवान केलें आहे. चंद्रानें तुमच्या बुद्धीचा विकास केला आहे. सर्व लोक राष्ट्राची वृद्धि करतात. हे राष्ट्र ज्यांना धारण करते ते त्याची प्रशंसा करतात. सर्व प्राणिमात्रांना प्रेरणा देणारा आदित्य आहे. शत्रूचा संहार करणारी मंत्ररूप वाणी प्रकट झाली आहे. विविध प्रकारचें सामर्थ्य धारण करणारा शत्रूचा पाडाव करतो. आदित्य आणि मंत्र एक होतांच हें सामर्थ्य प्रकट होतें: तुझ्या कृपेनें राष्ट्राचें संवर्धन होऊन प्रजेला इच्छित फलाची प्राप्ती होईल. प्रजेला यातना देणारा शत्रू पराभूत होऊन राज्याचें उत्तम प्रकारें शासन होईल.

३०. **दीर्घायुः प्राप्ति** (दीर्घायुष्याचा लाभ)

हे इंद्रा, विश्वेदेव, वसुगण, आणि अन्य देवतानों ज्यांना दीर्घायुष्याची इच्छा आहे त्यांची ती इच्छा तुम्ही पूर्ण करा. हे ब्रह्मदेवा आणि अयर्मा, तुम्ही त्यांच्या इच्छा पूर्ण करा. अशा पुरुषाचा कोणताही शत्रू त्याला त्रास देणार नाहीं असें करा. इतकेंच नव्हे तर त्याची कोणी हिंसा करणार नाहीं असेंही पाहा. हे देवतानों, तुमचे पितर आणि पुत्र आपल्या या प्रार्थनेकडे ध्यान देवोत. उत्तम श्वासोच्छवास करतां यावा म्हणून अशा पुरुषाला वायूच्या स्वाधीन करा. वायु सर्व आपत्तींतून त्याचे रक्षण करो. समस्त देवानों, संसारी लोकांवर उपकार करण्यासाठीं तुम्ही स्वर्गलोकांत वास करतां तर अग्नि या पृथ्वीवर निवास करतो. वायू अंतरीक्षांत राहातो. औषधी आणि गायी वगैरे पशुधन प्रिय असणाऱ्या देवतांनो, तुम्ही मनुष्यमात्राचें आयुष्य वृद्धिगत करा आणि त्याच्या मृत्यूला कारण होणाऱ्या ज्वरादि रोगांना शंभर वर्षेंपर्यंत दूर ठेवा. ज्या अग्नीच्या उपासनेच्या निमित्तानें यज्ञयागादि केले जातात, त्या यज्ञामध्यें ज्या देवतांना हवि देण्यांत येतात अशा इंद्रादि देवता, अग्नीच्या शिवाय अन्यत्र पडलेले हविरन्न भक्षण करणाऱ्या देवता आणि दिशांचे स्वामी, दीर्घायुष्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांना, दीर्घायुष्य प्रदान करून आपल्या सान्निध्यांत ठेवोत.

३१. **पाशमोचन** (बंधमुक्तता)

सर्व प्राणिमात्रांचा रक्षणकर्ता, अमृतत्वाचा स्वामी इंद्र, आणि चार दिशांचे पालक यांच्यासाठीं या यज्ञामध्यें आम्ही मंत्रयुक्त आहुती देत आहोत. हे इंद्रादि देवतानों, आम्हां मनुष्यमात्रांना त्रास देणारी पाप-देवता निर्ऋतीच्या मरणपाशांतून आमचें रक्षण करा. हे कुबेरा, इच्छित धनाची प्राप्ती व्हावी म्हणून आम्ही तुला हवि प्रदान करीत आहोत. चार दिक्पालांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस. तूं आम्हाला सुवर्णादि धन प्रदान कर आणि आम्ही दिलेल्या हवींनीं प्रसन्न हो. आमचे माता-पिता, गोधन, आणि अन्य सांसारिक परिवार सुखानें कालक्रमणा करो. आमचे माता-पिता बुद्धिवान, ज्ञानवान, आणि सर्व प्रकारच्या धनानीं समृद्ध होवोत. त्याचप्रमाणें आम्ही देखील शंभर वर्षेपर्यंत या सूर्याचें दर्शन घेत राहूं असें दीर्घायुष्य तूं आम्हाला प्रदान कर.

३२. **महत्‌ब्रह्म** (ब्रह्माचें स्वरूप)

हे ज्ञानवान श्रेष्ठानों, या वस्तूचें ज्ञान तुम्ही करून घ्या. या वस्तूला ब्रह्म अशी संज्ञा आहे. हे जलरूप आहे. तें पृथ्वीवर राहात नाही अंतरीक्ष किंवा द्यु-लोकांत देखील राहात नाही. या जलाच्या प्रभावामुळें, कौशिक ऋषींच्या ज्ञानांतून निर्माण झालेल्या या औषधी आणि अन्य वर्धनशील औषधी जिवंत राहातात. या औषधींचें कारण स्थान, पाणी, आकाश आणि अंतरीक्षाचा मध्य यांमध्यें आहे. अंतरीक्षांत यक्ष आणि गंधर्व यांचेही निवासस्थान आहे. या ठिकाणीं असणारें पाणी स्थावर आणि जंगम वस्तूंचें आश्रयस्थान आहे. ब्रह्मदेव आणि अन्य देवतांना तरी याचे ज्ञान आहे कीं नाही याची वानवाच आहे. हे आकाश आणि पृथ्वी, हे जल केवळ तुमच्यामुळें उत्पन्न झालें आहे. पाणी नित्य चंचल आहे. सागराच्या दिशेनें धांव घेणाऱ्या नद्या सदैव या पाण्यानें भरलेल्या असतात. आकाश हें या विश्वाचें झांकण आहे. पृथ्वीचा आश्रय करणारें विश्व, द्युलोकांतून पर्जन्याची अपेक्षा करतें. या वृष्टीच्या कारणानें निर्माण होणारें धान्य, आणि विश्वाचा आश्रय

म्हणून भासमान होणारें आकाश या सर्वांना मी प्रणाम करतो.

३३. आपः (पाणी)

(मेघांतून निघालेलें परंतु पृथ्वीचा स्पर्श होण्यापूर्वी शंभर हातांवर असलेल्या पाण्यास आप अशी संज्ञा आहे. distilled water असा आंग्ल शब्द आहे)

हिरण्याप्रमाणें गुणवान, पवित्र, सूर्यापासून उत्पन्न झालेलें, मेघांतून पडणारें, समुद्रामध्यें असणारे, ज्याच्यामध्यें विद्युत् आणि वडवानल नांवाचा अग्नि आहे, ज्या पाण्यांच्या गर्भांत अग्नि सूक्ष्मरूपानें राहातो अशा सर्व प्रकारचें पाणी आमची रुग्णता नाहीशी करून आम्हाला सुख प्रदान करो. पापी लोकांना नियंत्रित ठेवणारा आणि मानवाच्या सत्यासत्य कर्मांचे निरीक्षण करणारा वरुण मनुष्याचें पाश स्वतःकडे घेऊन उत्तम फल प्रदान करतो. ज्या पाण्यामध्यें सूक्ष्मरूपानें अग्नि वास करतो तें पाणी आम्हाला त्याच्या स्पर्शानें सुख आणि शांति प्रदान करो. ज्या जलाचा अंश सोमरसांत भरलेला आहे त्या सोमाचा उपभोग स्वर्गांतील इंद्रादि देव घेतात. जें पाणी अंतरिक्षांत राहातें आणि ज्या पाण्यांत विद्युत्‌रूपी अग्नि गर्भरूपानें सदैव वास करतो तें पाणी आम्हाला आपल्या स्पर्शानें शांत करो. हे जलदेवतानों, तुम्ही तुमच्या क्रूरताशून्य नजरेनें आमचें अनिष्ट न चिंतणाऱ्याकडे पाहा आणि आपल्या शरीरस्पर्शानें आम्हाला आनंद प्रदान करा. अग्निगर्भ आणि अमृतवर्षक उदक आम्हाला शांतता प्रदान करो.

३४. मधुविद्या (मधुमयता निर्माण करणें)

मधुरसयुक्त वृद्धिगत होणारी ही वेल मधुमय पृथ्वीवर जन्मली. ती स्वभावतः मधुमयी आहे. हे लते तुझ्या मधुर रसाचा मी आस्वाद घेत आहे. तूं आम्हाला मधुर रस प्रदान कर. हे मधुलते, पुष्प ज्याप्रमाणें मधुगर्भ असते त्याप्रमाणें माझ्या जिभेचें टोंक मधुर रस चाखणारें आहे. तूं माझें शरीर आणि माझ्या सर्व क्रिया मधुरतेनें व्यापून टाक. हे मधुलते, तुझ्यामुळें माझी जवळच्या आणि दूरच्या परिसरांतील सर्व कार्यें मधुर फळ देणारी होवोत आणि मी सर्वांचा आवडता होवो. माझ्या

सान्निध्यांत मी सर्वांना आवडतो. मधुर रसानें भरलेला झाडाचा भाग सर्व लोक आनंदानें सेवन करतात त्याप्रमाणें तुझ्या आस्वादामुळें मी सर्वांचा आवडता होईन. हे भार्ये, सर्वत्र पसरलेल्या मधुतेचा, द्वेषशून्य मधुमयतेचा उपभोग घेण्यासाठीं मी तुझा स्वीकार केला आहे. तूं माझा त्याग करून अन्यत्र जाण्याची इच्छा न करतां माझ्याच सान्निध्याची इच्छा करतेस त्यामुळें मी तुझ्याजवळ आलों आहे.

## ३५. दीर्घायुः प्राप्ती (दीर्घ आयुष्याचा लाभ)

हे पुरुषा, तूं दीर्घायुष्याची इच्छा करणारा आहेस. तुझें आयुष्य वाढविण्यासाठीं तेज आणि वलाच्या प्राप्तीनें तुला शतायुष्याचा लाभ होईल. पूर्वी दक्ष गोत्रांत उत्पन्न झालेल्या ऋषींनीं शतानीक नांवाच्या राजाला हिरण्यानें वद्ध केलें होतें त्याप्रमाणें मी देखील तुला त्या हिरण्यानें वद्ध करीत आहे. हिरण्य धारण करणाऱ्या पुरुषाला ज्वरादि रोग त्रास देत नाहींत. मांस भक्षण करणारीं पिशाच्चें त्याला पीडा करीत नाहींत. नीलमणियुक्त सुवर्ण इंद्रादि देवांपासून प्रथम उत्पन्न झालें. शरीराला वलवान करणारा आणि तेजसंपन्न करणारा हा आठवा धातु आहे. हा धातु राक्षसांचा नाश करतो म्हणून याला दाक्षायण असेही म्हणतात. जो कोणी हा धातु धारण करतो त्याला राक्षसाकडून त्रास दिला जात नाही अगर राक्षस त्याला ठारही मारीत नाहींत. त्यामुळें त्याला शतायुष्याचा लाभ होतो. पाण्याची आर्द्रता, सूर्य आणि चंद्र यांचें तेज, इंद्राची ओजस्विता, वल, वीर्य, वगैरे सर्वांचा लाभ हें हिरण्य धारण करणाऱ्या पुरुषाला होतो. इंद्राचें सामर्थ्य ज्याप्रमाणें इंद्राजवळ असतें त्या प्रमाणें हिरण्य धारण करणाऱ्या पुरुषाचें सामर्थ्य त्यालाच लाभतें. म्हणून हे पुरुषा तूं नीलमणियुक्त सुवर्ण धारण कर. हे पुरुषा, सर्व प्रकारच्या ऐश्वर्य प्राप्तीची तूं इच्छा करतोस. तुला मी सर्व ऋतूंमध्यें समृद्ध करतो. अनेक वर्षें तुझ्याजवळ राहणारे गाई वगैरे पशू आणि मी तुला धनधान्यादिकांनीं समृद्ध करतो. अन्य सर्व देवतांच्या वरोवर इंद्र आणि अग्नि आमच्या उणीवांवर न रागावतां त्या भरून काढण्यासाठी, सुवर्ण धारणानें प्राप्त होणारें फळ आम्हाला प्रदान करोत.



# द्वितीय काण्ड

## १. परमं धाम (सर्वश्रेष्ठ निवासस्थान)

सत्य आणि ज्ञानमय लक्षणांनीं नटलेल्या परब्रह्मामध्यें हे विश्व एकरूप होऊन राहातें. या ब्रह्माचें ज्ञान सूर्याला आहे. या भौतिक जगापेक्षां निराळें आणि शक्तीसंपन्न असें या सूर्याचें रूप आहे. तो अनेक रूपांनीं प्रकट होतो. उत्पन्न झालेली प्रजा या सूर्याला जाणते आणि त्याची मनापासून स्तुती करते. अत्यंत दीप्तिमान सूर्य हृदयरूपीं गुहेंत राहतो आणि परब्रह्माच्या उपासकांना मदत करतो. या ब्रह्माचे तीन पाद गुह्य असून त्यांचे ज्ञान केवळ सत्याच्या ज्ञानमार्गानेंच प्राप्त होतें. ब्रह्मज्ञ सूर्य आमचा पालनकर्ता आणि पोषणकर्ता आहे. आम्हाला तोच जन्म देतो आणि प्रसंगी तोच आमचा बंधूही होतो. केलेल्या फळांचा म्हणजेच स्वर्गादि लोकांचा तो ज्ञाता आहे. सर्व- (सातही) लोकांचे ज्ञान त्याला आहे. ज्या परब्रह्माचें वर्णन केलें जातें ते परब्रह्म इंद्र, अग्नि वगैरे रूपानें आणि नावानें प्रकट होतें. आकाश पृथ्वी- आणि संपूर्ण विश्वाचें मला ज्ञान प्राप्त झालें. सत्य आणि अनंत ब्रह्मातून निर्माण झालेलें सूत्र ज्याप्रमाणें संसारी जगाला व्यापून टाकतें त्याप्रमाणें मी या विश्वाच्या ज्ञानानें भरून गेलो आहे. वक्त्यामध्यें वाणी ज्या प्रकारें प्रकट होते त्याप्रमाणें उपासकामध्यें हे विश्व गोचर होतें. तत्त्वज्ञान प्रकट होऊन सर्वांना ते आकलन करतें. इंद्रादि देवता ज्या परब्रह्मामध्यें लीन होतात आणि विविध वृत्तींच्या अस्तित्वानें परमानंदाचा उपभोग

घेणारीं इंद्रियें ज्या परब्रह्मामध्यें एकरूप होऊन जातात त्या ब्रह्माचें ज्ञान व्हावें म्हणून सर्व लोकांतून त्यांनी भ्रमण केलें.

**२. भुवनपति** (निवासस्थानाचा स्वामी)

पवित्र पाणी आणि आश्चर्यकारक शक्ती असलेला सूर्य, वृष्टीच्या योगानें पृथ्वीचें पोषण करीत असल्यानें तो तिचा स्वामी आहे. पृथ्वीवरील प्रजेलादेखील तो पुष्ट बनवतो म्हणून सर्व प्रजा त्याची स्तुती करते. हे दिव्य गंधर्वा, तुझा गौरव करून तुला मी हवि प्रदान करीत आहे. माझा तुला नमस्कार असो. जो गंधर्व सूर्यासारख्या दीप्तिरूपानें आकाशांत स्थिर राहतो, जो या लोकांचा स्वामी आहे, लोकांना जो देवांच्या क्रोधापासून दूर ठेवतो आणि त्यांना सुख प्रदान करतो तो गंधर्व आम्हालाही सुख प्रदान करो. सूर्याच्या दीप्तिशलाका रूपी अप्सरा सूर्यरूपीं गंधर्वाच्या नेहमी बरोबर असतात. या अप्सरांचें स्थान समुद्रोप नामक सूर्य आहे. सूर्योदयाच्या वेळीं सूर्याचे किरण प्रथम येतात आणि सूर्यास्ताच्या वेळीं ते किरण सूर्यामध्यें मिळून जातात. चंद्रासहित प्रकाशवान असलेल्या नक्षत्रानों आम्ही तुम्हाला नमस्कारपूर्वक हवि देत आहोत. लोकांना मोहांत पाडणारी, त्यांना उपद्रव देणारी, लोकांना भुरळ पाडणारी गंधर्वपत्नी अप्सरेला आम्ही नमस्कारपूर्वक हवि अर्पण करतो.

**३. आस्रावस्य भेषजम्** (शरीरांतील घाण वाहून नेणारें औषध)

मुंज नांवाचें गवत व्याधी दूर करणारे आहे. महान पर्वताच्या उतारणीवर निर्माण होणाऱ्या या गवताचा अग्रभाग औषधी आहे. हे मुंज नामक तृणा, तूं अत्यंत प्रभावी औषध असल्यानें व्याधी दूर करण्यासाठीं लोक तुझी योजना करतात. हे औषधी, अतिसारादि रोगांनां तूं दूर कर. गवताच्या जातीमध्यें ज्या औषधी आहेत त्यामध्यें तूं सर्वोत्तम आहेस. तूं अतिमूत्रस्राव, अतिसार, आणि एखाद्या जखमेतून होणारा मोठा रुधिरस्राव यांना थांबविणें अगर नाहीसें करण्यास समर्थ आहेस. असुर तुला खणून नाहीशी करतात तर तूं त्यांच्यासह रोगाचें मूळ नाहीसें करतेस. शरीरावर असुरांनी केलेल्या व्रणातून येणारे रक्त

ही औषधी थांबविते आणि व्रण नष्ट करते. या औषधींच्या मुळाशीं असलेली ओली मातीसुद्धा औषध बनून या रोगांचा उद्भव नाहीसा करते. शेतांतील माती व्रणादि रोग नाहीसे करणारी आहे. या औषधांचा प्रयोग करून निर्माण केलेलें पाणी रोगांना नाहीसे करणारे आणि सुख प्रदान करणारे आहे. रोग उत्पन्न करणाऱ्या कारणांचा इंद्राचे वज्र नाश करो. राक्षसांकडून मनुष्यमात्रांवर सोडलेले रोगरूप अस्त्र अन्यत्र जाऊन पडो.

(शेतांतील वस्त्रगाळ माती ओली करून पोटावर लेप दिला तर पोटांतील अनेक व्याधी दूर होतात. शरीरांतून घामाच्या द्वारें घाण निघून जाते त्या शरीराला शेतांतील वस्त्रागाळ माती ओली करून अंगाला लावून स्नान केल्यास शरीर स्वच्छ होतें आणि रोग दूर होतात. अर्थात सध्या शेतांत घातलेल्या रासायनिक खतामुळें मात्र ही माती निरूपयोगी आहे. कारण त्या मातीच्या योगानें रोग दूर व्हायच्या ऐवजी शरीराची त्वचा विकृत होईल. म्हणून ज्या ठिकाणी खत घातले जांत नाहीं अशी डोंगर उतरणीची माती अधिक उपयुक्त. सावणापेक्षां मातीनें शरीर अधिक स्वच्छ होऊन सतत ताजें राहतें.)

**४. दीर्घायुः प्राप्तिः** (दीर्घायुषाचा लाभ)

आम्हाला दीर्घायुष्य प्राप्त व्हावें म्हणून हिंसात्मक कर्माच्या त्यागासाठीं राक्षसांचे आक्रमण थांबविण्यासाठीं आणि शरीराला लाभणारी व्याधी दूर करण्यासाठीं जंगिड नांवाच्या वृक्षाच्या बियांची माळ आम्ही शरीरावर धारण करतो. हे जंगड वृक्षाचे मणि हिंसाचारी राक्षसांच्या शरीराचे तुकडे करण्यास समर्थ आहेत. त्यामुळें आमचें संरक्षण होतें. हे मणि दुसऱ्यानें निर्माण केलेल्या उपद्रवांना विरोध करून त्यांचा नाश करतात. सर्व रोगांचा निरास करणारे आणि औषधीगुणयुक्त हे मणि आमचे पापापासून रक्षण करोत. अग्नि वगैरे देवता मानवांना वैभव प्रदान करतात. या ऐश्वर्याच्या आड येणाऱ्या भूत, प्रेत, पिशाच्च आणि राक्षस हे ज्या ठिकाणीं भ्रमण करतात त्या स्थानी हे मणि त्यांना निष्प्रभ करतात. सूत्रांत गोविलेले जंगिड वृक्षाचे बीरूपी मणि आणि सन आमचे

रक्षण करणारे आहेत. यांपैकीं सन याची उत्पत्ती शेतांत येणाऱ्या एका पिकाच्या रसापासून आहे तर जंगड वृक्ष जंगलामध्यें निर्माण होतात. हे दोन्ही आमच्यावर येणाऱ्या विघ्नांचें निवारण करतात. अन्यांच्या दुष्कृत्यांमुळें होणारा त्रास आणि आमच्या अत्यंत वलवान शत्रूचा उपद्रव हे वी-रूपी मणि नाहीसा करून आमच्या आयुष्याची वृद्धि करतात.

५. इंद्रवीर्य (इंद्राचा पराक्रम)

हे इंद्रा, तूं ऐश्वर्यवंत आहेस. आम्हाला ज्याची इच्छा आहे ते तूं आम्हाला प्रदान कर. आपल्या हरिदाश्व जोडलेल्या रथाच्या साहाय्यानें तूं आमच्या यज्ञस्थानीं ये. गाळण्यांतून गाळल्याने शुद्ध झालेला आणि तुला प्रसन्न करणारा हा सोम तूं प्राशन कर. या सोमरसानें तुझें पोट भरेल. ह्या अमृतमय रसाच्या स्तुतीनें तुला स्वर्गीय आनंद प्राप्त होतो. इंद्रा, तूं सर्वांचा मित्र आणि शत्रूला आपल्या ताब्यांत ठेवणारा आहेस. तूं वृत्रासुराचा वध केलास. अनिवार्य झालेल्या मेघांना ताडण केलेंस. अंगिराच्या यज्ञामध्यें, गाईंना हरण करून नेणाऱ्या वल नांवाच्या असुराला तूं चांगलीच शिक्षा केलीस. केवळ सोम प्राशन केल्यावर तुला प्राप्त झालेल्या आनंदामुळेंच पराक्रम तुझ्या हातून घडले. हे इंद्रा, मुद्दाम तयार केलेला हा सोमरस तू आपल्या स्वाधीन ठेव. आम्ही ज्या वेळी तुला बोलावू त्या वेळी तू आमच्या यज्ञस्थानीं पदार्पण कर. तुझी स्तुती करण्यासाठी आम्ही उच्चारलेली वाणी तू ऐक आणि प्रसन्न हो. मित्र आणि मरुत् या तुझ्या मित्रांसहित सोम प्राशन करून तू तृप्त हो आणि आम्ही केलेल्या कर्माचें फळ आम्हाला प्रदान कर. हे इंद्रा तुझ्या पराक्रमाचें आम्ही वर्णन करीत आहोत. तू वृत्रासुराला ठार करून मेघांनाही दंड दिलास आणि त्यांच्यामध्ये लपवून ठेवलेलें पाणी मुक्त केलेस. हे पाणी पर्वतावर पडलें आणि नदीरूपाने वाहात आलें. वृत्रासुराचा पिता त्वष्टा याने इंद्रासाठी तीक्ष्ण वज्र निर्माण केलें. गाई ज्याप्रमाणें खालीं मुख करून चालतात त्याप्रमाणे पाण्यानी भरलेल्या नद्या समुद्राकडे नम्रपणें गमन करतात. इंद्र वृषाप्रमाणें वर्षाव करणारा आहे. त्यानें सोमरूपी अन्नानें प्रजापतीला आपलेसें केलें. यज्ञामध्यें त्याच्या समवेत

संस्कारित सोम प्राशन केला. त्यायोगें सामर्थ्यवान होऊन इंद्रानें आपल्या वज्राच्या साहाय्यानें हिंसक असुरांमध्यें उत्पन्न झालेल्या वृत्रासुराला ठार केलें.

**६. सपत्नहाग्नि** (शत्रुनाशक अग्नि)

हे अग्ने, वर्ष, ऋतु, मास, पक्ष आणि दिवस तुम्हाला समृद्ध करोत. पृथ्वी तुझें पोषण करो. तुझ्या दीप्तिमान शरीरानें चारही दिशा व्यापल्या गेल्या. हे अग्ने, तूं स्वतः दीप्तिमान असून लोकांच्या कामना पूर्ण करतोस. त्यांना प्रतिष्ठा मिळवून देतोस. तुझी सेवा करणारे हे ऋत्विज आणि यज्ञकर्ते यजमान आपल्या कार्यांत कोणतीही उणीव ठेवीत नाहींत. जो मनुष्य तुझा सेवक नाहीं त्याला यश प्राप्त होत नाहीं. यजमान आणि ऋत्विज तुझे खरे उपासक आहेत. हे अग्ने, तूं तुझ्या भक्तांवर रुष्ट होऊं नकोस. तूं आपल्या बळानें समृद्ध असून, मित्रांवर उपकार करणारा आणि त्यांचें पोषण करणारा आहेस. तूं सर्व प्रज्ञावंतांना सुख देणारा हो. निरनिराळ्या यज्ञामध्यें तुला आवाहन केलें जातें. आमचे विकृत आचार आम्हाला श्वानसूकरांच्या जन्माला घालतील. या आचारापासून आम्हांला तूं वाचव. देहाला शुष्क करणाऱ्या रोगांना दूर कर. पापाकडे वळणारी आमची बुद्धी चांगल्या मार्गाला वळव. आमच्या शत्रूची नगरें उद्ध्वस्त करून आम्हाला पुत्रपौत्र आणि धन प्रदान कर.

**७. शापमोचन** (शापाची निवृत्ति)

पाणी ज्याप्रमाणे शरीरातील सर्व प्रकारचा मळ धुऊन बाजूला टाकून देते त्याप्रमाणें पिशाच्यांपासून उत्पन्न होणारा अडथळा, ब्राह्मणाचा शाप वगैरेंना देवांनी उत्पन्न केलेल्या वीरुध नांवाच्या वनस्पती दूर करोत. शत्रूचें आक्रमण, ब्राह्मण शाप आणि बहिणीचा राग यांमुळें निर्माण होणारा दोष माझ्या पायाखालीं दबून जावो. खाली मुख सहस्रावधी कांडांनी वाढणाऱ्या दुर्वा आम्हाला सर्व प्रकारच्या शापा पासून मुक्त करोत. हे वनस्पते, तूं माझें, माझ्या मुलाबाळांचें आणि त्याबरोबर आमच्या धनाचे रक्षण कर. आमच्या शत्रूची भरभराट

होणार नाहीं त्याच प्रमाणे हिंसाचारी राक्षस आणि पिशाच्च आमची हिंसा करण्यास समर्थ होणार नाहींत असे कर. जो आम्हाला शाप देईल त्यालाच शाप बाधेल असे कर. आम्हाला अनुकूल असलेल्या पुरुषाकडून आम्हाला सुख प्राप्त होवो. आमच्याबद्दल दुर्बुद्धि ठेवणाऱ्या आणि आमच्यामागें आमची निंदा करणाऱ्या आमच्या शत्रूचे नेत्र जावोत आणि ते आंधळे होवोत.

**८. यक्ष्मकुष्ठनाशनम्** (क्षय आणि कुष्ठरोग यांचा नाश)

वाडवडिलांपासून प्राप्त झालेला क्षयरोग आणि अन्य रोगांचा पाश विचृती नामक मूळ नक्षत्राच्या उदयाबरोबर समूळ नष्ट होवो. उषेच्या उदयापूर्वी या शरीरांतील सर्व रोगांचा नाश होवो. सूर्य या रोगांचा नाश करतो. रोग निर्माण करणारी पिशाच्च दूर जावोत. या रोगावरील औषधी प्रभाववान होवो. हे रुग्णा अर्जुन वृक्षाची गांठ, गवताचे तुरे, मंजिरीसहित तुळस व तीळ या रोगाचे उच्चाटन करोत. शिवाय अन्य औषधीदेखील या शरीरांतील रोगाचें निर्मूलन करोत. हे औषधी, बैलांचा रोग तूं बरा करतेस त्या तुला, बैलांच्या मानेवर बसणाऱ्या जोखडाला, माती काढल्यानंतर तयार झालेल्या खड्ड्याला नमस्कार असो. ज्या घराची खिडक्या दारें जीर्ण झाली आहेत, अशा उदास वाटणाऱ्या घराच्या स्वामीला नमस्कार असो. हे औषधी तूं रोगांचा नाश कर आणि रुग्णाच्या शरीराला मुक्त कर.

**९. दीर्घायुः प्राप्ति** (दीर्घायुष्य लाभ)

हे औषधी, रोगरूपी राक्षसांनीं ग्रासलेल्या या पुरुषाला मुक्त करून तूं त्याचा उद्धार कर. तुझ्या प्रभावानेंच हा रोगी आपल्या रोगापासून मुक्त होऊन पुन्हा जीवन प्राप्त करूं शकेल. त्याला आपला व्यवसाय करतां येईल आणि पुत्रांचा तो पिता होईल. रोगामुळें विस्मृत झालेली विद्या त्याला पुन्हा प्राप्त होईल आणि त्याचा उद्धार होईल. हे औषधे तुझें हे सामर्थ्य इंद्रादी देव, वरुण, मित्र वगैरे देवता देखील जाणतात. अथर्वा नांवाच्या ऋषीनीं या औषधांची उत्पत्ती केली. ते या रोगाचा समूळ नाश करोत. कारण ते महान वैद्य आहेत. ते अत्यंत

पवित्र असल्यानें त्यांना तुझ्या रोगाची निश्चित चिकित्सा करतां येईल.

**१०. पाशमोचन** (बंधन मुक्तता)

या सूक्तांत अनागसं ब्रह्मणा त्वा कृणोमि शिवे ते द्यावापृथिवी उभे स्ताम् । ही पंक्ती पालुपदाप्रमाणें प्रत्येक ऋचेच्या अखेरीस आहे या पंक्तीचा अर्थ– "ब्रह्मपीडकांपासून मी तुला पापमुक्त करीन द्यौ आणि पृथ्वी तुला कल्याणकारक होतील." असा आहे.

हे पुरुषा, आपल्या मातापित्यांकडून प्राप्त झालेला क्षय, कुष्ट वगैरे रोगापासून आणि पाप्यांना शिक्षा करणाऱ्या वरुणाच्या पाशातून तूं मुक्त होशील. ब्रह्मपीडकांपासून मी तुला पापमुक्त करीन. द्यौ आणि पृथ्वी तुला कल्याणमय होतील. हे रुग्णा हा अग्नि, जलदेवतांसह तुला सुख प्रदान करणारा होवो. सर्व औषधींच्या रसानें सोम तुला सुखी करील. तुझ्या शरीरांतील सर्व व्याधीपासून मी तुझी मुक्तता करतो. आकाश आणि पृथ्वी यांच्या मध्यें असलेल्या अंतरिक्षांत भ्रमण करणारा वायु आणि चारही दिशा तुझें मंगल करोत. वीज ही वायुपत्नी आहे. सूर्य मंडलाचा अधिपति सूर्यच आहे आणि तो चारही दिशा न्याहाळतो. (त्याच्या प्रकाशामुळे चारही दिशांचे ज्ञान होतें) या दिशा आणि सूर्य तुझे कल्याण करोत. तुला रोगमुक्त केल्यावर वृद्धावस्थेपर्यंत या चार दिशांमध्यें तूं रहा. तुझ्यापासून रोग आणि पापदेवता लांब जातील. तूं तुझ्या शरीरांत असलेल्या क्षय रोगापासून मुक्त होत आहेस. शत्रूप्रमाणें तुझा छळ करणाऱ्या व्याधी तुला सोडून जात आहेत कारण पूर्वी केलेल्या पुण्यकृतीमुळें तूं या पृथ्वीवर पुन्हा जन्माला आला आहेस. ग्रहण सुटतांनां राहू पासून जसा सूर्य अलग होतो त्याप्रमाणें सर्व देवतांनी तुझ्यामध्यें असलेल्या पापानां दूर केलें आहे. तुझ्या शरीरांत असणाऱ्या सर्व रोगांना मुक्ती मिळत आहे. ब्रह्मपीडकांपासून मी तुला पापमुक्त करीन त्यामुळें द्यौ आणि पृथ्वी तुला कल्याणकारक होतील.

**११. श्रेयप्राप्तिः** (चांगल्याचा लाभ)

तूं दूषित क्रिया करणाऱ्यांचा द्वेष करणारा, शस्त्रानें जखम करणाऱ्याचा शस्त्रानें घात करणारा, कठोर कर्म करणाऱ्यांना कठोरतेने

उत्तर देणारा असल्यानें सर्व मंगल आणि कल्याणमय मार्गावर पदार्पण कर. हे औषधीं, तूं दूषित कृत्यांना दूर करणारी आणि मंत्ररक्षक आहेस. समान वलाच्या शत्रूवर तूं विजय प्राप्त कर. जे पशु, पुत्र आणि वांधव आमच्याशी वैर करतात किंवा आम्हाला ठार करण्याची इच्छा करतात त्या शत्रूंना तूं नष्ट कर. आपल्या शत्रूवर विजय मिळव. शत्रूच्या अभिचाराचें ज्ञान तुला आहे. तूं आपल्या तेजानें तेजोवान वनली आहेस त्यामुळें अभिचार करणाऱ्या शत्रूपासून तूं आमचें रक्षण कर. शत्रूंना ताप देणारी, ज्वरादि रोग शत्रूकडे पाठविणारी आणि त्यांना संतप्त करणारी तूं सूर्याप्रमाणें तेजोवान् असून अधिक वलवान शत्रूला सुद्धां पराजित करतेस.

## १२. **शत्रूनाश** (शत्रूचा नाश करणें)

आकाश आणि पृथ्वी यांच्यामध्यें असलेल्या अंतरीक्षांत वास करणाऱ्या वायु, सूर्य, अग्नि, लोकपाल व भगवान विष्णू वगैरे सर्व देवता या अभिचाराची जाणीव ठेवून शत्रूचा नाश करण्यास प्रवृत्त होतात. हे यज्ञीय देवतानों, आमचे म्हणणें तुम्ही श्रवण करा. वषट् या शव्दानें देवतांना आहुती देणारे भरद्वाज ऋषी आमच्या इच्छित फलाच्या प्राप्तीसाठीं उत्तम मंत्रांचें पठण करीत आहेत. अत्यंत श्रेष्ठ कर्मामध्यें गुंतलेल्या आमच्या मनाला दुःखी करणाऱ्या शत्रूला मृत्युरूपी दुर्गती प्राप्त होवो. हे इंद्रा, तुझे चित्त सोम प्राशन केल्यानें प्रसन्न झालें आहे. तूं आमची प्रार्थना ऐक. आमचे शत्रू सतत दुष्कर्म करीत असल्यानें आम्ही तुला पुन्हा पुन्हा पाचारण करीत आहोत. आमच्या शत्रूला वृक्षाला तोडतात त्या प्रमाणें तोडून टाक. स्तोत्र पाठक अंगिरा, वारा आदित्य, अष्ट वसु आणि रुद्र हे यज्ञ करण्याच्या इच्छा आणि विहीर, नदी, नाले, तलाव यांना संरक्षण प्रदान करोत. आकाश, पृथ्वी आणि विश्वेदेवांनों, शत्रूला ठार करण्यासाठीं सज्ज व्हा. हे अंगिरा ऋषींनो, आमच्या शत्रूला ताब्यांत घेण्यासाठीं तुम्ही तत्पर राहा. हे मरुतांनों, आम्हाला कमी लेखून आमच्या यज्ञादि कर्मांची निंदा करणाऱ्या शत्रूला तुमच्या तेजानें आणि शस्त्रानें निष्प्रभ करा. आमच्या कर्मांचा द्वेष

करणाऱ्या शत्रूला सवितृदेव सर्व बाजूंनीं पीडा देवो. नेत्रादि ठिकाणीं असलेले सप्तप्राण कंठांत असलेल्या नाड्या आणि अन्य अवयव यांना कर्माच्या द्वारें आम्ही छिन्नविछिन्न करीत आहोंत. हे शत्रो, तूं शवरूपानें आतां यमलोकीं पदार्पण कर. तुझ्या छिन्नविछिन्न शरीराला आम्ही अग्नीच्या स्वाधीन करीत आहोत तो तुझ्या प्राण आणि वाणीला भस्म करील.

## १३. दीर्घायुः प्राप्तिः (दीर्घायुष्य लाभ)

हे अग्ने, तूं शतवर्षाचें आयुष्य प्रदान करणारा आहेस. तूप तुझ्या अवयवांचा आश्रय करते. त्यामुळें गोधृताच्या मंत्रासहित आम्ही आहुती जी तुला देतो त्यांनी तूं तृप्त हो आणि पिता ज्याप्रमाणें पुत्राचें रक्षण करतो त्याप्रमाणें या नवजात बालकाचें रक्षण करून त्याला शंभर वर्षांचे आयुष्य प्रदान कर. हे देवतांनों, या बालकाला आपण जवळ घ्या. त्याला तेजस्वी आणि सर्वप्रकारें परिपूर्ण करा. याला शंभर वर्षांचे आयुष्य प्रदान करा. इंद्रादि देवतांचे प्रमुख बृहस्पती त्यानीं ज्याप्रमाणें सोमाला धारण केलें त्याप्रमाणें तुम्ही या बालकाला धारण करा. हे बालका तुझें क्षेम व्हावें म्हणून या देवतांनीं तुला धारण केलें आहे. या प्रभावानें तूं गाईंचें संरक्षण कर, त्याचें पालनपोषण कर आणि पुत्र पौत्रादि संततीसह ऐश्वर्यवान होऊन शंभर वर्षें जग. हे बालका आपला उजवा पाय या पाषाणावर ठेवून वर चढ म्हणजे विश्वेदेव तुला शतायुषी करील. तुझे जुने कपडे आम्ही धारण करतो. तूं समृद्ध आणि शोभायमान हो. तुझ्या जन्मानंतर, सर्व ऐश्वर्यानें युक्त असा तुझा बंधू जन्माला येवो आणि सर्व देवता त्याचें रक्षण करोत.

(नवजात बालकाला देवदर्शन घडविण्यासाठीं शुचिर्भूतपणें देवालयात नेण्यात येतें. त्या वेळीं त्या देवतेची यथासांग पूजा करून या बालकाला तिच्या पायाशीं ठेवण्यांत येतें. त्यानंतर त्या देवतेची प्रार्थना करण्यांत येते ती या ठिकाणीं दिली आहे. अर्थात ही चाल महाराष्ट्रांत प्रचलित नाही. उत्तर भारतांत विशेषतः बिहार, नेपाळ वगैरे भागांत ही पद्धत आहे. याच पद्धतीचा अवलंब महाराष्ट्रांत निराळ्या पद्धतीनें

करतात. ज्या बालकाला वाईट नक्षत्र लागले असेल त्या बालकाला, उघडे करून गाईच्या समोर ठेवतात. त्यापूर्वी गाईची देवता म्हणून पूजा करतात. गाईनें बालकाला चाटलें म्हणजे नक्षत्र दोष जातो.)

**१४. दस्यूनाशन** (क्रूरकर्म करणारे व राक्षस यांचा नाश)

अवाढव्य शरीर धारण करणारी, संततीचा नाश करणारी, भय उत्पादन करणारी, अत्यंत कठोर वाणीनें बोलणारी, एकसारखी ओरड-णारी निःसाला नांवाची राक्षसी बालकाला त्रास देते. तिचा संहार करून तिच्या बरोबर असणाऱ्या पिशाच्च्यांना देखील आम्ही पळवून लावतो. भगुन्दी नामक पिशाच्चपुत्रीला (ही गाईंच्या गोठ्यांत वास करते आणि गाईंचे दूध विकृत करते.) आम्ही गोठ्याच्या बाहेर घालवतो. धनभांडार, धान्यभांडार आणि उत्तम निवासस्थानांतून तिला आम्ही हांकलून लावतो आणि तिचा नाश करतो. पृथ्वीपासून दूर आणि खालीं असलेल्या पाताळांत राहणाऱ्या, पुण्यकर्मामध्यें विघ्न उत्पन्न करणाऱ्या या राक्षसीला आणि सर्वांचा नाश करणाऱ्या सेवी नांवाच्या राक्षसीला आम्ही या लोकांतून पाताळांत घालवतो. भूतांचा अधिपति रुद्र, आणि इंद्र, या अकाळविकाळपणें ओरडणाऱ्या पिशाच्च्यांना या शुभ स्थानांतून घालवून देवोत. हे राक्षसी तू माता-पित्याच्या देहांतील विकृतीमुळें उत्पन्न झाली आहेस. या स्थानाचा नाश करण्यापूर्वीच तू येथून निघून जा. आपल्या ठिकाणी जाण्यासाठी घोडा ज्याप्रमाणे वेगाने धांवतो आणि स्वस्थळीं येऊन थांबतो त्याप्रमाणे या पिशाच्च्यांच्या निवासस्थानी ती परत जाऊन रुद्ध झाली आहेत. हे पिशाच्च्यानों, युद्धामध्यें तुमचा पराभव झाल्यानें तुमची घरे देखील छिन्नविछिन्न केली आहेत. आतां मृत्यु हे एकच तुमचें घर राहिले आहे त्या घरीं तुम्ही जा.

**१५. अभयप्राप्तिः** (भीतीचें निर्मूलन)

ज्याप्रमाणें द्यु आणि पृथ्वी कोणालाही भीत नाहींत आणि इजाही करीत नाहींत त्याप्रमाणें हे माझ्या प्राणा भयभीत न होतां तू सुखरूप हो आणि त्यांच्या प्रमाणें दीर्घजीवी हो. दिवस आणि रात्र,

चंद्र आणि सूर्य, ब्राह्मण आणि क्षत्रिय, सत्य आणि असत्य, भूतकाळ आणि भविष्यकाळ हे कधीं भयभीत होत नाहींत आणि नष्टही होत नाहींत. त्याप्रमाणें तुला मृत्यु प्राप्त होईल ही शंका बाजूला कर. आणि पुष्कळ वर्षे पर्यंत आयुष्याचा उपभोग घे.

**१६. सुरक्षाः** (संरक्षण)

प्राण आणि अपान वायू माझे मृत्यूपासून रक्षण करोत. त्यांना ही आहुती स्वीकृत होवो. द्यौ पृथ्वी आणि दिशा माझ्या श्रवणशक्तीचें संरक्षण करोत. त्यांना ही आहुती स्वीकृत होवो. नेत्रांना प्रकाश देणारा सूर्य माझ्या नेत्रांचे रक्षण करो. त्याला ही आहुती स्वीकृत होवो. वैश्वानर अग्नि आमच्या सर्व इंद्रीयांना बल देऊन रक्षण करो. त्याला ही आहुती स्वीकृत होवो. विश्वाचें पोषण करणाऱ्या विश्वंभरा, आमचें पोषण करून तू आमचें रक्षण कर. आम्ही दिलेली ही आहुती तू स्वीकार.

**१७ बलप्राप्तिः** (सामर्थ्य लाभ)

हे तेजा, तू तेज प्रदान करतेस. आम्हाला तेज प्रदान कर. आम्ही तुला ही आहुती प्रदान करीत आहोत. हे अन्ना, तू अन्न प्रदान करतोस. शत्रूचा तिरस्कार करतेस. तूं आमचे रक्षण कर आणि आम्ही दिलेली ही आहुती स्वीकार. हे बला, तू बल प्रदान करतेस, आम्हाला तू सामर्थ्य प्रदान कर. आम्ही तुला ही आहुती प्रदान करीत आहोत. हे आयुष्य, तूं आम्हाला आयुष्य प्रदान कर आणि आम्ही तुला दिलेल्या या आहुतीचा स्वीकार कर. हे श्रोत्रशक्ती, तूं आम्हाला ऐकण्याचें सामर्थ्य दे आणि आम्ही तुला दिलेल्या या आहुतीचा स्वीकार कर. हे नेत्रांनों, तुम्ही आम्हाला पाहाण्याचें सामर्थ्य द्या. आम्ही दिलेली ही आहुती तुम्हाला स्वीकृत होवो. सर्व विश्वाचें पालन करणाऱ्या शक्ते, तूं आमचें पोषण कर आणि आम्ही तुला प्रदान केलेल्या त्या आहुतीचा तूं स्वीकार कर.

**१८. शत्रुनाशन** (शत्रूचा नाश)

हे अग्ने तूं शत्रूचा नाश करणारा आहेस. आम्हाला पण तूं

शत्रूचा नाश करणारी शक्ती प्रदान कर आणि आम्ही दिलेल्या आहुतीचा स्वीकार कर. तूं आमच्याशीं वैर करणाऱ्या शत्रूचा नाश करण्याचें सामर्थ्य आम्हाला दे. आमची ही आहुती तुला स्वीकृत होवो. दान देणाऱ्यांचे शत्रू अराय नामक राक्षसांना तूं ठार मारणारा आहेस' त्या राक्षसांना मारण्याचें सामर्थ्य तूं आम्हालाही प्रदान कर आणि आमची ही आंहुती स्वीकार. पिशाच्चांना तूं नष्ट करतोस. तें सामर्थ्य तूं आम्हाला दे आणि आम्ही दिलेल्या आहुतीचा तूं स्वीकार कर. राक्षसांचा संहार करण्याचें सामर्थ्य तुझ्याजवळ आहे. तें सामर्थ्य तूं आम्हाला प्रदान कर. आम्ही तुला दिलेल्या आहुतीचा तूं स्वीकार कर.

(या पुढील १९ ते २३ ही पांच सूक्तें शत्रूनाशन या शीर्षकाखालीं येतात. यांमध्यें मनुष्यांनीं अग्नि, वायू सूर्य, चंद्र आणि पाणी यांपासून जो आमचा द्वेष करतो आणि आम्ही ज्याचा द्वेष करतो अशा शत्रूच्या नाशाची अपेक्षा केली आहे. त्याप्रमाणें ही प्रार्थना आहे. "यो उस्मान् द्वेष्टि यं वयं द्विष्मः ।" हें पालुपद प्रत्येक ऋचेच्या अखेर उद्धृत करण्यांत आलेलें आहे. वर उल्लेख केलेल्या पांचही देवतांच्या, पराक्रम, नाश-शक्ति, तेज वाढविणारी शक्ती, संस्कार शक्ती आणि तेज संहारक शक्ती यांच्या योगें संरक्षण प्रार्थिलें आहे.)

१९. हे अग्ने, जो शत्रू आमच्या विरुद्ध दुष्कर्म करतो आणि आम्ही ज्याचा द्वेष करतो अशा शत्रूला तूं आपल्या पराक्रमानें नष्ट कर. नाशशक्तीनें त्यांचा नाश कर. वाढणाऱ्या तेजानें त्यांना दिपवून टाक. त्याच्या संस्काराचा नाश कर आणि तुझ्या तेज संहारक शक्तीनें त्यांच्या तेजाचा-पराक्रमाचा तूं संहार कर.

२०. हे वायो, जो आमचा शत्रू आमचा द्वेष करतो आणि आम्ही ज्याचा द्वेष करतो त्या शत्रूचा तूं आपल्या पराक्रमानें नाश कर. तुझ्या-जवळ असलेल्या नाशशक्तीनें त्यांचा नाश कर. तुझ्या दीप्तिमान तेजानें त्यांना दिपवून टाक. त्यांच्यावर झालेल्या संस्कारांचा नाश कर आणि तेज संहारक शक्तीनें त्यांचे तेज तूं हरण कर.

२१. हे सूर्या, जो आमचा द्वेष करतो आणि आम्ही ज्याचा द्वेष करतो अशा शत्रूचा तूं आपल्या पराक्रमानें पाडाव कर. तुझ्याजवळ

असलेल्या नाश शक्तीनें शत्रूचा नाश कर. तुझ्या ज्योतीन त्यांना दिपवून टाक. त्यांच्या तेजाचा लोप कर आणि तुझ्या तेज संहारक शक्तीनें त्यांचें तेज हरण कर.

२२. हे चंद्रा, जो आमचा द्वेष करतो आणि आम्ही ज्याचा द्वेष करतो अशा आमच्या शत्रूला तूं आपल्या पराक्रमानें नाहीसें कर. तुझ्या-जवळ असणाऱ्या नाशक शक्तीनें तूं त्यांचा नाश कर. तुला दीप्ती आहे. त्या दीप्तीनें तूं त्यांना झांकून टाक, त्यांच्या जवळ जो पराक्रम असेल त्याचा नाश कर आणि तुझ्या तेज संहारक शक्तीनें त्यांच्या शरीरांतील पोषण शक्तीचा नाश कर.

२३. हे उदका, जो आमचा द्वेष करतो आणि त्यामुळें आम्ही ज्याचा द्वेष करतो अशा आमच्या शत्रूचा पराक्रम तूं शून्य कर. तुझ्या जवळ असलेल्या नाशक शक्तीनें त्यांचा नाश कर. तुला तेज आहे तें तेज तूं त्यांना न देतां त्यांच्या तेजाचा नाश कर. तुझें पोषण सामर्थ्य तूं त्यांना प्रदान करूं नकोस. त्याचप्रमाणें तुझ्याजवळ विनाशक सामर्थ्य आहे. त्या शक्तीनें तूं या शत्रूंना तुझ्यामध्यें बुडवून त्यांचा नाश कर.

## २४. **शत्रुनाशन** (शत्रूचा नाश)

हे वध करण्यांत कुशल असलेल्या शरभका, तूं वध करणाऱ्या राक्षसांचा पुढारी आहेस. आमच्याकडे तूं पाठविलेली आपत्ती आणि वध करणारे राक्षस त्यांच्या आयुधासह तुमच्याकडे परत जावोत. चोर आणि अन्य हिंसक आणि तुझे मित्र आहेत. तेही तुझ्याकडे परत जावोत. तुला ज्यानीं आमच्या नाशासाठी पाठविलें आणि तूं ज्या आमच्या शत्रूच्या सान्निध्यांत राहातोस त्याचें पशुधन तूं भक्षण कर आणि आमच्या शत्रूचें मांस भक्षण कर. हे घातका, तूं सुखवृद्धी करणाऱ्या शत्रूंचा स्वामी आहेस. तूं आमच्या हिंसेसाठीं पाठविलेल्या व्याधी, राक्षस आणि हिंसात्मक आयुधें तुझ्याकडे परत जावोत. तूं ज्या आमच्या शत्रूच्या सान्निध्यांत राहतोस त्या शत्रूचें आणि त्याच्या अनुचरांच्या मांसाचें भक्षण कर. चोरांचा प्रमुख, सर्पाप्रमाणें दुष्ट कृती करणाऱ्या राक्षसांनीं आमच्याकडे पाठविलेल्या सर्व व्याधी, राक्षस आणि हिंसक

आयुधें त्यांच्याकडे परत जावोत. त्या राक्षसांचे अनुचरसुद्धां येथें न राहोत. हे जूर्णि नामक राक्षसी, तूं देह जीर्ण करणाऱ्यांची स्वामिनी आहेस. या राक्षसीनें पाठविलेल्या दारिद्र्यादि आपत्ती, हिंसात्मक आयुधें आणि तिचे अनुचर तिच्याकडेच परत जावोत. आमच्या शत्रूचें मांस तूं भक्षण कर. अपाव्द, अर्जुनी आणि भरूजी या राक्षसी मानवांकडे, विविध व्याधी, दारिद्र्य, यातना, यांना पाठवतात. हे सर्व आपत्तींनों, तुम्ही पुन्हा तुमच्या मूळस्थानीं परत जा. तुमच्या राक्षसी, आणि त्यांचे पशुधन यांना तुम्ही भक्षण करा.

२५. **पृश्निपर्णी** (कोंकणांत याला 'डवला' असे म्हणतात. हे बुटके झुडूप आहे. याच्या मुळाचा वापर करतात. फुरशाच्या विषावर या वृक्षाच्या, फळ, पान, फूल, साल व मूळ यांच्या एकत्रित रसाचा उपयोग केला जातो.)

हे पृश्णिपर्णी विषनाशासाठीं मी तुझा स्वीकार करतो. आमचें विष नाहीसें करून तूं आम्हाला सुख प्रदान कर. हे औषधी वनस्पते, तूं महान बलवान असून निर्ऋति नामक राक्षसीचा तूं नाश कर. शरीरांतील आणि शरीरावरील विषमयता तुझ्या लेपानें नाहीशी होते. शरीरातील शुद्ध रक्त शोषून घेणाऱ्या रोगांना तूं नाहीसे करतेस. स्त्रियांच्या शरीरांत वाढणारा गर्भ नाहीसा करणाऱ्या रोगांना तूं आवरतेस. अशा रोगांचा तूं नाश कर. मनुष्याला भ्रमांत टाकणारें रोग पापरूप आहेत. त्यांना तूं नाहीसे कर. सर्पादि विषांचा तूं नाश कर. सूर्योदयाबरोबर अंधकार संपतो त्याप्रमाणें तुझ्या दर्शनानें विषादी रोगरूपी अंधःकार दूर करून आम्हाला सुख दे.

२६. **पशुसंवर्धन** (पशूंचें पोषण-वर्धन)

ज्या पशूंच्या रक्षणासाठीं वायू सहायक होतो, ज्या पशूंच्या गर्भाला त्वष्टा उत्तम प्रकारें वाढवितो, सूर्य ज्यांना आनंद देतो असे या गोठ्यांतील बाहेर गेलेले पशु पुन्हा या गोठ्यांत येऊन स्थिर होवोत. गाईनीं या गोठ्यांत परत यावें म्हणून बृहस्पति त्यांना स्फूर्ति प्रदान

करो. हे सर्व पशु माझ्या गोठ्यांत येवोत. सिनीवाली देवता या पशूंना घेऊन येवो. गाई आणि अश्व आनंदानें या गोठ्यांत येवोत. सेवक आणि धान्य यांची समृद्धी होवो. आमच्या इच्छित फलाच्या प्राप्तीसाठीं आम्ही आहुती देत आहोत. सर्व गाई माझ्याजवळ राहोत. आमचे पुत्र-पौत्र तुपामुळें पुष्ट होवोत. गाईंच्या दुधानें सर्वांना पुष्टता लाभते. अन्न, जलरस यांमध्यें तुपाची समृद्धि होवो. गाई, गोदुग्ध, धान्य आणि विविध प्रकारचे रस यांनीं मी माझें घर समृद्ध करतो. माझी पत्नी, पुत्र पौत्रादिकांनीं माझें घर मी भरून टाकतो.

## २७. शत्रुपराजय (शत्रूचा पराभव)

हे औषधे, तुझ्या सेवनानें मी ज्याप्रमाणें ज्वरादि रोगांवर विजय प्राप्त करतो त्याप्रमाणें माझ्या प्रतिस्पर्ध्यावरोबर वादविवाद करताना मला विजय प्राप्त होईल असें कर. हे औषधे, गरुडानें विषनाशासाठीं तुझा स्वीकार केला आहे. तूं माझ्या प्रतिस्पर्ध्याचें विष काढून घेऊं न देतां असंबद्ध वाक्य बोलायला लाव. इंद्रानें आपल्या डाव्या हातामध्यें तुला धारण केलें आहे. त्याप्रमाणें मी तुला माझ्या हातांत धारण करतो. तूं तुझ्या प्रभावानें माझ्याबरोबर वाद करणाऱ्यां प्रतिस्पर्ध्यांचीं मुखें शुष्क कर. राक्षसांवर विजय प्राप्त करण्यासाठीं इंद्रानें तुझें सेवन केलें होतें. मी तुझें सेवन करतो. त्यामुळें मला माझ्या शत्रूवर विजय प्राप्त करतां येईल. हे औषधी वनस्पते, तुझ्या सेवनानें इंद्रानें ज्याप्रमाणें राक्षसांना निरुत्तर केलें त्याप्रमाणें मी तुझें सेवन करून प्रतिपक्षाला निरुत्तर करीन. हे रुद्रा, केवळ स्मरणानें तूं पाण्याला औषधी गुण प्रदान करतोस. डोक्यावर निळा तुरा असणाऱ्या मोराप्रमाणें मला तीक्ष्ण दृष्टी प्रदान कर म्हणजे प्रतिपक्षाला मी पराभूत करीन. हे इंद्रा, ज्याच्यामुळें आम्ही क्षीण होत आहोत त्या आमच्या प्रतिपक्षाला तूं प्रश्नहीन कर. आम्हाला भरपूर तर्कशक्ति प्रदान कर.

## २८. दीर्घायुः प्राप्तिः (दीर्घ आयुष्य-लाभ)

हे अग्ने, तुझी सेवा करता यावी म्हणून हा बालक रोगाचा परि-हार करून वाढत आहे. हा बालक त्याच्या वृद्धावस्थेपर्यंत असाच

वृद्धिंगत होत राहील. रोग आणि पिशाच्च याचें काहीही अनिष्ट करूं शकणार नाहींत. माता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राचें रक्षण करते त्याप्रमाणें मित्रादि देवता, अनिष्टांपासून या बालकाचें रक्षण करोत. दिवसा सूर्य आणि रात्री वरुण या बालकाचें वृद्धावस्थेपर्यंत रक्षण करतील. हा बालक देवांना प्रदान केलेलीं हविर्द्रव्यें वाहून नेणाऱ्या अग्नीची प्रदीर्घ आयुष्यासाठीं प्रार्थना करील. हे अग्ने, उत्पन्न झालेल्या, अस्तित्वात असलेल्या किंवा यापुढें उत्पन्न होणाऱ्या वस्तूंचा तूं स्वामी आहेस. या बालकाचे प्राण-अपान त्याला सोडून न जावोत. त्याचे मित्र किंवा शत्रू सुद्धां या बालकाला त्रास न देवोत. हे बालका, आकाश तुझा पिता असून पृथ्वी तुझी माता आहे. या पृथ्वीमातेच्या मांडीवर वसून शंभर हेमंत ऋतू जाईपर्यंत आणि तुला वृद्धत्व प्राप्त होईपर्यंत तूं रहा. हे अग्ने, या बालकाला तूं आपलें तेज प्रदान कर आणि शंभर वर्षेपर्यंत जिवंत ठेव. हे मित्रा-वरुणांनों, या बालकाला संतती निर्माण करणारें वीर्य प्रदान करा. हे विश्वेदेवांनों, या बालकामध्यें सर्व सद्गुणांची स्थापना करून त्याला शतवर्षाचें आयुष्य प्रदान करा. हे अदिति माते, तूं मातेप्रमाणें या बालकाला सुख प्रदान कर.

## २९. **दीर्घायुष्य** (दीर्घ आयुष्य)

पृथ्वीपासून उत्पन्न झालेल्या रसांचें सेवन करणाऱ्या पुरुषाला भगदेवता तेज देते, इंद्र ऐश्वर्य देतो, अग्नि शतायुष्य देतो, सूर्य दीप्ति देतो आणि बृहस्पति बुद्धी देतो. हे अग्ने, ह्या पुरुषाला शतायुषी कर. हे त्वष्ट्या, तूं त्याला संततीवान कर. सूर्या, तूं त्याला गाई वगैरे पशूंनीं समृद्ध कर. हे आकाश आणि पृथ्वीमाते, आमच्या इच्छा सफल कर. आम्हाला पुत्र, पौत्र, धन आणि पशूंची समृद्धी प्रदान कर. हे इंद्रा, तुझ्या कृपेनें या पुरुषाला त्याच्या शत्रूवर विजय संपादन करता येईल. तुझ्याकडून आयुष्य, वरुणाकडून बल आणि मरुताकडून स्फूर्ति ह्या पुरुषाला मिळेल. हे मरुता, या पुरुषाला तूं अन्न आणि पाणी दे. त्या तहानलेल्या पुरुषाला तूं दिलेले पाणी तृप्त करील. हा एकवस्त्रवान योगी अश्विनीकुमारांनी प्रदान केलेल्या औषधांचे सेवन करील आणि शतायुषी होऊन

या शरीराचा उपभोग घेईल.

**३०. कामिनीमनोऽभिमुखाकरण** (स्त्रीच्या मनाप्रमाणें कृती करणें. स्त्रीला वश होणें)

हे स्त्रिये, वायूच्या फेऱ्यामध्यें सांपडलेलें शुष्कपत्र ज्याप्रमाणें वायूच्या इच्छेप्रमाणें फिरत राहातें त्याप्रमाणें तुझ्या कामनेप्रमाणें माझ्या मनाच्या आणि शरीराच्या हालचाली होत आहेत. हे अश्विनीकुमारांनों, मी ज्या कामिनीची इच्छा करतो ती कामिनी माझ्या सान्निध्यांत येवो. तिचें मन माझ्याकडे आकर्षित होवो. मनोहर पक्ष्यांचा मधुर आवाज आणि प्रभाववान पुरुषाचे शब्द ज्याप्रमाणे दुसऱ्याचें लक्ष आकर्षून घेतात त्याप्रमाणें माझें हे आवाहन बाणाच्या लक्षाप्रमाणें इच्छित स्थळीं जावो. आंत आणि बाहेरील विचारासह निर्दोष अवयवांच्या कन्यांचें चित्त विचलित करणाऱ्या औषधे तूं त्यांच्या मनाला स्फूर्ति प्रदान कर. ही स्त्री आपल्या इच्छेप्रमाणें पति लाभ होईल म्हणून माझ्याजवळ आली आणि तिच्या लाभाची इच्छा करीत माझ्या जवळील सर्व धना-सह, घोडा ज्याप्रमाणें आपल्या कामुक मादीकडे आकर्षित होतो, त्या-प्रमाणें मी देखील तिंच्या जवळ जात आहे.

**३१. क्रिमिजम्मन** (जंतूंच्या उत्पत्तीचें निराकरण)

जात्यामध्यें ज्याप्रमाणें धान्यकण भरडले जातात त्याप्रमाणें, इंद्रानें या किडयांच्या नाशासाठी निर्माण केलेल्या दगडानें मी किडयांचा चुरा करीत आहे. दृश्य अदृश्य, देहात वास करणारे, अग्नीप्रमाणे दाहक, रक्त आणि मांस यांना दूषित करणाऱ्या सर्व प्रकारच्या जंतूंना मी मंत्राच्या प्रभावानें नष्ट करीत आहे. पर्वत, वनें, औषधी, पशु-पक्षी वगैरेंमध्यें असणारें जंतु आहारांतून उदरांत जातात आणि त्याठिकाणी त्यांची वाढ होते. ती वाढ मी मंत्राच्या प्रभावानें नष्ट करतो.

**३२. क्रिमिनाशन** (जंतुनाश)

सूर्याच्या उष्णतेनें सर्व प्रकारचे रोगजंतु नाहीसे होतात. गाई सूर्याच्या उन्हांत चरतात त्यामुळें त्यांच्या शरीरांतील रोगजंतू मरतात.

पूर्वी गाय हे माणसांचें जीवन होतें त्यामुळें या ठिकाणी गाईंचा मुद्दाम उल्लेख करण्यात आला आहे. कोणत्याही जखमा सूर्य-प्रकाशानें बऱ्या होतात, त्याचें हें सूत्र आहे.

उद्यन्नादित्यः क्रिमीन् हन्तु निम्रोचन हन्तु रश्मिभिः ।
ये अन्तः क्रिमयो गवि ।

सूर्याच्या उदयाबरोबर गाईंच्या शरीरामध्यें असणाऱ्या दोषजंतूंचा नाश सूर्याचे किरण करतात. विविध रंगांचे, चार नेत्र असलेले, पांढऱ्या रंगाचे, विविध आकाराचे, रोगजंतु, अत्रि, कण्व आणि जमदग्नि ऋषींच्या मंत्रांनीं नष्ट होतात. अगस्ति ऋषींच्या मंत्रामुळें त्या जंतूंचे पुनर्जनन थांबतें. कृमि, त्यांचा राजा, मंत्री, माता यांसहित तें जंतू नष्ट होतात. त्यांचा वंशसुद्धा नष्ट होतो. या कृमीचें वसतिस्थान सुद्धा नष्ट होतें. नांगी असलेल्या, विषयुक्त प्राण्यांचे विषमय अवयव मी बाजूला करतो.

## ३३. यक्ष्मविबिर्हण (क्षयनाश)

हे क्षयग्रस्त रुग्णा, तुझे नेत्र, कान, नाक, जीभ, मान आणि त्या ठिकाणी एकत्र झालेल्या चौदा नाड्या, कंठ छाती, स्कंध, भुज, हृदय, जठर, पार्श्वभाग, पोट, प्लीहा, यकृत, आतडें, कुक्षी, नाभी, जांघे, पाय, कंबर, गुह्येंद्रिय, अस्थि, मज्जा, बोटें, नखें, केस, त्वचा, तळपाय वगैरे ठिकाणी असणारा यक्ष्मरोग महर्षी काश्यपांच्या यक्ष्मघ्न मंत्रांनीं मी नाहीसा करतो.

## ३४. पशवः (पशू)

हे पशुपति, दोन पाय असणाऱ्या आणि चार पाय असणाऱ्या पशूंचा तूं स्वामी आहेस. हे जाणूनच तूं या यज्ञांत प्राप्त झालास. त्यामुळे यज्ञकर्त्या यजमानाला सर्व प्रकारचे धन प्राप्त होईल. या यज्ञकर्त्याला तूं सन्मार्गगामी कर. देवांना अत्यंत प्रिय असणाऱ्या सोमाप्रमाणें आम्हाला प्रिय वाटणारे अन्य धन आम्हाला लाभावें. बंधनांत सांपडलेल्या जीवाला, जो प्रकाशमान जीव मन आणि नेत्र यांनी पाहातो तो जीव मुक्त होतो. गांवात असणारे विविध रंगांचे पशु, एकापेक्षा एक

भिन्न असणारे पशु, मनुष्यांबरोबर राहणारे पशु त्यांना भगवंत मुक्त करो. विशेष प्रज्ञावंत लोक चारही दिशांना भ्रमण करणाऱ्या प्राणाला एकत्रित करून स्वतःच्या नियंत्रणांत ठेवतात आणि आपलें जीवन व्यतीत करतात. अखेर दिव्य मार्गानें प्रकाशमान लोकाचा ते आश्रय करतात.

### ३५. विश्वकर्मा (विश्वोत्पत्तिकारक देव)

यज्ञकर्माखेरीज अन्यत्र धनव्यय केल्यानें आमची समृद्धी नष्ट झाली. यज्ञीय अग्निदेखील आपल्यावर रुष्ट झाला. त्यामुळें पापवृत्ति वनलेल्या आम्हाला विश्वकर्मा यज्ञ करण्याची इच्छा आणि स्फूर्ति प्रदान करो. यागादि क्रिया न झाल्यानें अतींद्रिय ज्ञान असलेले ऋषि दुःखित होतात. ज्या प्रजापतीनें सोमरसाच्या बिन्दूंनीं आपलें अंतःकरण भरून टाकलें त्या बिन्दूंच्या साह्यानें आमचा यज्ञ सफल होवो. रणांगणावर प्राप्त झालेला योद्धा अन्य योद्धयांना ज्याप्रमाणें तुच्छ लेखतो त्याप्रमाणें यज्ञाला तुच्छ समजून आणि असत्विद्येच्या जोरावर प्रज्ञावंतांचा अवमान करीत जें पाप जवळ केलें, त्या पापापासून प्रजापती मला मुक्त करो. ऋषींना यथार्थानें पाहाणारे माझे नेत्र, देवपालक बृहस्पति आणि प्रजापति, यांना माझा नमस्कार असो. हे देवतांनों, आमच्या क्रूर दृष्टीनें केलेल्या पापापासून मुक्तता करून आमचे रक्षण करा. यज्ञांत प्रज्वलित झालेला अग्नि यज्ञाचा नेत्र आहे. सर्व यज्ञ या अग्नीमुळेंच संपन्न होतात. देवतासुद्धा सर्व प्रथम अग्नीचेंच पूजन करतात. अशा या अग्निदेवतेला आम्ही तुपाची आहुती समर्पण करीत आहोत. या यज्ञामध्यें इंद्र, प्रजापति वगैरे देवता आपल्या कृपापूर्ण दृष्टीनें आणि देयबुद्धीनें आगमन करोत.

### ३६. पतिवेदनम् (पतीमुळें लाभणारें वैभव)

हे अग्ने, या वधूचें पाणिग्रहण करण्याची इच्छा असणारा सुन्दर वर आम्हाला प्राप्त होवो. ज्या वरानें आम्हाला पूर्वी नकार देऊन निराश केलें अशा वरालासुद्धां परत या वधूची अभिलाषा प्राप्त होऊन तो या ठिकाणी प्राप्त होवो. सर्व परिवाराला वधू-वरांची संमती सुखद होवो आणि ही कन्या पतिसान्निध्यानें सौभाग्यवान होवो. सोम, गंधर्व आणि अर्यमा विवाहाग्नीच्या समोर स्वीकृत केलेलें कुमारीरूपी धन

या देवतांच्या आज्ञेनें मनुष्यरूपी पतीला प्राप्त होईल असें करतात. ही कन्या आपल्या इच्छित वराला—पतीला प्राप्त करो. सोम ह्या कन्येला सौभाग्य प्रदान करो. त्यामुळें तेजस्वी बनलेल्या या कन्येनें पुत्राला जन्म देणाऱ्या जायेचे रूप धारण करावें. उत्तम उद्यानस्थानें ज्याप्रमाणें हरिणांना प्रिय होऊन हरीण त्या ठिकाणी निर्भयपणें राहतात त्याप्रमाणें ही कन्या आपल्या पतिसमवेत प्रसन्न चित्तानें राहून सौभाग्यवान होवो. हे कन्ये, इच्छित फळांनी भरलेल्या नावेमध्यें आरोहण कर. आपल्या पतीचें सान्निध्य प्राप्त कर. जो वर तुझी इच्छा करतो त्याच्याजवळ तूं आपण होऊन जा. हे वरुणा, या कन्येच्या वराला या कन्येच्या समोर आण. तिच्याबद्दल त्याला प्रेरणा लाभेल आणि तो तिच्याशी विवाहबद्ध होईल असें कर. या कन्येला अनुकूल होईल असा वर होवो आणि वरालादेखील ही कन्या आपली पत्नी आहे असें वाटेल असें कर. हे कन्ये, सर्व सुवर्णभूषणें, उटी, वगैरेची देवता सूर्य आहे. तो तुला, सोम, गंधर्व आणि अग्नि या देवतांच्या रक्षणासहित आपल्या पतीच्या स्वाधीन करीत आहे. हे औषधींनों, या कन्येला इच्छित पतीची प्राप्ती होवो. सूर्य तुझ्यायोग्य वराला तुझ्या समीप आणो. तो वर तुझें पाणिग्रहण करून तुला आपलीशी करो.



# तृतीय काण्ड

१. शत्रुसेनासंमोहनम् (शत्रूच्या सेनेला मोहित करणें. भ्रमित करणें.)

हा अग्नि सेनाध्यक्ष असून आमच्यावर आक्रमण करण्यास सिद्ध झालेल्या शत्रुसेनेची मनें व्याकूळ करून त्यांना शस्त्र उगारण्यास तो असमर्थ करतो. देवासुर युद्धामध्यें हा अग्नि देवसेनेला पुढें घेऊन जात होता आणि समोरच्या शत्रूचें भस्म करीत पुढें पुढें जात होता. हे मरुतानों, तुम्ही माझ्या सहाय्यार्थ माझ्या बरोबर राहून शत्रूवर प्रहार करा. हे वसु आमच्या प्रार्थनेला प्रतिसाद देऊन तूं देखील शत्रूवर प्रहार कर. हे इंद्रा, तूं आमच्या शत्रूसेनेच्या समोर ये. तूं आणि अग्नि शत्रुसैन्याला भस्म करून टाका. इंद्रा, तूं आपल्या वज्रानें शत्रूचा संहार कर. शत्रू-सेनेला संमोहित कर आणि अग्नीच्या सहाय्यानें भस्म कर. या शत्रूच्या सेनेला काहीं सुचूं देऊ नकोस आणि मरुद्गणांच्या सहाय्यानें त्या सेनेला नष्ट कर. अग्निदेव शत्रूच्या नेत्रांना विकृत करो.या आपत्तीमुळे शत्रुसेना भयभीत होऊन परत जाईल.

२. शत्रुसेनासमोहनम् (शत्रूला भ्रममय करणें)

देवदूताप्रमाणें नेहमी अग्रणी असणाऱ्या अग्नीनें शत्रुसेनेला भस्म करावें. तिला मोह उत्पन्न करावा आणि तिचें शस्त्रास्त्र चालविण्याचें सामर्थ्य नष्ट करावें. हे शत्रूंनो आमचा पराभव करण्याची इच्छा करणाऱ्या तुम्हाला हा अग्नि भ्रमिष्ट करून भस्म करील. हे इंद्रा

शत्रूच्या सेनेला तूं भ्रम निर्माण कर आणि अग्नि व वायूच्या सहाय्यानें तिला नष्ट कर. शत्रूच्या मनानों, तुम्ही भ्रमिष्ट व्हा. शत्रूचा जो संकल्प असेल त्याच्या विरुद्ध आचार करा. तुमचा युद्धविषयक उत्साह नष्ट करा. तिचें सुख नष्ट करा. हे अप्ला (पापदेवी) तूं शत्रूच्या मनांत प्रवेश करून त्यांची मति भ्रष्ट कर आणि मोहरूपी पिशाच्चाकडून तिचा नाश कर. हे मरुतांनों, आपल्या बलानें आमच्यावरोबर स्पर्धा करणाऱ्या आमच्या शत्रूचा आपल्या मायेनें नाश करा.

**३. स्वराज्ये राज्ञः पुनःस्थापनम्** (राजाला पुन्हा राज्यावर वसविणें)

हे अग्ने, राज्यभ्रष्ट झालेला हा राजा पुन्हा राज्याधिष्ठित होण्याची इच्छा करीत असून तुला आवाहन करीत आहे. हा राजा प्रजापालक आहे. द्यौ आणि पृथ्वीला व्यापून टाकणाऱ्या तुझ्या कृपेनें आणि मरुत्‌गणांच्या सहाय्यानें ह्या राजाला पुन्हा राज्यावर वसव. हे ऋत्विजांनों या राज्याच्या साहाय्यासाठीं देवराज इंद्राचें आवाहन करा. कारण या इंद्राला गायत्री, वृहती आणि वृहद्‌उक्थ यांनीं पराक्रमी वनविलें आहे. हे राजा, तुझें गेलेलें राज्य तुला प्राप्त व्हावें म्हणून, वरुण जलाच्या रूपानें, सोम पर्वताच्या रुपानें आणि इंद्र प्रजेच्या रुपानें तुला आमंत्रण करीत आहेत. म्हणून तूं अश्वगतीनें येऊन शत्रूनें पूर्वी जिंकलेल्या या राज्यावर अधिष्ठित हो. स्वर्गदेवता तुला तुझ्या राज्यांत येण्यासाठीं सहाय्य करीत आहेत. तुझा येण्याचा मार्ग हे अश्विनीद्वय शत्रुशून्य करीत आहेत. हे प्रजाजनहो, या राजाची तुम्ही पूर्वीप्रमाणेंच सेवा करा. तुझ्या प्रतिकूल असणारे प्रजाजन आतां तुला अनुकूल होतील आणि तुझ्या आज्ञेचें पालन करतील, इंद्र, अग्नि व विश्वेदेव तुला प्रजापालनाचें सामर्थ्य प्रदान करोत. हे राजा आपल्या वलाच्या योगें जो तुला सहाय्य करणार नाहीं त्याला हा इंद्र या राज्याच्या वाहेर घालवून देऊन तूं राजा असल्याचें घोषित करील.

**४. प्रजाभिः राज्ञः संवरणम्** (प्रजेकडून राजाचें स्वागत)

हे राजा, शत्रूकडून तुझें राज्य तुला परत मिळालें आहे. तूं प्रजेचें पालन करणारा आणि अजातशत्रू हो. सर्व दिशांमध्यें वास करणाऱ्या

देवता आणि सर्व दिशांना निवास करणारे मानव तुला आपला स्वामी समजून तुझ्या आज्ञेत राहोत. तूं या उत्तम सिंहासनावर आरूढ हो. आम्हां सेवकांची सेवा स्वीकारून आम्हाला धन दे. प्रजा तुझा आपला राजा म्हणून स्वीकार करीत आहे. तुझ्या प्रमाणें अन्य राजे तूं बोलव-तांच तुझ्याकडे येवोत. तुझे दूत, देवदूत अग्नीप्रमाणें सर्वत्र संचार करोत. तुझी पत्नी, पुत्र-पौत्र तुला प्राप्त झालेल्या राजैश्वर्यानें संतुष्ट होवोत. अश्विनीकुमार, मित्रावरुण आणि मरुद्‌गण तुला राज्यामध्यें अधिष्ठित करोत. तुला दानशील करोत. तूं आपल्या पराक्रमानें वैभववान हो. राजां तूं दूरदेशीं असलास तरी स्वदेशांत त्वरित परत ये. हे राजा इंद्र तुला वोलावीत आहे. तूं आपल्या राज्यांत परत ये आणि यज्ञादि कार्याला लाग. जलदेवता तुझें कल्याण करतील. या ,सर्व देवता तुला बोलावीत आहेत. तूं शंभर वर्षे पर्यंत सुखाने या राज्याचा उपभोग घे.

### ५. राष्ट्रस्य राजा राजकृतश्च (राजानें घडविलेलें राष्ट्र)

आपल्या वलानें शत्रूचा नाश करणारी, सर्व औषधीचें सार असा पर्णमणी मला प्राप्त होवो. कारण त्याच्या तेजानें मी तेजोवान होईन. मला स्थिरता प्राप्त होऊन धन व वल यांच्या वरोवरच राज्याचाही लाभ होईल. इंद्रादि देवांनीं स्वतःच्या इच्छेप्रमाणें फल देणारा हा पर्णमणि गुप्तपणें वृक्षामध्यें ठेवून दिला. आमचें आयुष्य वाढावें, भरण पोषण व्हावें म्हणून देवांनीं हा मणि आम्हाला प्रदान करावा. चंद्रकांत मणि दुसऱ्याचें सामर्थ्य कमी करतो. तो मला प्राप्त होवो. इंद्राच्या कृपेनें आणि वरुणाच्या प्रेमानें लाभलेला हा पर्णमणि मला शतायुषी होता यावें म्हणून मी धारण करीत आहे. तो चिरकाल माझ्याजवळ राहो. तो माझें कल्याण करो. हा मणि जवळ असतां आपल्यापेक्षां अधिक वलवान शत्रूला देखील मी पराभूत करूं शकेन. कोळी, सुतार, रथकार लोहार आणि अन्य कर्मकारी माझ्या स्वाधीन राहातील. राजाला अभिषेक करणारे पुरोहित, अन्य देशांतील राजसेवक, व्राह्मण, क्षत्रिय, सारथी आणि ग्रामप्रमुख या पर्णमणिमुळें माझ्या आधीन राहातील. हे पर्णमणि तूं सोमरूप असल्यानें देहरक्षक, वीर्यवान आणि सूर्याप्रमाणें

तेजस्वी असल्यानें माझ्या कल्याणासाठीं मी तुला धारण करीत आहे.

**६. शत्रुनाशन** (शत्रूचा नाश)

अत्यंत वीर्यवान, गायत्री सार असा खैराच्या वृक्षापासून तयार झालेला अश्वत्थमणि शत्रुनाश करणारा आहे. इंद्र आणि वरुण यांचा तो मित्र आहे. तो सर्व शत्रू नष्ट करतो. हे अश्वत्थवृक्षा, या मणीचें उत्पत्तिस्थान तूं आहेस. खैराच्या सालीचा भेद करून तूं ज्याप्रमाणें जन्माला आलास त्याप्रमाणें माझ्या शत्रूंचा तूं भेद कर. पिंपळवृक्ष ज्याप्रमाणें अन्य वृक्षांना दाबून वाढतो त्याप्रमाणें हा मणि धारण करणारे माझे शत्रू दवले जावोत. पापदेवी निर्ऋति माझ्या शत्रूंना बंधनांत जखडून टाको. हे अश्वत्थवृक्षा, अन्य वृक्षांपेक्षां तूं उंच वाढतोस. माझ्या शत्रूंची मस्तकें खाली करून तूं त्यांचा नाश कर. तीरावर असलेल्या वृक्षाला बांधलेली नांव मुक्त करतांच नदीच्या प्रवाहावरोबर वाहात जाते त्याप्रमाणे माझे शत्रू असेच वाहात जावोत आणि त्यांचा शोधही न लागो. या पिंपळाच्या झाडाला मंत्राने अभिमंत्रित केल्यावर शत्रूचें उच्चाटण होतें.

**७. यक्ष्मनाशन** (क्षय-पंडुरोग, नाश)

अत्यंत द्रुतगामी कृष्णमृगाचे शिंग हे रोगनाश करणारें औषध आहे. माता-पित्यांकडून आलेला क्षय अगर कुष्ठ या रोगांचा नाश हें औषध करतें. हे मृगशृंगा, या शरीरांतील रोगांचा नाश व्हावा म्हणून मी तुला धारण केलें आहे. हृदयांत निर्माण होणारा क्षय तूं नाहीसा कर. या हरणाचें कातडें सुशोभित असून त्याच्या उपयोगानें मी शरीरस्थ रोगांना दूर करतो. आई-वडिलांकडून आलेला, दमा, क्षय, कुष्ठ वगैरे रोगांवर मी विजय मिळवूं शकतो. पाणी हें मूळचें औषध आहे. ते सर्व रोगांचा नाश करणारें आहे. हे रुग्णा, हें पाणी तुला रोगापासून मुक्त करो. विविध प्रकारच्या अन्नानें शरीरांत निर्माण होणारे रोग मी मला ज्ञात असलेल्या औषधानें दूर करतो. रोगांना कारण होणारें पाप उषःकाली अगर प्रातःकाळीं केलेल्या स्नानानें नष्ट होतें. आमच्या शरीरातून समस्त रोगांचें उच्चाटन होवो.

**टीप–** आपो विश्वस्य भेषजीः । पाणी हे विश्वाचें रोग दूर करणारें औषध आहे. उषःकालीं किंवा सूर्योदयापूर्वी निसर्गरम्य पाण्यानें स्नान केल्यास रोगांचा प्रादुर्भाव होत नाहीं हा महत्त्वाचा सिद्धांत या ठिकाणीं आला आहे. हा आचार म्हणून आपल्या नित्यकर्मांत याला महान स्थान देण्यांत आलें आहे.

## ८. राष्ट्रधारणम् (राज्य करणें)

मृत्यूपासून संरक्षण करण्यास समर्थ आणि मित्राप्रमाणें उपकारक मित्रादि देवता वसंतादि सर्व ऋतूंमध्यें आम्हाला दीर्घायुष्य देवोत. वरुण, वायु आणि अग्नि आम्हाला राज्य करण्याचें सामर्थ्य प्रदान करोत. ब्रह्मदेव, अर्यमा आणि सविता आमच्या आहुती स्वीकारोत. इंद्र, त्वष्टा, देवमाता अदिती आणि यजमानाला सर्वश्रेष्ठ पद प्राप्त करून देणारा सोम याना मी आवाहन करीत आहे. या देवता आम्ही केलेली स्तुती श्रवण करोत. आम्ही दिलेल्या आहुतींच्या योगानें अग्नि प्रज्वलित होवो. मला तो श्रेष्ठत्व प्रदान करो. हे स्त्रियांनों, तुम्ही तुमच्या अपत्यां-जवळ राहावें या तुमच्या इच्छेला विश्वेदेव साथ देवो. पूषादेव तुम्हाला सत्कर्माची प्रेरणा प्रदान करो. आमच्यापेक्षां विरुद्ध विचार करणा-ऱ्यांची मनें आम्ही वळवून आपलीशी करूं. तुम्ही माझ्या मनाला अनुकूल व्हा. माझ्या मनाप्रमाणें काम करा आणि मला सदैव अनुकूल होऊन राहा.

## ९. दुःखनाशनम् (दुखःनाश)

ज्यांना नखें आहेत असे व्याघ्रादि प्राणि, खूर असलेले गाई अश्वादि प्राणी आणि खूर अगर नखें नसलेले सर्पादि प्राणी यांचें पर्जन्यादि प्रकारांनीं पोषण करणारे आकाश हा त्यांचा पिता आणि या सर्वांना धारण करणारी पृथ्वी ही त्यांची माता आहे. हे देवगणांनों, तुम्ही ज्याप्रमाणें तुमची विघ्ने दूर केलीत त्याप्रमाणें आमच्या विघ्नांचें कारण तुम्ही नाहीसे करा. इच्छित फळ प्राप्त न झाल्यानें पापमय मनुष्यांच्या पापाचें निराकरण करण्यासाठी आणि विघ्नांच्या शांतीसाठीं, अरलू (टेंटू) नाम वृक्षाचें बी आम्ही धारण करतो. स्वायंभुव मनूनें हें बी धारण केलें होतें. मी देखील याच्या योगें सर्व विघ्नें दूर करीन. पिवळट रंग असलेले ह्या

वृक्षाचे वी विघ्न शमनार्थ धारण केलें जातें. या योगें आमच्या शरीरातील, कफ, सांधेदुखी वगैरे रोग नाहीसे होवोत. हे मानवांनों, तुम्ही शत्रूवर विजय प्राप्त करून ऐश्वर्य प्राप्त करण्याची इच्छा करतां पण आसुरी मायेनें मोहित झालेल्या देवांप्रमाणें तुम्हीही मोहवश झालां आहांत. कुत्र्यांना वानर ज्याप्रमाणें दूषण ठरतात त्याप्रमाणें वांकलेला आणि वहिरा मनुष्य शास्त्राचें दूषण आहे. विघ्नांची शांति होतांच हे मानवानों तुम्हीं शंकामुक्त व्हाल आणि आपल्या कार्यास लागाल. पृथ्वीमध्यें असलेल्या अनेक विघ्नांचा नाश अरलूच्या बीपासून होतो म्हणून मनुष्यें त्याचा वापर करतात.

## १०. **रायस्पोषप्राप्तिः** (ऐश्वर्यप्राप्ति)

सृष्टीच्या प्रारंभी उत्पन्न झालेल्या उषेनें अंधकार दूर केला. ही धेनू आमच्यासाठीं दुग्धवती झाली. रात्र जवळ येत चाललेली पाहून हवि प्राप्त करणारे देव ज्याची प्रशंसा करतात त्या संवत्सराची सुमंगली नावांची पत्नी आमच्यासाठीं कल्याणमयी होते. या उषेचा नित्य उदय होतो. अग्नि, सूर्य आणि सोमादि देवता तिच्या सान्निध्यांत असतात. सूर्यपत्नी उषा सर्व प्राणिमात्रांना प्रकाश प्रदान करते आणि त्यांचे कल्याण करते. मुसळ, उखळ, ही वृक्षाची रूपें आहेत. अन्न कुटून वारीक करण्याचें काम तीं करतात. या अन्नामुळें आम्हाला सुन्दर पुत्र, भृत्य आणि धन यांचा लाभ होतो. हे जातवेद, तूं आमच्या आहुती स्वीकारून प्रसन्न हो. गाय, घोडा, वकरी, उंट वगैरे प्राणि माझ्यावर प्रेम करोत. हे रात्री, मला धन, पुत्र आणि पौत्रादि संपत्ती प्रदान कर. तुझ्या कृपेनें आम्ही देवांची कृपा प्राप्त करूं. हे एकष्टके, संवत्सर तुझा पती आहे. त्याच्या समवेत राहून तूं आम्हाला ऐश्वर्यवान आणि आयुष्यवान कर. वसंतादी सहा ऋतूंच्या देवता, ऋतूंचे अवयव म्हणून गणलेल्या चोवीस पक्ष, वारा महिने यांना आम्ही हवि प्रदान करून संतुष्ट करतो. काल हा संसाराचा स्वामी आहे. आम्ही त्याचें पूजन करतो. सर्व समृद्धि प्राप्त व्हावी म्हणून या सर्व देवतांच्या निमित्तानें मी यज्ञ करतो. त्यांना घृतासहित हवि प्रदान करतो. त्यामुळें या देवता

प्रसन्न होतात आणि आम्हाला गोधन देऊन आमच्या सर्व कामना पूर्ण करतात. एकाष्टिकेनें उत्पन्न केलेल्या इंद्रानें असुरांचा पराभव केला. हे एकाष्टके, तूं प्रजापतीची कन्या आहेस. आमचे हवि तूं स्वीकार आणि आम्हाला ऐश्वर्यवान कर.

## ११ दीर्घायुः प्राप्ति (दीर्घायुष्यलाभ)

तुझ्या शरीरांत राजयक्ष्मा नांवाच्या रोगानें नकळत प्रवेश केला आहे. यज्ञामध्यें सर्व प्रदान करून मी सोम प्राशन केलेल्या तुला त्या रोगापासून मुक्त करतो. त्यामुळें तूं दीर्घायुषी होशील. हे इंद्रा, पिशाच्चानें प्रभुत्व स्थापित केलेल्या या बालकाला तूं मुक्त कर. निरनिराळ्या व्याधीमुळें मनुष्याचें आयुष्य क्षीण होते आणि या लोकांतून तो यमलोकीं जातो. अशा मनुष्याला सुद्धां मी यमलोकांतून परत आणून दीर्घायुषी करीन. ज्या यज्ञाच्या योगें नेत्र आणि कान यांचे सामर्थ्य वाढते त्या यज्ञाच्या योगानें अशा मनुष्याला मी यज्ञलोकां-तून परत आणून दीर्घायुषी करीन. ह्यांनी मी इंद्राला प्रसन्न करीन. तो मनुष्याचे पाप नाहीसे करून शतवर्षाचें आयुष्य त्याला प्रदान करील. हे मनुष्या, तूं शंभर शरद्ऋतू, शंभर हेमंतऋतू आणि शंभर वसंत-ऋतूंचा उपभोग घे. इंद्र, अग्नि, सविता आणि बृहस्पति तुला शतायु करोत. बैल ज्याप्रमाणें आपल्या गोठ्यात प्रवेश करतो त्याप्रमाणें प्राणादि वायु तुझ्या शरीरांत प्रवेश करून मृत्यूला कारणीभूत होणाऱ्या रोगांना बाहेर घालवो. प्राणादि वायूंनों तुम्ही कोणत्याही काळीं या शरीराचा त्याग करू नका. वृद्धावस्थेपर्यंत या मनुष्याचें आयुष्य वृद्धिंगत करा. सर्व रोग तुझ्यापासून दूर जावोत. अकाल मृत्यूपासून बृहस्पति तुझें रक्षण करोत.

## १२. शालानिर्माणम् (घर बांधणें)

खांबांच्या सहाय्यानें उभारलेल्या घृतादि पदार्थांची समृद्धि करणाऱ्या, भयरहित, रोग आणि संकटें रहित आणि पुत्र-पौत्रादिकांनीं भरलेल्या घरांत मला राहावयास मिळो. हे निवासा, तूं घृतदुग्धादि अन्न, गो-अश्वादि ऐश्वर्य, बालांची वाणी कानी पडेल अशी मंगल

अवस्था आमच्यासाठीं निर्माण कर. तूं देवतांचा आश्रय करतेस. तुझ्यामध्यें आमच्या पुत्रांचा प्रवेश होवो. घर निर्माण करण्यामध्यें कुशल असलेल्या बृहस्पति, सविता, वायु आणि इंद्र खांबांच्या साहाय्यानें घर तयार करोत. मरुत्‌गण घृत आणि जलसिंचन करोत आणि भग-देवता भोंवतालची जमीन उत्पन्नक्षम करोत. धान्यांचे रक्षण करणारें, प्राण्यांचें पोषण करणारें, प्राण्यांना सुख प्रदान करणारे, देवता आणि मनुष्यें यांना उपभोग घेतां यावा म्हणून हे घर तयार करण्यांत आलें आहे. हे वंश-स्तंभ तूं घराच्या मध्यभागीं उभा रहा. या घरामध्यें राहाणारें कधीही संतप्त न होवोत. पुत्रपौत्रादिकांनीं समृद्ध होऊन ते शतायुषी होवोत. या घरामध्यें तरुण पुत्र येवोत. गाई वासरें, मधुर अन्न आणि दुग्धपूर्ण कलश आगमन करोत. हे गृहस्वामिनी या घरामध्यें येणाऱ्यांना जल, मध आणि घृतानें तूं संपन्न कर. या घरांत चोर आणि अग्नि यांचे भय नाहींसे होवो. इष्ट व धर्म्य कृत्य करणारे या घरांत सुरक्षित होवोत. क्षयनाशक आणि यक्ष्मरहित जलकलशाचा कधीही नाश न होणाऱ्या अग्नीचे मी या घरांत स्वागत करतो.

## १३. आप: (शुद्ध पाणी)

इकडे तिकडे फिरणाऱ्या आणि नाद करणाऱ्या मेघातून जन्म झाल्यावरोवर हे पाण्या तुला आप हे सार्थ नाव प्राप्त झालें. वरुणाच्या प्रेरणेनें केलेल्या नृत्यावर प्रसन्न होऊन इंद्रानें तुम्हाला दिलेल्या शक्तीच्या वरदानामुळें वारि हे नांव प्राप्त झालें. एकदा इंद्रानें पाण्यावर नियंत्रण करीत पाण्याला गौरविलें त्यामुळें पाणी वर उठून सर्वांवर सिंचन करतें झालें तेव्हां त्या पाण्याला उदक असें नांव प्राप्त झालें. जगाचें कल्याण करणाऱ्या पाण्यामध्यें आहुत केलेलें घृत जलरूप होतें म्हणून या पाण्यास जल अशी संज्ञा प्राप्त झाली. हे पाणी अग्नि आणि सोम यांना धारण करतें. त्यामुळें तें मधुर, बलपूर्ण आणि प्राणवायुमय होतें. पाणी नाद करीत प्रत्येक प्राण्याला तृप्त करतें. त्यामध्यें अमृताचे गुण आहेत. पाणी हें हृदय असून, शक्तीचें अपत्य आहे. अशा या शक्तिशाली पाण्याला मी या शरीरांत प्रविष्ट करीत आहे.

(पाणी या अर्थानें संस्कृतमध्यें अनेक शब्द आहेत. वरील ऋचा वरीच रूपकात्मक आहे. तिचें सामान्य स्वरूप खालीलप्रमाणें आहे.)

**आप**– मेघातून पृथ्वीवर येतांना पृथ्वीला स्पर्श करण्यापूर्वी १५० हातावर अगर अधिक वर असलेलें शुद्ध पाणी. (distilled water)

**उदक**– शिंपडलें जाणारें किंवा पाण्याच्या पातळीपासून उंच नेलें जाणारें पाणी.

**जल**– ज = जन्म देणें, ल = पालन पोषण करणें. हे दोन्ही गुण ज्यामध्यें आहेत असें पाणी. वनस्पती व प्राण्यांना उपयुक्त.

**वारि**– दोष दूर करणारें पाणी.

**तोय**– केवळ तहान नाहीशी करणारें पाणी.

**सलिल**– नदी नाल्याच्या रूपानें प्रवाहित होणारें पाणी.

१४. **गोष्ठ**– (गोठा)

हे गाईनो, तुम्हाला सुखमय वाटेल असे गोठे आम्ही निर्माण करतो. गवत आणि पाणी या योगें ते समृद्ध करतो. तुमच्या गोठ्यांत तुम्ही पुत्र-पौत्रादिकांनीं समृद्ध होऊन निवास करा. अर्यमा, पूषन् इंद्र आणि बृहस्पति तुम्हाला जन्म देवोत. तुम्ही माझ्यासारख्या साधकाला दूध, तूप वगैरे पदार्थ देऊन पुष्ट करा. हे गाईंनों, या गोठ्यामध्यें तुम्ही तुमच्या संततीसह निर्भयपणें रहा. तुम्हाला कोणत्याही रोगाची पीडा न होवो. हे गाईंनों, मधुर दुधानें भरलेली कास तुम्हाला प्राप्त होवो. माशी ज्याप्रमाणें अत्यंत अल्प काळात असंख्य होते त्याप्रमाणें तुमची वृद्धी होवो. या गोठ्यामध्यें अनंत काळ-पर्यंत तुम्ही राहा. मी तुमचा स्वामी आहे. माझ्या गोठ्यामध्यें तुम्ही चिरकाल राहा आणि मलाही चिरायुषी करा.

१५. **वाणिज्यम्** (व्यापार-उदीम)

एक व्यापारकर्ता म्हणून मी इंद्राची स्तुती करतो. त्याच्या प्रेरणेनें व्यापाराची निंदा करणारे, व्यापाराचे शत्रू, व्यापाराच्या मार्गात आडवे येणारे हिंसक आणि जाण्यायेण्याच्या मार्गावरील व्याघ्रादि हिंसक प्राणी नष्ट होवोत. इंद्र मला माझ्या व्यापारांत लाभरूपानें धन प्रदान करो.

ज्या देशांत आम्ही व्यापार करतो तो देश दुधातुपानीं समृद्ध होऊन आम्हाला अनुकूल होवो. त्या ठिकाणीं केलेल्या व्यापारांत प्राप्त झालेलें द्रव्य घेऊन मी स्वगृहीं जाईन. हे अग्ने, व्यापारामध्यें भरपूर लाभ मिळविण्याच्या इच्छेनें, जलद जाण्याची शक्ती मिळण्यासाठीं मी तुझी स्तुती करीत आहे. तुझ्यामुळें मला भरपूर धन प्राप्त होईल. मी तुला हवि अर्पण करीत आहे. हे अग्ने, लांववर प्रवास करतांना आमच्या व्रतामध्यें जो खंड होईल त्याचा दोष दूर करून तूं मला क्षमा कर. या दूरच्या देशांत कष्ट सहन करण्याचीं तूं मला शक्ती दे. माझा व्यापार लाभदायक आणि सुखदायक होवो. मी तुला देत असलेला हवि तू स्वीकार. मला मिळणारें धन मला सुखी करील असें कर. व्यापारांतील लाभाच्या आड येणाऱ्या देवता माझ्या हवीनें संतुष्ट होवोत. धनदेवतांच्या कृपेनें माझें धन सतत वृद्धिंगत होवो. इंद्र, सविता, सोम, प्रजापति आणि अग्नि मला धनलाभ होणाऱ्या व्यापारासाठी प्रेरणा देवोत. देवांना घेऊन येणाऱ्या अग्ने, तुला आम्ही हवि अर्पण करीत प्रार्थना करतो कीं, आमचे पुत्र पौत्रादि सर्व सुरक्षित राहोत. सर्व प्राणिमात्रांचा ज्ञाता असलेल्या अग्ने, आमच्या अश्वादि प्राण्यांना ज्याप्रमाणें आम्ही रोज चारा देतो त्याप्रमाणें तुला हवि देतो. तुझ्या कृपेनें तुझे सेवक धनादि संपत्तीनें सदैव तृप्त राहोत.

### १६. **स्वस्तये प्रार्थना** (कल्याणकारक प्रार्थना)

या प्रातःकालीं, उत्तम फळाच्या अपेक्षेनें आम्ही इंद्र, मित्र, वरुण, अश्विनीकुमार, पूषन्, भग, ब्रह्मणस्पति, सोम, रुद्र सर्वांचा धारणकर्ता आणि पालनकर्ता, दरिद्र्यांना त्यांच्या मनाप्रमाणें फल देणारा, राजासुद्धां ज्याची नित्य पूजा करतो अशा अदितीपुत्र सूर्याला आम्ही आवाहन करीत आहोंत. हे सूर्या, तूं प्रदान केलेल्या धनाचा कधीही नाश होत नाहीं. तूं आम्हाला बुद्धीरूपी धन प्रदान कर. हे भग, तूं आम्हाला पुत्र-पौत्र, गाई, अश्व, नोकरचाकर, वगैरेनीं समृद्ध कर. तुझ्या कृपेनें आम्ही चांगली कर्में करीत तृप्त होतो. सूर्योदय, मध्यान्ह आणि सूर्या-

अ...५

स्ताच्या वेळीं हे इंद्रा, सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देईल असें कर. हे भगदेवता, तुझ्या सेवेत आम्ही नेहमी अग्रभागीं राहूं. आम्ही तुला आवाहन करीत आहोत. पुरुष अश्वावर स्वार झाल्यावर चालण्यास तयार होतो, त्याप्रमाणें पूर्व क्षितीजावर आरूढ झालेल्या धनदा उषा भगदेवतेला माझ्याकडें आण. अश्व आणि गाई यांनी संपन्न झालेली उषा आपल्या घरांमध्यें सदा उदित होवो. हे उषा देवते, आमची कर्में तूं नष्ट करूं नकोस. आमचें नित्य रक्षण कर. तूं सर्वगुणसंपन्न असून सर्वांचे कल्याण करणारी आहेस.

## १७. कृषि (शेती)

हवि प्रदान करण्यास लागणाऱ्या अन्नाच्या प्राप्तिसाठीं कुशल शेतकरी वृषभाना नांगराला जोडतो. त्या योगें नांगरलेल्या शेतांत व्रीहि यवादि धान्यांची पेरणी करतो. हें अन्न लवकर आमच्या स्वाधीन होवो. शेती करण्यास योग्य असलेल्या जमिनीला, लोखंडाचा फाळ वसविलेला नांगर सुख देतो. त्याच्यामुळें धान्यवृद्धी होते. या धान्याच्या साहाय्यानें सोमयाग संपन्न करतां येतो. कारण या धान्यांचा अंकुर भूमींत असतो. गाई वगैरे पशूंच्या वृद्धीला हा अंकुर कारण होतो. इंद्र या शेतांत सऱ्या तयार करो, पूषा त्यांचें रक्षण करो. ह्या सऱ्या इच्छित फळांनीं वर्षभर समृद्ध होतील. शेत जल आणि धनानीं संपन्न होईल. नांगरांचा लोखंडी फाळ बैलांच्या मागून जावो. सूर्य आणि वायू, आमचा हवि स्वीकारून आमचें शेत संपन्न करोत. कृषक समाधानानें शेतामध्यें नांगराला बैल जोडोत. या नांगराच्या दोऱ्या बैलांना सुखद होवोत. या चाबकामध्यें देखील सुख भरलेलें असो. आकाशातील जलदेवता पर्जन्य वृष्टीनें ही नांगरलेली भूमी भिजवोत. हे सऱ्यांनों, तुम्हाला आमचा नमस्कार असो. तूं सुन्दर फलासह आमच्या समोर या. मधुर रसानें भरलेल्या, घृताप्रमाणें पौष्टिक अन्नयुक्त होऊन विश्वेदेव आणि मरुतांच्या प्रेरणेनें जलासह आमच्याकडे या.

## १८ वनस्पतिः (वनस्पति)

जी वनस्पति माझ्या सवतीला बाधकारक होऊन माझा पति मला

प्राप्त करून देईल अशा, वलवान उत्तानपर्णा नामक वनस्पतीला जमीन खणून मी प्राप्त करते. हे ऊर्ध्वपर्णे, माझ्या सवतीला माझ्या पतीच्या जवळ येवूं देवूं नकोस. माझ्या पतीला वलपूर्ण होऊन माझ्याजवळ राहू दे. हे सवते, तूं माझ्या पतीच्या सहवासात येवूं नकोस. मी तुझें नांव सुद्धा घेत नाहीं. तू दूर हो. हे उत्तानपर्णे माझी सवत सर्व नीच होऊन मला श्रेष्ठत्व मिळू दे. हे औषधी वनस्पते, तूं शत्रूचा पराभव करण्यास समर्थ आहेस. तुझ्या प्रभावाने मी माझ्या सवतीस आपल्या ताब्यांत ठेवूं शकेन. हे सवते मी पलंगाच्या चारी बाजूस ही उत्तानपर्ण वनस्पती पसरून ठेवते. त्यामुळें तुझें मन मोहवश होईल आणि वत्स ज्याप्रमाणें गाईच्या मागून धावते त्याप्रमाणें माझ्यामागून येईल.

## १९ अजंरक्षत्रम् (अविनाशी सामर्थ्य)

जातीला भ्रष्ट करणारे व दोष नाहीसे करणारे ब्राह्मणत्व संपन्न होवो आणि त्यांचे मंत्र उत्तम फलदायी होवोत. या मंत्रांनी शारीरिक वल वाढो आणि ज्या क्षत्रियाचें आम्ही पुरोहित आहोत यांचे क्षत्रियत्व वृद्धिगत होत जावो. ज्या राज्यामध्ये मी राहातो तो राजा वलसमृद्ध आणि त्यांची सेना शत्रूचा पराभव करणारी शक्तीशाली होवो. आमच्या कार्यातील चूक व वरोवर यांचे ज्ञान असलेला, विजयाच्या इच्छेनें सेनेला एकत्रित करणारा, शत्रूच्या समोर येताच शत्रू त्याला शरण येवो. या मंत्राच्या साहाय्याने शत्रूला क्षीण करून राजाचा विजय निश्चित करतो. ज्या राजाचा मी पुरोहित आहे तो राजा कुऱ्हाडीपेक्षां देखील तीक्ष्ण होऊन शत्रूचा विध्वंस करो. संपूर्ण विश्वाचें भस्म करण्याचें सामर्थ्य असलेला अग्नि शत्रुसेनेला भस्म करो. मी राजाची शस्त्रें धारवान करतो. या राजाला विजय प्राप्त होवो आणि देव त्याच्या मनाचे रक्षण करोत. हे इंद्रा, तुझ्या प्रसन्नतेमुळें आमचे रथ आणि अश्व संग्रामांतही प्रसन्न राहोत. आमचे शूर सैनिक गर्जना करोत. ती गर्जना सर्वत्र निनादो. हे सैनिकानों, रणक्षेत्राकडे जा. आयुधानीं सज्ज झालेल्या हातांनीं तुम्ही शत्रूवर वार करा आणि त्याला नष्ट करा. इंद्रापेक्षा श्रेष्ठ असलेले मरुद्गण आपल्या सैन्यासह

तुमच्या साहाय्याला आले आहेत. मंत्रानें शक्तिसंपन्न झालेला. वाण शत्रूला मारण्यांत कुशल आहे. तूं शत्रूसैन्यांत घुसून त्यांच्यावर विजय प्राप्त कर. शत्रूचे हत्ती, अश्वस्वार, पायदळ यांच्यासह सर्व शत्रुसैन्याचा संहार कर.

## २० रयिसंवर्धनम् (ऐश्वर्यवृद्धी)

हे अग्ने, यज्ञासाठीं तुझा जन्म आहे. या यज्ञामध्यें तू प्रविष्ट होऊन आमच्या धनाची वृद्धि कर. तूं वैश्वानर रूपानें प्रजापालक होतोस आणि इच्छित धन प्रदान करतोस. अर्यमा, भग, वृहस्पति, इंद्राणी आणि सरस्वतीदेवी आम्हाला धन प्रदान करोत. सोम आणि अग्नि यांना आम्ही आमच्या संरक्षणासाठीं आवाहन करतो. अदितीपुत्र तीन पदामध्यें त्रैलोक्य पादाक्रांत केलेल्या विष्णूंना, सर्वकर्मप्रेरक सूर्य, विश्व-उत्पादक ब्रह्मा, देवांचें हित करणारा वृहस्पति यांना देखील आम्ही आवाहन करतो. हे अग्ने, आमचा यज्ञ सफल कर. तुला हवि देणाऱ्या-यजमानाला धन दे. या कर्मांत आम्ही इंद्र आणि वायूला देखील आवाहन करीत आहोत. हे स्तोत्यांनों, इच्छित फल देणाऱ्या अर्यमा, वृहस्पति, इंद्र, सरस्वती, सूर्य आणि विष्णू यांना आवाहन करतो. अन्नाची उत्पत्ती करणारी कर्में आमच्याकडून त्वरेने होवोत. हे सर्व प्राणी अन्न उत्पन्न करणारे आहेत. दान देणाऱ्यांना दानाची प्रेरणा या देवता देतात. या देवतांच्या कृपेनें आमचे पुत्रपौत्र चिरायुषी होवोत. पृथ्वी, आकाश, दिवस, रात्र, पाणी आणि औषधी आम्हाला इच्छित धन प्रदान करोत आणि आमच्या हृदयांत आम्ही जो संकल्प करू तो यांच्या कृपेने पूर्ण होवो. सर्व प्रकारची समृद्धी प्रदान करणारी वाणी मी उच्चारतो. हे वाणी, तुझ्या तेजानें मी संपन्न होवो. वायू माझ्या शरीरांत प्राणरूपानें संचार करो आणि त्वष्टा मला पुष्ट करो.

## २१ शांतिः (शांतिलाभ)

मेघांतील विद्युत्रूपी अग्नि, पाण्यांतील वडवानल मनुष्याच्या शरीरातील वैश्वानर आणि रत्नांतील तसेंच अन्य सर्व ठिकाणीं असलेल्या अग्नीला आमचे हवि अर्पण होवोत. जो अग्नि सोमामध्यें

पाचकरसाच्या रूपानें अधिष्ठित आहे, तसेंच जो अग्नि प्राणिमात्रांच्या हालचालीला कारणीभूत होतो त्यांनाही आमचा हवि प्राप्त होवो. अगणित गुणवंत असलेला हा अग्नि इंद्रावरोवर रथगामी होऊन, माणसांच्या शरीरांत वैश्वानर रूपानें, वनांत दावानल रूपानें आणि संग्रामात शत्रूवर प्रभाव पाडून त्यांना हताश करणारा अग्नि आमच्या आहुती स्वीकारो. विश्वामध्यें संचार करणारा, इष्ट फल देणारा, धीरवान, सर्व कार्यांची प्रेरणा देणारा अग्नि आमचा हवि स्वीकारो. ज्यामुळें प्राणिमात्रांना बल प्राप्त होतें, वर्षाचे तेरा महिने व सर्व ऋतुमध्यें अग्नीला. आवाहन केलें जातें, त्या सत्यवादी प्रभारूप अग्नीला आमचे हवि समर्पण होवोत. ज्या अग्नीच्या पाठीवर सोम वसतो, वृषभ ज्याचें अन्न आहे, संसारी जीवामध्यें वैश्वानर म्हणून जो वावरतो त्या अग्नीला आमच्या आहुती समर्पित होवोत. पृथ्वी आणि अंतरिक्षात प्रकाशरूपानें संचार करणारा मेघ आणि विद्युत यांमध्यें ज्योतीच्या रूपानें राहणारा सर्व दिशांमध्यें वास्तव्य करून संसाराला आश्रय ठरणाऱ्या अग्नीला आमचा हवि प्राप्त होवो. स्तुतिपाठकांना दान देण्यासाठीं ज्यांच्या हातामध्यें सुवर्ण आहे त्या इंद्र, सूर्य, मित्र, वरुण व अग्नि याचे अंगिराऋषी आवाहन करीत आहेत. क्रव्यादि अग्नि त्यामुळें संतुष्ट होतो (हव्य– यज्ञांतील हवि, कव्य– पितरांना दिलेलें श्राद्धान्न) सूर्याच्या कृपेनें, क्रव्यवाहक अग्नि, हिंसा करणारा अग्नि, वनभक्षक दावानल अग्नि, सोमधारक, पर्वतावर शयन करणारा आणि मेघ व वायुमध्यें जोरानें संचार करणारा अग्नि शांत होवो.

## २२. वर्चः प्राप्तिः (सत्तालाभ)

मला हत्तीप्रमाणें विरोधशून्य तेज प्राप्त होवो. देवमाता अदितीच्या देहतेजापासून देव उत्पन्न झाले ते तेज मला प्राप्त होवो. दिनप्रमुख मित्र, रात्रप्रमुख वरुण आणि स्वर्गराज इंद्र माझ्यावर कृपा करोत. या सर्व देवता संसारपोषक आणि तेज प्रदान करणाऱ्या आहेत. ज्या योगानें राजाला अधिकार-तेज प्राप्त होतें, जलांतील प्राण्यांना बलसंपन्न होता येतें, हत्तीला महान देह प्राप्त होतो, यक्ष आणि गंधर्व यांना यश प्राप्त

होतें आणि इंद्राला देवत्व प्राप्त होतें ते तेज अग्नि मला प्रदान करो. प्राण्यांना उत्पन्न करणाऱ्या आणि यज्ञासाठीं आवाहन केल्या जाणाऱ्या अग्निदेवा, तुझ्यामध्यें जेवढें तेज आहे, सूर्यामध्यें जेवढें तेज आहे त्या तेजानें पद्ममालाभूषित अश्विनीकुमार तेजोमय होवोत. नेत्रांनीं नक्षत्रां-पर्यंत पाहतां येतें, चार दिशांना नेत्र व्यापून टाकतात. इंद्राचे अपूर्व तेज मला प्राप्त होवो. हत्ती शक्तिमान असल्यानें सर्वांवर वर्चस्व ठेवतो ते हत्तीचे भाग्य मला लाभो.

## २३. वीर प्रसूतिः (विरांना जन्म देणें)

हे स्त्रिये, तूं ज्या पापामुळें वंध्या झालीस तो पापरूपी रोग मी तुझ्यापासून दूर करतो. इतकेंच नव्हे तर तो रोग पुन्हा तुझ्याकडे येऊं नये म्हणून मी त्याला दूर करीत आहे. हे स्त्रिये, तुझ्यामध्यें वीर्ययुक्त गर्भाची स्थापना होवो. हा गर्भ दहा मासपर्यंत तुझ्या गर्भाशयांत वाढून दहाव्या महिन्यांत तो पुत्ररूपानें प्रकट होवो. हे स्त्रिये, तूं पुत्रांना जन्म देणारी पुत्रवती हो. हे स्त्रिये, ज्या वीर्याच्या प्रभावानें बैल गाईमध्यें वत्स उत्पन्न करतात या वीर्याच्या प्रभावानें तुला पुत्र प्राप्त होवो. तुला अनेक पुत्र होवोत. हे स्त्रिये, देवांनी निर्माण केलेल्या प्रजनन नियमाप्रमाणें तुला सुख देणाऱ्या पुत्राचीच प्राप्ती होईल. वर वाढत जाणाऱ्या औषधी वनस्पतींचा पिता आकाश आहे आणि माता पृथ्वी आहे. या औषधी पाण्यामुळें वाढतात. त्या औषधी तुझ्या वीरपुत्रांचें रक्षण करोत.

## २४. समृद्धि प्राप्तिः (समृद्धीचा लाभ)

सर्व औषधी वनस्पती, सर्व प्रकारची अन्नधान्यें आणि माझी वाणी रससमृद्ध होवो. या सारमय देवतेचा मी ज्ञाता आहे. तो सर्व रसांची वृद्धि करतो. धनधान्य एकत्रित करणाऱ्या देवतांना आम्ही आवाहन करतो. यज्ञ न करणाऱ्या परंतु धनवानाचे समस्त धन संभृत्वा–देव आम्हाला प्रदान करो. पर्जन्यामुळें नदीचें पाणी ज्याप्रमाणें आंतील जीवाना घेऊन एका ठिकाणाहून दुसरीकडे जाते त्या प्रमाणें चारही दिशांकडून येणाऱ्या धनधान्यानें यजमान समृद्ध होवो. सहस्रावधी

धारांनीं संपन्न झालेल्या नदीचें उत्पत्तीस्थान संपन्न असतें त्याप्रमाणें यजमानाला धान्यांदिकांनी समृद्ध करतांना संचित धान्यामध्यें क्षीणता न येवो. हे देवतांनों तुम्ही आपल्या हजारों हातांनीं आम्हाला धन आणून द्या आणि माझ्या कर्मफलांनीं मला समृद्ध करा. गंधर्व व अप्सरा यांच्याजवळ जी कलासंपन्नता आहे त्याचा स्पर्श मला होवो. हे प्रजापते, समृद्धी करणारे उपोह– देव आणि या समृद्धीची वाढ व रक्षण करणारे समूहदेव तुमचे सारथीरुप आहेत. त्यांना घेऊन तुम्ही या.

**२५. कामस्य इषु:** (कामवाण)

हे स्त्रिये, ही उत्तुद नामक देवता तुला कामव्यथित करते. ही कामव्यथा भयंकर आहे. तिला कामवाणानें मी विद्ध करतो. या कामव्यथेमध्यें रममाण होणें हें तिचें फळ असून काम असफल होणें हें पर्ण, भोग संकल्प– व सिद्धी हे त्याचें फळ आहे. कामदेव आपल्या वाणानें तुझ्या हृदयांत वृद्धिंगत होणारा हा कामवृक्ष छेदून टाकतो. या वाणानें शरीराला आश्रयभूत असणारी प्लीहा सुखावेल आणि तुझें हृदय मात्र आक्रोश करील. त्यानें तुझा कंठ कोरडा पडेल. प्रणयकलहाचा त्याग करून तूं मृदु भाषण कर आणि मला प्रिय हो. हे मित्रावरुणानों या स्त्रीच्या मनांतील कामज्ञान नाहीसे करा म्हणजे ती सर्व कार्यकुशल होऊन मला वश होईल.

**२६. दिक्षु आत्मरक्षा** (सर्ववाजूंनी आत्मसंरक्षण करणें)

हे पूर्व दिशेकडे राहणाऱ्या हेवय देवतांनों, तुम्ही दानशूर अग्नीप्रमाणें तीक्ष्ण, आम्हाला सुख देणारे आणि शत्रूसंहारक आहांत. आम्ही तुम्हाला नमस्कार– पूर्वक आहुती देतो. दक्षिणेस राहाणाऱ्या आमच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या, सुख देणाऱ्या विल्यव देवांनों, आम्ही तुम्हाला नम्रतापूर्वक ही आहुती प्रदान करतो. पश्चिमेला वास करणाऱ्या, वृष्टिरूपी वाणानें दुष्काळ नाहीसा करून सुख प्रदान करणाऱ्या वैराज नामक देवतांनों, आम्ही आदरानें तुम्हाला ही आहुती देत आहोत. उत्तर दिशेला राहाणाऱ्या, दानसंपन्न आणि वायुरुपी वाणानीं माणसांना सुख देणाऱ्या प्रविध्यन्त नामक देवतांनो, तुम्हाला वंदन करून आम्ही ही

आहुती देत आहोत. धरादिशेला वास करणाऱ्या धान्य, कन्द, मुळें, वृक्ष वगैरेंनीं आम्हाला सुखी करणाऱ्या, निलिम्पा नामक देवतेला आम्ही नमस्कारपूर्वक ही आहुती प्रदान करतो. ऊर्ध्व दिशेला राहणाऱ्या मंत्रस्वामी बृहस्पतीचे मित्र, आम्हाला सुख प्रदान करणाऱ्या अदखेत नामक देवांनों, तुम्हाला आम्ही नम्रतापूर्वक, घृतसंपन्न हवि अर्पण करीत आहोत त्याचा तुम्ही स्वीकार करा.

**२७. शत्रूनिवारणम्** (शत्रूला दूर करणे)

पूर्व दिशेचा स्वामी इंद्र असून आमच्या संसाराचें रक्षण करणारे सर्प, धाता, आर्यमा, अदितीचे पुत्र व अग्नि यांना माझा नमस्कार असो. आमच्या नमस्कारानें हे देव आनंदित होओत. हे देवतांनों आम्हाला पीडा देणाऱ्या शत्रूला भक्षण करा. दक्षिणदिशा कल्याणमयी आहे. या दिशेचे स्वामी यम दिशारक्षक सर्प, दुष्टसंहारक वाण व पितृदेव यांना केलेल्या नमस्कारानीं ते प्रसन्न होवोत. जो आमचा शत्रु आहे आणि आम्ही ज्याचा द्वेष करतो त्यांना तुम्ही भक्षण करा. पश्चिम दिशेचा स्वामी वरुण आहे. रक्षक सर्प, यवादि धान्यांनां आमचे नमस्कार असोत त्यानी ते प्रसन्न होवोत. उत्तर दिशा स्वामी सोम, रक्षक स्वजनामक आणि दुष्टांना शासन करणारा देव यांना केलेल्या नमस्कारांनी या देवता आनंदित होवोत. अधर दिशेचा स्वामी भगवान विष्णू, रक्षक कल्याणग्रीय नामक सर्प आणि सर्व औषधी या सर्व आमच्या नमस्कारानें प्रसन्न होवोत. ऊर्ध्व दिशेचा स्वामी बृहस्पति, श्वेतसर्प. आणि अवर्षण दूर करणारी वृष्टि आमच्या नमस्कारांनी प्रसन्न होवोत. आम्ही ज्याचें वैर करतो आणि आमचे जे वैर करतात त्या सर्वांना तुम्ही भक्षण करा.

**२८. पशुपोषणम्** (पशूंचा सांभाळ करणे)

विधात्यानें सृष्टी निर्माण केली त्याच वेळीं गाई वगैरेंचीही उत्पत्ती केली. एखाद्या गाईचें, निष्कृष्ट बीजापासून निर्माण झालेले वत्सद्वय यजमान अन्य पशू, यजमान आणि अन्य श्वापदांचा नाश करणारी असते परंतु अशी गाय प्रज्ञावंताला दान केली तर ती दान घेणाऱ्याला पुत्रपौत्रादिकांनी समृद्ध करते आणि स्वतःही सौभाग्य लक्षणांनी अलंकृत

होते. जुळ्या वत्सांना जन्म देणाऱ्या हे गाई, तू पुरुषांना सुखी कर. यजमानाच्या गोठ्यांतील गोधनाची वृद्धि कर. ज्या ठिकाणी शुभ कर्म करणारे लोक राहतात त्यांचें अशी गाय अशुभ न करो. यज्ञामध्यें विघ्न न आणो.

## २९. अविः (मेंढा)

आकाशांत गोचर होणारे यमाचे दूत पापी लोकांना दण्ड देणारे आणि धर्मशील लोकांवर कृपा करणारे आहेत. ते यज्ञकर्मांतील पाप आणि पुण्य अलग करतात. हा यज्ञ वृष्टी करणारा असून आमची अभिलाषा पूर्ण करतो. या ठिकाणी बळी दिलेला मेंढा कधीही क्षय पावत नाहीं. जो यजमान मेंढा दान करतो तो स्वर्गाचा अधिकारी होतो. पांढऱ्या पायाच्या मेंढ्याच्या चार पाय आणि नाभी या ठिकाणीं हवि ठेवून यज्ञात अर्पण केला जातो तो दाता पितृलोकाला जातो. सूर्य लोकांत प्रवेश करतो. पांढऱ्या पायाची यज्ञांत बळी दिलेली मेंढी कधींही क्षीण होत नाहीं कारण प्रजापती तिला धारण करतो आणि यजमानाला इच्छित फल प्रदान करतो. पृथ्वी आणि अंतरिक्ष या कामात्मा मेंढीच्यामुळे मिळालेलें फल ग्रहण करतात.

## ३०. **सांमनस्यम्** – (समजून कर्म करणें)

हे वाद करणाऱ्यांनों, तुमच्यातील द्वेष भावना नाहीसे करणारी प्रममय कृती मी करतो. गाय ज्याप्रमाणें आपल्या वत्सावर प्रेम करते त्याप्रमाणें तुम्ही एकमेकांवर प्रेम करा. पुत्र पित्याच्या वचनांत राहो, आई मुलाला अनुकूल होवो, पत्नी पतीशीं मधुर वाणीनें बोलो. वाटणी करतांना एक भाऊ दुसऱ्या भावाचें वाईट न करो. बहीण भावाशीं वैर न करो. सर्व भाऊ समान काय करणारे आणि मंगलमय बोलणारे होवोत. मंत्राच्या प्रभावानें देवतामध्यें वैरत्व निर्माण होत नाहीं. अशा मंत्राच्यामुळें तुमच्यामध्येंदेखील समानता निर्माण होवो. समान कर्म करणारे तुम्ही एकमेकाला सन्मानित करीत श्रवणीय वाणी बोला. हे मानवांनों, समान कार्य करण्यासाठीं तुम्ही प्रवृत्त व्हा. समानतेची इच्छा करणाऱ्यांनों, तुमचें अन्न-पाणी समान होवो. तुम्ही एकात्म प्रेम-

रज्जूनें बांधले जावोत. तुम्ही एकत्र राहून एकमनानें अग्नीची सेवा करा. मी तुम्हाला समान विचार करणारे करून स्वर्गामध्यें अमृताचे रक्षण करणाऱ्या इंद्रादी सर्व देवांचे मन ज्याप्रमाणें श्रेष्ठ राहातें, त्याप्रमाणें तुमची मनेंसुद्धां सकाळ-संध्याकाळ समरूप होतील असे मी करीन.

## ३१. यक्ष्मनाशनम् (क्षयनाश)

हे अश्विनीकुमारांनों, वृद्धत्वामुळें आयुष्य क्षीण करणाऱ्या अवस्थेपासून या बालकाला तुम्ही दूर ठेवा. अदानता आणि पशूपासून आम्हाला दूर ठेवा. या क्षयरोगाला दूर करून दीर्घायुषी करा. या रोगातील दु:ख प्राणवायु नाहीसे करो. या रोगाला कारण होणाऱ्या पापापासून इंद्र रक्षण करो. जंगलांतील हिंस्र पशूंपासून गाई वगैरे प्राणी ज्याप्रमाणें गावांत अलग राहातात, तहान लागलेल्या माणसाला पाणी ज्याप्रमाणें दूर आहेसें वाटतें त्याप्रमाणें हा क्षयरोग आमच्यापासून दूर राहून आम्हाला दीर्घायुष्य लाभो. एके दिशेकडून अन्य दिशांकडे जाणारे मार्ग ज्याप्रमाणें निराळे होतात, आकाश आणि पृथ्वी निराळी आहेत त्याप्रमाणें पाप आमच्यापासून निराळें होवो. त्वष्ट्याने आपल्या कन्येच्या विवाहाच्या वेळीं परितोष धन दिलें ते ठेवण्यासाठीं पृथ्वी आणि अंतरीक्ष अलग करण्यांत आली, त्याप्रमाणें पाप आणि क्षय या देहापासून दूर होऊन आम्हाला दीर्घायुष्य प्राप्त होवो. भोजन केल्यावर अन्न पचण्यासाठीं जठराग्नीतून पाचक रस वेगळा होऊन तो आपलें कार्य करतो त्याप्रमाणें चंद्र प्राणवायुशीं एकरूप होऊन आत्म्याचें पोषण करतो. देवांनी सूर्याला प्राणरूपानें प्रकट केला. या सूर्याला या बालकाच्या आयुष्यवृद्धिसाठीं प्रार्थना करतो. तो या बालकाला पाप आणि क्षय यांपासून दूर ठेवील. दीर्घायुष्य लाभलेल्या पुरुषांच्या आणि देवतांनी प्रसृत केलेल्या प्राणवायूच्या साहाय्यानें हे बालका, तूं अनंत काळपर्यंत प्राण धारण कर. तुला सर्व पापांपासून मुक्त करून आणि क्षयापासून दूर ठेवून दीर्घायुषी करतो. हे बालका, जे प्राणी श्वसन करतात त्यांच्यापासून तूं श्वास घे आणि मृत्यलोकांत न जाता या लोकीं दीर्घकाळपर्यंत रहा. आयुशक्तीच्या साहाय्यानें मृत्यपासून रक्षण होतें त्याप्रमाणें

या लोकीं वास करतांना धान्यादिकांच्या रसांनीं वृद्धि आणि संरक्षण लाभतें. पर्जन्य देवतेनें दिलेल्या पाण्यानें आम्हाला अमृतत्त्व प्राप्त होतें. या वर्षाजलानें संसार सुखमय होतो. हे बालका, मी तुला रोगांच्या उत्पत्तीला कारण असणाऱ्या पापापासून मुक्त करून क्षयरोगापासून दूर ठेवतो आणि दीर्घायुषी करतो.

# चतुर्थ काण्ड

**ब्रह्मविद्या** (ब्रह्मज्ञान)

विश्वाच्या उत्पत्तीला कारणभूत असणारा ईश्वर अगदी प्रारंभीं हिरण्यगर्भरूपी सूर्य म्हणून प्रकट झाला. हा सूर्य पूर्व दिशेला उदित होणारा आणि सत् आणि असत् वस्तूचें ज्ञान प्रदान करणारा आहे. सर्व विश्वाच्या उत्पत्तीकर्त्याला प्रजापती असें म्हणतात. आपल्या पित्या-कडून नादरूपाने प्राप्त झालेली वाणी सांसारिक व्यवहाराची अधीश्वरी आहे. या वाणीनें सूर्यात्मक ब्रह्माची स्तुती प्रथम प्रकट झाली. या संसाराला मर्यादेची बंधनें घालून, या संसाराचे ज्ञाते म्हणून जे देव उत्पन्न झाले त्यामध्यें सूर्याबरोवर इंद्रादि देव नंतर जन्माला आले. या सूर्यानें वेदांचा उद्धार केला. त्यानंतर देवतांना हविरूप अन्न मिळालें. हा परब्रह्मरूपी सूर्य प्रथम उत्पन्न होऊन आकाश आणि पृथ्वीची अवि-नाशी स्थिती निर्माण करता झाला. या सूर्यामुळें रसातलादि लोक व्याप्त झाले. दानशूर बृहस्पति या लोकाचा स्वामी आहे. सूर्यामुळे दिवस निर्माण होतो तेव्हां ऋत्विज हविर्दान करून देवतांची पूजा करतात. ऋत्विजांच्या यज्ञामध्यें सूर्य तेजरूपानें प्रकट होतो. व ऋत्वि-जांना यज्ञाची प्रेरणा देतो. पूर्व दिशेला उदय पावलेला हा सूर्य हवि-रत्नांवर आसक्त होतो. सर्व देवतांचा सखा, बृहस्पती आणि प्रजापति यांना माझा नमस्कार असो. तुम्ही सर्व प्राणिमात्र आणि अन्न यांना उत्पन्न केलेंत. हे देव आमच्या हविर्दानानें आमच्यावर प्रसन्न होवोत.

## २ आत्मविद्या (आत्मज्ञान)

प्रजापति सर्व वस्तूंमध्यें सामर्थ्य निर्माण करणारा आणि त्यांचें नियमन करणारा आहे. सर्व देवता आणि मानव त्या प्रजापतीच्या आज्ञेत राहातात म्हणून आम्ही त्या प्रजापतीची हवि प्रदान करून पूजा करतो. श्वास-उच्छ्वासाचा स्वामी, मृत्युनाशाचें साधन आणि सर्व प्राण्यांचा मृत्यु ज्याच्या अधीन आहे त्या प्रजापतीची आम्ही हविर्दानानें पूजा करतो. आक्रोश करणाऱ्या प्राण्यांना क्रन्दसी देवतेचा आधार आहे. तिच्यामुळेच द्यौ आणि पृथ्वी डळमळत नाही. ही पृथ्वी डळमळेल या भयानें प्रजापती रडू लागला. तेव्हांपासून या देवतेला रोदसी म्हणून संबोधण्यात येऊ लागलें. द्यौ आणि पृथ्वीनें आपल्या रक्षणासाठी प्रजापतीला आवाहन केले. त्या प्रजापतीला आम्ही हवि अर्पण करतो. ज्याच्या कृपेमुळें आणि प्रभावामुळें आकाश, पृथ्वी आणि अंतरीक्ष यांना विस्तार झाला, सूर्याचें जगाला दर्शन झालें, वायू उत्पन्न झाला, नद्या समुद्राप्रमाणे महान झाल्या, ज्याच्या चार भुजा म्हणजे चार दिशा आहेत, सृष्टीच्या पूर्वीं पाणी उत्पन्न झालें आणि त्यामुळें सर्व प्राणिमात्रांचा संसार सुरक्षित झाला, ज्यानें हिरण्यगर्भ धारण केला, त्या जलगर्भ प्रजापतीला आम्ही हवि अर्पण करून संतुष्ट करतो. या सृष्टीच्या पूर्वीं हिरण्यगर्भ निर्माण झाला आणि तो या सांसारिक जीवनाचा प्रमुख बनला. त्यानेंच द्यौ आणि पृथ्वी यांना धारण केलें, प्राणिमात्रांच्या शरीरांत, त्यांच्या उत्पत्तीसाठीं वीर्य प्रस्थापित केलें त्या हिरण्यगर्भ प्रजापतीला आम्ही हविर्दानानें प्रसन्न करतो.

## ३ शत्रुनाशनम् (शत्रुनाश)

प्रवाहित नद्यांचें प्रवाह समुद्रात ज्याप्रमाणे गुप्त होतात त्याप्रमाणें जंगलात संचार करणारे व्याघ्र, चोर, लांडगे आणि त्यांचे शत्रू देखील जंगलांतच गुप्त होवोत. ज्या मार्गावरून आम्ही जातो त्या मार्गांत आडवे येणारे जंगली प्राणी, चोर, सर्प आणि दुसऱ्याची हिंसा करणारे शत्रू, या मार्गापासून दूर जावेत. हे व्याघ्र, आम्ही तुझे तीक्ष्ण नेत्र, मुख आणि वीस नखे उखडून टाकतो आणि हिंस्र पशूमधील या श्वापदाला

ठार करतो. त्यानंतर, लांडगे, सर्प आणि चोर यांचा समाचार घेतो. या मार्गांत येणारा चोर आमच्या भारामुळे धांवत सुटेल आणि इंद्र त्याला आपल्या वज्रानें चूर्ण करील. व्याघ्रादि प्राण्यांचे दांत नष्ट होवोत, शिंग असलेल्या हिंस्र प्राण्यांची शिंगे नाहीशी होवोत आणि त्यांची हाडेही मोडून पडोत. हे पांथस्था, सुसर, मगर किंवा घोरपड, आणि झोंपेची आवड असणारा हरिण अन्य मार्गानें दूर निघून जावोत. इंद्र आणि सोम यांच्यामुळें उत्पन्न झालेलें संयमन नाहीसें होत नाहीं. अथर्व ऋषींच्या प्रेरणेनें आणि कृपेनें तूं व्याघ्रादि प्राण्यांना संयमित करशील.

## ४. **वाजीकरण** (वीर्य निर्माण करणें)

पूर्वी वरुणाचें वीर्य नष्ट झालें तेव्हा गंधर्वांनीं वीर्य प्रस्थापित करणाऱ्या औषधीचा शोध घेतला. सूर्य सर्वश्रेष्ठ वीर्यसंपन्न असून याची पत्नी उषा ते वीर्य धारण करते. या मंत्राच्या योगानें मी वीर्य संपन्न होवो. प्रजापति माझ्या कामेंद्रियांना तृप्त करो. हे वीर्यवान पुरुषा पुत्र-पौत्रांसाठीं तुझें कामावयव सतत चेतन राहाव्यात म्हणून ह्या औषधी तुला सतत वीर्यसंपन्न ठेवोत. ह्या औषधी सर्व पुरुषांना वीर्यसंपन्न करोत. हे इंद्रा त्यांच्या शरीरांत तूं वीर्य प्रस्थापित कर. हे अग्ने, सूर्य, सरस्वते आणि ब्रह्मणस्पते, वीर्यवान आणि कामेच्छु पुरुषांना तुम्ही निरोगीपण प्रदान करा. हे वीर्यवान पुरुषा, वृषभाप्रमाणें कामक्रीडा करीत आपल्या पत्नीला संतुष्ट कर. कारण या औषधींच्या प्रभावानें अश्व, वृषभ किंवा मेंढा यांच्या शरीरांतील विर्याप्रमाणें तूं वीर्ययुक्त झाला आहेत.

## ५. **स्वापनम्** (स्वप्नमय अवस्था निर्माण करणें)

इच्छापूर्ती आणि वर्षा करणाऱ्या सूर्याचा उदय झाला तरी आमच्या शत्रूला आम्ही निद्रावश करूं. हे वायो, तूं इंद्राचा मित्र आहेस, तुझ्या मंद चालीनें तूं सर्प, कुत्रे आणि स्त्रिया यांना निद्रावश कर. ज्या स्त्रिया, शयनगृह, अंगण किंवा अन्यत्र झोपलेल्या आहेत आणि ज्या स्त्रिया पुष्पगंधा आहेत त्या निद्रावश होवोत. या निद्रेनें वनश्वापदांच्या मनाला, त्याच्या नेत्रशक्तीला, आघ्राणशक्तीला, हात-पायादि अवयवांना

आपल्या स्वाधीन ठेवलें आहे. आम्हा सर्वांचे नेत्र या निद्रेनें बंद केले. ज्या स्त्रीला आम्ही वश करूं इच्छितो त्या स्त्रीचे मातापिता, रक्षक, वगैरे निद्राधीन होवोत. हे स्वप्नदेवते या सर्वांना सूर्योदयापर्यंत निद्रावश ठेव. यांना उषःकालापर्यंत जाग येणार नाहीं आणि झोपेंत यांना कोणी मारणार नाहीं असे कर.

### ६. विषघ्नम् (विषनाश)

तक्षक नांवाचा सर्प ब्राह्मण आहे. त्याला दशमुखें आहेत. त्यानें सर्वांच्या अगोदर सोम प्राशन केला. त्यानें फळमूळांतून होणारा विष-प्रभाव नाहीसा केला. द्यौ, पृथ्वी यांचा जेवढा विस्तार आहे, समुद्र जेवढा पसरला आहे तेवढ्या परिसरांतील विष दूर करणारी वाणी मी बोलतो. हे विषा, तुला प्रथम गरुडानें भक्षण केलें. पाच बोटांनी, मुखाच्या मार्फत, या शरीरांत विष घातलें, ते विष आणि विष पाज-णाऱ्या हातांचे, सुपारी तोडावी त्याप्रमाणें खण्डन करतो. फळाला वाण लागल्यानें त्यामध्यें निर्माण होणारे विष मी मंत्रप्रभावानें दूर करतो. हे वाणा, तुझें विष निष्फळ होवो आणि तुझें आसन जे धनुष्य ते पण निष्प्रभावित होवो. विषयुक्त औषध देणारे, अंगावर विष फेकणारे, पाण्यांत विष कालविणारे आणि दातांचे विष मी निष्प्रभ केलें. हे विष-युक्त औषधे, मंत्राच्या प्रभावानें तूं निष्प्रभ होतेस. ज्या पर्वतावर विष-मय, कन्द, मूळ आणि फळें निर्माण होतात तो पर्वत देखील निर्वीष होवो.

### ७. विषनाशनम् (विषाचा नाश करणें)

वृक्ष निर्माण करणाऱ्या वरणावतीचें पाणी आमचें विष दूर करो. या पाण्यांत द्युलोकांतील अमृताचा अंश आहे. या अमृतांशामुळें उत्पन्न झालेलें विष नाहीसें होतें. चारही दिशांमध्यें असणारे विष मंत्रशक्तीनें निष्प्रभ होवो. हे विषा, तूं शरीर दूषित करतेस. न जाणतां तुला भक्षण करणाऱ्या पुरुषाला वेदना होतात. तूं त्याचें चेतनत्व नष्ट करूं नको. शरीरांत विष निर्माण करणाऱ्या वनस्पतींनो, धनुष्यांतून ज्याप्रमाणें तीर सुटून बाजूला जातो त्याप्रमाणें तुम्ही या देहांतून वीष दूर करा. गुप्तचरा

प्रमाणें गुप्तपणें शरीरांत प्रवेश करणाऱ्या विषा, मंत्राच्या प्रभावानें मी तुला दूर करतो. भूमी खणून काढलेल्या औषधींनो, तुम्ही आपल्या स्थानीं अचल रहा. या मनुष्यांना मूर्च्छित करूं नका. तुमच्यातील विष आम्ही मंत्रशक्तीनें दूर करतो. विषमय औषधींनो, तुम्हाला निर्विष करण्यासाठी मृगचर्माच्या मोबदल्यांत तुला ज्ञात्या लोकांनी तुझी विक्री केली. विक्री केलेली तूं या ठिकाणाहून जा. या पुरुषाला मूर्च्छित करूं नकोस. ज्या पुरुषानें यज्ञादि कर्में केली आहेत त्याचे पुत्रपौत्र नष्ट न होवोत. यासाठी मी विषाची चिकित्सा करतो.

## ८. राज्याभिषेक (राजाला राज्यावर प्रस्थापित करणें)

अभिषेकानंतर ऐश्वर्य प्राप्त झालेला आणि आपल्या प्रजेला अन्नादिकांनी संतुष्ट ठेवणारा राजा त्यांचा स्वामी होतो. सर्व प्रजेचे नियंत्रण आणि दुष्टांचें निर्दालन करण्यासाठी यम राजाकडून राजसूय नांवाचा यज्ञ करून घेतो. हे राजा, तूं हत्ती, घोडे, रथ, राज्य, सिंहासन यांच्या बाबतीत उदासीन राहू नकोस. तूं कर्माकर्माचा ज्ञाता हो. इंद्र तुला आपला म्हणो. राजा प्रजेची आणि प्रजा राजाची सेवा करण्यांत तत्पर राहोत. अभिषेकानंतर राजाच्या प्रभावानें चारही दिशा व्याप्त होऊन, भयाने त्रस्त झालेले शत्रू दूर निघून जावोत. हा राजा शत्रु, मित्र आणि स्त्रिया याच्याबरोबर विविध आचार करतां करतां, त्यांना न्याय देण्याच्या कार्यांत आणि अध्ययनादि कार्यांत तत्पर राहो. हे राजा, व्याघ्रचर्मावर अधिष्ठित होऊन पूर्व दिशेवर विजय संपादन कर. तूं तेजोवान हो. ही प्रजा तुझा स्वीकार करो. तुझ्यावर अनावृष्टिरूपी संकट न येवो. प्राण्यांना तृप्त करणारें पाणी स्वर्ग, अंतरीक्ष आणि पृथ्वी यांनी व्याप्त असल्यानें त्यानेंच हे राजन् तुला अभिषेक करण्यांत येत आहे. हे दिव्य जल तुझ्या मस्तकावर शिंपतो. तूं आपल्या परिवाराची वृद्धि करूं शकशील असे सामर्थ्य सूर्य तुला प्रदान करो. वीरवान राजाला पाणी मातेप्रमाणें आनंदित करतें आणि ऐश्वर्याचा स्वामी करते व अभिषेकानें तृप्त करते. सेवक राजाला अलंकार आणि मुकुटांच्या योगें सुशोभित करतात.

## ९. आञ्जनम् (काजळ)

अंजन पर्वताचा नेत्र आहे. जीवन रक्षक आणि जीवनाच्या मर्यादा म्हणून देवांनी त्याची निर्मिती केली. हे अंजना, तूं मनुष्य, गाय, वृषभ, अश्व, वगैरे सर्वांचें रक्षण करणारें आहेस. ज्याच्या नेत्रांस हे अंजन स्वच्छ करील तो राक्षसांची पीडा नष्ट करण्यास समर्थ होतो. अंजनामध्यें आकाशस्थ अमृताचे गुण असून जीवांचे अनिष्ट आणि पंडुरोगादी रोगांना दूर करणारें आहे. ज्याच्या शरीरामध्यें अंजन स्थिर होतें ते शरीर क्षयरहित आणि वायुप्रमाणे वेगवान बनतें. जो पुरुष अंजनाचा स्वीकार करतो त्याला दुसऱ्याचा शाप बाधत नाही. दूषित मन आणि क्रूर नेत्रांपासून हे अंजना तूं माझें रक्षण कर. तुझा महिमा मला माहीत आहे. जीवनाला त्रास देणारा ज्वर, सन्निपात, सर्प वगैरेंचे विष प्राण्याचें जीवन हरण करतें. हा दोष अंजनाच्या प्रभावानें दूर होतो. हे अंजना, पर्वत, तुझा पिता आहे. हिमालय पर्वतामध्यें असणारें अंजन राक्षसांचा नाश करतें आणि आमच्या रोगादिकांचा परिहार करते. हे अंजना यमुनेच्या तीरावर असो की पर्वतावर असो ते प्राणिमात्रांचें कल्याण करणारें आहे.

## १०. शङ्खमणि (शंख)

अंतरीक्ष, वायु, ज्योतिमण्डल आणि सुवर्ण यांच्यातून उत्पन्न झालेला शंख आमचें पापापासून रक्षण करणारा आणि शत्रूला निर्बल करणारा आहे. सर्व नक्षत्रांच्या समोर समुद्रानें या शंखाला जन्म दिला. या शंखाच्या प्रभावानें आम्ही राक्षस आणि पिशाच्च यांना वश करतो. रोग आणि अज्ञान दूर होऊन, संतापनाशक आणि अलक्ष्मीनाशक शंख आम्हाला पापापासून दूर करो. हा प्रथम वायूपासून, समुद्रांत, नदीच्या उगमांतून प्रवाहित झालेल्या सुवर्णाच्या योगें, आयुष्यवृद्धीसाठी उत्पन्न झाला. हा शंख मेघातून उत्पन्न झालेल्या सूर्यप्रमाणें प्रभावी आहे. या शंखापासून देव आणि दैत्य यांच्या त्रासापासून आमचें रक्षण होवो. हे शंखा, तूं चांदी व सुवर्णा प्रमाणें महान आहेस कारण अमृतमय चंद्रमंडळा-

पासून तुझी उत्पत्ती आहे. युद्धाच्या वेळी तूं रथावर आरूढ होतोस. हे शंखा, तूं आम्हाला दीर्घायुषी करून बल आणि तेज प्रदान कर.

११. अनड्वान् (वृषभ)

गाडी ओढणारा, आपल्या कर्मांनीं पृथ्वीच पोषण करणारा, चारु व पुरोडाश उत्पन्न करण्यांत साहाय्यभूत असणारा, अंतरीक्ष, दिशा आणि सर्व भुवनांना संरक्षण देणारा बैल या ठिकाणी येत आहे. हा वृषभ इंद्ररूप आहे. इंद्र ज्याप्रमाणें वृष्टीच्या रूपानें चराचरात्मक संसाराचें पालन करतो, त्याप्रमाणें आपल्या वीर्यानें तो स्वजातीची उत्पत्ती करतो आणि दही, दूध, धान्य वगैरेच्या साहाय्याचें सर्वांचे पालन करतो. भूत, भविष्य आणि वर्तमान तीनही ऋतूंमध्यें कर्मानुष्ठान करतो. हा वृषभ सूर्यरूपानें जगाला प्रकाश देतो. सुंदर संतती देतो आणि पुन्हा या संसारात येत नाहीं. यज्ञादि कर्माचें फळ हा वृषभ देतो. वर्षा करणाऱ्या देवतेच्या रूपानें मरुताशी एकरूप होतो. हा यज्ञ करण्यास योग्य आणि यज्ञांतील सर्व क्रियांचें फळ देण्यास योग्य आहे. यज्ञीय यजमान या वृषभाचा स्वामी आहे. जो वृषभ पार्थिव देहाचा त्याग करतो तो स्वर्गरूपी मुक्तीचें द्वार मिळवतो. त्याच्यामुळें आम्ही सूर्याची उपासना करतो आणि लाभाची इच्छा करतो. हा वृषभ, इंद्र, अग्नि, प्रजापति किंवा ब्रह्मदेव यांच्या समान आहे. वैश्वानर अग्नीच्या रूपानेही तो या विश्वांत स्थिर झाला आहे. हा वृषभ सर्व क्रियांचा ज्ञाता असल्यानें स्वर्गादि फळांचा अधिकारी आहे. तो शेतकऱ्यांच्या शेताचा स्वामी असून अन्न उत्पन्न करतो. हा वृषभ सकाळ, दुपार आणि सायंकाळ या तिन्ही वेळीं अनुष्ठान करणाऱ्यांच्या फलाचा स्वामी आहे.

१२. **रोहणी वनस्पतीः** रोहणी वृक्ष

विषमज्वरात उपयुक्त असलेली एक वनस्पती. ह्या वृक्षाच्या सालीच्या पाण्यानें जखमा धुतल्यास निर्विष होतात. डोंगराळ भागांत असणारा हा मोठा वृक्ष आहे. यावर हिरवट पांढरी फुलें आणि सफरचंदाएवढें पिकल्यावर काळें दिसणारें फळ येतें.)

कोणतीही जखम भरून आणणारी, रक्तस्राव थांबविणारी,

आणि रक्ताचा प्रवाह नियमित करणारी ही वनस्पति, हे पुरुषा, तुला होत असलेल्या वेदना शमन करणारी आहे. हे पुरुषा तुझ्या मज्जातंतूला मार लागल्यानें आणि हाडें तुटल्यानें, मांस तुटलें आहे तें पूर्ववत होवो. प्रहारामुळें निराळें झालेले अवयव एकमेकांस मिळोत आणि ते ते अवयव व्यापारक्षम बनोत. हे पुरुषा, शस्त्राच्या प्रहारानें तुझे अवयव तुटलें असले तर या औषधीचा मंत्रासह उपयोग केल्यास पूर्ववत होऊन रथ ज्याप्रमाणें वेगानें धावतो त्याप्रमाणें वेगानें जाण्यास तूं समर्थ होशील. शस्त्र शरीरावर पडल्यानें किंवा शरीरावर फेकल्यानें या शरीरास पीडा होते. हाडें तुटतात. मंत्राच्या सामर्थ्यानें ती तुटलेली हाडें जोडली जावोत. सुतार ज्याप्रमाणें रथाचे सर्व भाग एकत्र करून त्याचा रथ बनवितो त्याप्रमाणें या अथर्वमंत्राच्या साहाय्यानें आणि या वनस्पतीच्या उपयोगानें तुझें तुटलेलें शरीर एक होऊन सामर्थ्यवान होईल.

### १३. **रोगनिवारणम्** (रोगापासून संरक्षण)

हे देवगणांनों, ह्या बालकाकडून धर्मकार्यांत कोणताही प्रमाद न होवो, अध्ययनाच्या योगें याला ज्ञानसंपन्न करा. अज्ञानानें याच्याकडून घडणाऱ्या पापापासून याला दूर ठेवा. ज्या वायूच्या योगें आयुष्य क्षीण होतें त्या वायूपासून ह्या बालकाला दूर ठेवा आणि शतायुषी करा. प्राण आणि अपान हे दोन्ही वायू शरीरांत आपापले कार्य करोत. हे बालका, प्राणवायु तुला बलवंत करील आणि अपान पापापासून मुक्त करील. हे वायो, सर्व रोगांचा नाश करणारी औषधी आण आणि रोग उत्पन्न करणाऱ्या पापाला दूर कर. तूं सर्व रोगांना दूर करण्यास समर्थ आहेस. या विश्वाच्या रक्षणार्थ आणि प्राणिमात्रांचें पोषण करण्यासाठीं देवांचा प्रतिनिधी म्हणून तूं संचार करतोस. सर्व देवता या उपनीत बालकाचें रक्षण करोत. इंद्रियांची देवता याची सर्व इंद्रियें कार्यक्षम ठेवोत. सात मरूत्‌गण, पंच वायू आणि अन्य सर्व प्राणी या बालकाचें रक्षण करून पापापासून त्याला दूर ठेवोत. हे बालका, तुला मंत्रामुळें सुख आणि सत्कर्मामुळें कल्याण आणि अतुल बळ प्राप्त झालें आहे. तुझे यक्ष्मादि रोग तुझ्यापासून दूर गेले आहेत. यामुळें सर्व रोग आणि शोक

दूर करणारी औषधी आपला प्रभाव प्रस्थापित करतील. ज्या प्रजापतीच्या हातांनीं वाणी आणि जिव्हा निर्माण केली त्या हातांच्या स्पर्शानें सर्व पाप पुसून जाईल.

### १४. स्वर्ज्योतिः प्राप्तिः (तेजसंपन्नता)

अज पवित्र अग्नीच्या तापापासून उत्पन्न झाला. त्यानें प्रजापति आणि अग्नि यांना प्रथम पाहिले. या अजामुळें इंद्रादिकांना देवत्व प्राप्त झालें. त्यामुळें ऋषींनीं देखील त्याला श्रेष्ठ मानलें. या अजामुळें यज्ञ सफल होतो. हे मनुष्यांनो, यज्ञादि कर्मांच्या द्वारें तुम्ही स्वर्गाला प्राप्त व्हाल आणि स्वर्गातील देवांचें ऐश्वर्य उपभोगाल. मी पृथ्वीवरून अंतरीक्ष आणि अंतरीक्षांतून स्वर्गांत पदार्पण करीन. ज्या ठिकाणीं दुःख नाहीं, त्या स्वर्गाच्या वर सूर्य मंडलाची दीप्ति आहे. त्यामध्ये मी मिसळून जाईन. यज्ञाच्या योगें स्वर्गाची इच्छा करणारे प्रापंचिक सुखाची इच्छा करीत नाहींत. जो यजमान यज्ञादि कर्मं यथासांग करतो तो त्रिलोकांत विजयी होतो. हे अग्ने, तूं देवांमध्ये प्रमुख आहेस. आमच्या आवाहनाप्रमाणें तूं ये. अग्नि इंद्रादि देवांना यज्ञीय हवि पोहोचवितो त्यामुळें त्यांना तो आपल्या नेत्रांप्रमाणें प्रिय आहे. म्हणून मनुष्यांना श्रेष्ठ लोकांचें दर्शन घडेल अशी दृष्टी तो देतो. त्याच्या प्रकाशामध्ये प्रथम त्याचें पूजन करून नंतर यज्ञकर्म करणारे यजमान स्वर्गांत जातात. या अजाला, दुधाप्रमाणें रसयुक्त व तुपानें मी सिद्ध करतो. त्या हवीने यजमानाला स्वर्गप्राप्ति होईल. त्याप्रमाणें स्वर्गाला गेल्यावर पुन्हा आम्ही सूर्यज्योतीमध्ये एकरूप होऊं. या अजाचे पांच विभाग करा. नंतर मस्तक पूर्वेला, छाती दक्षिणेला, कंवर पश्चिमेला, पार्श्वभाग उत्तरेला, पाठ ऊर्ध्व दिशेला आणि पोट अधर दिशेला, प्रस्थापित करा. या अजाला परमेश्वर आच्छादित करून स्वर्गांत नेतो.

### १५. वृष्टिः (पाऊस)

पूर्व दिशा मेघांनीं भरून जावो. जलवर्षाव करणारे मेघ; वायूच्या प्रेरणेनें एकत्रित होऊन गर्जना करीत या भूमीला शांत करोत. मेघ पृथ्वीवर पाण्यानें अभिषेक करोत. बीजामध्ये तें जल मिसळो. त्यामुळें

धान्य उत्पन्न होईल. हे मरुतांनों, आमच्या स्तुतीनें तृप्त होऊन जलपूर्ण मेघांना एकत्रित आणा. मेघांतून पृथ्वीवर पडलेल्या पाण्याचे विविध प्रवाह होऊन त्यांचा वीजांना स्पर्श होतो. त्यामुळें विविध वनस्पति उत्पन्न होतील. हे पर्जन्या, मरुत्गण तुझे कौतुक करतात. तुम्ही आपल्या लहान लहान थेंबांनीं पृथ्वीला भिजवून काढा. हे मरुत्गणांनों, पृथ्वीवरील पाणी समुद्राच्या दिशेनें जावो. वृषभाप्रमाणें गर्जना करणारें पाणी या पृथ्वीला सतत तृप्त करो. हे पर्जन्या तुझ्या गतीचा नाद सर्वत्र ऐकावयास येवो. तूं मेघांना गर्जना करण्यास प्रवृत्त कर. तुझ्या प्रेरणेनें मेघ जलवर्षाव करो. सूर्य आणि किरणें मेघामध्यें लुप्त होवोत. हे मनुष्यांनों, मरुत् तुम्हाला तृप्त करोत. महान जलप्रवाह निर्माण करोत आणि मेघ तुमच्यावर वृष्टी करोत. प्रत्येक दिशेला मेघांना प्रेरित करणारा वायू विजेचे तेज पसरवितो आणि मेघांना वृष्टि करण्यास प्रवृत्त करतो. हे मरुत्गणांनों, तुम्ही निर्माण केलेले, जलपूर्ण मेघ, विद्युत् वृष्टिच्या योगें अग्निगर्भ वनस्पती निर्माण करोत आणि प्राणिमात्रांना प्राणदायिनी आणि अमृतमयता निर्माण करणारी वृष्टी करोत. हे सूर्या, तू प्रजापालक आहेस. समुद्रापासून वृष्टियोग्य जल निर्माण होईल असें कर. अश्वाप्रमाणें वेगवान आणि व्यापक वृष्टिरूप वीर्यवृद्धि निर्माण कर. वृष्टीच्या रूपानें सूर्य पृथ्वीला तृप्त करो. या तृप्त पृथ्वीवर बेडूक आनंदानें शब्द करोत. व्रत आणि आचारवंत ब्राह्मणाप्रमाणें संपूर्ण वर्षभर झोपलेले बेडूक मेघांकडे मुख करून शब्दघोष करोत. हे मंडुका, तूं आनंदित होऊन घोष कर. हे तादुरी, पर्जन्यामुळें जलपूर्ण सरोवरांत तूं गर्जना कर. सर्व प्रकारचे बेडूक घोष करोत. हे पर्जन्या, तू समुद्रापासून मेघाची उत्पत्ती कर आणि पृथ्वीवर तुझें पाणी शिंपड. तुला वायू साथ देवो. अंतरीक्ष विजेनें व्याप्त होवो आणि वृष्टी अनेक यज्ञांना उपयुक्त होवो. धान्य आणि औषध उत्पन्न करो.

**१६. सत्यानृतसमीक्षकः** (सत्यासत्य विवेचन)

नित्यानित्य वस्तूंचा ज्ञाता, पापाचारी शत्रूंचा नियंत्रक, सर्वज्ञ आणि अतींद्रिय वरुण शत्रूंच्या छळानें त्रासलेला, गुप्त अगर प्रकट-

रूपानें संचार करणारा आणि कष्टानें जीवन व्यतीत करणाऱ्या सत्य-पालकास उत्तम प्रकारें जाणतो व वाईट कर्म करणाऱ्यांना शिक्षा करतो. ही पृथ्वी, महान द्युलोक, पूर्व आणि पश्चिमेला असलेले सागर आणि दक्षिण-उत्तर दिशा या योगें वरुण संसारांत संचार करतो. पापाचरण करणारा वरुणाच्या प्रसादानें मुक्त होवो. वरुणाचे दूत या पृथ्वीवर संचार करतात आणि मनुष्यांच्या सर्व सूक्ष्म कर्मांचें अवलोकन करतात. आकाश आणि पृथ्वी यांच्यामध्यें राहणाऱ्या लोकांना आणि त्यांच्या भल्या-बुऱ्या वरुण कर्मांना पाहतो. पापाचारी लोकांना तो जुगारी ज्या-प्रमाणें फासे फेंकतात त्याप्रमाणें फेकून देतो. हे वरुणा, उत्तम, मध्यम आणि नीच यांचें प्रत्येकी सात पाश पापी लोकांना बांधण्यास सज्ज आहेत. मिथ्याभाषी आणि पापी लोकांना दंड देण्यास आणि पुण्यवंतांना सुख देण्यास वरुण नेहमी सज्ज असतो. वरुणा, सत्यासत्य कर्मांचा तूं परीक्षक असून मिथ्याभाषी वरुणरोगानें– जलोदरानें नष्ट होतो. कारण वरुणाचा सामान्य पाश व व्याम्यनामक शाप अनेक रोगांच्या साहाय्यानें मनुष्यांना वद्ध करतो. तसेंच संदेश्यनामक शाप स्वदेशांत, विदेश्य, परदेशांत, देव-देवतांमध्यें आणि मनुष्यपाश माणसांना प्रभाव होतो. या ठिकाणीं वर्णन केलेल्या शापापासून मी शत्रूला बंदिस्त करतो.

### १७. अपामार्ग (आघाडा)

पावसाळ्यांत आपोआप उगवणारीं ही वनस्पती आहे. याचें पान हृदयाच्या आकाराचें असून वरून हिरव्या रंगाचें असतें आणि मागील भाग पांढरट असतो. याला बी येतें. आघाड्याचें मूळ खोड, पान, फूल आणि फळ औषधांत उपयुक्त असतें. ही वनस्पती विषद्रव्य नाश करणारी आहे.

हे अपामार्ग नामक वनस्पते, तूं औषधांची स्वामिनी आहेस. शत्रूनें निर्माण केलेल्या दोषांचा आणि जादूटोण्याचा तूं नाश करतेस. तूं सत्यजित, अभिचार सहन करणारी, दुसऱ्यांचें दुःख दूर करणारी, शपथयावनीं अन्य औषधांमुळे निर्माण झालेला दोष घालविणारी, पिशाच्चांना मूर्च्छित करणारी, शरीराच्या जखमा बऱ्या करणारी, रात्र

हरण करण्याच्या इराद्यानें मुलांना कवटाळणाऱ्या पिशाच्चांना भक्षण करणारी आहेस. अभिचार करणारे लोक, तुला अग्नीत घालून निळ्या आणि तांबडया ज्वाळाच्यायोगें मृद्पात्रांत कच्च्या मांसावर क्रिया करून लोकांना त्रास देतात त्यांना, व्याधि, राक्षस, असमृद्धिकर, अलक्ष्मीकारक लोकांचा तूं नाश करतेस. भूक, तहान, यांनीं पिडलेल्या, गाई आणि संतान नसलेल्यांचा संताप तुझ्यामुळें दूर होतो. दुसऱ्यानें निर्माण केलेल्या व्याधीमुळें कष्टी होणाऱ्यांचे कष्ट तूं नाहीसे करतेस. तो रोगशून्य होऊन चिरंतन होतो.

## १८. **अपामार्ग** (आघाडा)

आदित्याचे तेज त्याच्यापासून दूर जात नाहीं आणि रात्रीला अंधार सोडून जात नाहीं त्याप्रमाणे करणी केलेल्या माणसाला ही औषधी वनस्पती सोडून जात नाहीं. दूध पिणारें वासरूं ज्याप्रमाणें गाईला विलगतें त्याप्रमाणें आम्हाला त्रास देणाऱ्या शत्रूला ही कृत्या आलिंगन देवो. जो विश्वासघात करणारा प्रतिकार करण्यास असमर्थ होवो. हे औषधी– सहदेवी, तूं अनेक ठिकाणी उत्पन्न होतेस. तूं आमच्या शत्रूचें मस्तक छेदून त्याला नष्ट कर. शत्रूचे हित करणाऱ्या कृत्येला दूर कर. जी कृत्था शेतांतील बीजामध्ये, गाईंच्या कासेमध्यें, वायूच्या मार्गांत लपून बसली आहे तिचें बल नाश होवो. जी कृत्या आमच्या हाता-पायांना इजा करण्यास तयार होते तिचें ते कार्य या औषधी वनस्पतीच्या आणि मंत्राच्या सामर्थ्यानें नष्ट होवो आणि आमचें मंगल होवो. हे अपामार्ग परंपरेने प्राप्त झालेले कुष्ठ, क्षय, पिशाच्च अलक्ष्मी, यक्ष, राक्षस आणि पापजनक देवतांना आमच्यापासून दूर कर.

## १९. **अपामार्ग** (आघाडा)

हे सहदेवी, पावसाळयांत निर्माण होणारें गवत ज्याप्रमाणें कापून टाकलें जातें त्याप्रमाणें आमच्यावर करणी करणाऱ्या शत्रूंचे पुत्र-पौत्र तूं नष्ट कर. नृपद्पुत्र काण्वानें तुझा उपयोग केला. तूं यजमानाचें रक्षण करतेस. तुझ्या अस्तित्वामुळें करणीला वाव मिळत नाहीं. आरक्षामुळें

सूर्य जसा सर्व तेजोमय पदार्थांमध्यें श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें अपामार्ग सर्व औषधी वनस्पतींमध्यें श्रेष्ठ आहे. ही औषधी राक्षसादिकांपासून रक्षण करणारी आहे. पूर्वी इंद्रादि देवांनी राक्षसांना मारण्यासाठीं तुझा विनियोग केला. तुला अनेक फांद्या असल्याने तुला विथिदंती असेही म्हणतात. त्यामुळेंच आमच्या शत्रूला तूं आमच्यापासून विभिन्न करतेस. तुझी छाया ज्या भूमीवर पडते त्याठिकाणीं वाईट कृत्यें होत नाहींत. तूं फल देणारी आहेस. सर्व वाईट कृत्यांपासून तूं आमचें रक्षण कर. प्रतापी इंद्र मला तेजस्वी करो.

२०. **पिशाच क्षयणम्** (पिशाच्च नाश)

पुढें येणारे, वर्तमान, दूर असलेला धोका पाहणाऱ्या, स्वर्ग, अंतरीक्ष आणि पृथ्वी या ठिकाणीं निवास करणाऱ्या प्राणीमात्रांना पाहणाऱ्या, भू, भुव, स्वः या तीन स्वर्गांना, तीन भूमी, वरच्या तीन दिशा, खालच्या तीन दिशा यांमध्यें निवास करणाऱ्या प्राण्यांना पाहणाऱ्या, स्वर्गांतील देवतेप्रमाणें सुंदर, उत्तम पंख असलेल्या गरुडाप्रमाणें तीक्ष्ण नेत्र असलेल्या, हे औषधी, तूं या पृथ्वीवर उत्पन्न झाली आहेस. दानानें नटलेल्या हातांनीं इंद्रानें तुला उजव्या हातीं धारण केलें. तुझ्या प्रभावामुळें मी चारही वर्णाच्या लोकांना आणि राक्षसांना माझ्या नियंत्रणांत ठेवतो. राक्षसादि दुष्टांना दूर करण्याचें तुझें सामर्थ्य तूं प्रकट कर. या राक्षसांवर सक्त नजर ठेव आणि आमचे रक्षण कर. गुप्तपणें मला पीडा देणाऱ्या राक्षसांना आणि पिशाच्चांना तू प्रकट कर. तूं कश्यप ऋषींच्या नेत्राप्रमाणें आहेस. देवशुनी सरमेचा नेत्र तूं आहेस. नक्षत्रांनीं प्रसन्न असलेल्या अंतरीक्षांत लपून राहिलेल्या राक्षसांना तूं प्रकट कर. मी तुझ्यामुळें यांना नियंत्रित करीन. जे पिशाच्च अंतरीक्षांत राहून पृथ्वीला आपल्या ताब्यांत ठेवण्याचा यत्न करतें अशा तीनही लोकांत संचार करणारे पिशाच्च तूं मला दिसेल असे कर.

२१. **गावः** (गाई)

अनेक वर्णांच्या, सवत्स आणि उषःकाली यजमानाला भरपूर दूध देणाऱ्या गायी आमच्या गोठ्यांत येवोत आणि दुग्धादी पदार्थांनी आम्हाला

प्रसन्न करोत. इंद्राची स्तुती करणाऱ्याला इंद्र गाईंच्या प्राप्तीचा उपाय सांगतो आणि त्या प्रदानही करतो. सूर्य त्यांना धनवान व दुःखशून्य करून ज्या स्वर्गांत यज्ञ करणारे लोक जातात, त्या स्वर्गांत त्यांना स्थान देतो. इंद्रानें दिलेल्या गाईना कोणी चोरून नेत नाहीं. शस्त्र त्यांना इजा करीत नाहीं. गाईच्या दुधानें जो देवांवर अभिषेक करतो किंवा दक्षिणा म्हणून गाई प्रदान करतो तो गोधनानें संपन्न होऊन दीर्घायुषी होतो. या गाईंना हिंस्र पशू त्रास न देवोत. गाईंना कापून त्याचें मांस शिजविणाऱ्याजवळ या गाईंनी जाऊं नये. यजमानानें निर्माण केलेल्या भयरहित स्थानीं त्या येवोत. गाई हे महान धन आहे. याचा दुग्धरूपी रसानें सोम सिद्ध केला जातो. या गाई इंद्ररूप आहेत. यांच्या तूप-दुधानी सिद्ध केलेला हवि प्रदान करून आम्ही इंद्राला प्रसन्न करतो. गाई आपल्या दुधाने निर्बलाला सबल करतात, कुरूपांना स्वरूपवान करतात आणि घरांची शोभा वाढवितात. भरपूर गवत असलेल्या ठिकाणीं चरणाऱ्या गाई शुद्ध पाणी प्राशन करोत. त्या सवत्स होवोत आणि ताप देणाऱ्या रुद्राचें लक्ष्य न होवोत.

## २२. **अमित्रक्षयणम्** (जो मित्र नाहीं तो दूर होवो.)

हे इंद्रा, या राजाला पुत्र, पौत्र आणि रथादी संपत्तीनें संपन्न कर. कोणाहीपुढें तोंड वेंगाडावयास लावू नको. याचें सर्व शत्रू बलहीन कर. मी मंत्रप्रभावानें याला श्रेष्ठ लोकपाल करीत आहे. राजा आणि प्रजा यांचे सख्य असो. या राजाच्या शत्रूचें अश्वादी पशु आणि मनुष्य-बळ नष्ट कर आणि त्याला सर्वश्रेष्ठ कर. हा राजा सर्व प्रकारच्या धनाचा व प्रजेचा स्वामी होवो. शत्रूला पराभूत करणारें तेज या राजाला प्राप्त होवो. आकाश आणि पृथ्वी या राजाला ऐश्वर्य, दुग्ध-वती गाई, यज्ञाच्या योगानें वृद्धिंगत होणारें इंद्राचें सख्य आणि भरपूर औषधी प्राप्त होवोत. इंद्राच्या प्रेरणेनें या राजाचे मित्र शत्रूवर विजय संपादन करोत. राजा पराक्रमी होवो, शत्रूचे ऐश्वर्य स्वाधीन करो. व्याघ्राप्रमाणें शत्रूला भय निर्माण करो आणि इंद्राचा मित्र होवो.

**२३. पाप-मोचनम** (पापापासून मुक्तता)

पंच यज्ञांच्याद्वारें (देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ आणि ब्रह्मयज्ञ) ज्या अग्नीची उपासना केली जाते. ज्या वर्णामध्यें पांचवा स्वर निषाद आहे. या वर्णांच्या द्वारे गंधर्व, अप्सरा, देवता, राक्षस, असुर यांच्या यज्ञामध्यें ज्याची आराधना केली जाते, ज्या अग्नीला आम्ही प्रदीप्त करतो, जो अग्नि प्राण्यांच्या जठरामध्यें प्रतिष्ठित होऊन पापापासून आमचें रक्षण करतो त्या अग्नीचें महत्त्व मी जाणतो. हे अग्ने, तूं उत्पन्न झालेल्या सर्व पदार्थांचा ज्ञाता, देवांना हवि पोहोचविणारा, यज्ञांचे भेद ज्ञात असलेला, आम्हाला बुद्धी प्रदान करणारा असून पापापासून आमचें रक्षण करतोस. यज्ञाचा आधार आणि हव्यवाहक अग्नीची आम्ही स्तुती करतो. कारण तो यज्ञाची वृद्धि करणारा असल्यानें आम्ही त्याला घृताहुती प्रदान करतो. मनुष्यांचें हित साधणाऱ्या अग्नीचें आम्ही आवाहन करतो. अंगिरस ऋषीनीं अग्नीचें सख्य साधलें आणि आत्मशक्ति वाढविली. देवतांनीं आसुरी मायेला बाजूला करून पणी नामक असुरांवर विजय प्राप्त केला. ज्या इंद्रानें अग्नीच्या सहाय्यानें अमृताची प्राप्ती केली, वृक्षादि औषधी रससंपन्न केल्या, ज्याच्या उपासनेनें यजमानाला स्वर्गलाभ होतो, ज्याच्यामुळें या संसाराचें स्वरूप प्रकट होतें; ग्रह, नक्षत्र, तारे प्रकाशित होतात, पृथ्वीवरील सर्व प्राणी ज्याला अनुकूल होतात त्या अग्नीची स्तुती करून आम्ही त्याला आवाहन करतो.

**२४. पाप-मोचनम्** (पापापासून मुक्तता)

ऐश्वर्ययुक्त, वृत्रनाशक, मर्मज्ञ, यजमानाच्या आवाहनाला प्रतिसाद देणारा, पापारोचक, शत्रुसेनेमध्ये गोंधळ माजविणारा, मेघांना फोडून पाण्याला वाट करून देणारा, दानवांची शक्ती नष्ट करणारा, पाण्यामुळे गाईना जीवन प्रदान करणारा, मनुष्यांचे ईप्सित पुरे करणारा, त्यांना स्वर्ग प्राप्त करून देणारा, सोमप्रिय, ज्या इंद्रासाठी यज्ञांत यूप प्रस्थापित केला जातो, वंशवृद्धि करणारे वृषभ आणि गाई ज्याच्या यज्ञात एकत्रित होतात, ज्याच्या कृपेनें यजमानाची कामना पूर्ण होते,

असा महापराक्रमी, स्तुत्य आणि युद्धकुशल इंद्र आम्हास पापातून मुक्त करो.

## २५. पापमोचनम् (पापापासून मुक्तता)

आम्ही वायू आणि सूर्य यांना त्यांच्या कर्मामुळें जाणतो. सर्व प्राणिमात्रांमध्यें व्याप्त असलेल्या संसाराचें रक्षण करणाऱ्या, आमच्या चांगल्या वाईट कर्मांची गणना करणाऱ्या, आकाशांत जल प्रस्थापित करणाऱ्या, देवताश्रेष्ठ, असे वायू आणि इंद्र आमचें पाप दूर करोत., हे सूर्या तुझी उपासना करणारे नियमाप्रमाणे कर्मे करतात. तुझा उदय होतांच ते आपापल्या कामाला लागतात. हे वायो आणि सूर्या तुम्ही दोघेही प्राणिमात्रांचे संरक्षणकर्ते आहांत. तुम्ही आम्हाला राक्षस आणि कृत्येपासून दूर ठेवा. अन्नरसांनी आम्हाला पुष्ट करा. आम्हाला ऐश्वर्य प्रदान करा. शरीर बलसंपन्न करा. यजमानाला आरोग्य द्या. हा सोम तुम्ही प्राशन करा. आम्हाला उत्तम बुद्धी द्या. आमची स्तुती ऐका आणि दानशील करून आमची पापापासून मुक्तता करा.

## २६. पापमोचनम् (पापापासून मुक्तता)

सर्व भोगसंपन्न, समानचित्तयुक्त, अपरिमित, विस्तृत, देवतांचें एश्वर्यरूप, धनगर्भ, सर्व प्राणिमात्रांचें अधिष्ठान, दानशील, सुखद, प्राण्यांचे दुःख नाहीसे करणाऱ्या, नमस्कार योग्य, प्राणिमात्रांना अमृत-तत्त्वाची प्राप्ती करून देणाऱ्या, चरू, पुरोडाश, हवि यांना धारण कर-णाऱ्या, नद्यांना जन्म देणाऱ्या, गाईंना पुष्ट करणाऱ्या, वनस्पतींचें पोषण करणाऱ्या, मनुष्यांचे अन्नानें पोषण करणाऱ्या, जलानें तृष्णा शमवि-णाऱ्या, द्यौ आणि पृथ्वीची आम्ही स्तुती करतो, त्यांना हवि अर्पण करतो. ती आम्हाला आमच्या पापकर्मापासून दूर करोत.

## २७. पापमोचनम् (पापापासून मुक्तता)

हे मरुद्गणांनों, तुम्ही आम्हाला आपले म्हणा. आमच्या अन्नाचें रक्षण करा. युद्धांत क्षेम करा. मेघांना महान करून, वृक्ष आणि औषधीं-

वर वृष्टि करा. तुम्ही गाईच्या शरीरांत दूध उत्पन्न करतां, औषधींमध्यें रस निर्माण करतां, समुद्र पाण्यानें भरून टाकता. पक्ष्यांना आनंद देता. तुम्ही जलाचे स्वामी आहात त्यामुळें सर्वत्र वृष्टि करतां. मनुष्यांचें पाप नाहीसे करतां, अपराध क्षमा करता. सप्तरूपानीं विशाल बनता. तुमचे युद्धातील अस्तित्व शत्रूला दुःसह होतें. हे मरुतांनों, मी तुमची स्तुती करतो. पापापासून माझी मुक्तता करा.

## २८. पापमोचनम् (पापापासून मुक्तता)

संसाराची उत्पत्ति-संहार करणारे, पशुसृष्टीचे स्वामी, विश्व-नियंत्रक, जवळ अगर दूरवर असलेल्या वस्तूंवर अधिकार गाजविणाऱ्या धनुष्यांनीं बाण सोडणाऱ्या, द्विपाद आणि चतुष्पाद प्राण्यांचे स्वामी, सहस्राक्ष, वृत्रसंहारक, यांच्यापासून गोचर भूमीला समृद्ध करणाऱ्या भव आणि शर्व यांना आम्ही आवाहन करतो. या दोन्ही रूपानीं सृष्टीच्या प्रारंभी प्राणिमात्रांना उत्पन्न केलें. मनुष्यांच्या कर्माप्रमाणें त्याला फल प्रदान केलें. या दोघांच्या शस्त्रांपासून कोणीही वाचत नाहीं. कृत्यादि अनिष्ट कर्म करणाऱ्यांचें संतान हे नष्ट करतात. शत्रुवर प्रहार करून त्यांचा नाश करतात. हे भव आणि शर्व तुमची शस्त्रें शत्रूंना गाढ आलिंगन देवोत. तुमची स्तुती करून आम्ही तुम्हाला बोलावतो. आम्हाला पापापासून मुक्त करा.

## २९. पापमोचनम (पापापासून मुक्तता करणें)

हे मित्रावरुणांनों, पाणी आणि यज्ञ यांची वृद्धि करणाऱ्या शत्रूला पदच्युत करणाऱ्या, सत्यवंतांचें रक्षण करणाऱ्या, ज्ञानवान, रात्र आणि दिवसांचे अधिष्ठान, सोम प्राप्त करणाऱ्या तुमची स्तुतिस्तोत्रें मी गातो. तुम्ही अंगिरा, अगस्त्य, अत्रि, कश्यप, वसिष्ठ, श्यावाश्व, वध्र्यश्व, पुरुमीढ, विमद, भरद्वाज, गविष्ठित, विश्वामित्र, कुत्स, कक्षीवन, कण्व, मेधाविथि, त्रिशोक, उशना, गौतम, मुद्गल यांचे ज्याप्रमाणें रक्षण केलेत त्याप्रमाणें माझेही रक्षण करा.

मिथ्यामार्गाला लागलेल्या पुरुषाला त्रास देणारे आणि सत्यमार्गानें जाणारे मित्रावरुण पापापासून माझें रक्षण करोत. स्तोत्रांच्या साहाय्यानें

मी त्यांना आवाहन करीत आहे.

### ३०. राष्ट्रीदेवी (राष्ट्ररूपी देवता)

अकरा रुद्र, आठ वसू, बारा आदित्य, धाता, विश्वेदेव, इंद्राग्नि, आणि अश्विनीकुमार यांच्या रूपानें मी संचार करते. मी ब्रह्मवादिनी आणि परब्रह्मात्मिका आहे म्हणून सर्व दृश्य विश्वाची मी स्वामिनी आहे. माझें आराधन करणाऱ्यांना मी ऐश्वर्यवान करते. मी यज्ञीय देवता आहे. माझी अनेक लोक उपासना करतात. मी स्वतः आत्मरूप असून इंद्रादि देव आणि मनुष्यें यांना सद्वस्तूचा उपदेश करते. मी ज्याचे रक्षण करते तो बलवान होतो. मी त्याला सत्ताधीश बुद्धिमान आणि तपोवान करते. खाणें, पिणें, पाहाणें, श्वास घेणें वगैरे सर्व कार्यें माझ्या-मुळेंच होतात. मी सर्वांच्या अंतरांत वास करते. जो मला जाणत नाहीं त्याची उपेक्षा होते. हे मित्रा, भक्तीबद्दल मी जे कथन करतें ते लक्षात घे. त्रिपुरासुराला जिंकण्यासाठी धनुष्य धारण करते. स्वर्ग आणि आकाशांत मी गुप्त रूपानें राहते. शत्रूंचा ज्याप्रमाणें नाश होतो त्या-प्रमाणेंच स्वर्गांत निवास करणारे देव सोमानें पुष्ट होतात. हवि प्रदान करणाऱ्या यजमानाला मी ऐश्वर्यवान करते. या त्रैलोक्यांत शिररूप असणारा विधाता मी निर्माण करते. या संसाराचे कारण मी आहे. ब्रह्म, चैतन्य, वडवानल, विद्युत, सर्व प्राणिमात्रांना प्रकट करणारी माया, पृथ्वीच्या वर असणारा द्युलोक, अंतरीक्षातील जल या सर्वांना मी स्पर्श करते. कोणत्याही आणि कोणाच्याही साहाय्याशिवाय सर्व उत्पन्न करते. मी महान शक्तिशाली आहे.

### ३१. सेनानिरीक्षणम् (सैन्याची पाहाणी करणें)

हे मन्युदेवा, तूं उत्साही, मरुताप्रमाणें वेगवान, रथयुक्त, शत्रुपीडक दुर्जय, अग्नीप्रमाणें तेजस्वी व शत्रूला वश करणारा आहेस. आमच्या सेनेचा प्रमुख होऊन युद्धांत उपस्थित हो. शत्रूला नष्ट कर आणि त्यांचे धन आम्हाला वाटून टाक. तुझें बल महान आहे. तूं या राजाच्या शत्रूचे हत्ती, अश्व आणि सैनिकांना ठार कर. हे मन्युदेवा तूं ज्या स्थानीं प्रकट होतोस ते स्थान मला माहीत आहे. इंद्राप्रमाणें तूं आमचा संरक्षक हो.

अनेक यजमान तुला हवि प्रदान करतात. ऐश्वर्य प्रदान करणाऱ्या कर्माच्या रूपानें तूं या ठिकाणी आगमन कर. तूं आणि वरुणांनी आणलेलें सर्व धन तूं आम्हाला प्रदान कर. तुझ्यामुळे आमचे शत्रू भयभीत होऊन पळून जातील.

**३२. सेनासंयोजनम्** (सेनेची योजना– रचना करणें)

हे मन्यो, तुझी सेवा करणारे पुरुष तुझ्या प्रभावानें शत्रूला क्षीण करतात. तूं इंद्र आहेस. देवांना आवाहन करणारा अग्नि व वरुण तूंच आहेस. तूं अमित्रांचा घात करणारा, शत्रूला नष्ट करणारा, शत्रूचें धन हिरावून घेणारा, स्वतः रक्षणार्थ धावणारा, शक्तिसंस्थापक, ज्ञानी आणि युद्धकुशल आहेस. मी तुझी स्तुती करतो. तूं आम्हास बल प्रदान कर. तुला आम्ही आवाहन करीत आहोत. तूं आमचा मंत्रि होऊन दक्षिण दिशेला विराजमान हो. मी तुला सोमरसाची आहुती देतो. तूं आणि मी गुप्त रूपाने सोमपान करूं.

**३३. पापनाशनम्** (पापाचा नाश करणें)

हे अग्ने, तूं आमचें पाप दूर करून आम्हाला धनसंपन्न कर. तुझ्या कृपेनें आमचे पाप दूर होईल. हे अग्ने, रमणीय स्थान, निष्कंटक मार्ग आणि धन प्राप्तीच्या इच्छेनें मी तुला हवि प्रदान करून तृप्त करतो. सर्व स्तोत्यांच्या साहाय्याने मी तुझी स्तुती करतो. माझे पुत्र-पौत्रादि तुझी स्तुती करतात. तुझी स्तुती करणारे पुत्रपौत्रादिकांनीं समृद्ध होतात. तुझा मोठेपणा जाणणारे आम्ही देखील असेच संततिवान होऊं. तुझ्या सर्वत्र पसरलेल्या दीप्तीमुळें आमचें कल्याण होते. या दीप्तीनें आमचें पाप नष्ट होवो. हें अग्ने, तूं सर्वव्यापक, संसाराचा नियंत्रक आणि पापापासून भक्तांना दूर ठेवणारा आहेस. नाव ज्या प्रमाणें आम्हाला तरून नेते त्याप्रमाणें तू आम्हाला शत्रूच्या सेनासागरा-तून तरून ने. आमच्या पापाच्या समुद्रांतून तारून ने. तुझ्या कृपेने आमचें पाप दूर जाईल.

**३४. ब्रह्मौदनम्** (ब्रह्मानंदाचा उपभोग)

या ब्रह्मरूपी यज्ञाचे रथंतर साम हे शिर, बृहत्साम पाठ, वामदेव

पोट, गायत्र्यादि छंद हे पंख आणि सत्य हे मुख आहे. सर्व यज्ञकर्ते वायूच्या प्रभावानें पवित्र होऊन उज्ज्वल लोकीं जातात. त्यांच्या भोग-साधनांना (इंद्रियांना) अग्नि जाळत नाहीं तर त्यांना विविध भोग प्रदान करतो. जो यजमान उत्तम प्रकारचें पक्वान्न तयार करून ब्राह्मणांना देतो तो दरिद्री राहात नाहीं. यज्ञकर्ता त्याच्या मृत्यूनंतर यमलोकीं सुखानें राहतो, देवतांचें सान्निध्य संपादन करतो आणि सोमपानानें प्रसन्न होतो. यज्ञकर्त्याला यम बलहीन करीत नाहीं. तो पृथ्वीवर संचार करतो त्याप्रमाणें अंतरीक्षांत संचार करून भोगांचा आस्वाद घेतो तो यजमान स्वर्गांत जातो. श्वेतकमलाला सरोवरांत स्थिर करून अन्य पद्मकंदानाही स्थिर करतो. दही, घृत आणि मध यजमानाला पुष्ट करतात. पुष्करिणी त्याला आनंद देते. हे यज्ञकर्त्या तुला घृतयुक्त सरोवर, मधानें ज्याचे किनारे भरले आहेत असे तलाव, दूध, दहीं आणि पाणी संपन्नपणे स्वर्गांत लाभो. दुधाने भरलेले चार कलश चार दिशांना ठेवून मी त्यांचें पूजन करतो. नदीच्या मधुर जलानें संपन्न झालेल्या नद्या मला साहाय्यभूत होवोत. हे पक्वान्न स्वर्ग प्राप्त करून देणारें आहे. मी ब्राह्मणांना ते प्रदान करतो. इच्छित फल देणाऱ्या गाईंच्या रूपानें मला त्यांचें फल लाभो.

## ३५. मृत्युसंतरणम् (मृत्यूला मागे टाकून जाणें– अमर होणें)

या सूक्तांत "तेनौदनेनाति तराणि मृत्युम्" हा मंत्रार्ध प्रत्येक मंत्राच्या अखेरीस आला आहे. याचा अर्थ या पक्वान्नानें मी मृत्यू तरून जाईन, असा आहे.

जें पक्वान्न पूर्वीं आपल्या तपस्येनें स्वतःसाठीं निर्माण केलें तें ओदन मनुष्य ज्याप्रमाणें नाभी धारण करतो त्याप्रमाणे पृथ्वी वगैरे धारण करते. त्या ओदनाच्या दानानें मी मृत्यू तरून जाईन. त्या ओदनाने सर्व मृत्यूला कारण असणाऱ्या सर्व देवतांना मी उल्लंघून जाईन. ज्या ओदनानें पृथ्वीला धारण केलें आहे, आपल्या रसाने अंतरीक्ष भरून टाकलें आहे आणि द्यु लोक आपल्या श्रेष्ठत्वानें महान केला आहे त्या ओदनाच्या साहाय्यानें मी मृत्युला मागें टाकीन. ज्या ओदनामुळें बारा

महिने, तीस दिवसरूपी आरे आणि संवत्सर उत्पन्न होतें त्या ओदनानें मी मृत्यू तरून जाईन. ज्या ओदनानें चारही दिशा तेजसंपन्न होतात, मृत्युवानाला प्राण प्रदान करतें, आकाशांत अमृत उत्पन्न होतें, गायत्री छंदाची अधिपती देवता प्रसन्न होते, ज्या ओदनानें चारही वेद अधिष्ठित होतात त्या ओदनाने मी मृत्यू तरून जातो. माझ्याशीं वैर करणाऱ्या शत्रूच्या कार्यांत विघ्न निर्माण करतो. शत्रू नष्ट होतात त्यामुळें ब्रह्मरूप ओदन मी सिद्ध करतो. पूज्य देवता आमची स्तुती श्रवण करोत.

३६. **सत्यौजा अग्निः** (सत्यरूपी तेजोवान अग्नि)

जो शत्रू आमची हिंसा करण्याची इच्छा करतो, जे दोष आमच्यांत नाहींत ते मिथ्या दोष आमच्यावर लादतो, आम्हाला दुःख देतो, ज्या युद्धांत मांस व रक्त नष्ट केलें जातें, पिशाच्च आम्हाला मारून खाण्यासाठीं शोधत असतात, शत्रूनें भारल्यामुळें अमावास्येला जी पिशाच्चें आम्हाला नष्ट करण्याची इच्छा करतात त्या सर्वांना मानवां-वर उपकार करणारा अग्नि भस्म करो. या राक्षसांचे बल मी मंत्र-शक्तीनें नष्ट करतो. आमचा संकल्प सुखमय होऊन सिद्धीस जावो. जे पिशाच्च मायावीपणें आम्हाला भिववितात, नदी आणि पर्वतावर संचार करतात त्यांच्यापासून मी गाईचें रक्षण करून धनवान होईन. सिंह ज्याप्रमाणें गाईंना दुःख देतो त्याप्रमाणें मी माझ्या मंत्र-सामर्थ्यानें राक्षसांना दुःख देईन. सिंहाच्या भयानें कुत्रे ज्याप्रमाणें लपून जातात त्याप्रमाणें ही पिशाच्चें माझ्या मंत्रसामर्थ्यानें लपून बसतील. मी ज्या गावांत जाईन त्या गावांतील चोर आणि पिशाच्चे आपोआप नाहीशी होतील. त्या ठिकाणचे निवासी हिंसाकार्यापासून सदैव दूर राहतील. डास ज्याप्रमाणें हत्तीला क्रोध आणतात त्याप्रमाणें या पिशाच्चांना माझ्या मंत्रबलानें क्रोध येईल आणि त्यांतच तीं जळून जातील. खोडकर अश्वाला ज्याप्रमाणें दोरीनें बांधतात त्याप्रमाणें पापदेवता निर्ऋति माझ्या शत्रूंना बांधून टाकील.

३७. **कृमिनाशनम्:** (कीटक व किड्यांचा नाश करणें)

निरनिराळ्या औषधींच्या उपयोगानें निरनिराळ्या कीटकांचा

नाश होतो. या वनस्पती ऋषीनीं निर्माण केल्या आहेत.)

हे औषधींनों तुम्हाला अथर्वा, कश्यप, कण्व, अगस्त्यादि ऋषीनीं निर्माण केलें आणि त्यायोगें राक्षसांना नाहीसें केलें त्याप्रमाणें मी करतो.

हे अजशृंगे, तुझा उग्र वास उपद्रवी राक्षस आणि पिशाच्च यांना लांब पळवून लावतो. नदी पार करण्यासाठीं मनुष्य ज्याप्रमाणें नावाड्याजवळ जातो त्याप्रमाणें, गुगुल, पीला, नलदी, अक्षगंधा आणि प्रमर्दनी या वनस्पतींच्या हवनानें, गंधर्वस्त्रिया आपल्या स्थानीं परत जातात. पिंपळ, वड, श्यामली, अर्जुन आणि शिखंडी यांच्या योगें अप्सरा परत जातात आणि गतिहीन होतात. अजशृंग ही अत्यंत बलवती, हिंसा करणाऱ्यांचे उच्चाटण करणारी, उग्र दर्प असलेली आणि राक्षस व पिशाच्च यांचा नाश करणारी वनस्पती आहे. मोराप्रमाणें नाचणाऱ्या, सुंदर, गायन करणाऱ्या आणि आम्हाला मारण्याची इच्छा करणाऱ्या गंधर्वांचा अण्डकोष चूर्ण करून मी त्यांना वीर्यहीन करतो. इंद्राच्या ज्या सहस्राधार वज्राला सर्व प्राणी भितात ते वज्र गंधर्वांना नष्ट करो. हे अजशृंगे, उपद्रव करणाऱ्या गंधर्व आणि पिशाच्चांना तूं तुझ्या स्वाधीन ठेव. गंधर्व मायावीपणें श्वान, माकड, बालक वगैरेची रूपें धारण करून, प्रेमाचें नाटक करीत स्त्रियांजवळ जातात. त्या मायावी गंधर्वांना मी मंत्रबलानें स्त्रीपासून बाजूला करतो. हे गंधर्वांनों, अप्सराच तुम्हाला उपभोग्य आहेत. त्या तुमच्या स्त्रिया आहेत. त्यांना तुम्ही आलिंगन द्या. तुम्ही अमर असल्यानें मर्त्य स्त्रियांशीं संगती करूं नका.

## ३८. वाजिनीवान वृषभः (उत्पत्तिक्षम वृषभ)

द्यूत क्रियेची अधिदेवता, नेहमी विजय प्राप्त करून देणाऱ्या, फाशांनी खेळण्यांत चतुर असलेल्या अप्सरेला द्यूतासाठीं मी आवाहन करतो. सर्व बंधनें करून विजय खेचून आणणाऱ्या, फाशांनी सुंदर खेळणाऱ्या, द्यूतदेवतेची स्वामिनी असलेल्या अप्सरेला द्यूतामध्यें विजय प्राप्त व्हावा म्हणून मी बोलावतो. जी अप्सरा विजयानें नाचते त्या फाशांच्या चार संख्यांनीं आम्हाला विजयी करून धन प्राप्त करून देते.

अन्य द्यूत खेळणाऱ्यांना ती विजयी करीत नाहीं. जी अप्सरा द्यूतांतील पराजयानें शोक आणि विजयानें आनंद निर्माण करते ती अप्सरा फाशांनीं प्रसन्न होते. ज्या अप्सरेचा स्वामी अंतरीक्षांत संचार करीत आहे आणि जो उषायुक्त आहे तो सूर्य सर्व लोकांचे रक्षण करीत चारही दिशांना संचार करतो. तो सूर्य अप्सरांसहित येऊन आमची हवनद्रव्यें ग्रहण करो. हे उषा आणि अप्सरायुक्त सूर्या, तूं गाईच्या धवल वत्साचें पोषण आणि रक्षण करावेस. ही श्वेत गाय आमच्या गोठ्यामध्यें तुझ्या कृपेनें आण. तुला आमची शतवन्दनें आहेत. हे उषावान आणि अप्सरायुक्त सूर्या, गाई-वासरांना खावयास द्यावयाचें हें गवत पौष्टिक होवो. त्यानें गोठे भरून जावोत. या गोठ्यांत आम्ही गाईच्या वासरांना बांधतो.

## ३९ संततिः (नम्रभाव)

अग्नि सर्व प्राणिमात्रांना प्रिय आहे. पृथ्वी ही गाय असून अग्नि तिचें पाडस आहे. आपल्या वत्साच्या मार्फत ती मनुष्यांना अन्न, पशुधन, आणि शंभर वर्षांचे आयुष्य प्रदान करते. वायु हा अंतरीक्षाचा स्वामी आहे. अंतरीक्षात राहणारे गंधर्व वायूच्या जवळ आल्यानें वायूला ज्याप्रमाणें समृद्धि प्राप्त होते त्याप्रमाणें मलाही समृद्धि प्राप्त होवो. अंतरीक्ष ही पयस्विनी धेनु असून वायू हे तिचें वत्स आहे. हे वत्स मनुष्यांना अन्न, अन्नरस, पुत्र, पशु शतायुष आणि इच्छित वस्तू प्रदान करतें. सूर्यमंडलांत निवास करणारे सूर्यापुढें नम्र होतात. त्यांच्यामुळें सूर्य समृद्ध होतो. आकाश ही इच्छित फल देणारी गाय असून सूर्य तिचें वत्स आहे. सूर्य मनुष्यांना अन्न, बल, पुत्र, पशुधन शतायुष आणि इच्छित वस्तू प्रदान करतो. पूर्वेस राहणारे प्राणी चंद्राच्या सान्निध्यांत आल्यानें चंद्राचे ऐश्वर्य वाढतें. सर्व दिशा ही गाय असून चंद्र तिचें वत्स आहे. तो चंद्र अन्न, पशु, दीर्घायुष्य आणि इच्छित फल प्रदान करतो. अग्नीमध्यें मंत्रशक्ती निवास करते. तो चक्षु, अथर्वा आणि अंगिराचा पुत्र आहे. तो असत्यापासून रक्षण करतो. या अग्नीला आम्ही हवि अर्पण करतो. हे अग्ने, तूं सर्वांचा ज्ञाता आहेस, दानवान आहेस. तुझ्या

मुखांत सप्तजिव्हा असून तुझें मुख उघडावे म्हणून आम्ही प्रेमानें घृताहुती अर्पण करतो.

**४० शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

हे अग्ने, तूं सर्व प्राणिमात्रांचा ज्ञाता आहेस. जे शत्रू अभिचार कर्मांनी आम्हाला पूर्व दिशेतून नष्ट करण्याचा प्रयत्न करतात ते अग्नीच्या समीप जाऊन भस्म होवोत. जो शत्रू आम्हाला दक्षिण, पश्चिम उत्तर, अधर आणि उर्ध्व दिशांतून नष्ट करण्याचा प्रयत्न करतात ते अनुक्रमे दिशास्वामी यम, वरुण, सोम, पृथ्वी आणि सूर्य यांच्याकडे जाऊन व्यथामय होवोत. त्यांना मी त्यांच्या मंत्रशक्तीच्या विरुद्ध शक्तीचा उपयोग करून नष्ट करतो.

अभिचार कर्म करणाऱ्या शत्रूचा मी नाश करतो. हे अग्ने आकाश आणि अंतरीक्षांत राहणाऱ्या लोकांना अभिचार कर्मांनीं जे शत्रू नष्ट करण्याचा प्रयत्न करतात ते या स्थलाचा स्वामी वासुदेव यांच्या-जवळ जातांच व्यथामय होऊन दूर जातात. हे अग्ने, चार उपदिशांमध्यें राहून अभिचार कर्म करणारे क्षीणबल होवोत. ते परब्रह्मापर्यंत जाऊन व्यथामय होवोत.



# पंचम काण्ड

## १ अमृतासुः (अमरत्व)

सूर्याप्रमाणें प्रकाशक, त्रैलोक्यपालक, अहिंसक, विविधाकार धारण करणारा, वाणीचा उद्गाता, धर्म कर्मामध्यें कष्ट सहन करणारा, आपल्या धर्मकांतीचे तेज पसरविणारा, जीवात्मा योनीचा आश्रय करून जन्म पावला. जो प्रत्येक ठिकाणीं उपस्थित होऊन ब्राह्मणाचें हित करण्यासाठी परमात्म्याचें चिंतन करून तो त्याला जाऊन मिळतो. प्रजारूपी भगिनीचा भार वाहतो. पृथ्वीला स्थिर करणारे भूपद्वय गतीने वाढत जातात. अथर्वामध्यें प्रवीण असलेल्या देवानों आम्ही हवि प्रदान करतो. पूर्वीच्या ऋषींनी सात दुष्कृती स्पष्ट केल्या आहेत. (चोरी, गुरुपत्नीगमन, ब्रह्महत्या, भ्रूणहत्या, मद्यपान, द्यूत आणि मिथ्या भाषण) यांचा जो आदर करतो तो पापी होय. परंतु यांचा जो अनादर करतो तो आदित्य मंडलांत स्थिर होतो. जो कोणी हवि प्रदान करतो त्याला इंद्र रत्ने प्रदान करतो. पुत्र पित्याचा आदर करो. कल्याणासाठीं धर्माचार करो. हे वरुणा, तूं या सांसारिक देहांची रचना करतोस. दुग्धादिकांची वृद्धि करतोस. आकाश आणि पृथ्वी देवतांनो, ऋषींनीं प्रशंसिलेल्या या देहाचें हें वर्णन आहे.

## २ भुवनेषु ज्येष्ठः (सर्वांत ज्येष्ठ पुरुष)

इंद्र धनवान आणि बलवान असल्यानें सर्वश्रेष्ठ आहे. तो शत्रु-संहार करतो म्हणून त्याचे सैनिक नित्य आनंदी असतात. हे विश्व

ब्रह्मामध्यें लीन होते. विश्व ब्रह्माची प्रार्थना करते. जन्म, संस्कार आणि दीक्षा यायोगें यज्ञाचा परिचय होतो. हे इंद्रा, तूं पदार्थांना मधुता आणतोस ते पदार्थ उपलब्ध कर. तू युद्धांत धन जिंकणारा असून ब्राह्मण तुझी स्तुती करतात. तूं त्यांना बल दे. सुखात दुःख निर्माण करणारा मनुष्य आम्हास प्राप्त होवो. तुझ्या कृपेनें, तपस्येच्या साहाय्याने मी शस्त्र चालवितो आणि बाणांना तीक्ष्ण करतो. ज्या घरामध्ये सर्व प्राणिमात्रांचें पालन-पोषण होतें आणि त्यांना स्थिरता प्राप्त होते त्या घरामध्यें तुझें बल स्थापन करून सर्व पदार्थ उपयुक्त कर. हे मनुष्यानो, शील, तेजस्वी, सर्वत्र संचार करणारा आणि सर्वांचा स्वामी असलेल्या राजाची स्तुती करा. स्वर्गाची इच्छा करणारा राजा स्तोत्रांच्या साहाय्यानें इंद्राला प्रसन्न करतो आणि स्वर्गराज इंद्र वृष्टीनें त्यांना संतुष्ट करतो स्वतःला इंद्र मानणाऱ्या अथर्वा ऋषी पापरहित भगिनी त्याला प्रसन्न करतात.

**३ विजयाय प्रार्थना** (विजय प्राप्तीसाठी प्रार्थना)

ही प्रार्थना संकटाच्या वेळीं एकटे असताना, कोणी बंधनात ठेवल्यास किंवा ज्या ठिकाणीं मनुष्याला काहीं सुचेनासे होतें त्या ठिकाणीं या प्रार्थनेचा उपयोग करतात.

हे अग्ने, आम्हाला तेजस्वी आणि बलवान कर. तुझें संरक्षण लाभले तर आम्ही शत्रूचा पराभव करूं. याचा क्रोध नाहीसा करू. आम्हाला दुःख देणारे आमच्यापुढें नम्र होवोत. इंद्र, मरुत, विष्णू, अग्नि वायु आणि अंतरीक्ष समरप्रसंगी आम्हाला अनुकूल होवोत. माझे सर्व संकल्प सत्य होवोत. मला पापाचा स्पर्शही न होवो. मी ज्या देवतांना आवाहन करतो त्या देवता आमच्याकडे येवोत. आम्हाला बल आणि धन प्रदान करोत. पृथ्वी, आकाश, जल औषधी, दिवस आणि रात्र आम्हाला संपन्न करोत. हे देवतांनों आमच्यावर प्रसन्न व्हा आणि आम्हाला परनिंदा आणि पाप यांपासून दूर ठेवा. भारती, पृथ्वी आणि सरस्वती आम्हाला अन्न, संतान आणि आरोग्य प्रदान करून आमचें कल्याण करोत. हे सोमा, आम्हाला शत्रू न मिळोत. नदीप्रमाणें गतिमान गुणी आणि अन्नस्वामी इंद्र आम्हाला यज्ञात सुखी करो. आमच्या पुत्र

पौत्रांना सुखी ठेवो. ब्रह्मदेव, सूर्य, आदित्य आणि अश्विनीकुमार यजमानाचे पापापासून रक्षण करोत. आमचे शत्रू नष्ट होवोत. इंद्र आणि अग्नि शत्रूला बद्ध करोत. सूर्य आणि आदित्य सर्व कार्यांत दक्ष असलेला राजा आम्हाला देवोत. जमीन, धन आणि अश्व यांना जिंकणाऱ्या इंद्राला आम्ही बोलावतो. आम्ही केलेली स्तुती तो श्रवण करो. हे इंद्रा, आम्हाला तुझें मित्रत्व लाभो.

### ४. कुष्ठतक्मनाशनम् (कुष्ठनाश)

हिमालय पर्वतावर उत्पन्न झालेल्या, कुष्ट रोगाचा आमूलाग्र नाश करणाऱ्या औषधी लोकांनी विकत घेतल्या. आकाशरूपी देवांच्या तृतीय निवासस्थानी देववृक्ष अश्वत्थ आहे. त्यामधील अमृतत्त्व देवांना माहीत आहे. स्वर्गाला प्राप्त होणाऱ्या, सुवर्णाच्या बंधनानीं बद्ध केलेल्या आणि स्वर्गनौकेच्या साधनानें सुवर्णमार्गाने देवांनी ही पुष्पित वनस्पती प्राप्त केली. हे अमृतमय औषधे, या रोगांचा नाश करून लोकांना तूं दीर्घायुष्य दे. हे औषधे, तूं सोमाची मित्र आहेस. तूं माणसांना प्राणादि वायु दे आणि नेत्रसुखद कर. हिमाचलाच्या उत्तरेस ही वनस्पती निर्माण झाली, पूर्वेस ती मनुष्यांना प्राप्त झाली आणि रोगांच्या निर्मितीला कारण असणाऱ्या पापाला आपल्या बलानें तिनें नष्ट केलें.

### ५. लाक्षा (लाख)

हे लाखे, रात्र ही तुझी माता, आकाश पिता, अर्यमा आजोबा आणि देवतांची तूं भगिनी आहेस. तुझा स्वीकार करणारा संरक्षित होतो. त्याचें पोषण होतें. कारण लाख बलसंपन्न आहे. तूं प्रत्येक वृक्षाच्या आश्रयानें राहतेस म्हणून तुला स्मरणी म्हणतात. तूं क्षतनाशक आणि व्रणनाशक आहेस. तूं कदंब, पिंपळ वड, खैर, उंबर यांच्या पानापासून उत्पन्न होतेस. तूं आम्हाला प्राप्त हो. तूं सुवर्णाप्रमाणें कान्तिमान, जखमा बरी करणारी, सुखद आणि जलभगिनी आहेस. वायु तुझा आत्मा आहे. तुला सिलाची किंवा कानीन अशीही नावें आहेत. शरीरांत बद्ध झालेला आत्मा तुझा पालनकर्ता आहे. यमाच्या पिवळ्या रंगाच्या अश्वाचे रक्त तुझ्यावर

शिंपडलें आहे. त्यामुळें तूं अश्वरक्ताच्या रंगाची, वृक्षांचा आश्रयकरणारी, पक्ष्याप्रमाणें रक्षणकर्ती असून मनुष्यांना उपलब्ध होणारी आहेस.

## ६. ब्रह्मविद्या (ब्रह्मज्ञान)

संपूर्ण विश्वाला कारण झालेलें ब्रह्म प्रारंभी सूर्यापासून प्रकट झालें. त्याच्या तेजाने सर्व दिशा भरून गेल्या. हे पुरुषा, तुझ्या शत्रूनें उत्तम कर्म करून आमची प्रजा नष्ट करण्याचा प्रयत्न केला म्हणून मी त्याला थांववून ठेवण्याचा मंत्रप्रयोग करतो. आकाशमार्गानें स्वर्गस्वामी झालेल्या पुरुषानें असे सांगितलें आहे कीं, युद्धांत कपट करणारे यमपाशांत सापडतात. हे सूर्या अन्न उत्पन्न व्हावें म्हणून तूं मेघांना ताडण करतोस म्हणून तुला सनिस्रस नांव प्राप्त झालें. तूं तेराव्या महिन्यांत सुद्धा वृष्टी करतोस. अभिचार कर्मातून प्राप्त झालेली सिद्धी इंद्रा, तुला अर्पण होवो. तूं सोम, रुद्र, यांच्याप्रमाणें तीक्ष्णास्त्र आहेस. आम्हाला युद्धांत जय दे. या राजानें अभिचार कर्मांनीं शत्रुनाशाची आणि शत्रुदमनाची जी सिद्धी प्राप्त केली ती तुम्हाला अर्पण होवो. हे सोमरुद्रांनों, पापापासून आमचें रक्षण करा. आम्हाला यज्ञांतून अमरत्व प्रदान करा. डोळे आणि मन ही श्रेष्ठ आयुधें आहेत. जो आम्हाला नष्ट करण्याची इच्छा करतो तो आयुधशून्य होवो. आमचा नाश करण्याच्या उद्देशानें आमच्याकडे जो वाकड्या दृष्टीनें पाहतो किंवा आम्हाला क्षीण करण्याची इच्छा करतो त्याला हे अग्ने तूं क्षीणायुष्य कर. आमची ही आहुती तुला समर्पित होवो. हे अग्ने, तूं इंद्राचें घर आहेस. तूं सर्वांचा सर्वगामी आत्मा आहेस. आम्ही तुला शरण आहोत. तुझ्यामुळें इंद्र सुखी होतो, तूं इंद्राचे संरक्षण कवच आहेस आणि सर्वगामी आहेस. मी माझ्या सर्व पुत्रपौत्रादिकांसह तुला शरण येऊन तुझ्यामध्यें प्रविष्ट होत आहे.

## ७. अरातिनाशनम् (शत्रुनाश)

शत्रू आमच्या चार बाजूला न राहो. आम्हाला मिळालेली दक्षिणा अमंगल न होवो. वृद्धिनाशाची इच्छा यज्ञार्पण होवो. केवळ वाचाळ पुरुषाला आम्ही लांबूनच प्रणाम करतो. देवाबद्दलची आमची भक्ती

अहोरात्र वाढत राहो. शत्रू त्यामुळें शरण येईल. हा हवि, हे देवते, तुला सर्मपित होवो. देवांना बोलावणारे मंत्र म्हणणारी वाणी मी उच्चारतो. त्यामुळें अनुमती, सरस्वती, आणि भग देवतेला आम्ही शरण आहोत. मी मनानें ज्या वस्तूची इच्छा करतो ती सोम पूर्ण करो. हे शत्रुप्रिय देवते, आमची वाणी आणि श्रद्धा यांना तूं अडवूं नकोस. इंद्र आणि अग्नि आम्हाला सर्व प्रकारचे धन देतात. ते शत्रूला अनुकूल होत नाहींत. हे शत्रुदेवते तू आम्हाला पीडा देणारी आणि दुर्बल करणारी आहेस. तूं आमच्यापासून दूर हो. तुझ्या विनाशक शक्तीला आम्ही मंत्रानें दूर करतो. मनुष्यांच्या इच्छा असफल करून प्रमादाच्या रूपानें तूं लोकांकडे येतेस. त्या तुझ्या कृतीला आमचा दुरून नमस्कार असो. ही हिरण्यगर्भा पृथ्वी हिरण्यकश्यपूला वश होऊन असमृद्ध झाली होती. या नाशक असमृद्धीला मी नमस्कार करतो.

## ८. शत्रूनाशनम् (शत्रूचा नाश करणे)

हे अग्ने, औषधगर्भ इंधनानें देवगणांपर्यंत जाऊन त्यांना प्रसन्न कर आणि आमच्या आवाहनाबरोबर त्यांना घेऊन ये. हे इंद्रा, ऋत्विजांची स्तुती ऐकून प्रसन्नपणें तूं आमच्या यज्ञस्थळी ये आणि आम्हाला वीर्यवान कर. देवांची भक्ती न करणाऱ्या लोकांना अग्नीची प्राप्ती होणार नाहीं. हे इंद्रा दोन कोल्हे ज्याप्रमाणें झुंजतात त्याप्रमाणें शत्रूबरोबर युद्ध करून त्याला नष्ट कर. आमच्या नाशासाठीं शत्रूने ज्यांना पुरोहित केलें त्याचें तेज नाहीसे होवो. त्यांच्या मृत्यूसाठीं मी शस्त्र फेकतो. आमच्या शत्रूंनीं मंत्रकवच निर्माण केलें असेल तर हे देवानों तुम्ही तें भेदून टाका. हे वृत्रहंतका, ज्या शत्रूनें वीरांना पुढें केलें आहे त्यांना तूं मागें हटव आणि शत्रुसेनेचा संहार कर. इंद्रानें ज्याप्रमाणें शत्रूला थांबवून ठेवलें त्याप्रमाणें मी शत्रूला मारतो. या युद्धांत तूं उग्र रूप धारण करून शत्रूची मर्मस्थानें छेदून टाक. आम्ही तुझे मित्र असून नेहमी तुला अनुकूल होऊन राहूं.

## ९. आत्मा (आत्मा)

आकाश, पृथ्वी आणि अंतरीक्ष, यांना आमच्या दोन दोन आहुती समर्पित होवोत. सूर्य माझे नेत्र, वायु हा प्राण, अंतरीक्ष आत्मा आणि पृथ्वी शरीर आहे. नामधारक मी द्यौ आणि पृथ्वी यांच्यापासून संरक्षण प्राप्त करतो आणि त्यांना शरण जातो. हे द्यौ, पृथ्वी, तुम्ही माझें आयुष्य, बल, कृती, बुद्धी आणि इंद्रियें यांचे रक्षण करा. तुम्ही स्वधा-युक्त रक्षक आहांत. माझा नाश करूं नका.

## १०. आत्मरक्षा (स्वतःचें रक्षण करणें)

हे दगडा तूं आमचे घर आहेस. हत्या करून आम्हाला जो, पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर, ऊर्ध्व, अधर आणि अंतरदिशांतून नष्ट कर-ण्याची इच्छा करतो त्याचा नाश होवो. मी चंद्रानें मनाचें, वायूनें प्राणापानादिकांचें, सूर्यानें नेत्राचें, अंतरीक्षानें कानांचें, पृथ्वीनें देह आणि सरस्वतीनें वाणी प्रदान करावी म्हणून त्यांना प्रार्थनापूर्वक आवाहन करीत आहे.

## ११. संपत्कर्म (संपत्तिलाभासाठीं करावयाची कृती)

वरुण बलवान असून सूर्याचा मित्र आहे. आम्ही केवळ धनाची इच्छा करून आम्हाला धन प्राप्त होत नाहीं. परंतु सूर्याच्या कृपेनें आम्हाला धन प्राप्त होते. हे ऋत्विजांनों, तुम्ही अग्नीप्रमाणें तेजस्वी कसे झालात. अथर्वापासून आम्हाला ज्ञानप्राप्ती झाली त्यामुळे आम्हाला अग्नीचे तेज प्राप्त झालें. वरुण महान धैर्यवान आहे. तो सर्व वस्तूंचा ज्ञाता आहे. सांसारिक मनुष्याला वरुणाचा धाक आहे. तो धनस्वामी आहे. रजोगुणयुक्त धनापेक्षां सत्त्वशील धन आणि त्यापेक्षां ब्रह्म सर्वो-त्तम आहे. हे वरुणा या प्रापंचिक लोकांची तूं उपेक्षा करूं नकोस. अन्य लोक आम्हाला धनहीन न म्हणोत. मी तुला दान देत आहे. तुझे महत्त्व सर्वत्र पसरो. हे वरुणा, तूं मला जे द्यावयाचे शिल्लक राहिलें असेल तें दे. तूं आम्ही आणि आमची प्रजा एकच आहोत हें मला ज्ञात आहे. तुला मी जें द्यावयाचें राहिलें आहे तें मी तुला अर्पण करीत आहे. हे

वरुणा, तू ज्ञानवान अथर्वाला निर्माण केलेंस. तू आमचा मित्र आणि बंधू आहेस.

१२. **ऋतस्य यज्ञः** (सत्य यज्ञ)

हे अग्ने, तूं मित्रपूजक, देवतांना बोलावून आणणारा, प्रदीर्घ कालाच ज्ञान असलेला, ज्ञानी सुजिव्ह आणि सत्याकडे जाणाऱ्या मार्गाचा प्रतिपादक असून मनुष्यांच्या यज्ञांत पदार्पण करून तूं त्याची वृद्धि करतोस. तूं पूजनीय, वन्दनीय आणि यज्ञयोग्य आहेस. तूं वेदीरूपी भूमी झांकून टाकणारा, विस्तृत होणारा, सर्व ज्योतींमध्ये श्रेष्ठ, यजमानाला सुख प्रदान करणारा आणि पृथ्वीला आनंद देणारा आहेस. अग्नीची दीप्ति उषा आणि आहुतीची दीप्ति रात्र संपन्न करते. यजमानाला ती दीप्ति लक्ष्मीप्रमाणें आहे. वायु आणि अग्नि दिव्य सुंदर वाणीयुक्त, यज्ञप्रेरक यज्ञनिर्माते असल्यानें आम्ही त्यांची सेवा करतो. ते आमच्यावर उपकार करोत. अग्नि, पृथ्वी आणि सरस्वती आमच्या आवाहनाला साद देवोत आणि कुशासनावर विराजमान होवोत. जो त्वष्टा प्राण्यांना अनेक रूपांनी नटवतो त्या त्वष्टयाची आम्ही पूजा करतो. प्रत्येक ऋतूमध्यें सर्व वनस्पती आणि पाणी यांना स्वादमय करो. अग्नि प्रकट होतांच यज्ञाला प्रारंभ होतो. यज्ञाला प्रारंभ होताच देवतांचे आगमन होतें आणि सर्वश्रेष्ठ अग्नीच्या मुखातून मनुष्यांनी संर्मपित केलेल्या आहुती त्या स्वीकारतात.

१३. **सर्पविषनाशनम्** (सर्पाच्या विषबाधेपासून मुक्तता करणें)

स्वर्गदेवता वरुणाच्या कृपेनें आणि त्याच्या आज्ञेप्रमाणें हे विष मी नष्ट करतो. जे विष मांसामध्यें, त्वचेमध्यें आहे, ते मी काढून घेतो. वीर्यामधील जलांश नष्ट होण्याप्रमाणें हे विष नष्ट झालें. (वीर्यातील जलांश नष्ट झाला कीं त्याचा प्रभाव संपतो त्याप्रमाणें सर्पाच्या विषांतील जलांश नाहीसा झाला तर उर्वरित भागाचा उपयोग विष नष्ट करण्यासाठी करण्यांत येतो) सर्पाचें उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ प्रकारचें विष मीं काढून घेतो. जलशोषण करणाऱ्या विषाला मी शरीरांतच

बद्ध केलें आहे. मी माझ्या मंत्रमय वाणीनें सर्पाला बद्ध करतो. अंधकाराच्या वेळीं सूर्योदय झाला म्हणजे ज्याप्रमाणें चेतना प्राप्त होते त्याप्रमाणें मनुष्य विषापासून मुक्त होऊन सजीव होतो. हे सर्पा, माझ्या नेत्रांनी, तुझ्या नेत्रांतील शक्ति आणि विषानें विष नाहीसे करतो म्हणजे तू मृत्यू पावशील. हे निंदनीय सर्पा, माझ्या मित्राच्या जवळ जाऊं नकोस. हे कृष्णवर्ण, ओल्या जमिनींत राहणाऱ्या, तसेच भुरकट वर्णाचा आणि शुष्क मातीमध्यें राहणाऱ्या सर्पाचा क्रोध मी उतरवतो. हे सर्पा, तुझे मातापिता, बंधु आम्ही जाणतो. तू निर्वीर्य झाला असल्यानें आम्हाला त्रास देऊं शकत नाहीस. विशाल वृक्षांत राहणाऱ्या सर्पाची पुत्री आणि कृष्णवर्णा सर्पिणी सेवा करतात. आपल्या दातांनी दुःख देणाऱ्या या सर्पांचें विष नष्ट होवो. पर्वत आणि विवरांतील सर्प विषहीन होवोत. तुझे विष प्रभावशून्य होवो.

(ह्या सर्व ऋचा म्हणजे महान मंत्र आहे. अनोळखी जागीं प्रवेश करण्यापूर्वीं या ऋचांचा उपयोग केला जातो. विशेषत: अरण्य, जलाशय, गुहा आणि पर्वत यामध्यें प्रवेश करण्यापूर्वी यांचा उपयोग होतो. सर्व स्थळें भीतिशून्य होतात.)

१४ **कृत्यापरिहरणम** (कृत्या नांवाची वाईट कृती करणारी जी व्यक्ति तिचा नाश करणें) हे संपूर्ण सूक्त कृत्याच्या गतीला थांबविणारे आहे. याचा उपयोग जारण-मरण क्रियेंत संरक्षण म्हणून केला जातो.)

सुंदर पंख असलेल्या गरुडानें प्राप्त केलेल्या आणि डुकरानें उकरलेल्या मातीतून जन्म पावलेल्या हे औषधी-वनस्पते, आम्हाला ठार मारण्याची इच्छा करणाऱ्या कृत्येला व पीडाकारक राक्षसांना तूं नष्ट कर. हे देवतांनों, हिंस्रक् अस्त्रें व सुवर्णाच्या मोहानें दुसऱ्याला ठार करण्याची इच्छा करणाऱ्या– लोकांना तूं नष्ट कर. हे औषधे, एका कृत्येकडून दुसऱ्या कृत्येला नष्ट कर. शाप देणाऱ्यालाच शाप त्रास देवो. हे कृत्ये, तुला जरी देवांनीं निर्माण केलें असले तरीं मी इंद्राचा मित्र तुला परत पाठवीत आहे. हे इंद्रा, तूं ज्याप्रमाणें राक्षसांशी युद्ध करून त्याला पळवून लावतोस त्याप्रमाणें या कृत्येला पिटाळून लाव. हे कृत्ये, पुत्र ज्याप्रमाणें आपल्या पित्याकडे जातो त्याप्रमाणें तूं आपल्या

उत्पादकाकडे परत जा. हत्तीण, मृगी, ज्याप्रमाणें फसतात त्याप्रमाणे ही कृत्या फसो. हे द्यौ आणि पृथ्वी, तुम्ही तुमच्या बाणांनीं कृत्येला विद्ध करा.

## १५. रोगोपशमन (रोगाचा परिहार)

या सूक्तांत– ऋतजात ऋतावरि, मधु मे मधुला कुरु। ही अर्धऋचा पुन्हा पुन्हा आली आहे.

यज्ञांतून निर्माण झालेल्या, जलोत्पन्न, ऋतुकालोद्भव औषधे, माझी निंदा करणारे, एक, दहापासून शत अगर सहस्र असोत. सत्यातून निर्माण झालेल्या, सत्यकृती करणाऱ्या औषधे, तूं स्वतः अतिशय मधुर आहेस. मलादेखील तुझ्याप्रमाणें मधुर कृती करणारा कर.

## १६. वृषरोगशमन (वृषभरोग नाहीसे करणें)

एकपासून अकरा बैलांची शक्ती एकवटलेल्या हे शक्तिशाली वृषभा, तूं या गाईपासून शक्तिशाली प्रजा निर्माण कर. अन्यथा तूं निर्वीर्य आहेस असें मानलें जाईल.

(मनुष्याची दहा इंद्रियें एकत्रित आल्यास, मनाच्या सामर्थ्यानें त्यांना अधिक सामर्थ्य प्राप्त होतें. सक्षम आणि बलशाली इंद्रिये आपली प्रजा निर्माण करतात परंतु बाहेरून दिसण्यांत सक्षम असलेली इंद्रियें जर प्रजा उत्पन्न करूं शकली नाहींत तर तीं इंद्रियें धारण करणारा मनुष्य निर्वीर्य आहे असें मानलें जातें.)

## १७. ब्रह्मजाया (ब्राह्मण पत्नी)

सूर्य, वरुण, वायु, चंद्र आणि आपोदेवी ब्रह्मदेवाच्या पूर्वी उत्पन्न झालेल्यांनी ब्रह्माचा अपमान न करण्याबद्दल सांगितलें आहे. सोमाने ब्रह्माला उत्पन्न करणारी गाय दिली. वरुण आणि सूर्य त्यामध्यें सहभागी झाले, अग्नि होता झाला. उल्का ज्या बाजूला पडते या ठिकाणी नाश करते. त्याप्रमाणें ब्रह्मजाया राज्याचा नाश करते. ब्रह्मचर्य हे देवतांचें रूप आहे. एक अंग आहे., देवता ब्रह्मचर्यामध्यें रमतात आणि सर्वत्र

संचार करतात. ज्याप्रमाणें देवांनी सोमाची प्राप्ति केली त्याप्रमाणें वृहस्पतीनें ब्रह्मवृत्तीनें पत्नी प्राप्त केली. स्वर्गांत वास करणाऱ्या सप्त ऋषींनी आणि देवतांनी ब्रह्मजायेबद्दल चर्चा केली– की पळविली गेलेली ब्राह्मण स्त्री स्वर्गांत भयंकर होऊन अन्यांना दुर्गतीला नेते. संसाराची उलथापालथ, गर्भपात, वीरांचें आपापसांत लढणें हे कार्य ब्रह्मजाया करते. ब्राह्मण कन्येचे पालक कितीही असले तरी ब्राह्मण तिचें पाणिग्रहण करतो. या गाईचा स्वामी ब्रह्मा आहे. क्षत्रिय अगर वैश्य नाही. देवांनी, पांचजणांना ही गोष्ट सांगितली व ते गुप्त झाले. राजा मनुष्य आणि देवतांनी सत्याचा अवलंब करून पुन्हा पुन्हा गाईचें दान केलें.

वलकारक अन्नाचा एक भाग ब्रह्मजायेला प्रदान करून कीर्तिवंत परमात्म्याची उपासना करण्यात येते. ज्या राज्यांत ब्राह्मण स्त्रीला त्रास दिला जातो त्या राज्यांत वायकांना सुखानें झोंप लागत नाही. दिव्य वुद्धिमान पुरुषांचा अभाव निर्माण होतो. राजाचे व्यवहार रुद्ध होतात. श्वेताश्व सुद्धा राजाला जय देत नाहीत. त्या राज्यात पुष्करिणी फुलत नाहींत. पद्मकंद निर्माण होत नाहीत. पापवुद्धीनें जो ब्राह्मण रात्री निवास करतो त्या ब्राह्मणाच्या गाई कल्याणकारी होत नाहींत आणि बैलही भारवाहक राहात नाहींत.

## १८. **ब्रह्मगवी** (ब्राह्मणवर्चस्व)

हे राजा, गाईचें मांस खाण्यासाठीं देवांनीं तुला गाय दिलेली नाहीं. अशी इच्छा तूं करूं नकोस (या ठिकाणी 'गौ' याचा अर्थ गाय, विद्वान ब्राह्मण, समृद्ध वाणी, भूमी असाही करण्यांत येतो) आत्म-वंचित आणि असंयमी राजा ब्राह्मण-गाईला भक्षण करील तो उद्यापर्यंत सुद्धा जिवंत राहणार नाहीं. राजा तहानलेली आणि छळ केला गेलेली गाय सर्पिणीप्रमाणें आहे. ब्राह्मणाच्या पदार्थांना भक्ष्य समजणारा विष प्राशन करून आपल्या क्षात्रतेजाला वंचित होतो. भडकलेल्या अग्नीप्रमाणे तो आपले सर्वस्व स्वतःच नष्ट करतो. ब्राह्मणाला मवाळ समजून त्याला नष्ट करण्याची इच्छा करतो तो देवहिंसक आहे. अशा पापी

माणसाच्या हृदयांत इंद्र अग्नि उत्पन्न करतो तर पृथ्वी आणि आकाश त्याचे वैरी होतात. आपल्या शरीराला ज्याप्रमाणें कोणी कष्ट देण्याची इच्छा करीत नाहीं त्याप्रमाणें अग्निरूपी ब्राह्मणाला दुःख देणें उचित नाहीं. सोम ब्राह्मणाचा रक्षणकर्ता असून इंद्र ब्रह्मशापाची पूर्ती करणारा आहे. ब्राह्मणाच्या अन्नाला स्वादिष्ट समजून भक्षण करणारा पापी अनेक आपत्तीमध्यें घेरला जातो आणि त्यातून त्याची सुटका होत नाहीं. ब्राह्मणाची जिव्हा धनुष्याच्या दोरीप्रमाणें, वाणी बाणाच्या दांड्या-प्रमाणें आणि दात तीक्ष्ण टोकाप्रमाणे आहेत. देवांच्या प्रेरणेनें ब्राह्मण देवहिंसकांना विद्ध करतात. ब्राह्मण आपल्या तप आणि क्रोधरूपी बाणांचा वर्षाव करतात आणि दूरच्या शत्रूलाही पराभूत करतात. यज्ञ न करणारे जे राजे पृथ्वीवर राज्य करतात, ब्राह्मण आणि गाईंचे अपहरण करतात ते भ्रष्ट होतात. शेंकडो लोक जे पृथ्वीला कंपायमान करतात ते ब्राह्मणाच्या प्रजेला मारण्यानें हतवल झाले. ब्राह्मण हिंसक विषानें जीर्ण होऊन केवळ अस्थिरूप होऊन जगतात. जो देवबंधू ब्राह्मणाची हत्या करतो त्याला पितृयान मार्गानें लाभणारा लोक मिळत नाहीं. अग्नि आमच्या पायांना उत्तम स्थळीं पोहोचविणारा आहे, सोम आमचा वंश आहे, आमच्या बाजूनें युद्ध करणारा इंद्र आहे. हे प्रजावंतांना माहीत आहे. हे राजा, ब्राह्मणाची वाणी म्हणजे विषामध्यें बुडालेला बाण किंवा सर्पाप्रमाणें भयंकर आहे. त्यांना दुःख देणाऱ्यांना ते या बाणानें नष्ट करतात.

## १९. ब्रह्मगवी (ब्राह्मण वर्चस्व)

संजय वैभवान झाला पण त्यानें भृगूला मारल्यानें त्याला स्वर्ग मिळाला नाहीं. बृहत्सामगायक अंगिरसाला ज्या मनुष्यांनीं संकटात आणलें त्यांना वंशनाशी पुत्र दिला आणि त्यांच्या संततीला दूर फेकलें. ब्राह्मणांकडून कर घेणारे रक्ताच्या नदींत केसांच्या जाळ्यांत अडकले आहेत. ज्या राष्ट्रांत विद्वानांचा अपमान होतो ते राज्य रसातळास जातें. त्या राष्ट्रांत वीर्यवान प्रजा निर्माण होत नाहीं. ब्राह्मणांना ठार मारणें पापकर्म आहे. गाईंचे मांस तहान निर्माण करतें. गाईंचे मांस

खाण्याच्या इच्छेनें गाईचे पालन करून जो तिचें दूध पितो तो आणि त्याचे पितर पापाचे धनी होतात. जो राजा ब्राह्मणांना नष्ट करतो किंवा ज्या राज्यात ब्राह्मण दुःखी राहतात ते राज्य आणि तो राजा नष्ट होतो. ब्राह्मणांना आपत्तीत आणणारा राजा नष्ट होतो. छिद्र पडलेली नाव ज्याप्रमाणें बुडून नाहीशी होते त्याप्रमाणें पाप राजाला बुडविते. ज्या राज्यांत ब्राह्मणांची हिंसा होते त्या राष्ट्राचा नाश होतो. जो कोणी ब्राह्मणाचें धन आपले समजतो त्याला वृक्षदेखील आपल्या छायेत येऊं देत नाहीत. वरुण म्हणतो ब्राह्मणाचें धन हिरावून घेणें विषासमान होय. ही संपत्ती हिरावून घेऊन कोणी फार काळ जिवंत राहणार नाहीं. ज्या आठ हजार पुरुषांमुळें ही पृथ्वी कंपायमान होते त्यांनी ब्राह्मणांची प्रजा नष्ट केल्यानें मिळालेल्या पापाने ते पराभूत झाले. ज्या दोरीला शव बांधले जाते त्या दोरीने ब्राह्मणाला त्रास देणाऱ्यांना देवतांनीं पायदळीं तुडविलें. ब्राह्मणाचें आनंदाश्रूना देवांनीं आपलें म्हटले आहे. जे पाणी मृताला स्नान घालण्यासाठीं असतें ते पाणी पापी लोकांसाठी निश्चित केलें आहे. ब्राह्मणांना दुःख देणाऱ्या राजाच्या राज्यांत सूर्य आणि वरुण वृष्टी करीत नाहींत. त्याची सभा मित्रांना सुद्धा वश करू शकत नाहीं.

## २० शत्रुसेना त्रासनम् (शत्रुसेनेला संत्रस्त करणे)

हे दुन्दुभि, वनस्पतीपासून तुझा जन्म झाल्यामुळें तूं मोठ्यानें आवाज करतेस. तूं बलवानांप्रमाणें मोठी गर्जना करून शत्रूला जिकण्याची इच्छा प्रकट कर. वृक्षाप्रमाणें तुला दीर्घायुष्य आहे. तूं गाईंमध्यें रममाण होणाऱ्या वृषभाप्रमाणें गर्जना करणारी आणि वीरता वाढविणारी आहेस परंतु शत्रु मात्र तुझ्या आवाजानें भयभीत होतात. गाईच्या इच्छेनें गाईंत घुसणारा बैल ज्याप्रमाणें ओळखता येतो त्याप्रमाणें धन जिकून आणण्याच्या इच्छेनें, शत्रूच्या हृदयाला कंप निर्माण होईल असा नाद तूं कर. त्यामुळें शत्रू गांव सोडून निघून जाईल. तुझ्या वाणीनें शत्रू पराजित होऊन त्याचें धन आम्हास प्राप्त होवो. तुझ्या गर्जनेनें जागी झालेली शत्रूची स्त्री युद्धांतील हत्या पाहून, भयभीत होईल आणि आपल्या

पुत्राला घेऊन दूर निघून जाईल. तुझा ध्वनि प्रथम कानावर येतांच शत्रूची सेना नष्ट होऊन पृथ्वीवर सत्याचा अंमल करते. तुझा ध्वनि द्यौ आणि पृथ्वीमध्यें अनेक रूपांनी प्रतीत होतो. त्या स्वरानें तूं सर्वांना सचेतन करतेस. हे दुंदुभि अत्यंत कुशलतापूर्वक वाजविल्यास तुझ्यातून कर्णमधुर शब्ददेखील निघतो. तुझा स्वर ऐकून वीर पुरुष हात उंचावून आपला आनंद व्यक्त करतात. तूं वीरांना आव्हान करणारी, शत्रूचा नाश करणारी आणि इंद्रप्रेमी आहेस. तूं गर्जना करणारी, गावाला जागी करणारी, धनदात्री, लोकांना साहसी करणारी, कल्याणकारी, आणि राजपुरुषांना धन देणारी आहेस. तूं युद्ध जिंकणारी आणि बलवती आहेस. ज्याप्रमाणें अधिषवण काली पर्वत नृत्य करतात त्याप्रमाणें शत्रूच्या धनावर अधिकार करीत तूं नृत्य करतेस. तूं शत्रूला टक्कर देणारी, वाणीला उच्च स्वरांत नेणारी, विद्यवान पुरुषाप्रमाणें शोध घेणारी आणि युद्ध जिंकण्याची इच्छा करणारी आहेस. हे दुंदुभे, तूं आपल्या नादानें पुढें जायला लावणारी, युद्धात विजयी करणारी आणि इंद्ररक्षित असून शत्रूच्या हृदयाला जाळणारी आहेस.

## २१. शत्रुसेनात्रासनम् (शत्रुसेनेला संत्रस्त करणें)

हे दुंदुभे, तूं शत्रूंच्या सैन्यांत परस्पर द्वेष निर्माण कर. त्याच्यामध्यें वैरभाव निर्माण करावा असें आम्हाला वाटतें. तूं त्यांचा तिरस्कार करून नष्ट कर. तूं वनस्पतिनिर्मित, चर्ममंडित आणि मेघाप्रमाणें गंभीर शब्द करणारी आणि शत्रूला त्रास होईल असा नाद करणारी आहेस. शिकारी ज्याप्रमाणें वनमृगांना भयभीत करतो त्याप्रमाणें तूं शत्रूला भयभीत कर. त्याची मनें कंपित कर. शत्रूची सेना दुंदुभी आणि आमच्या प्रत्यंचेच्या नादानें भयभीत होईल आणि पळून जाईल. हे मरुतांनो, सोम, वरुण, महादेव, मृत्यु आणि इंद्राच्या साहाय्यानों शत्रूचा पराभव करा. समान विचाराची, सूर्य चिन्हांकित पताका धारण करणारी देवसेना, आमच्या शत्रूंवर विजय प्राप्त करो. त्यांना आमची ही आहुती सर्मपित होवो.

## २२. तक्मनाशनम् (दुःख व रोगाचा परिहार करणें)

अग्नि, सोम, इंद्र, वरुण, वेदी, र्बाह, आणि समिधा प्रज्वलित होतांच ज्वर रुद्ध होतो आणि शत्रु दूर जातो. हा ज्वर देह नष्ट करणारा, अग्नीप्रमाणें ताप देणारा आणि शरीर फिकें करणारा आहे. तो कठोर व लाल वर्णाचा आहे. त्याला बाजूला करा. मी ज्वराला प्रणाम करतो. त्याला नीच स्थानी जाऊं दे. ज्वराचें प्रमुख स्थान अधिक वीर्य सिंचन करणाऱ्या पुरुषाचें शरीर आहे. सर्पाप्रमाणें माणसाला ज्वर त्रास देतो. हे ज्वरा, तूं या ठिकाणाहून दूर निघून जा. अन्य क्षेत्रांमध्यें तूं निवास कर म्हणजे आम्हाला सुख लाभेल. तूं शीताची साथ करणारा, खोकला वाढविणारा आणि बल क्षीण करणारा आहेस. बल क्षीण करणारा रोग तुझा भाऊ असून खोकला साथी आहे. हे ऋतूंनों, या ज्वराचा नाश करा.

## २३. क्रिमीघ्नम् (जंतुनाश)

द्यौ, पृथ्वी, सरस्वती, इंद्र, आणि अग्नि यांचा वास माझ्या शरीरांत आहे. ते सर्व जंतु नष्ट करतात. ऐश्वर्यवान इंद्र शत्रूरूप जंतूंना नष्ट करतो. नेत्र, नाकपुड्या, दांत, यांमध्यें विविध रूपानें राहाणारे विकट, रक्तवर्ण, तपकिरी रंगाचे, शुंडायुक्त, गृध्र, कोक, तीक्ष्ण भुजा असलेले, काळे, वगैरे प्रकारचे किडे मंत्रबलानें नष्ट होतात. अदृष्ट आणि दृश्य किड्यांना ठार करून सूर्य रोज उगवतो. अत्यंत वेगानें जाणारे कृमि मी मंत्रानें नष्ट करतो. अत्रि, कण्व, अगस्त्य आणि जमदग्नि ह्या ऋषींनी मंत्रशक्तीनें या जंतूना नष्ट केलें. या जंतूंचा राजा, प्रधान, भाऊ, वहीण, माता, पिता, आमच्या मंत्रानें नष्ट होवोत. त्यांची निवासस्थानें नष्ट होवोत, त्यांचे बीज नष्ट होवो. सर्व कृमि नर आणि माद्या अग्नि दग्ध करो.

## २४. ब्रह्मकर्म (सर्वोत्तम क्रिया करणें)

या सूक्तामध्यें एकूण १७ ऋचा असून मानवी जीवनाला

सुखस्पर्श प्राप्त करून देणाऱ्या देवतांना मानवांचें रक्षण व्हावें म्हणून आणि विविध आचारांत साथ लाभावी म्हणून केलेली प्रार्थना आणि समर्पित केलेली आहुती यांचा सर्वोत्तम मिलाप आहे. या ऋचांचा पाठ अनेक ठिकाणी केला जातो. या ऋचा पाठ करण्यास उपयुक्त आहेत.

मरुतः पर्वतानामधिपतयस्ते मावन्तु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

सविता प्रसवानामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

अग्निर्वनस्पतीनामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

द्यावापृथिवी दातॄणामधिपत्नी ते मावताम् ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

वरुणोऽपामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

मित्रावरुणौ वृष्ट्याधिपती तौ मावताम् ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

सोमो वीरुधामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा
वायुरन्तरिक्षस्याधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा
सूर्यश्चक्षुषामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा
चन्द्रमा नक्षत्राणामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोयायामस्यां प्रतिष्ठायामस्यां चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा
इन्द्रो दिवोऽधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा
मरुतां पिता पशूनामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्या चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा
मृत्युः प्रजानामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

यमः पितॄणामधिपतिः स मावतु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

पितरः परे ते मावन्तु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

तता अवरे ते मावन्तु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

ततस्ततामहास्ते मावन्तु ।
अस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् कर्मण्यस्यां पुरोधायामस्यां प्रतिष्ठायामस्यां
चित्त्यामस्यामाकूत्यामस्यामाशिष्यस्यां देवहूत्यां स्वाहा

१. मरुत्– पर्वतांचे अधिपति आहेत.
२. अग्नि– सर्व लहान-थोर वनस्पतींचा अधिपति आहे.
३. द्यौ आणि पृथ्वी– दातृत्ववान लोकांचे अधिपति आहेत.
४. वरुण– पाण्याचा अधिपति आहे.
५. मित्रावरुणौ– पर्जन्यवृष्टीचे अधिपति आहेत.
६. सविता– सर्व निर्माण झालेल्या वस्तूंचा अधिपति आहे.
७. सोम– लतादि औषधींचा अधिपति आहे.
८. वायु– अंतरीक्षाचा अधिपति आहे.
९. सूर्य– नेत्रांचा अधिपति आहे.
१०. चंद्र– नक्षत्रांचा अधिपति आहे.
११. इंद्र– देवांचा अधिपति आहे.
१२. मरुत्पिता– पशूंचा अधिपति आहे.
१३. मृत्यु – प्रजेचा अधिपति आहे.
१४. यम – पितरांचा अधिपति आहे.

१५. सात पिढ्यांच्या मागील पितर
१६. यांच्या शिवाय राहिलेले सर्व पितर
१७. मृत – फार लांबचे पितर

हे माझे रक्षण करोत. त्याचप्रमाणें ब्रह्मप्राप्तीकरितां करावयाच्या वेदोक्त कर्मामध्यें संकल्पानुरूप केलेल्या आणि करावयाच्या कर्मामध्यें, प्रतिष्ठा निर्माण करणाऱ्या कर्मामध्यें, ज्ञान संपादन कर्मामध्यें, इच्छापूर्तीसाठीं, श्रेष्ठांचे आशीर्वाद प्राप्त होण्यासाठी आमचे नेहमी रक्षण करोत. त्यांना माझी ही आहुती समर्पित होवो.

## २५. **गर्भाधानम्** (गर्भप्रतिष्ठा)

पर्वतावर निर्माण होणाऱ्या औषधी, स्वर्गातील पुण्य आणि शरीर सामर्थ्य यांच्यामुळे पुष्ट वीर्य धारण करणारा पुरुष, जलामध्यें ज्याप्रमाणें पर्ण जन्म घेतात, त्याप्रमाणें गर्भ-प्रतिष्ठा करतो. सर्व भूतमात्रांचा गर्भ पृथ्वी धारण करते. त्याप्रमाणें समर्थ पुरुषाचा पुष्ट गर्भ स्त्री धारण करते. मित्रावरुण, बृहस्पती, इंद्र, अग्नि आणि ब्रह्मदेव गर्भाचें पोषण करोत. त्वष्टा त्याला रूप देवो, प्रजापति त्याला वीर्य देवोत, विष्णु जननेंद्रिय समर्थ करो. धाता, वरुण, सरस्वती, इंद्र यांना गर्भकरणाचें ज्ञान आहे. ज्यामुळें गर्भ धारण केला जाईल अशा रसांचें पान करावें. हे अग्ने, तूं हा गर्भ पुष्ट कर. वृष्ण्यावान, तूं वर्षक आहेस. या गर्भाला वीर्यवान कर. हे सान्त्वनामयी स्त्रिये, मी तुझ्यामध्यें गर्भ प्रस्थापित करतो. सोमप देवांनी इहपर माझें रक्षण करणारा पुत्र प्रदान करावा. धाता, त्वष्टा, सविता आणि प्रजापति या नारीच्या उदरी असणाऱ्या श्रेष्ठ पुत्राला दहाव्या महिन्यांत जन्म देवोत.

## २६. **नवशालायां घृतहोम :** (नवीन घरांत होम करून घृताहुती देणें)

यजुर्मंत्र आणि समिधा ज्ञानवान अग्नीच्या योगें यज्ञांत एकत्र येवोत. त्यांत सामील होणाऱ्या सूर्याला ही आहुती समर्पित होवो. हे उक्थरसा, या यज्ञांत सामील होणाऱ्या इंद्राला ही आहुती समर्पित होवो. हे श्रेष्ठ मनुष्या, आपल्या पत्नीसह या यज्ञाचें कर्म आचरण कर. माता

ज्याप्रमाणें आपल्या पुत्राचे पालन करतें त्याप्रमाणें मरुद्गण छंदाचें पालन करोत. त्यांना ही आहुती समर्पित होवो. कुशादिकांनी यज्ञ-वर्धन करणाऱ्या देवमाता अदितीला ही आहुती मिळो. महान तपांनी लाभलेल्या भगवान विष्णूला ही आहुती समर्पित होवो. अमोघ आशी-र्वाद देणाऱ्या भग देवतेला ही आहुती मिळो. जलामध्यें एकरूप होणाऱ्या सोमाला, वीर्यवान इंद्राला, मंत्रांनीं यज्ञ संपन्न करणाऱ्या बृहस्पतीला यज्ञवृद्धि करणाऱ्या अश्विनीकुमारांना आमच्या आहुती समर्पित होवोत. त्यायोगें यजमानाचें सर्व प्रकारें कल्याण होईल.

## २७. अग्नि (अग्नि)

हा अग्नि वीर्यतेजयुक्त, समिधांनी प्रदीप्त होणारा, सूर्याप्रमाणें सुंदर, यज्ञसाथी, देवतांमध्यें श्रेष्ठ, मधुघृतानें तृप्त होणारा, निर्दोष कर्म करणारा, संसारी लोकांना श्रेष्ठ वाटणारा, हवि आणि स्तुती स्वीकारणारा, देवतांच्या सान्निध्यांत असणारा, यज्ञाचा महिमा वाढ-विणारा, हर्षोत्पादक, यज्ञतारक, धनपोषक, यजमानांच्या व्रताचें रक्षण करणारा, गतिवान्, ऐश्वर्यवान, आहुती स्वीकारणारा, यज्ञसंपादक, आश्रय देणारा, सर्वांकडून प्रशंसा करण्यास योग्य, यजमानाचे कल्याण करणारा आणि दीप्तिमान आहे. पृथ्वी, अग्नि आणि सरस्वती यांची स्तुती केली जावी. त्वष्टा आम्हाला जल, अन्न, धन, प्रदान करो. आमचा हवि देवतांना रुचिर वाटो. हे अग्ने, इंद्रासाठी हा यज्ञ संपन्न कर. सर्व देवता आमचा हवि स्वीकारोत.

## २८. दीर्घायु:(प्रदीर्घ आयुष्य प्राप्ति)

शतायु होण्यासाठी नऊ प्राण (पांच प्राण आणि धनंजयाशिवाय अन्य चार प्राण) सुवर्ण, रौप्य आणि लोह या तिघांची उष्णता, यांचे एकत्रीकरण आवश्यक असते त्याचप्रमाणे तीन प्रकारच्या कर्मांनीं अग्नि चंद्र, सूर्य, पृथ्वी, जल, आकाश, अंतरीक्ष, सर्व दिशा, आणि सर्व ऋतु यांना आपलेसें करावें लागतें. पूषा, घृत आणि दूध कर्माची शुद्धी करतात. अन्न, पुरुष आणि पशु यांचा आश्रय करावा लागतो. हे आदित्या या बालकाला धनपूर्ण कर. हे अग्ने तू याची वृद्धी कर. इंद्रा तू याला वीर्य-

युक्त कर, सुवर्णमय पृथ्वी या बालकाची रक्षक होवो. विश्वपोषक अग्नि आणि जल त्याला बलसंपन्न करो. सुवर्णाचा जन्म तीन प्रकारे झाला. एक अग्नीतून, सोमापासून आणि जलापासून महर्षी कश्यप आणि जमदग्नि यांना ज्या बाल, तरुण आणि वृद्ध अशा तीन अवस्थामुळें दीर्घायु प्राप्त झालें ते हे बालका तुलाही मिळो. त्रिरूप पाप नाहींसे करून अमृतमय अवस्थेंत मृत्यु नष्ट होतो. आकाशांत सुवर्ण, अंतरीक्षांत चांदी आणि पृथ्वीवर लोह या बालकाचें रक्षण करतात. चारही बाजूंनीं या बालकाचे रक्षण करणाऱ्या देवता शत्रूपेक्षां या बालकाला सबल करोत. ज्या देवतेंनें अमृताला बद्ध केलें तिला माझा नमस्कार असो. अर्यमा, पूषा आणि बृहस्पति तुला बद्ध करोत. हे ब्रह्मचारी, आयु व तेज यांच्या प्राप्तीसाठीं मी तुला ऋतु, महिने, संवत्सर यांच्या तेजानें सूर्याप्रमाणें करतो. घृताप्रमाणें निरोगी, मधाप्रमाणें गोड आणि पृथ्वी-प्रमाणें दृढ होऊन, शत्रूला बाजूला करून महान ऐश्वर्यवान हो.

## २९. **रक्षोघ्नम्** (राक्षसांना ठार मारणें)

सर्व कर्मांचा साक्षी असलेल्या अग्ने, तूं भारवाहक, औषधी उत्पन्न करणारा असून तुझ्यापासून आम्हाला गाई, अश्व आणि मनुष्य यांचे आरोग्य संपादन करतां येतें. हे अग्ने, आमचें अन्न खाणाऱ्या पिशाच्च आणि राक्षस यांचे डोळे फोडून टाक. हृदय, जीभ आणि दांत तोडून त्यांचा नाश कर. पिशाच्चांनीं ज्या प्राण्यांच्या मासाचे लचके तोडले आहेत ते त्यांना परत दे. मंत्रशक्तीनें मी या शरीरांत पुन्हा प्राणांचा संचार करतो. पिशाच्चांनीं तयार केलेल्या अन्न जलपान, यात्रा, शयन, दिवस, रात्र, यांनी आमचा नाश करण्याचा विचार केला.

हे अग्ने, मांस आणि रक्त भक्षण करणाऱ्याना तू नष्ट कर. इंद्र आपल्या वज्रानें या पिशाच्चाची मस्तकें तोडून टाको. हे अग्ने तूं राक्षसांचा नेहमी पराजय करतोस त्यांना तूं तुझ्या अस्त्रानं नष्ट कर. ज्यांचें ज्ञान आणि शरीर-सामर्थ्य नष्ट झालें आहें ते तूं त्यांना परत दे. या सोमाने त्यांना पुष्टांग कर आणि रोगशून्य कर. समिधांमुळे पिशाच्चें नष्ट होतात. तृषा शांत होते त्या समिधा तुला आम्ही अर्पण करतो.

## ३०. दीर्घायुष्यम् (दीर्घ आयुष्यलाभ)

हे पुरुषा, आपल्या पितरांकडे न जातां तूं याच ठिकाणीं राहा. तुला मंत्रशक्तीनें मी सर्व अभिचार कृत्यापासून मुक्त करतो. तूं ज्याला शाप दिला असशील त्याला मुक्त कर. माता-पित्यांच्या पापामुळे तुला काहीं आजार झाला असेल तो या मंत्रमायेनें नाहीसा होईल. तूं या औषधीचें सेवन कर म्हणजे तूं वृद्धत्वापर्यंत जगशील. तूं यमदूतांच्या मागून जाऊ नकोस. सूर्य उदयाचें तुला ज्ञान आहे. उत्तरायण आणि दक्षिणायन यामध्यें तुझे जीवन व्यतीत होवो. तूं भयाचा त्याग कर. तुझ्या शरीरांतील यक्ष्मादि रोग आतां दूर झाले आहेत. तुझ्या प्राणांचे रक्षण करणारे ऋषी जागृत आहेत. अग्नि तुझ्याजवळ राहातो. सूर्य तुझ्यासाठीं उदय पावतो. तूं मृत्युरूपी अंधःकारातून बाहेर पड. मृत्यु, पितर, यम, अग्नि, यांना नमस्कार असो. हे माणसाचे मंगल करतात. मनुष्याला प्राण, मन, नेत्र, प्राप्त होऊन तो सामर्थ्यवान होवो. हे अग्ने या पुरुषाला तूं अमृतमय कर. या लोकांतून तो न जावो. स्मशान त्याचें घर न होवो. त्याच्या प्राणाचा क्षय न होवो. सूर्य तुला मृत्युशय्येपासून दूर करील. तुला क्षयरोगापासून मुक्त करील. मृत्यूसाठीच तुझा जन्म आहे. मृत्युलोक देवतांना सुद्धां प्रिय आहे. वृद्धावस्थेपर्यंत तूं मृत्यूकडे जाऊं नकोस.

## ३१. कृत्यापरिहरणम् (कृत्येचा पराभव)

ज्या कृत्येनें तांदूळ, जव, गहू, तीळ वगैरे पदार्थ कोंबड्याच्या मांसाबरोबर मातीच्या भांड्यांत शिजवून अभिचार करण्याचे ठरविलें त्या कृत्येला मी परत पाठविलें. तूं झाड किंवा बकऱ्यावर अभिचार कर्म केलेस तर ते तुझ्याकडे परत येईल. तू एक खूर. दोन दांत असलेल्या गाढवावर, शेतावर, यज्ञशालेवर, सभागृह आणि सभा, सेना, शस्त्रें, विहीर, पुरुषाची हाडे, अग्नि यांवर अभिचार कृत्य केलेस तर ते तुझ्याकडेच परत येईल. जी कृत्या, आमची बोटें, पाय, यांच्यावर छपून अभिचार कर्म करण्याची इच्छा करते त्या कृत्येला इंद्र नष्ट करतो आणि अग्नि आपल्या ज्वालांनीं जाळून टाकतो.



# षष्ठ काण्ड

## १. अमृत प्रदाता (अमृतदाता)

दानगुणांनीं संपन्न, सर्वांच्या आधी उत्पन्न झालेला, समुद्रातून उदय होतांना दिसणारा, तरुण, रात्रीच्या अंधकाराला नाहीसा करणारा, मधुर वाणीनें बोलणारा, आमचे हवि स्वीकारणारा सविता अमरत्व प्रदान करणारा आहे. अथर्वा ऋषीचा पुत्र दध्यङ्, बृहद्साम गायनानें स्तुती करो. बृहत् आणि रथंतर साम गायनाची स्फूर्ति स्तोत्यांना लाभो.

## २. जेता इंद्रः (विजयी इंद्र)

हे ऋत्विजांनों, सोमप वज्रधारी, शत्रुमर्दक, युवा, विश्वस्वामी आणि जयवान इंद्रासाठीं तुम्ही सोमरस तयार करा. पक्षी ज्याप्रमाणें आपल्या निवासाकडे जातात त्याप्रमाणें हा तयार केलेला सोम इंद्राच्या उदररूपी निवासाकडे जातो. हे इंद्रा, सोमानें प्रसन्न होऊन तूं शत्रूवर विजय मिळव आणि यजमानाच्या कामना पुऱ्या कर.

## ३. आत्मगोपनम् (आत्मरक्षण)

हे इंद्र, पूषन्, देवमाता अदिती, अपान्पात अग्नि, एकूणपन्नास मरुद्गण, सप्त समुद्र, आकाश, विष्णु, इच्छित फल देणारी पृथ्वी, उत्पन्न झालेला सोम, मंत्रस्वामिनी सरस्वती, आवाहनीय अग्नि, सुखद

सूर्यकिरण, रात्र, दिवस, दानादि गुणांनी संपन्न असलेले अश्विनीकुमार आणि त्वष्टा आमची वृद्धी करून आमचें रक्षण करोत.

४. **आत्मगोपनम्** (आत्मरक्षण)

त्वष्टा, पर्जन्य, बृहस्पति, आपल्या पुत्रपौत्रादिकांसहित देवी अदिति, भग, वरुण, मित्र, अर्यमा, व मरुद्गण ज्या शत्रूपासून आम्हीं संरक्षणाची इच्छा करतो, त्या आमच्या शत्रूला दूर घालवून लावोत आणि त्याचें अनिष्ट कर्म आमच्याकडे न आणोत. गतिमान वायु, अश्विनीकुमार, पितारूपी द्युलोक, पापकर्म करणाऱ्यांना आमच्यापासून दूर ठेवून आमचें रक्षण करोत.

५. **वर्चः प्राप्तिः** (उत्तम पदाचा लाभ)

हे अग्ने, घृताहुतीच्या दानानें तुला आवाहन केलें जातें. तूं यजमानाला उत्तम पदाची प्राप्ती, कांतिमान देह आणि संतानयुक्त कर. हे इंद्रा, यजमानाची वृद्धी कर. तुझ्या कृपेनें तो सर्वांवर नियंत्रण ठेवूं शकेल. त्याला धनसमृद्ध करून वृद्धत्वापर्यंत आयुष्य प्रदान कर. ज्या यजमानाच्या घरीं आम्ही यज्ञ करतो त्याला सोम प्राप्त होवो आणि ब्रह्मणस्पति त्याला आपला म्हणो.

६. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

हे ब्रह्मणस्पते, देवतांचीं भक्ती न करणारा शत्रु वधयोग्य असेल तर सोम प्रदान करणाऱ्या यजमानाला तो वश होवो. हे सोम, वाईट विचार करणारा शत्रु आमच्या चांगल्या विचारांचा तिरस्कार करीत असेल तर तूं त्याच्या मस्तकावर प्रहार कर आणि तें छिन्नविच्छिन्न कर. जो आमच्या नाशाची इच्छा करतो, किंवा जो आम्हाला त्रास देतो त्यावर द्युलोकातून दगड फेकून त्याचा नाश कर.

७. **असुरक्षयणम्** (असुरांचा नाश करणें)

हे सोमा, ज्या देवयान मार्गामध्यें, अद्वेष्टी आणि कृपावंत मित्रादि वारा आदित्य, देवमाता अदितीसहित संचार करतात त्या मार्गातून कल्याणमय होऊन तूं ये. ज्या बलानें तूं राक्षसांना वश करतोस तें

बल आम्हाला दे. हे देवतांनों, ज्या युक्तीनें राक्षसांचे बल तुम्ही नाहींसे करून त्यांना आपल्या ताब्यांत ठेवतो ती युक्ती आम्हाला देऊन सुखी करा.

८. **कामात्मा** (कामनापूर्ती)

हे स्त्रिये, वेल ज्याप्रमाणें वृक्षाला बिलगते त्याप्रमाणें तूं मला बिलगून रहा. गरुड ज्याप्रमाणें आपल्या पंखांच्या साहाय्यानें पृथ्वीला आपलेसें करतो त्या प्रमाणें माझी झालेल्या तूं अन्यत्र जाऊ नकोस. आकाश, पृथ्वी आणि स्वर्ग यांना सूर्य ज्याप्रमाणें आपल्या प्रभावानें व्याप्त करतो त्याप्रमाणें तुझें मन माझ्या कामनेनें व्यापून टाकतो. (हा वशीकरण मंत्र आहे. या मंत्राचा उपयोग, स्त्री, गाय, हरिणी वगैरे आपल्या अंकित राहण्यासाठीं केला जातो.)

९. **कामात्मा** (कामनापूर्ति)

हे स्त्रिये, तूं तुझ्या ठिकाणीं गर्भ स्थापन करणाऱ्या पुरुषाची इच्छा करतेस. तूं माझे शरीर, पाय, नेत्र, आणि जघन यांची इच्छा कर. तुझे लांब केस व सुंदर नेत्र मला विकारयुक्त करतात. माझ्या इच्छेप्रमाणें तूं प्रसन्नपणें माझ्या बाहुपाशांत बद्ध हो. ज्या स्त्रियांचें अंग मृदुल आणि हृदय पुरुषाला वश होणारें आहे त्या स्त्रियेला दूध-तूप देऊन समृद्ध करणाऱ्या गाई माझ्याजवळ आहेत. (स्वस्त्री वशीकरणा-साठीं या मंत्राचा उपयोग केला जात असे.)

१०. **संप्रोक्षणम्** (दानानें संतुष्ट करणें. दानाचा वर्षाव करणें)

पृथ्वी, शब्द ऐकण्याची शक्ती असलेल्या, पृथ्वीवर असलेल्या वृक्षांच्या देवता, पृथ्वीस्वामी अग्नि, वायुरूप प्राण, अंतरीक्ष, पक्षी, आकाश, नेत्र, नक्षत्र, आणि द्युलोक स्वामी सूर्य यांना आमच्या या आहुती सर्मपित होवोत.

११. **पुंसवन** (पुरुषबीजाचें संजीवन करणें)

शमीवृक्षापासून अग्निरूपी पुत्र उत्पन्न करण्यासाठीं अश्वत्थ वृक्षाचे मंथन केलें जातें. पुत्रोत्पत्तीसाठीं स्त्रीमध्यें वीर्यस्थापना ज्या

कर्मानें केली जाते, पिंपळाला ज्या क्रियेनें पुरुष संतती लाभते त्याला पुंसवन कर्मानें पुरुषबीज प्राप्त करणें आवश्यक आहे. पुरुषबीज गर्भाशयांत खेचलें जातें आणि त्यांतून पुरुष संतती होते. ब्रह्मदेवानें पुरुष संततीचा हा उपाय कथन केला आहे. अमावास्येची देवता सिनीवाली, पौर्णिमेची देवता अनुमति आणि प्रजापती यांनी गर्भांत स्थापित झालेल्या बीजाला सर्व अवयव प्रदान केले.

## १२. **सर्पविष निवारणम्** (सर्पविषाचें निवारण करणें)

अंतरीक्ष व्यापणाऱ्या सूर्याप्रमाणें किंवा रात्र व्याप्त करणाऱ्या अंधकाराप्रमाणें मनुष्य सर्पविषानें व्याप्त होतो. ते विष मी या औषधीनें नष्ट करतो. इंद्रादि देव, अगस्त्य– वशिष्ठादि ऋषींना ज्ञात असलेली ही औषधी मंत्रानें ब्राह्मणांना प्राप्त होते. भूत, भविष्य आणि वर्तमानकालीन देहगत सर्पविष मी नष्ट करतो. गंगादि नद्या, लहान मोठे पर्वत आणि परुष्णी नदी शरीरांत स्वास्थ्य निर्माण करतात. विषहरण करणारे अमृत संपूर्ण देहावर मी शिंपडतो. हे विषनाशक मधुर जल तुझ्या हृदयाला सुख प्रदान करील.

## १३. **मृत्युंजय** (मृत्यूवर विजय मिळविणें)

ही मृत्यूची एक उत्तम प्रार्थना आहे. अतीव रोग वेदना या प्रार्थनेनें शमतात. शस्त्रांच्या तीव्र जखमा सुसह्य होऊन लवकर बऱ्या होतात.

**नमो देववधेभ्यो नमो राजवधेभ्यः । अथो ये विश्यानां वधास्तेभ्यो मृत्यो नमोऽस्तु ते**
**नमस्ते अधिवाकाय परावाकाय ते नमः । सुमत्यै मृत्यो ते नमो दुर्मत्यै त इदं नमः**
**नमस्ते यातुधानेभ्यो नमस्ते भेषजेभ्यः । नमस्ते मृत्यो मूलेभ्यो ब्राह्मणेभ्य इदं नमः**

इंद्रादि देवांचा वध करणाऱ्या, क्षत्रिय आणि वैश्य यांचा वध करणाऱ्या मृत्युदेवतेला माझा नमस्कार असो. हे मृत्यो, तुझ्या बोलण्याला आणि कृतीला नमस्कार असो. तुझी कृपा आणि निग्रह, यांना वंदन असो. रक्षण करणारी औषधी, पीडा देणारे राक्षस आणि

वेदवेत्त्यानां शाप देणे किंवा कृपा करण्याचें सामर्थ्य असणाऱ्या ब्राह्मणांना माझा नमस्कार असो.

**१४. बलासनाशम्** (बलाचा नाश होणें, थांबविणें)

हाडांना कंपित करणारा, सांधे वेदनायुक्त करणारा, बलक्षय-कारक, कंप निर्माण करणारा रोग, सरोवरांतून कमळ ज्याप्रमाणें तोडून काढलें जातें त्याप्रमाणें हा रोग मी मंत्रांनीं जखडून टाकतो. काकडी ज्याप्रमाणें देठापासून निराळी होते त्याप्रमाणें हा रोग आपोआप नष्ट होतो. गेलेला काळ ज्याप्रमाणें परत येत नाहीं, मृग ज्याप्रमाणें दूर पळत जातो त्याप्रमाणे वेगानें गेलेला रोग परत येणार नाहीं.

**१५. शत्रुनिवारणम्** (शत्रूपासून निवारण करणे)

सोमापासून निर्माण झालेला पलाश (पळस) श्रेष्ठ औषधी आहे. आम्हाला क्षीण करणारा शत्रू त्याच्या कृपेनें क्षीण होईल. आमचा जवळचा अगर लांबचा जो शत्रू आमचें बल क्षीण करण्याची इच्छा धरतो, त्यांच्यापेक्षां आम्ही श्रेष्ठ होऊं.

**१६. अक्षिरोगभैषजम्** (नेत्रावरील औषध)

रोग नष्ट करण्यासाठीं करम्भ भक्षण केला जातो. विहल्हो हा याचा पिता असून मदावती ही माता आहे. तौविलिक नामक पिशाच्ची या रोगाला कारण आहे. हे पिशाच्ची आमच्या रोगाला पराभूत करून तूंहीं निघून जा. ऐलब, बभ्रू आणि निराल नामक नेत्ररोग या शरीरां-तून निघून जावोत. अलसलसाला, पूर्वा, शलांजालाला उत्तरा आणि निलागलसाला या औषधींना दोहोंच्यामधील स्थान प्राप्त होतें.

**१७. गर्भदृंहणम्** (गर्भ विकसित होणें)

ही विशाल पृथ्वी सर्व वस्तूंचा गर्भ धारण करते त्याप्रमाणे हे स्त्रिये प्रसवकालपर्यंत तूं हा गर्भ धारण कर. ही प्रदीर्घ पृथ्वी ज्याप्रमाणें वृक्ष आणि पर्वतांना धारण करते किंवा चराचर वस्तूला धारण करते त्याप्रमाणें प्रसवकालपर्यंत सर्व अवयवयुक्त गर्भ तूं धारण कर.

## १८. ईर्षाविनाशनम् (मत्सराचा नाश करणें)

हे मत्सरी पुरुषा, तुझा मत्सर आणि राग यांना मी तुझ्यापासून दूर करतो. पृथ्वी ज्याप्रमाणें कोणाचा मत्सर न करतां शान्त राहाते त्याप्रमाणें मत्सरी पुरुषाची ईर्षा आणि क्रोध नाहीसा होऊन तो शांत होवो.

## १९ पावमानम् (पवित्रीकरण)

देवता मला पवित्र करोत. मनुष्यकर्म आणि बुद्धी पवित्र करोत. अंतरीक्षांत संचार करणारा वायु आणि गाळून तयार केलेला सोम, वललाभ, कर्मफललाभ आणि अहिंसक आचारासाठीं मला पवित्र करोत. सवितृदेव सर्वांना प्रेरणा देणारा, या लोकीं आणि परलोकीं सुख प्रदान करणारा असल्यानें तो आम्हास पावन करो.

## २०. यक्ष्मनाशनम् (क्षयनाश)

दावाग्नीप्रमाणें अंग भाजून काढणारा आणि माणसाला आयुष्य नको करणारा ज्वर आमच्यापासून दूर जाऊन दुराचारी लोकांना ग्रासो. ज्वराभिमानी देवतेला नमस्कार असो. रुद्र, ज्वर, वरुण, आकाश, पृथ्वी आणि पृथ्वीवर उत्पन्न होणाऱ्या औषधींना माझा नमस्कार असो. सर्वांग व्यापणाऱ्या, रक्त दूषित करणाऱ्या आणि पांढरेपण आणणाऱ्या ज्वराला आमचा नमस्कार असो.

## २१. केशवर्धनी औषधी (केंसांची वाढ करणारी औषधी)

तीनही लोकांत, ऐहिक फल देणारी, स्वर्गादि फलांचे साधन आणि यज्ञादि कर्मांचे कारण म्हणून पृथ्वी श्रेष्ठ होय. या पृथ्वीच्या त्वचारूपी भूमीमध्यें ज्या औषधी उत्पन्न होतात त्या उपयुक्त आहेत. हे औषधी, तूं सर्व औषधी व वेली यांमध्यें श्रेष्ठ आहेस. सर्व ऐश्वर्यामध्यें सोम, रात्रीच्या वेळी चन्द्र आणि देवतांमध्यें वरुण ज्याप्रमाणें श्रेष्ठ आहेत त्याप्रमाणें निरोगी, कोणत्याही उपायानें नाहीशी न होणारी ही वनस्पती माझ्या केशकलापांची वाढ करो.

**२२. भैषज्यम्** (औषधीय–निरोगीकरण)

अंतरीक्षांत संचार करणाऱ्या नक्षत्रांबरोबर सूर्याचे किरणदेखील पृथ्वीवरील रस सूर्यमंडळात नेतात आणि वृष्टिरूपानें त्या रसांनीं पृथ्वीला भिजवून टाकतात. सुवर्णभूषणें धारण केलेला मरुद्, आपल्या गतिस्पर्शानें पाणी आणि औषधींचें ज्या प्रदेशांत वृष्टी करतो तेथील प्रजेचे बलसंपन्न आणि सुबुद्धीनें पोषण करतो. सर्व धान्यें आणि उताराकडे धावणाऱ्या नद्यांना तृप्त करण्यासाठीं मेघांना प्रेरित करतो. मेघ आपल्या गर्जनेनें सर्वांना कंपित करतात. पतीबरोबर संभाषण करणारी स्त्री ज्याप्रमाणें पतीला अन्न देते त्याप्रमाणें आपल्या वाणीनें कंपित करणारे मेघ अन्न देतात.

**२३. अपां भैषज्यम्** (पाण्यापासून निरोगीकरण)

उत्तम कर्म करणारा, संसाराच्या रक्षणार्थ पाण्याच्या प्रवाहाचें आवाहन करतो. हे प्रवाहित जल पापापासून आमचें रक्षण करून उत्तम फल प्रदान करतें. सूर्याच्या प्रेरणेनें सर्व मनुष्यें वैदिक कर्माचा आचार करोत. औषधींना पुष्ट करणारें पाणी आमचें कल्याण करो.

**२४. अपां भैषज्यम्** (पाण्यापासून निरोगीकरण)

हिमालयांतून प्रवाहित होऊन नदीच्या रूपानें समुद्राला मिळणारें पाणी, माझ्या हृदयाचा दाह नाहीसा करणाऱ्या औषधी मला प्रदान करतें. नेत्र, पाठ आणि पाय यांचा दाह या पाण्यानें शमतो. रोग नाहीसा करणाऱ्या या औषधी महान आहेत. हे नद्यांनों समुद्र पति आहे. तुमच्या सामर्थ्यानें आम्हाला मिळालेल्या औषधी आम्हाला अन्न आणि बल प्रदान करतात.

**२५. मन्याविनाशनम्** (विकृतिनाश)

गळ्यांतील पंचावन्न, कंठातील सत्त्याहत्तर आणि स्कंधप्रदेशांतील नव्याण्णव सूक्ष्म नाड्यांतील क्षयदोष नाहींसा होवो.

**२६. पाप्मपाशनम्** (पापी पुरुषाचा अगर वृत्तीचा नाश करणें)

हे देवते, पापापासून माझें रक्षण कर आणि मला सुखी कर.

माझ्या पुण्यानें लाभणारा स्वर्ग मला मिळूं दे. तूं मला मुक्त केलें नाहीस तर माझ्या कर्मानुष्ठानानें मी तुला नाहीसे करून माझा मार्ग मोकळा करीन. तूं माझ्या शत्रूच्या शरीरांत तत्पूर्वी प्रवेश कर. आम्ही ज्यांचा द्वेष करतो, त्याच्याकडे हे बलवान पाप जावो आणि त्याचा नाश करो.

**२७. अरिष्टक्षयणम्** (अरिष्ट कमी करणें)

(कपोत– कबुतर हा पक्षी घुवडाप्रमाणेंच अरिष्ट निर्माण करणारा आहे. हें अरिष्ट नष्ट व्हावें म्हणून ही प्रार्थना आहे.)

हे देवतानों, कबुतर पापदेवतेचा दूत असून आम्हाला दुःख देत आहे. त्याचें निवारण व्हावें म्हणून आम्ही तुझी पूजा करतो. आमचे द्विपाद आणि चतुष्पाद प्राणी सुखी होवोत. यासाठी हे अग्ने आमच्या आहुती तूं स्वीकार. त्या कबुतराचे पंख रूपी हत्यार आमची हत्या न करो. आम्हाला ताप न देवो. आमच्या गाई आणि अन्य पुरुषांना सुख लाभो.

**२८. अरिष्टक्षयणम्** (अरिष्ट कमी करणें)

हे कबुतर आमच्या घरापासून दूर जावो. त्याच्या पायांनीं आमचें अन्न अपवित्र न करतां तें दूर जावो. या कबुतराच्या प्रवेशाने निर्माण होणारा द्वेष नाहीसा करण्यासाठीं ऋत्विज अग्नि प्रदीप्त करोत. यामुळें कोणीही हिंसक पुरुष आम्हाला त्रास देणार नाहीं. यम, पशु, पक्षी आणि मानव यांचा स्वामी आहे. या कबुतराला आज अगर उद्यां तो मृत्यु प्रदान करील. त्या यमराजाला आमचा नमस्कार असो.

**२९. अरिष्टक्षयणम्** (अरिष्ट कमी करणें)

पंख हें आयुध असलेलें कबुतर आणि घुबड निर्वीर्य होवोत. हे पाप देवते, तूं पाठविलेल्या या अशुभ पक्ष्यांना या घरांत आश्रय मिळाला नाही. कारण त्यांचे आगमन हे अशुभ चिन्ह होय. हे यमा, तुझ्यापुढे सर्व प्राणी ज्याप्रमाणें निर्वीर्य होतात त्याप्रमाणें आमच्यापुढें सुद्धा हे दोन पक्षी निर्वीर्य होवोत.

**३०. पापनाशनम्** (पापाचा नाश करणें)

मधुर रसयुक्त यव देवतांनी सरस्वती नदीच्या तीरावरील मनु-

ष्यांना दिले. इंद्रानें शेत नांगरलें. मरुद्गण शेतकरी झाले. हे शमी, तूं केशवर्धक आहेस. अगणित शाखांनी तुझी वृद्धि होते. मी तुला तोडणार नाहीं. तूं पावसाच्या पाण्याशिवाय वाढणारी वनस्पती आहेस. माता ज्याप्रमाणें पुत्राला सुख देते त्याप्रमाणें तूं आमचे केस आम्हाला सुखकारक होतील असें कर.

३१. ही पृथ्वी, सूर्यरूपी मातेच्या समोर परिक्रमा करतें. ती आपल्या अस्तित्वाने स्वर्ग आणि अंतरीक्ष यांना व्यापून टाकते. सूर्य तिला पर्जन्यानें तृप्त करतो. हा सूर्य सर्व प्राणिमात्रांच्या देहांत आपल्या प्रकाशानें स्थित असतो. तो स्वर्ग किंवा त्यावरील लोकांनासुद्धां आपल्या किरणांनीं प्रकाशित करतो. रात्रंदिवस हा सूर्य प्रकाशित राहतो. वेदराणी सूर्याच्या आश्रयानें राहते. (आयं गौः पृश्निरक्रमीदसदन्मातरं पुरः)

(पृथ्वी प्रदक्षिणा करते आणि सूर्याचा उदय किंवा अस्त होत नाहीं. तो नेहमी प्रकाश देत असतो. पर्जन्याचें कारण देखील तोच आहे हे आधुनिक समजलें जाणारें विज्ञान वेदप्रणीत आहे.)

३२. **यातुधानक्षयणम्** (यातुधान म्हणजे राक्षस परंतु या ठिकाणी मानवांना त्रास देणारे किडे किंवा जंतु असा आशय आहे. हवनाच्या वेळीं घृताच्या आहुतीनें हे जंतु नाहीसे होतात. हे वेदकालीन ज्ञात असल्यानें यज्ञावर विशेष भर देण्यात आला.

अंतर्दावे जुहुता स्वेउतद् यातुधानक्षयणम् घृतेन ।

ही उक्ती या दृष्टीनें महत्त्वाची आहे.)

हे ऋत्विजांनों, रोग निर्माण करणारें जंतु नाहीसे करण्यासाठीं अग्नीला तुपाच्या आहुती द्या म्हणजे अग्नि या जंतूंना भस्म करील. रुद्रदेवता या जंतूंचा नाश करील. औषधी देखील त्याचा नाश करतात. हे मित्रावरुणानों, आम्ही निर्भयपणें या ठिकाणी राहण्यासाठी या जंतूंना आमच्यापासून दूर करा. त्यांना भूमीचा आश्रय न मिळाल्यानें ते आपापसांत लढून नष्ट होतील.

३३. **इंद्रस्तवः** (इंद्रस्तुती)

शत्रूच्या हिंसेची प्रेरणा देणाऱ्या, आपल्या प्रभावानें शत्रूला परा-

अ...९

भूत करणाऱ्या, आपल्या बलानें वृत्राचा वध करणाऱ्या इंद्राची स्तुती करून त्याला आम्ही सुवर्ण प्रदान करतो, कारण तो मनुष्यांच्या प्रेरणेचा स्वामी आहे.

**३४. शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

इच्छापूर्ति करणाऱ्या, राक्षसांचा संहार करणाऱ्या अग्नीची स्तुती करा. तो आपल्या अत्यंत प्रखर तेजानें शत्रूचा नाश करतो. जो अग्नि वाळवंटी प्रदेशांत तीक्ष्ण होतो, अनेक रूपांनी साकारतो, अंतरीक्षांत सूर्य रूपानें तळपतो तो अग्नि राक्षस, पिशाच्च आणि आमचे असंख्य शत्रु यांना नष्ट करून आम्हाला मुक्त करो.

**३५. वैश्वानर** (प्राणिमात्रांच्या शरीरांत असलेला अग्नि)

सर्व प्राणिमात्रांचें हित करणारा अग्नि आमच्या रक्षणार्थ या ठिकाणी येऊन आम्ही केलेली स्तुती ऐको. यज्ञामध्यें स्थिर होवो. अंगिरा ऋषींनीं स्तोम आणिं शस्त्र नामक स्तुतीला सार्थ केलें. उज्ज्वल यश आणि पौष्टिक अन्न आम्हाला देऊन तो आमच्या स्वर्गाचा मार्ग मोकळा करतो.

**३६ वैश्वानर** (प्राणिमात्रांच्या शरीरांत असलेला अग्नि)

यज्ञस्वामी, दीप्तिमान, सर्वांच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या, यज्ञांतील आहुती देवतांना नेऊन देणाऱ्या वसन्तादि ऋतूंची रचना करणाऱ्या, आणि सर्वोत्तम स्थानाचा स्वामी असलेल्या अग्नीची आम्ही स्तुती करतो. तो आम्हाला इच्छित फल प्रदान करो.

**३७. शापनाशनम्** (शापोद्धार)

सहस्त्रचक्षु इंद्र आमच्याकडे येवो आणि आम्हाला शाप देणाऱ्या शत्रूला लांडग्याप्रमाणे झोडपून ठार करो. आम्हाला शपथ घालणाऱ्यांपासून तो आमची मुक्तता करो. वीज वृक्षावर पडतांना ती ज्याप्रमाणें वृक्षाचे भस्म करते त्याप्रमाणें आम्हाला शाप देणाऱ्या अगर शपथ घालणाऱ्या शत्रूला भस्म कर. आम्ही कोणाला शाप देत नाही. परंतु

आम्हाला जो शाप देतो त्याला कुत्र्यापुढें भाकरी फेकावी त्याप्रमाणें आम्ही त्याला मृत्यूकडे फेकतो.

## ३८. वर्चस्वम् (मोठेपणा)

मृग, व्याघ्र, सर्प यांच्यामध्यें असलेलें आकर्षक तेज, अग्नीमधील दाहकता, ब्राह्मणांजवळचे शापसामर्थ्य, सूर्याजवळील तप्तता, हत्तीमधील वल, सुवर्णामधील अविनाशी वस्तुत्व, गाई, पाणी आणि पुरुष यांच्यामध्यें असलेले प्राणतेज, वर्षाव करणारे मेघ, गतिमान रथ, वीर्यवान बैल, द्रुतगति वायु, मेघस्वामी वरुण, दुंदुभीचा महान नाद आणि अश्वांची शीघ्र गति यांयोगें उत्पन्न झालेल्या इंद्राला आणि आम्हाला ही तेजरूपा देवता प्राप्त होवो.

## ३९. वर्चस्वम् (मोठेपणा)

अत्यंत शक्तिसंपन्न, बलदायिनी, यशस्विनी आणि शत्रूला पराभूत करणारी आमची ही आहुती त्या इंद्राला प्राप्त होवो. त्यामुळें तो यजमानाची वृद्धी करील. आम्ही त्या इंद्राला वन्दन करतो. हे इंद्रा, तुझ्यामुळें प्राप्त झालेल्या स्थितीमध्यें आम्ही यशस्वी होऊं. इंद्र, अग्नि, आणि सोम यशदायक आहेत. त्यांच्या प्रभावामुळें मी सर्वांत यशस्वी होईन.

## ४०. अभयम् (निर्भयता निर्माण होणें)

द्यौ, पृथ्वी, चंद्र, सूर्य, अंतरीक्ष सप्त ऋषींनां प्राप्त होणारी हविर्द्रव्यें आम्हाला अभयदान देवोत. सूर्य आमच्या चारही वाजूला भरपूर अन्न उत्पन्न करो. आमचे कुशल होवो. इंद्र आम्हाला शत्रुभयापासून अभय देवो. राजाच्या क्रोधापासून आमची मुक्तता होऊन तो आमच्यावर कृपा करो. हे इंद्रा, चारही दिशामध्यें असलेल्या शत्रूंपासून आणि आमचा द्वेष करणाऱ्यांपासून आम्हाला अभय प्रदान कर.

## ४१. दीर्घायु प्राप्ती (प्रदीर्घ आयुष्याचा लाभ)

आमचें मन, चित्त, वुद्धि, मति, श्रुति आणि नेत्र यांना सामर्थ्य संपन्न करण्यासाठीं आम्ही इंद्राचें पूजन करतो. प्राणापानादि व्यापार

करणारा वायु व देवी सरस्वती यांची आम्ही मनापासून सेवा करतो. इंद्रियाच्या रुपानें उत्पन्न झालेले प्राणाधिपति सप्तऋषि आमचा त्याग न करोत. हे अविनाशी देवगणांनों, आमच्या शरीरांत दीर्घायुष्याची स्थापना करा.

**४२. परस्पर चैत्तैकीकरणम्** (एकमेकांच्या चित्ताचें एकत्रीकरण)

धनुष्याला लावलेला बाण काढून घ्यावा त्याप्रमाणें तुझा क्रोध मी काढून घेत आहे. आतां आपण एकमेकांवर प्रेम करून एकमतानें राहूं. एकमतानें कार्य करूं. तुझ्या क्रोधाला मी एका शिळेखालीं पुरून टाकतो आणि आपली मनें एकरूप होतील असें करतों.

**४३. मन्युनाशनम्** (राग शांत करणें)

शत्रूचा क्रोध किंवा क्रोधी मनुष्याला कारणपरत्वें आलेला क्रोध नाहीसा करण्यासाठी दर्भाचा उपयोग होतो. हे दर्भ पाणथळ जमिनीत उभे आहेत. पृथ्वीवर स्थिर होऊन अंतरीक्षाकडे पाहणारा हा दर्भ क्रोधशामक आहे. हे क्रोधी पुरुषा ज्यामुळें तुला राग येतो तें कारण आणि रागामुळें मुखावर प्रदर्शित होणाऱ्या शिरा मी नष्ट करतो आणि तुला अनुकूल करून घेतो. (दर्भ पाण्यांत टाकून पाणी पिण्यानें शरीरदाह शमतो.)

**४४. रोगनाशनम्** (राग व रोग शांत करणें)

नक्षत्रांसहित द्युलोक आणि भूतमात्रांसहित पृथ्वी, सर्वांचा आधार आहे. वृक्ष, प्राणी आणि अन्य जंतु आपल्या सुखानें पृथ्वीवर राहतात त्याप्रमाणें तुझ्या हृदयामध्यें रक्त आधारानें राहिलें आहे. अनेक रोगांना दूर करणाऱ्या औषधींमध्यें रक्तस्राव थांबविणाऱ्या औषधी आहेत. रुद्राचें मूत्र अमृतमय आहे. त्यानें रोगशमन आणि रोगाला कारण असणारें पाप समूळ नाहीसें होतें.

**४५. दुःस्वप्ननाशनम्** (दुःखद स्वप्नाचा नाश)

हे पापांमध्यें आसक्त होणाऱ्या आणि असंस्कृत वार्तांना स्थान

देणाऱ्या मना, तूं माझ्यापासून दूर जा. माझें मन माझ्या कुटुंबियांमध्यें उचित प्रेमानें राहो. ज्या स्वप्नांच्या योगें त्रास होतो ती स्वप्नें अग्नि भस्म करो. हे ब्रह्मणस्पते, हे इंद्रा, पापवश व दुःखद स्वप्नांपासून आम्हाला जो अकारण त्रास होतो त्यापासून अंगिरसांच्या मंत्रानें वरुण आमचें रक्षण करो.

### ४६. दुःस्वप्ननाशनम् (दुःखद स्वप्नांचा नाश)

स्वप्नाला जीवनही नाही आणि मरणही नाहीं. जागृतावस्थेमधील अनुभवांनीं ते साकारतें. यम हा स्वप्नांचा पिता आणि वरुणपत्नी माता आहे. म्हणून तुला अररु असे म्हणतात. हे स्वप्नदेवते मी तुला ओळखतो. तूं वरुणपत्नीचा पुत्र असून यमसहाय्यक आहेस. स्वप्नांतील भयापासून तूं आमचे रक्षण कर. ऋणको धन देऊन ऋणमुक्त होतो किंवा गाईच्या खुरांना लागलेली मलिनता धुऊन टाकली जाते त्याप्रमाणें दुःखद स्वप्नांपासून निर्माण होणाऱ्या भयापासून आमचे रक्षण कर आणि ते भय आमच्या शत्रूकडे पाठवून दे.

### ४७. दीर्घायुःप्राप्तिः (दीर्घायुष्याची प्राप्ती)

विश्वकर्ता, प्राणिमात्रांचे हित करणारा, दुःख शमविणारा आणि यजमानाला यज्ञाचें फल प्रदान करणारा अग्नि, प्रातःस्तवनाच्या सेवेनें आमचें रक्षण करो. त्याच्या कृपेनें पुत्रपौत्र आणि अन्न यांनी समृद्ध होऊन दीर्घकाळ जिवंत राहूं. एकूणपन्नास मरुद्गण आणि त्यांचा स्वामी इंद्र दुसऱ्या सवनाच्या योगें आमचे रक्षण करो. त्यांना प्रसन्न करणारी आमची स्तोत्रें ते श्रवण करोत आणि आम्हाला दीर्घायु करोत. तृतीय सवनाच्या योगे सोमपान करणारा ऋभु सुधन्वा अंगिरसपुत्र देवत्वाला प्राप्त झाले. ते आम्हाला सर्वसिद्धीमय करून दीर्घायु देवोत.

### ४८. स्वस्तिवाचन (शुभ वचन)

अतिशय गतिमान, प्रज्ञावंत व बलवन्त, गायत्री, जगती आणि त्रिष्टुभ छंदामध्यें गायिलेल्या स्तोत्रांनीं प्रसन्न होणारा अग्नि आम्ही जवळ करतो कारण यज्ञाचें फळ तो आम्हास प्रदान करतो. आमच्या

ह्या आहुती त्याला समर्पित होवोत.

**४९. अग्निस्तव** – (अग्नीची स्तुती)

वानराप्रमाणें अत्यंत चंचल आणि देहांतील आर्द्रता काढून घेणाऱ्या अग्नीच्या प्रदीप्त ज्वालांना मनुष्य स्पर्श करूं शकत नाहीं. वनामध्यें सांपडलेला मेंढा ज्याप्रमाणें सर्वत्र संचार करीत खातो त्याप्रमाणें तूं मनुष्य देहांत व्याप्त होऊन सर्व शोषून घेतोस. दावाग्नि वनांना आणि शवाग्नि प्रेताला भस्म करतो त्याप्रमाणें वृक्षांना लपटलेल्या सोमलतांनादेखील तूं जाळून टाकतोस. हे अग्ने, तुझ्या ज्वाला कृष्णमृगाप्रमाणें नाचत आकाशांत जातात आणि ध्वनीही करतात. त्यांच्या धूमापासून मेघांची उत्पत्ती होते. तुझ्या ज्वाला सूर्यमंडलाला व्यापून संसाराला साथ करतात.

**५०. अभययाचना** (भीती नाहीशी होण्यासाठी मागणें)

हे अश्विनीकुमारांनों, आमच्या धान्याच्या संरक्षणासाठीं उंदरांना मारून टाका. हे मूषका, तूं उपद्रव देतोस म्हणून मारण्यास योग्य आहेस. तुझा नाश करण्यासाठीं अश्विनीकुमारांना ही आहुती समर्पण करीत आहोत. तूं त्यापूर्वी या ठिकाणाहून निघून जा. उंदीर आणि कीटकांच्या प्रमुखा, या कर्मांनीं मी तुझा नाश करीत आहे.

**५१. एनोनाशनम्** (पापनाश करणें)

वायूच्या योगानें शुद्ध आणि रसपूर्ण झालेला इंद्राचा मित्र सोम शरीरांत मुखापासून नाभीपर्यंत जातो. मातृरूप जल आम्ही पापरहित करतो आणि रक्षणयोग्य रसानें पाणी पवित्र करतो. हे देवरूप पाणी स्नान, आचमन आणि प्रोक्षण या क्रियांच्या द्वारा पापाला घालवून देणारें आहे. मी अशा पाण्यांत स्नान करून पवित्र झालों. हें वरुणा जो मनुष्य पाप करतो किंवा अज्ञानामुळें धर्माचरण करीत नाहीं त्याचा तूं नाश करूं नकोस.

**५२ भैषज्यम्** (औषधीयता)

रात्रीच्या अंधकारात त्रास देणाऱ्या परंतु, दृष्टीला न दिसणाऱ्या पिशाच्च आणि राक्षसांचा नाश करण्यासाठीं अंतरीक्षांत सूर्योदय होत

आहे. त्यामुळें रात्री ज्या नद्या दिसत नाहींत त्या दिसू लागतात. आमच्या गाई निर्भयपणें आपल्या गोठ्यांत आणि जंगली श्वापदे आपल्या वनांतील निवासस्थानी जाऊन सुखरूप होतात. शंभर वर्षांचें आयुष्य देणारी, रोगविनाशिनी आणि महर्षी कण्वांनीं शोधून काढलेली औषधी मला प्राप्त झाली आहे. ही औषधी अदृष्ट राक्षसांनी निर्माण केली. ती व्याधी दूर करते.

## ५३. **सर्वतो रक्षणम्** (सर्व बाजूंनीं संरक्षण मिळविणें)

सूर्य दक्षिण दिशेपासून आमचें रक्षण करून मला ऐश्वर्यवान करो. आकाश आणि पृथ्वी आम्हाला इच्छित फल आणि स्वधादि देव अन्नादि पदार्थ आम्हाला देवोत. सोम, अग्नि, वायु, सविता आणि भग या देवता आमच्यावर प्रसन्न होवोत. प्राणवायु आम्हास सतत मिळो. सर्व प्राणिमात्रांचें हित करणारा अग्नि आमच्या पापांना नाहीसे करून आमच्या रक्षणार्थ शरीरांत राहो. आमचें अंतःकरण व हातपायादि अवयव शुद्ध होवोत. त्वष्टा आमचे रोगपीडित अंग रोगरहित करून पुष्ट करो.

## ५४. **अमित्रदम्भनम्** (शत्रूचा पाडाव करणे)

पर्जन्यवृष्टि ज्याप्रमाणें धनधान्याची वृद्धि करतें त्याप्रमाणें अभिचार कर्मानें त्रासलेल्या पुरुषांना धन, पुत्रपौत्र आणि बल प्रदान करून, आमच्या स्तोत्रांनी प्रसन्न झालेला इंद्र वृद्धि करतो. हे अग्ने आणि सोमा, अत्यंत श्रेष्ठ कर्म करणाऱ्या यजमानाच्या बलाची वृद्धी करा. हे इंद्रा, आमचा जवळचा अगर लांबचा शत्रू, सोम तयार करणाऱ्या यजमानाला वश होवो.

## ५५. **सौमनस्यम्** (सामंजस्य)

ज्या मार्गानें देव जातात तो मार्ग पृथ्वीमध्यांत असून त्या मार्गाची मला प्राप्ती होवो. सहा ऋतु आम्हाला गोधन, पुत्रपौत्र आणि अन्य धन देऊन देवतांच्या आश्रयांत ठेवोत. हे मनुष्यांनो, इदावत्सर, परिवत्सर आणि संवत्सर यांना आम्ही वन्दन करून प्रसन्न करतो. या यज्ञामध्यें उत्पन्न होणारें श्रेष्ठ फळ देऊन ते आमच्यावर कृपा करोत.

**५६. सर्पेभ्योरक्षणम्** (सर्पांपासून संरक्षण)

हे विषनाशक देवतांनों, तुम्हाला आमचा नमस्कार असो. सर्प, आम्हीं, आमचे पुत्र-पौत्र, नोकरचाकर, यांना दंश न करोत. दंश करण्या-साठीं सर्पांचे मुख न उघडो. कृष्णवर्ण, श्वेतवर्ण, चित्रविचित्र वर्णाच्या सर्पांना आणि त्यांना नियंत्रणांत ठेवणाऱ्या देवतांना आमचा नमस्कार असो.

**५७. जलचिकित्सा** (पाण्याची चिकित्सा)

पाणी सर्व रोग दूर करणारें रुद्राचें औषध आहे. शिवांनी याचा प्रथम प्रयोग केला. हे परिचारकांनों, तुम्ही गोमूत्रफेनानें जखम धुऊन काढा. जखम वरी करण्यास ती सर्वोत्तम औषधी आहे. हे देवांनो, आम्हाला सुख प्रदान करून, रोगग्रस्त होणाऱ्या पापाला दूर करणाऱ्या औषधींप्रमाणें तुम्ही आमच्यासाठीं मदत करा. (विहिरीतले पाणी आणि गोमूत्र समभाग घेऊन ते ढवळलें कीं ते फेनयुक्त होतें. त्याची निर्जंतुकता वाढतें. त्यानें जखमा निर्जंतुक होतात.)

**५८ यशःप्राप्तिः** (यशाचा लाभ)

द्यौ, पृथ्वी, इंद्र आणि सविता मला माझ्या कार्यांत यशवान करोत. इंद्र ज्याप्रमाणें पृथ्वी आणि अंतरीक्षांतील वृष्टी कार्यामुळें श्रेष्ठ आहे; औषधामध्यें पाणी– किंवा रस ज्याप्रमाणें श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें मी मनुष्यमात्रांमध्यें श्रेष्ठ होईन. इंद्र, अग्नि आणि सोम ज्याप्रमाणें आपल्या कृतीनें श्रेष्ठ आणि यशवान झाले त्याप्रमाणें मी होईन.

**५९. औषधिः** (औषधी)

हे औषधी, प्रथम तूं लहान वयाच्या गाई, बैल आणि अश्व यांना निरोगी कर आणि आमचें गोठे दुग्धपूर्ण कर. तूं सौभाग्यप्रदायिनी, रुद्रानें फेकलेल्या शस्त्राला आमच्यापासून बाजूला वळवणारी असल्यानें आम्ही तुला प्रार्थना करतो कीं, आमचा सर्व परिवार रोगशून्य करून आमच्या इच्छेप्रमाणें आम्हाला तूं फल प्रदान कर.

**६०. पतिलाभ** (पतिलाभ)

पति प्राप्त करण्याची इच्छा असलेल्या पतिव्रता स्त्रिया ज्या धर्म

कर्माचें आचरण करून पतीच्या आवडत्या होतात अशा पतिलाभ न झाल्याने दुःखित असलेल्या कन्येचा हेतु पूर्ण करण्यासाठीं पूर्व क्षितिजावर हा सूर्य उदयास येत आहे. विश्वपति विधात्यानें पृथ्वीला निर्माण करून द्युलोकांतील सूर्यमंडलांत तिची स्थापना केली तो विधाता या कन्येला अनुरूप पति देवो.

(तीन ऋचांचा हा मंत्र सूर्याच्या साक्षीनें उपवर कन्येनें अगर तिच्या पित्यानें म्हटल्यास इच्छित वरप्राप्ति होते.)

अयमा यात्यर्यमा पुरस्ताद् विषितस्तुपः ।
अस्या इच्छन्नग्रुवै पतिमुत जायामजानये
अश्रमदियमर्यमन्नन्यासां समनं यती ।
अङ्गो न्वर्यमन्नस्या अन्याः समनमायति
धाता दाधार पृथिवीं धाता द्यामुत सूर्यम् ।
धातास्या अग्रुवै पतिं दधातु प्रतिकाम्यम्

## ६१. विश्वस्रष्टा (विश्वाची उत्पत्ती करणारा)

सर्व प्राणिमात्रांना आपल्या कार्याची प्रेरणा देणाऱ्या सूर्यानें आपली किरणें सर्वत्र पसरली. जलदेवतांनीं मधुर जल निर्माण केलें. हे देव मला इच्छित फल प्रदान करतात. पृथ्वी आणि स्वर्ग यांना निराळे करून, सहा ऋतु अधिक मासानें जोडले. सत्य आणि दैवीवाणी उच्चारली, सप्त महानद्या आणि समुद्र निर्माण केले. भोक्ता आणि भोग यांची यज्ञकर्मानें सांगड घालून संसार निर्माण केला.

## ६२. पावमानम् (पवित्रीकरण)

सर्व प्राणिमात्रांच्या शरीरांत स्थानापन्न झालेला वैश्वानर–अग्नि त्याच्या किरणांनीं, अंतरीक्षांत संचार करणारा वायू त्याच्या स्पर्शानें आणि यज्ञ संपन्न करणारे द्यौ– पृथ्वी आम्हाला पवित्र करोत. वैश्वानरात्मक सत्यवाणी, ब्रह्मवर्चस् तेजप्राप्ति, वैश्वानरात्मक अग्नीची कृपा,

आम्हाला पवित्र करून, अन्नानें पुष्ट करून प्रदीर्घ कालापर्यंत आम्हाला सूर्याचें दर्शन घडवो.

६३. **वर्चोबलप्राप्तिः** (सत्ता व बलप्राप्ति)

अनिष्ट कर्माच्या निर्ऋति देवतेनें, तुझें अंग आणि कंठ यांमध्यें निर्माण केलेला दोष तू दीर्घायुषी व्हावें म्हणून मी दूर करतो. आम्ही प्रेरित केलेल्या या अन्नाचा तूं स्वीकार कर. हे निर्ऋते, आमचा नमस्कार तुला प्रसन्न करो. आमची संसार बंधने मुक्त होवोत. यमाला आमचा नमस्कार असो. हे निर्ऋते, ज्वरादि वेडचांनी तूं आम्हाला बांधून टाकतेस परंतु कामपूरक अग्नि आम्हाला इच्छित फल देऊन मुक्त करो. हे अग्ने, तूं या वेदीवर प्रसन्नपणें स्थिर हो.

६४. **सांमनसम्** (सम-विचार सम-मन धारक)

समान मनाच्या लोकांचे ज्ञान, कार्य, अर्थ, आणि दान एक असतें. इंद्रादि देव एकमतानें कार्य करून इच्छित फल प्राप्त करून घेतात द्वेषाचा त्याग करतात, त्याप्रमाणें समानचित्त मनुष्यांनीं श्रेष्ठ फलाच्या प्राप्तीसाठीं एक संकल्प, एक कार्य आणि एक क्रिया यांच्या योगें सुखलाभ प्राप्त करावा.

६५. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

शत्रूचा राग, आयुधें आणि आयुधें धारण करणारे हात असमर्थ होवोत. हे इंद्रा, तूं शत्रूला मागें हटविणारा, धन प्राप्ती करणारा आणि धनदाता आहेस. हे देवतांनों, शत्रूवर जो तीक्ष्ण बाण सोडता त्या बाणाच्या देवतेला आमची ही आहुती समर्पित होवो. त्यायोगें शत्रूचे सामर्थ्य नाहीसें होईल. पूर्वी देवस्वामी इंद्रानें राक्षसांचे हात बलशून्य केले त्या इंद्राच्या अनुग्रहानें मला विजय प्राप्त होवो.

६६. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

आम्हाला संतप्त करणाऱ्या शत्रूचा हात निर्बल होवो. त्याला दुःखगति लाभो. हे इंद्रा, आपल्या सैन्यबलानें जो आमच्यावर आक्रमण करीत आहे त्या शत्रूला तुझ्या वज्रानें नाहीसे कर. हे शत्रूंनों, आमच्या-

वर वाण सोडणाऱ्या तुमचें अंग इंद्र शिथील करील. मग तुमची संपत्ती आम्ही आमच्यांतच वाटून घेऊ.

## ६७. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

इंद्र आणि पूषा शत्रूचा मार्ग अडवून ठेवोत. शत्रूच्या सेनेला भ्रम निर्माण होऊन ती कार्यशून्य होवो. फणा कापल्यावर ज्याप्रमाणें सर्प दंश करीत नाहीं, केवळ तडफड करतो त्याप्रमाणें तुम्ही भ्रममय होऊन रणभूमीवर फिरत राहाल. आमच्या आहुतीनें प्रसन्न झालेला इंद्र तुमच्या वीरांना नष्ट करील. अभीष्टफल देणाऱ्या इंद्रा, शत्रूला भीति निर्माण कर म्हणजे तो पळून जाईल आणि त्याच्या गवादि धनाचा लाभ आम्हाला होईल.

## ६८. वपनम् (केंस काढून टाकणें, मुंडण करणें)

सर्वप्रेरक सविता अत्यंत तीक्ष्ण धार असलेला वस्तरा घेऊन आला आहे. हे वायो, गरम पाण्यानें या वालकाचें मस्तक तूं ओले कर. अकरा रुद्र, वारा आदित्य आणि आठ वसू या वालकाचें मस्तक भिजवून काढोत. वरुण आणि सोम भिजलेले केंस काढून टाकोत. आदिती दाढीमिशा निराळ्या करो. पाणी ते ओले करोत, प्रजापती त्यांचे निरोगीपण निरीक्षण करो. सोम आणि वरुणानें ज्या वस्तऱ्यानें या वालकाचे केंस काढून टाकले त्यानेंच याच्या दाढीमिशादेखील कापल्या जावोत. मुंडन केलेला हा पुरुष गोधन, अश्व, पुत्रपौत्रादिक आणि दीर्घायुष्य यांनी संपन्न होवो.

## ६९. वर्चः प्राप्तिः (वर्चस्व लाभ)

रथांतून शत्रूला सामोरे जातांना जयघोषामुळें जे यश प्राप्त होतें, हिमालयादि पर्वतांमध्यें जी स्थिर यशता आहे, सुवर्ण आणि गाय यांच्यामध्यें जे यशद सामर्थ आहे तें मला प्राप्त होवो. त्याचप्रमाणें पर्जन्य अन्न आणि रस यांमध्यें असणारें सर्व श्रेष्ठ यश मला प्राप्त होवो. हे अश्विनीकुमारांनों, मधुमक्षिकांनी जमविलेला मध तुम्ही मला द्या. त्याच्या सेवनानें माझी वाणी मधुर आणि दीप्तिवान होईल. यज्ञ आणि अन्न

यांमध्यें जें श्रेष्ठत्व आहे आणि अंतरीक्षांत जें तेज आहे तें माझ्यामध्यें प्रजापति स्थिर करो.

**७०. अघ्न्या** (अवध्यता)

ज्याप्रमाणें सुरापान करण्याला दारू, मांस भक्षकास मांस, जुगार खेळणाऱ्याला फांसे, कामी पुरुषाला स्त्री, हत्तिणीला हत्ती, प्रिय असते त्या प्रमाणें हे अवध्य गाई तुला तुझें वत्स प्रिय आहे. रथाची धुरा ज्याप्रमाणें रथाला घट्ट बांधलेली असते किंवा कामी पुरुषाचें मन स्त्रीशीं जखडलेले असतें त्या प्रमाणें तुझें वासरूं तुला बिलगून राहो.

**७१. अन्नम्** (अन्न)

मी अनेक प्रकारचें अन्न खाल्लें आहे किंवा सुवर्णादिकांचा संग्रह केला आहे. यांमध्यें असलेले दोष, उत्तम अगर कनिष्ठ मार्गांतून लाभलेले द्रव्य, पितर आणि देवता यांच्याकडून मिळालेलें फळ यांमध्यें जो दोष असेल तो हा यज्ञीय अग्नि नाहीसा करो. हे देवतांनों, खोटें बोलून दुसऱ्याचें अन्न हिरावून घेतलें किंवा घेतलेलें कर्ज परत केलें नाहीं या दोषांपासून अग्नि मला मुक्त करून सुखद होवो.

**७२. वाजीकरणम्** (संतती उत्पन्न करणें)

एके ठिकाणीं असलेला मनुष्य आसुरी मायेनें अनेक ठिकाणीं दिसतो त्या प्रमाणें अशुद्ध कर्मांनीं बद्ध झालेलें माझें शरीर प्रजननासाठीं योग्य होवो. संततीला उपयुक्त ठरणारे असें पुरुषाचें पूर्णांग होवो. त्यामुळें त्याची प्रजा सामर्थ्यवान होईल.

(वीर्यक्षय किंवा बीजशून्यता या रोगांपासून मुक्तता लाभण्यासाठीं केलेली ही प्रार्थना आहे.)

**७३. सांमनस्यम्** (स्नेहमयता)

शरीर आणि मन एकत्र बद्ध झाल्यानें सर्व कर्में आवडीनें केली जातात. भग व बृहस्पति आमचें पुन्हा पुन्हा आगमन इच्छो. असा मनुष्य ज्ञानसंपादक, तपसंपादक आणि कर्मसंपादक असतो. अदितिपुत्र मित्रावरुण आणि अष्टवसु, रुद्र आणि मरुद्‌गण, ज्याप्रमाणें एकरूपानें

चांगलें कार्य करतात त्याप्रमाणें क्रोध नाहीसा करून मनुष्यानेंदेखील आपलें मन दुसऱ्याच्या मनाशीं एकरूप करावें आणि कार्यरत व्हावें.

**७४. सांमनस्यम्** (स्नेहरूपता)

तुमचें शरीर आणि मन एकमेकाला साथ देऊन कर्म करणारी असल्यानें भग आणि बृहस्पति तुमच्यावर कृपा करतात. तुमचें मन व हृदय ज्ञानमय असल्यानें तुम्ही केलेल्या स्तुतीने भगदेवता संतुष्ट होऊन तुम्हाला अधिक ज्ञानवान करतात. अदितीपुत्र मित्रावरुण, अष्टवसु, रुद्र आणि मरुद्‌गण ज्ञानवान असल्यानें, अग्निदेखील आपला राग कमी करून मनुष्यांना समृद्ध आणि सुसंस्कारित करतो.

**७५. सपत्नक्षयणम्** (शत्रुनाश)

आम्हाला पीडा देणाऱ्या शत्रूचा पाडाव करण्यासाठीं या हवींच्या योगें आम्ही इंद्राला प्रेरित करीत आहोंत. इंद्र त्यांना शंभर वर्षेपर्यंत परत येऊं देणार नाहीं. इंद्रानें ताडण केलेला शत्रू ज्या ठिकाणीं अग्नि व सूर्याचा प्रकाश नाहीं अशा ठिकाणीं जावो आणि जोपर्यंत अंतरीक्ष स्थित आहे तोपर्यंत परत न येवो.

**७६. आयुष्यम्** (आयुष्य)

जे राक्षसादि हिंसक या पुरुषाला मारण्यासाठीं चारही दिशांना टपले आहेत त्यांना अग्नि आपल्या ज्वालारूपी प्रचंड जिव्हांनीं भस्म करो. अद्धाति ऋषीनें आपल्या मुखांतून निघालेला अग्नि पाहिला. त्या अग्नीला दिलेल्या आहुतीमुळें श्वापदांकडून अशा पुरुषाला मृत्यु येत नाहीं. जो कोणी चिरंजीव होण्यासाठी अग्नीची स्तुती करतो त्याला शत्रु पीडा देण्यास असमर्थ होतो.

**७७. प्रतिष्ठापनम्** (व्यवस्थित स्थानावर वसविणें)

ईश्वराच्या प्रेरणेनें ज्याप्रमाणें द्युलोक आणि पृथ्वी आपापल्या स्थानीं स्थिर होऊन या दोहोंमध्यें असणाऱ्या संसारामध्यें, घोडेस्वार ज्याप्रमाणें घोड्याला दोरीनें बांधतो त्याप्रमाणें या स्त्रीला कर्मबंधनांनीं बांधून स्थिर केलें आहे. गतिमानतेच्या देवतेला मी आवाहन करतो. हे

अग्ने, या चंचल स्त्रीचा स्वभाव बदलून तिला स्थिर कर.

**७८. दम्पत्ये रयिप्राप्तये प्रार्थना** (एकमेकाला सुखसमृद्धिमय जीवन लाभावें म्हणून दांपत्यासाठीं केलेली प्रार्थना) नव दांपत्याला सुखसमृद्धी लाभावी, दीर्घायुष्य लाभावें म्हणून, पुरोहित आणि अन्य तपोधन, विद्यावान, वयोवृद्ध यांनीं चंद्राजवळ केलेली ही प्रार्थना आहे.

तेनं भूतेनं हविषायमा प्यांयतां पुनः ।
जायां यामस्मा आवांक्षुस्तां रसेनाभि वर्धताम्
अभि वर्धतां पयंसाभि राष्ट्रेणं वर्धताम् ।
रय्या सहस्रवर्चसेमौ स्तामनुंपक्षितौ
त्वष्टां जायामंजनयत् त्वष्टांस्यै त्वां पतिम् ।
त्वष्टां सहस्रमायूंषि दीर्घमायुः कृणोतु वाम्

पतीची प्राप्ती करून देण्याच्या निमित्तानें मातापित्यांनी ज्या वधूला वराजवळ आणलें आहे त्या वधूला हा अग्नि दही, घृत, मध वगैरे रसांनीं, संतती आणि पशुधनानें समृद्ध करो. या वधूचें घर दुग्धादि पदार्थांनी समृद्ध होवो आणि हिचा संसार वृद्धिगत होवो. त्वष्टचानें या वधूला आणि वराला उत्पन्न केलें. त्वष्टा त्यांना हजारों वर्षांचें दीर्घायुष्य प्रदान करो.

**७९. ऊर्जः प्राप्तिः** (उत्साह आणि बल यांची प्राप्ती)

देवांना हवि नेऊन देणारा व आकाशपालक अग्नि अगणित धन-धान्यानें आमचें घर भरून टाको. अंतरीक्षपालक वायु आमचें घर अन्न, संतति, पशु अन्य सर्व प्रकारच्या धनानें समृद्ध करो. हे आदित्य तूं प्रजापालक व धनस्वामी असल्यानें तुझ्या प्रसादानें आम्ही धनवान होऊं.

**८०. अरिष्टक्षयणम्** (संकटाचा नाश)

कावळा आणि कबुतर आकाशांतून माणसाच्या अंगावर पडल्यास निर्माण होणारे दोष घालविण्यासाठीं उत्तम कर्मामुळें देवतारूप बनलेल्या कालकंज तीन असुरांना आवाहन करीत आहे. हे अग्ने, तूं विजेच्या रूपानें

पाण्यात, आदित्य रूपानें द्युलोकांत, समुद्र आणि पृथ्वीप्रमाणें तूं महान आहेस. दिव्य श्वानाच्या तेजानें आम्ही तुझें पूजन करतो.

## ८१. गर्भाधानम् (गर्भाची स्थापना करणें)

गर्भाला नष्ट करणारी व्याधि आणि गर्भांचा संहार करणाऱ्या राक्षसांना अग्नि आपले हात उंचावून नष्ट करतो आणि पुत्रपौत्रादि भोगांचा रक्षक आणि दाता होतो. विस्तृत गर्भाशय असलेल्या स्त्रिये, तूं आपल्या गर्भाशयांत गर्भाची स्थापना कर. पुत्रकामा असलेली ही स्त्री पुत्र उत्पन्न करण्यास समर्थ होवो.

## ८२. जायाकामना (पुत्राची इच्छा करणाऱ्या स्त्रीची अभिलाषा)

वृत्रसंहारक इंद्राला, विवाहाची इच्छा करणारा मी त्याचें फल मागत आहे. मला भगदेवतेनें सांगितलें की, आश्विनीकुमारांनी ज्या-प्रमाणें सूर्यपुत्रीशीं विवाह केला त्या मार्गानें तूं वधू प्राप्त कर. हे इंद्रा, तुझ्या धनद हातानें मला पुत्राची इच्छा करणारी पत्नी प्रदान कर.

## ८३. भैषज्यम् (औषधीयता)

चतुर पक्षी आपल्या घरट्यांतून ज्याप्रमाणें चटकन बाहेर जातो त्याप्रमाणें हे व्याधि, तूं चटकन निघून जा. सूर्य तुला ओळखील आणि चंद्र तुला दूर घालवून देईल. या व्याधीमुळे रक्त, श्वेत, परमशुभ्र कृष्ण-वर्णांची गळवें होतात. त्यांना वात, पित्त, कफ यांच्या सान्निध्यामुळें विविध नावें प्राप्त होतात. ती सुन्दर नावे उच्चारून मी तुला निघून जाण्याची प्रार्थना करतो. या मंत्रांच्या उच्चारावरोवर दिलेल्या आहुतींबरोबर तूं नाहीशी हो.

## ८४. निर्ऋतिमोचनम् (पापनाशिनी)

हे निर्ऋति, आम्ही दिलेली आहुती तूं स्वीकार. तूं निर्माण केलेल्या व्रणावर हें औषधीयुक्त जल उपयुक्त आहे. लोक तुला रोगवर्धनी समजतात परंतु मी मात्र तुला पापवर्धिनी म्हणून जाणतो. आमचा हवि स्वीकारून तूं आमचें गोधन रोगशून्य कर. तूं आम्हाला पीडा देऊं नको. आमच्या भोंवतीचे रोगपाश काढून घे. रोगमुक्त करून मला परत

पाठविणाऱ्या यमाला माझा नमस्कार असो. हे निर्ऋति, एखाद्या पुरुषाला तूं बद्ध करतेस तेव्हां तो ज्वरादि अनेक बंधनांनी जखडतो. तूं या पुरुषाला पापरहित करून दुःखशून्य स्वर्गांत स्थापन कर.

**८५. यक्ष्मनाशनम्** (क्षयरोगाचा नाश)

ही औषधी वनस्पति तुझा क्षयरोग नाहीसा करील. इंद्र, मित्रा-वरुण आणि अन्य देवतांच्या आज्ञेनें क्षयरोग दूर होईल. त्वष्टापुत्र वृत्रानें ज्याप्रमाणें मेघांतील पाणी अडवून धरले होते त्याप्रमाणें हा अग्नि तुझ्या या रोगाला रोखून धरील.

**८६ वृषकामना** (महान इच्छा)

सर्वश्रेष्ठ इच्छा करणारा पुरुष, इंद्राच्या अनुग्रहानें, आकाश, पृथ्वी आणि सर्व प्राणिमात्रांना तृप्त करतो. तो सर्वांमध्यें श्रेष्ठ होतो. जलामध्यें समुद्र, दीप्तिमान पदार्थांमध्यें अग्नि, नक्षत्रांमध्यें चंद्र आणि देवतांमध्यें इंद्र ज्याप्रमाणें श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें इंद्राच्या कृपेनें महान कामना करणारा पुरुष मनुष्यांमध्यें श्रेष्ठ होतो.

**८७ राज्ञः संवरणम्** (राजाची श्रेष्ठता)

हे राजा, या राज्याचा तूं स्वामी असून पृथ्वीवरील सर्व प्रजा तुला आपला स्वामी मानते. तूं पर्वताप्रमाणें दृढ असलेल्या या सिंहासना-वर आरूढ होऊन आपल्या राज्याचें पालन कर. आमच्या हविर्दानानें प्रसन्न झालेल्या इंद्रानें या राजाला स्थिर केलें असून ब्रह्मणस्पति आणि सोम यांनीं त्याला आपला म्हटलें आहे.

**८८. ध्रुवो राजा** (सुस्थिर असणाऱ्या सर्व श्रेष्ठ वस्तु)

द्युलोक, पृथ्वी, विश्व, पर्वत, वरुण, बृहस्पति, इंद्र आणि अग्नि सुस्थिर आहेत त्यामुळें हे राजा शत्रुदमन केल्यामुळें, सर्व दिशा शत्रू-शून्य होऊन त्या तुला अनुकूल झाल्या आहेत. म्हणून तूं या ठिकाणी स्थितपणें राज्य कर.

**८९. प्रीतिसंजननम्** (प्रीतीची वृद्धि करणें)

सोमाच्या कृपेनें निर्माण झालेलें प्रेम माझ्या अंतःकरणाला चंचल

करतें. हे दांपत्यांनो, तुम्ही एकमेकांवर अनुरक्त आहांत कारण तुम्ही एकमेकाला साथ देणारे आहांत. हे स्त्रिये, मित्रा-वरुण, सरस्वती आणि अन्य सर्व प्राणिमात्र तुला माझ्याशीं संलग्न करोत.

**९०. इषुनिष्कासनम्** (बाणाचें निराकरण)

हे रुग्णा, शूलरोगरूपी रुद्रानें सोडलेल्या बाणाचें मी निराकरण करतो. तुझे हात–पाय आणि नाड्या ज्या जखडून गेल्या आहेत त्यांना मी ही औषधी वनस्पती प्रदान करतो हे रुद्रा, तुला, धनुष्यातून सुट-णाऱ्या तुझ्या बाणाला आणि बाणाचे लक्ष्य झालेल्या वस्तूला नमस्कार असो.

**९१. यक्ष्मनाशनम्** (क्षयनाश)

तुझ्या शरीरात निर्माण झालेला क्षयरोग सहा किंवा आठ प्रकारे हाताळलेल्या यवांच्या औषधी गुणांनीं बाजूला जाईल. सूर्य खालच्या लोकांना प्रकाश देतो, वायू खाली वाहतो, गाय खाली मुख करून दूध देते त्याप्रमाणें तुझें पाप अधोमुखी होईल. जल सर्व औषधांमध्यें श्रेष्ठ आहे तेंच तुझा रोग नाहीसा करील.

**९२. वाजी** (अश्व-घोडा)

हे अश्वा, रथाला जोडल्यावर तूं वेगसंपन्न हो. इंद्राच्या प्रेरणेने ठरलेल्या ठिकाणी लवकर जा. एकूणपन्नास मरुद्गण आणि त्वष्टा तुझ्या पायांना गती देवोत. तुला प्रदान केलेल्या वेगानें तूं युद्धामध्यें शत्रुसैन्य पार कर. तुझ्यावर स्वार होणारा पुरुष विजय प्राप्त करो. गांव आणि नगरे यामध्यें तूं सरळ गतीनें जाऊन आपल्या स्थानीं स्थिर हो.

**९३. स्वत्ययनम्** (शुभ घरकुल)

विश्वनियामक यम, मृत्यु, अघभार, शर्व, क्षेप्ता आणि नीलशिखा देवता पापी लोकांना नष्ट करण्यासाठी संचार करतात ते आमच्या पुत्रपौत्रादिकांना त्रास न देवोत. यज्ञात घृताची आहुती देऊन आणि मंत्रोक्त स्तुति-नमस्कारानें मी या देवतांना संतुष्ट करतो. ज्या कर्मा-

मध्यें पाप आहे ते सर्व दूर करोत. हे मरुद्‌गणांनो आणि विश्वदेवतांनो, तुम्ही पापमय साधनांपासून आमचें रक्षण करा. वरुण, मित्र, अग्नि, सोम वायु आणि पर्जन्य आमच्यावर कृपा करोत.

## ९४. सांमनस्यम् (मनानें एक होणे)

विरोधी विचार करणाऱ्या मानवांनो तुमच्या मनांतील विरुद्धता मी नाहीशी करतो. तुमच्या विरोधी कृतींचा नाश करतो. तुम्ही एक-मेकाला अनुकूल व्हाल असे मी करतो. तुम्ही एकचित्तानें या आणि माझ्या कार्यात मन लावून काम करा. द्यौ आणि पृथ्वी यांच्यामध्यें देवी सरस्वती आहे. इंद्र आणि अग्नी यांच्या कृपेनें मला इच्छित फलाची प्राप्ति होते.

## ९५. कुष्ठौषधिः (कोडावरील औषध)

देवतांचें निवासस्थान असलेला हा अश्वत्थ वृक्ष आहे. त्याच्यापासून देवांनीं गुप्त ज्ञान प्राप्त केलें. हिरण्यवर्णाची नौका स्वर्गात संचार करते. तिच्या योगें कुष्ठरोगाचा शोध लागला. हे अग्ने, ज्या औषधींमध्यें रस आहे त्यांमध्ये तूं गुप्त रूपानें राहतोस. हिमालयातील शीतल औषधी मध्येंदेखील तूं गुप्त रूपानें राहतोस. तूं या कुष्ठरोग्यास बरे कर.

## ९६. चिकित्सा (रोगनिदान)

ज्यांमध्ये रस आहे, जो रस वीर्य प्रदान करतो, बृहस्पति ज्या औषधांच्या योगानें पापमूलक रोग नाहीसा करतो त्या सर्व औषधी वनस्पतीमध्यें सोम श्रेष्ठ आहे. मिथ्या भाषण व देवतासंबंधीचें पाप यांच्यापासून मुक्त करणारें जलरूपी औषध मला शापमुक्त करो. इंद्रियांच्या व्यवहारामुळें, मन, वाणी आणि अन्य प्रकारें होणाऱ्या पापा-पासून सोम देवता, पितरांसाठीं हवी प्रदान करून आम्हाला पवित्र करो.

## ९७. अभिभूर्वीरः (विजयी वीर)

आम्ही विजयाची इच्छा करतो. आमच्या यज्ञामुळे शत्रू लांब जावो. यज्ञांतील अग्नि आणि सोम शत्रूला बाजूला करण्यासाठीं मला सामर्थ्य देवोत. मी त्यांना आहुती अर्पण करतो. हे मित्रावरुणांनों, आमची

ही आहुती तुम्हाला प्रसन्न करो. तुम्ही राजाला संतुष्ट करा म्हणजे राजा प्रजेला संतुष्ट करील. या पापदेवतेला लांब घालवा. पराजयरूपी पाप शत्रूकडे जाऊ दे. हे सैनिकांनो, या ऐश्वर्यवान, शत्रुजेत्या आणि शत्रूचें गोधन आपल्या स्वाधीन करणाऱ्या राजाच्या मागून तुम्ही वीरश्रीसह जा.

**९८. अजरं क्षत्रम्** (अक्षय्य क्षात्रतेज)

इंद्राप्रमाणें या संग्रामात पदार्पण केलेल्या राजाला जय प्राप्त होवो. हा राजा अन्य राजांपेक्षा महान आहे. हे इंद्रा, तुझ्या महानतेमुळें शत्रू पराजित होतात आणि राजा आपल्या प्रजेसह चिरकाल जिवंत राहातो. हे इंद्रा, तू सर्व दिशांचा स्वामी आहेस. संपूर्ण पृथ्वी तुझ्या नियंत्रणांत राहाते. तू पर्जन्यवृष्टी करतोस आणि प्राणिमात्रांच्या जीवनाला साथ देतोस.

**९९. संग्रामजयः** (युद्धातील जय)

हे इंद्रा, तूं शक्तिशाली, सर्व धनांचा स्वामी, विजयसाधनांचा ज्ञाता आणि अनेक नावांनीं ओळखला जाणारा वीर आहेस; त्यामुळें संग्रामापूर्वी आम्ही तुला आवाहन करीत आहोत. शत्रूची शस्त्रें आमच्यावर प्रहार करण्यास सिद्ध आहेत. इंद्राचे बाहू आमचे रक्षण करोत. हे सवितृदेवा आणि सोमा, आम्हाला विजयी करून आमचें मनही मोठें करा.

**१००. विषदूषणम्** (विषाची निंदा)

सर्वप्रेरक सूर्य, स्थावर आणि जंगम पदार्थातील विष दूर करो. इंद्रादि देव आकाश आणि पृथ्वी विषशून्य करोत. इडा, सरस्वती आणि भारती, आम्हाला विषनाशक औषधी प्रदान करोत. हे देवगणांनों, तुम्ही सिंचन केलेल्या पाण्यानें ही जमीन निर्विष होवो. माती देवद्वेषी असुरांची कन्या, देवतांची भगिनी आणि पृथ्वी व अंतरीक्ष यांपासून उत्पन्न झाली आहे ती स्थावर–जंगम निर्विष करो.

**१०१. वाजीकरणम्** (उत्पत्तीसमर्थ करणें)

हे पुरुषा, तूं बैलाप्रमाणें वीर्य सिंचन करणारा, पुष्ट शरीरयुक्त

हो. तुझ्या योग्य पत्नी तुला प्राप्त होवो. ज्या रसानें बलवान पुरुष वीर्यवान बनतो त्याच रसानें रोगी पुरुष रोगमुक्त होतो. हे ब्रह्मणस्पते, त्या रसानें या पुरुषाचे अंग-पुष्ट वीर्यवान, सेचनसमर्थ आणि बैला-प्रमाणें प्रसन्नपणें आपल्या पत्नीकडे कामयुक्त होऊन जावो.

१०२. **अभिसांमनस्यम्** (एकमेकांच्या इच्छेप्रमाणें काम करणें)

शिकविलेला घोडा ज्याप्रमाणें मालकाच्या इच्छेप्रमाणें त्याला अनुसरतो त्याप्रमाणें माझी पत्नी माझ्या मनाप्रमाणें वागून माझ्या स्वाधीन राहो. हे स्त्रिये, घोडयाचा स्वामी, घोडयाला ज्याप्रमाणें आपल्याकडे खेचून घेतो आणि वायूनें झाडाचें निखळलेलें पान वायूच्या मनाप्रमाणें चालतें त्याप्रमाणे तूं माझ्याकडे आकर्षित होऊन रहा. त्रिक्कुट पर्वतावर उत्पन्न होणारें नीलांजन, मधुकूट आणि वाळाचूर्णानें मी तुला विलेपन करतो.

१०३. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

हे शत्रूच्या सैनिकांनों, बृहस्पति, सविता, अर्यमा, भग आणि अश्विनीकुमार यांनी निर्माण केलेल्या पाशामध्यें तुम्ही बद्ध व्हाल. तुमच्या जवळच्या दूरच्या अगर मध्यें उभ्या असलेल्या सेनेला या पाशांनी जखडून टाकलें आहे. हे इंद्रा, या सेनापतींना बाजूला कर. हे अग्ने, शत्रूला बद्ध कर. ध्वजा फडकावीत चाल करून येणाऱ्या सैन्याचा दुरूनच इंद्रानें पराभव केला आणि अग्नीनें त्याला बद्ध केलें.

१०४. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

शत्रूला आदान आणि संदान नामक पाशांत बद्ध केलें आहे. त्यांचे प्राण त्यांच्या जीवनापासून निराळे होऊ पाहत आहेत. कारण या पाशांवर अभिचार प्रक्रियेनें इंद्रानें तीक्ष्णतेची क्रिया केली आहे. हे अग्ने युद्धातील आमच्या शत्रूला तूं बद्ध कर. आम्ही तुला दिलेल्या हवीनीं अग्नि आणि इंद्र प्रसन्न होवोत. ते सोम आणि मरुतगणांच्या साहाय्यानें आमच्या शत्रूला बद्ध करोत.

**१०५. कासशमनम्** (खोकल्याचा त्रास नाहीसा करणें)

दूर असलेल्या ज्ञात विषयाकडे मन ज्याप्रमाणें वेगानें धांवतें त्याप्रमाणें, खोकला आणि कफादि रोग निर्माण करणाऱ्या कृत्ये तूं दूर देशांत निघून जा. धनुष्यांतून सुटलेला तीक्ष्ण बाण ज्याप्रमाणें जमीन देखील भेदतो त्या प्रकारें बाणांनी उजाड केलेल्या भूमीकडे तूं जा. सूर्याचे किरण वरच्या लोकांत आणि पर्वतावर वेगानें पोहोचतात. त्याप्रमाणें तूं समुद्राचे विविध प्रवाह असलेल्या देशांत निघून जा.

**१०६. दूर्वाशाला** (दुर्वांची वसती)

हे अग्ने, जलगर्भ भूमीवर दूर्वा उत्पन्न होवोत आणि जलपूर्ण तलाव कमलयुक्त होवो. आमचें घर जलसमृद्ध होवो. हे अग्ने, आपल्या ज्योती तूं आवरून धर. दूर्वामय भूमे, तूं शीतगर्भ आणि जलगर्भ आहेस. अग्नीनें आमचें घर नाश होणार नाहीं असें कर.

(ज्या ठिकाणीं आपोआप दूर्वा वाढतात त्या जमिनीच्या वरच्या स्तरांत पाणी असतें. दूर्वा शीतल आहेत. शरीरांतील आणि जखमांच्यामुळें होणारा दाह, दुर्वांच्यामुळें नाहीसा होतो.)

**१०७. विश्वजित्** (विश्वावर जय मिळविणें)

संसारावर नियंत्रण ठेवणारी, पुत्रपौत्र, पशुपक्षी आणि नोकरचाकर यांचे रक्षण करणारी, सर्व प्रकारचें कल्याण करणारी, मंगलमयी विश्वजित देवता आमचें रक्षण करो. सर्वज्ञ आणि कार्यज्ञ देवते, तूं आमचें रक्षण कर आणि आमचें कल्याणही कर.

**१०८. मेधावर्धनम्** (बुद्धिवर्धन)

हे वेदधारिणी मेधा देवते, सर्व देव आणि मनुष्य तुला पूज्य मानून तुझी पूजा करतात. सूर्याचे किरण ज्याप्रमाणे सर्व प्रापंचिक वस्तूंना स्पर्श करून त्यांच्यामध्ये शक्ती निर्माण करतात त्याप्रमाणें तुझ्या स्पर्शानें आम्ही सर्व शक्तिव्याप्त होऊं. यज्ञाच्या आहुतीनें तू प्रसन्न होतेस. त्या आहुतीसाठी तूं ये. बुद्धिवर्धनाची इच्छा असणारा मी वेदांना शिरोधार्य मानतो. वेदयुक्त ब्रह्मण्वती, ब्रह्मसेविता, ब्रह्मजुत, अतींद्रियदर्शी,

वसिष्ठादि ऋषींनीं प्रशंसा केलेली, वेदविहित आचरणाच्या ज्ञानासाठी गुरुकुलांत राहाणाऱ्या ब्रह्मचारी विद्यार्थ्यांच्या बुद्धिवर्धनासाठी, अध्ययनासाठी आणि रक्षणासाठीं इंद्रादि देवतांना आवाहन करतो. जी बुद्धी ऋभुला ज्ञात आहे, जिला दानव, देव आणि ऋषी जाणतात ती बुद्धी साधकांमध्यें प्रतिष्ठित होवो. ज्या बुद्धीचें वैभव मंत्रद्रष्टे सामर्थ्यवान कौशिक कश्यपादि ऋषी पृथिव्यादि भूतांचे रक्षण करण्यासाठीं ही बुद्धी उपयुक्त असल्याचें जाणतात. मी त्या मेधा देवतेची तीनही काळीं स्तुती करतो. सूर्याचे किरण संपूर्ण दिवस ज्याप्रमाणें सूर्याजवळ राहतात त्याप्रमाणे स्तुतीरूप वचनांच्या साहाय्याने मी मेधा देवतेजवळ राहातो.

## १०९. पिप्पली भैषजम् (पिंपळी औषधी वनस्पती)

(पिंपळी अतीव गुणकारी औषधी आहे. शरीरस्वास्थ्यासाठीं या औषधीचा उपयोग केला जातो. विशेषतः कफनाशक, ज्वरनाशक, गर्भसंकोचक, अंग लुळे पडणें, हृदयसौष्ठवावर, मेंदूचे उत्तेजन यासाठी याचा मोठा उपयोग आहे.)

पिंपळी ही औषधी देवनिर्मित, वातादि रोग नाहीसे करणारी, सर्व रोगांना बांधणारी आणि प्राणिमात्राचे शरीर स्थिर ठेवणारी आहे. हस्ती-पिंपळी ज्या मनुष्याच्या शरीरांत औषधी म्हणून प्रवेश करते त्या प्राण्याच्या शरीराचा नाश होत नाही. हे पिंपळी, दानवांनी तुला जमिनीत पुरून टाकलें होतें परंतु जनकल्याणासाठी देवांनी तुला बाहेर काढलें.

## ११०. दीर्घायुः प्राप्तिः (दीर्घायुष्याचा लाभ)

हे अग्ने, तूं अति प्राचीन असून सर्व यज्ञांत तुलाच आवाहन करतात. कारण तू चिरंतन आहेस. प्रत्येक यज्ञाच्या वेळीं तूं नवीन रूपानें यज्ञांत येतोस. ज्येष्ठा नक्षत्रावर जन्मलेला पुत्र मोठ्या भावाला मारणारा आणि मूळ नक्षत्रावर जन्मलेला पुत्र कुटुंबनाशक होतो. या पापी नक्षत्रांपासून यम आणि अन्य सर्व देवता या बालकाला मुक्त करून शतायुषी करोत. क्रूर नक्षत्रावर जन्मलेला हा पुत्र वीर्यवान आणि मोठा झाल्यावर आपल्या मातापित्यांना कष्ट न देणारा अगर न

मारणारा होवो.

१११. **उन्मत्ततामोचनम्** (उन्मत्तता नाहीशी करणे)

हे अग्ने, पापानीं बद्ध झालेला हा पुरुष बडबड करू लागला आहे. या रोगापासून याचे रक्षण कर. तो तुला अधिक हवि देत आहे. उन्मत्ततेपासून याचे रक्षण कर. हे पुरुषा, तुझ्या उन्मत्ततेच्या रोगाला अग्नि दूर करील. तुझे मन विकृत होत आहे. मला ज्ञात असलेल्या औषधानें मी तुला मुक्त करतो. देवकृत उपघात किंवा ब्रह्मराक्षसाच्या वर्चस्वामुळे तूं उन्मत्त झाला असलास तर ज्ञाता पुरुष तुझ्या जवळ येताच तो हा उन्मत्तपणा नाहींसा करील. हे पुरुषा, अप्सरांनी तुझा उन्माद नाहीसा केला आहे. इंद्र भग आणि अन्य देवतांनी देखील तुझा उन्माद दूर करून तुला मुक्त केले आहे.

११२. **पाश-मोचनम्** (बंधनातून मुक्तता)

हे अग्ने, तूं शांतिउपायांचा ज्ञाता आहेस. या पिशाच्चांपासून तूं मुक्तता कर. माता, पिता, पुत्र, पितर यांच्यामध्यें मोठ्याच्या आधी धाकटयाचें लग्नादि संस्कार करण्यानें जे दोष निर्माण झाले असतील ते तूं दूर कर. ज्या पाशामध्यें जखडल्यामुळें पुरुषाचें अंग विकल होते त्या पाशाची, भ्रूणहत्यादि दोष आणि श्रोत्रियांच्या हिंसेचा दोष तूं दूर कर.

११३. **पापनाशनम्** (पापाचा नाश करणें)

देवतांनीं निर्माण होणारें पाप त्रिताच्या मनामध्यें प्रस्थापित केलें. त्रितानें सूर्योदयानंतर झोपणाऱ्या मनुष्यांच्यामध्ये हें पाप ठेवलें. हे पाप मी मंत्रशक्तीनें दूर घालवतो. परिवेदनापासून निर्माण झालेलें पाप टाकून देऊन अग्नि आणि सूर्य यांच्या प्रकाशांत तू समाविष्ट हो. धूर किंवा मेघ यांच्या आवरणांत पाप राहतें. ते पाप नदीच्या पाण्यांत निर्माण होणाऱ्या फेसाच्या रूपानें गोचर होतें. हे पाप मनुष्यमात्रांमध्यें प्रविष्ट होते. या पापाचा देवता आणि ब्राह्मणद्वारा नाश कर.

### ११४. उन्मोचनम् (राग नाश)

ज्या पापानें देवता रुष्ट होतात आणि त्यांचा राग मनुष्यांच्या इंद्रियांमध्ये प्रवेशतो ते पाप या यज्ञाच्या द्वारा मंत्रादि साधनांच्या प्रभावानें नष्ट होवो. हे अदितिपुत्रांनों, यज्ञरूपी सत्य आणि चिंतनयोग्य परब्रह्म द्वारा घातक कर्माचा नाश होवो. हे अग्नें, तू यज्ञसंपन्न करण्यास समर्थ आहेस. आम्ही यज्ञ करण्याची इच्छा करतो. आमचा या पापापासून वचाव करा. हे विश्वेदेव, आम्ही तुला घृताची आहुती देऊन यज्ञ करीत आहोत. त्याच्या आड येणाऱ्या पापाला तू दूर घालव.

### ११५. पापमोचनम् (पापापासून सुटका करणें)

हे विश्वेदेव, कळत न कळत केलेल्या पापापासून आमचें रक्षण कर. जागेपणीं अगर झोपेमध्ये आमच्याकडून जे पाप झाले असेल आणि होणार असेल त्यापासून आमची सुटका कर. घामानें चिंब झालेला मनुष्य स्नानानें ज्याप्रमाणें शरीराचा बाहेरील मळ नाहीसा करून शुद्ध होतो किंवा पवित्रानें किंवा गाळण्यानें ज्याप्रमाणे तूप शुद्ध बनते त्याप्रमाणें पाप निघून गेल्यावर मी शुद्ध होईन.

### ११६. मधुमदन्नम् (चवदार अन्न निर्माण करणें)

कृषि कर्म करणारे शेतकरी अज्ञानाने जमीन खोदण्याचें काम करतात. त्यामध्ये निर्माण होणाऱ्या दोषाच्या परिमार्जनासाठीं मी घृत, व मद्य यांच्या आहुती देत आहे. त्यांपासून मधुर चवीचें अन्न मला प्राप्त होवो. सूर्यपुत्र यम यज्ञांतील आपला हविर्भाग घेऊन आम्हांला, घृत, क्षीरयुक्त प्रदान करो. अपराधी लोकांचे पाप शांत करो. माता-पिता, बंधू, पुत्र यांच्यापासून उत्पन्न झालेलें पाप यम शान्त करो.

### ११७. आनृण्यम् (कर्जमुक्ती)

भूक व तहानशमनार्थ असलेलें ऋण मी परत करू शकलो नाही. या ऋणामुळें मी यमाच्या नियंत्रणांत आहे. हे अग्ने, तुझ्या कृपेनें मी या ऋणांतून मुक्त होईन. या लोकी राहतांना मरणापूर्वी आम्ही आमची ऋणे परत केली पाहिजेत. जीवनासाठी आम्ही जें धान्यादि ऋण घेतलें

असेल त्यांतून हे अग्ने तूं आम्हास मुक्त कर. हे अग्ने, केवळ तुझ्या कृपेने लौकिक आणि पारलौकिक ऋणांतून मुक्त होऊ शकेन आणि देहत्यागानंतर स्वर्गात मी अनृणी म्हणून जाऊं शकेन. नाकपृष्ठ, देवयान आणि पितृयान मार्गावर अनृणी म्हणून मी पाऊल टाकीन.

## ११८. आनृण्यम् (कर्जमुक्ती)

हात, पाय वगैरे इंद्रियांच्यामुळें जे पाप घडलें आणि त्या पापासाठी जें कर्ज झालें, त्याचप्रमाणें उग्रपश्या व उग्रजिता नामक अप्सरांच्या विषयप्रवृत्त पापानें जें ऋण झाले ते ऋण नाहीसे होवो. त्याचप्रमाणें ऋणदात्याचा पाश नाहीसा कर. वस्त्र, सुवर्ण आणि धान्यदिकांसाठी कर्ज घेण्यासाठीं मी ज्याच्या जवळ जाईन ते मला परत न पाठवोत.

## ११९. आनृण्यम् (कर्जमुक्ती)

मी घेतलेलें कर्ज परत करण्यास मी समर्थ नसल्यानें, सर्व प्राणिमात्रांचे कल्याण करणारा अग्नि मला उत्तम गति देवो. लौकिक ऋण परत करण्याची मी वैश्वानर अग्नीच्या समोर प्रतिज्ञा करतो. कारण ऋणपाशांतून कसें मुक्त करावे याचे ज्ञान त्याला आहे. त्यामुळें मी कर्जमुक्त होऊन स्वर्गफल प्राप्त करीन. मी यज्ञ करीन. वैश्वानर अग्नि मला पवित्र करील. देवांच्या प्रसादाची मी इच्छा करतो. कारण यज्ञादि ऋणातून मी मुक्त झालो नाहीं. असत्यापासून जें पाप घडलें असेल ते यज्ञद्वारा मी दूर करतो.

## १२०. सुकृतस्य लोकः (उत्तम गति)

अंतरीक्ष, पृथ्वी आणि द्युलोक यामध्यें राहाणाऱ्या प्राण्यांची हिंसा, आई-वडील यांच्या मनाविरुद्ध आचरण केल्याने होणारी हिंसा ही दोन्ही पापें गार्हपत्य अग्नि प्रसन्न झाल्यावर नाहीशी होऊन तो मला उत्तम गति प्रदान करील. पृथ्वी आणि देवमाता अदिति आमची आई असून अंतरीक्षांत राहाणारे प्राणी बंधुसमान आहेत. पापापासून ते आमचे रक्षण करतील. द्यौ आमचा पिता आहे. तो आमचा ऋणदोष नाहीसा करील. दुष्कर्म करणाऱ्या स्त्री बरोबर राहून मी स्वर्गातून भ्रष्ट होण्याची

इच्छा करीत नाही. विशाल परकल्याणी मनाच्या आणि यज्ञादि पुण्य-कर्मं करणाऱ्या पुरुषांना रोगमुक्त होऊन स्वर्ग प्राप्त होतो. आम्ही देखील पुण्यकर्मानें स्वर्गाची प्राप्ती करूं.

१२१. **सुकृतलोकप्राप्ति** : (उत्तम गतीची प्राप्ती)

हे निर्ऋति देवी आणि वरुणा, उत्तम, मध्यम आणि अधम अशा मृत्युपाशातून आमची सुटका करा. दुःस्वप्नजनित पापापासून दूर करून आम्हास स्वर्गप्राप्ती होईल असे करा. गार्हपत्य अग्नि मला निरनिराळ्या राजबंधनांपासून मुक्त करो. रागरूपी बंधनापासून, पिचृत नामक मूल-नक्षत्राच्या बंधनापासून आणि मृत्युभयापासून आमची मुक्तता करो. अशा बंधनानीं पीडलेल्या पुरुषाला, बंधनातून मुक्त करून ज्याप्रमाणे शिशु मातेच्या गर्भापासून मुक्त होऊन क्रिया करतो त्याप्रमाणे आचरण करो.

१२२. **तृतीय नाकः** (तिसरा स्वर्ग)

हे विश्वकर्मा, तूं सर्वांच्या पूर्वी उत्पन्न झालास. तुला जाणणारा, स्वतःच्या संरक्षणासाठीं आणि वृद्धत्वापर्यंत निरोगी आयुष्य लाभावे म्हणून तयार केलेले हविरन्न तुला प्रदान करतो. पित्याचे कर्ज पुत्र परत करून मुक्त होतो. परंतु ज्याला पुत्र नाहीं परंतु कर्ज परत करण्याची प्रखर इच्छा आहे तो देहपातानंतर कर्जातून मुक्त होतो. हे दांपत्यांनो, परलोकाचें स्मरण ठेवून नेहमी सत्कर्म करा. ब्राह्मणांना अगर यज्ञांत अग्नीला जें अन्न प्रदान करतां त्यांचें तुम्ही रक्षण करा. देवांकडे जाणाऱ्या मार्गानें जाण्यासाठीं मी महान यज्ञाच्या योगें प्रयत्न करतो. हे अग्ने, तुझ्या कृपेनें वृद्धावस्थेपर्यंत, या लोकीं राहून, जीर्ण झालेल्या देहाचा त्याग करून, दुःख-शोकाच्या पलीकडे असणाऱ्या स्वर्गात जाऊन मी सुखी होईन. यज्ञांतील ऋत्विजांच्या हातावर धुण्यासाठीं मी पाणी घालतो. या कार्यात मी ज्या पदार्थाची इच्छा करतो तो पदार्थ मरुता-सहित इंद्र आम्हाला प्रदान करतो.

१२३. **सौमनसम्ः** (सम-मनःस्थिती)

हे देवगणांनो, तुम्ही यजमानांच्या सहित स्वर्गांत राहतां. मी

तुम्हाला हा हवि अर्पण करतो. हा निधी अग्नीच्या द्वारा तुम्हाला प्रदान करतो. या हविर्दानानंतर कुशलतापूर्वक मी स्वर्गांत प्रवेश करीन. तुम्ही यजमानाला विसरू नका. हे देवतांनो, तुम्ही यजमानाला ओळखता. त्याला स्वर्ग लोकात उत्तम स्थान द्या. हवि प्रदान केल्यावरोवर यजमान या ठिकाणीं येईल. वसु, रुद्र आणि आदित्य अनुक्रमे माझे पिता, आजोवा, आणि पंजोवा आहेत. मी दानादि कर्मे करतो. आमच्या पुत्रादिकांनी केलेल्या श्राद्धादि कर्मांच्या योगें निर्माण होणारें फल मला प्राप्त व्हावे. हे सोमा, तू आमचे अपराध विसरून जा. आम्ही केलेल्या कर्माचे फळ म्हणून मला स्वर्गाची प्राप्ती होवो. हे देवगणांनों, तुम्ही मोठ्या मनाचे आहांत.

१२४. **निर्ऋत्यपस्तरणम्** (पापदेवतेला दूर करणे)

अंतरीक्षांतून माझ्या शरीरावर जे जलविंदू पडले त्यांनी आणि गायत्र्यादि अनुष्ठानानें मी पुण्यफलाचा स्वामी होईन. पावसाचा एक थेंव वृक्षाच्या पुढच्या वाजूस उभ्या असलेल्या माझ्या अंगावर वायूच्या प्रभावानें पडला. तो ज्या अवयवाला अगर वस्त्राला स्पर्श करून गेला त्या ठिकाणच्या पापदेवतेचा वास नाहींसा झाला. पावसाचें पाणी सुगंध, संपन्नता आणि अलंकारांचें कारण आहे. हे पाणी पवित्र करणारें असल्यानें या जलस्पर्शानें पापदेवता अगर शत्रू आमच्यापासून दूर जातात.

१२५. **वीरस्य रथः** (वीर-पुरुषाचा रथ)

वृक्षापासून तयार झालेल्या रथा, तू शत्रूला पार करणारा आमचा मित्र आहेस. चर्मवंधनांनीं तुला वद्ध केल्यानें तूं युद्धास योग्य आहेस. तुझ्यावर आरोहण करणारा शत्रूवर विजय मिळवितो आणि सुवर्ण आणि राज्याची प्राप्ती करतो. या रथाने आकाश आणि पृथ्वीपासून वल प्राप्त केले आहे. पावसाच्या पाण्यानें वाढणाऱ्या वनस्पतीचें वल या रथाला मिळाले आहे. चर्मवंधनांनी युक्त असलेला हा रथ इंद्राच्या रथाप्रमाणे गतिवान झाला आहे. घृतादि हविरन्नांनी रथाची सेवा केली पाहिजे. हे रथा, तूं म्हणजे इंद्राचा पराक्रम, मरुद्गणांचें वल मित्रगर्भ आणि वरुणाचा अवयव असल्यानें तूं आमचे यज्ञरुपी हवि

ग्रहण कर.

१२६. **दुंदुभीः** (नगारा)

हे दुंदुभी, आपल्या नादानें तूं आकाश आणि पृथ्वी भरून टाक. अनेक ठिकाणीं राहाणारे प्राणी तुझा आवाज ऐकतील. तूं युद्धस्वामी इंद्र, त्याचा मित्र मरुद् यांच्या साहाय्यानें शत्रूला पळवून लाव. शत्रूचे रथ, घोडे, हत्ती, आणि पदाति यांना पराभूत करण्यासाठीं मोठा नाद कर. शत्रूला तुझा नाद दुःखद वाटो. आमचा पराभव करणाऱ्या शत्रूला तूं आपल्या नादानें दूर कर. हे इंद्रा, या शत्रूसेनेवर तूं विजय प्राप्त कर. आमचे सेनापति, मंत्री आणि राजा देखील रथारूढ होऊन या युद्धांत जय मिळवोत.

१२७. **यक्ष्मनाशनम्** (क्षय नाश करणें)

पळस, कुडा आणि अडुळसा नांवाच्या वनस्पतींनों, वलक्षय करणारे कफ, श्वास, त्वचा रोग यांना तुम्ही दूर करतां. या औषधीचा मी ज्ञाता आहे. पायापासून मस्तकापर्यंत पसरणारी विषमयता, हात, पाय, कान आणि नेत्रांना अधिक त्रास देते. या औषधीच्या प्रभावानें मी त्या रोगाला घालवून देतो.

१२८. **राजा** (राजा)

शकधूम नांवाचा अग्नि नक्षत्रांचा राजा चंद्र बनला. प्रातःकाल, दुपार आणि संध्याकाळ त्याचप्रमाणें रात्र, दिवस, सत्तावीस नक्षत्रें यांना अलग करणारा सूर्य आमचें भलें करो. शकधूम—चंद्र, सूर्य आणि सोम यांना आम्ही वन्दन करतो.

१२९. **भगप्राप्तिः** (ऐश्वर्यप्राप्ती)

भग देवतेमुळें मला ऐश्वर्य लाभलें. इंद्र माझ्या सेवेमुळें प्रसन्न झाला आहे. त्याच्या कृपेनें मी भाग्यवान झालो. हे औषधी, भगदेवतेमुळें तू ज्या तेजाने वनस्पतीना दूर करतेस त्या तेजानें मला समृद्ध बनविलें. भग देवता अंधाप्रमाणें मार्ग क्रमण करीत ज्या वस्तूंना स्पर्श करते त्यामुळे मी भाग्यवान होतो. माझे शत्रू परत जावोत.

## १३०. स्मरः (मदन)

रथाच्या वेगाने जिंकली जाणारी अप्सरा जो काम निर्माण करते तो दूर होवो. तिचा प्रभाव माझ्यावर पडणार नाहीं. माझे प्रियजन माझें स्मरण करोत. मी त्यांचे स्मरण करीन. देवांनो आणि मरुतांनों, या कामाला तुम्ही उन्मत्त केलेंत तरी त्याचा माझ्यावर प्रभाव न पडो.

## १३१. स्मर (काम)

पायापासून मस्तकापर्यंत हा काम ज्या व्यथा निर्माण करतो त्यांना मी मागे हटवितो. देवांनों, या कामाला माझ्यापासून दूर करा. हे अनुमतीं, तूं मला अनुकूल हो. हे संकल्पा, तूं माझा नमस्कार स्वीकार. जो तीन योजनेपर्यंत धावत जाऊन परत येतो किंवा अश्वांच्या साह्याने पांच योजनें जाऊन परततो तो आमचा पिता होय.

## १३२. स्मर (काम)

सर्व प्राणिमात्रांच्या शरीरांत कामदेवाला अभिषेक करून राज्य प्रदान केलें. तरुणाच्या योगानें मी या कामाला संताप निर्माण करतो. विश्वदेवांनी कामावर जलाभिषेक केला. इंद्राणीनें मानसिक व्यथेमध्यें कामदेवाला पाण्यानें स्नान घातलें. त्या कामाला मी संतप्त करतो. मित्रावरुणांनीं ज्या कामाला अभिषेक केला त्याला मी संतप्त करतो.

## १३३. मेखलाबन्धनम् (कमरेला दोरी वांधणें)

शत्रूची हिंसा करण्यासाठीं या दोरीची निर्मिती करण्यांत आली आहे. जो या मेखलेचा उपयोग अभिचार कर्मांत करतो त्यापासून माझीं मुक्तता व्हावी. देवतेच्यामुळें आम्ही आमची सर्व कर्में पूर्णत्वास नेतो आणि शत्रूला घालवून आम्ही शत्रुहीन वनतो. आहुतीच्या योगें सिद्ध झालेल्या मेखले, तू ऋषींचे अस्त्र आहेस. शत्रूंचा संहार करणारी आणि दुग्धपान करणारी आहेस. मी व्रतवद्ध, तपोनिष्ठ आणि ब्रह्मचारी आहे. माझ्या अभिचार कर्मांनीं शत्रूचा नाश होईल. म्हणून या मंत्रसिद्ध मेखलेनें त्यांना वद्ध मी करतो. आस्तिक्य हे वुद्धीचें नांव आहे. श्रद्धेची कन्या मेखला ब्रह्मदेवाच्या तपापासून निर्माण झाली आहे. हे

मेखले, आम्हांला भविष्यांतील गोष्टीचे ज्ञान होईल असें सामर्थ्य प्रदान कर. आमचें आत्मबल वृद्धिगत कर. हे मेखले, ऋषींनी तुझा उपयोग केला होता. तूं मला अभिचार कर्मांपासून मुक्त करून दीर्घायुषी कर.

## १३४. शत्रूनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

हा दण्ड वज्राप्रमाणें शत्रूला रोखून धरील. शत्रूचे राज्य नष्ट करील. इंद्रानें ज्याप्रमाणें वृत्राचा गळा व बाहूं कापले त्याप्रमाणें हा दण्ड शत्रूचे गळे आणि दण्ड कापून टाकील. सर्वांत मोठा अगर लहान शत्रू पृथ्वीवर पडल्यावर परत उठणार नाहीं. हे दण्डा, आम्हाला त्रास देणाऱ्या शत्रूचा तूं संहार कर किंवा त्याला सीमापार कर.

## १३५. बलप्राप्तिः (वल प्राप्त करणें)

इंद्रानें ज्याप्रमाणें वृत्राचे बाहू तोडले त्याप्रमाणे शत्रूचे बाहू तोडण्यासाठीं लागणारें बल मला अन्नाच्या सेवनाने मिळते. बलामुळें अस्त्राचा उपयोग करता येतो. मी जे पाणी पितो त्यायोगें शत्रूच्या शरीरातील सर्व रस मी कर्षण करतो. प्राण, अपान, व्यान आणि नेत्र यांतील तेज काढून घेऊन मी शत्रूला शेवटीं पाडतो.

## १३६. केशदृंहणम् (केशवर्धन)

हे औषधी (आवळा अगर माका) तूं पृथ्वीवर उत्पन्न होऊन अनेक शाखांनी वहरतेस. केंस घट्ट करण्यासाठीं आम्ही तुला तोडून आणतो. तूं केंस दृढ कर. ज्या ठिकाणी केस आलेले नाहींत त्या ठिकाणी तूं उत्पन्न कर. केसांचीं वाढ होण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांनों, या औषधीमुळें केसांचे रोग दूर होतात.

## १३७. केशदृंहणम् (केशवर्धन)

महर्षि जमदग्नीनी आपल्या कन्येचे केंस मोठे व्हावेत म्हणून जी औषधी आणली ती कर्चुर नांवाची औषधी वीतहव्य नांवाच्या ऋषीनें मिळविली. केंस वाढण्याची इच्छा असणाऱ्या व्यक्तीनें हाताच्या बोटांनी प्रथम आपले केस विंचरावेत. या औषधीच्या साहाय्यानें केसांची मुळें निरोगी आणि दृढ होतात आणि वाढतात.

## १३८. क्लीबत्वम् (नपुंसकत्व)

लतांमध्यें सर्वश्रेष्ठ असलेल्या औषधी, माझ्या शत्रूला वीर्यहीन करोत. माझा शत्रू नपुंसक होवो. त्यांना स्त्रीत्व प्रदान कर. शत्रूकडील पुरुषांच्या प्रजनक्षम अंडकोषांचे चूर्ण कर. वीर्यवाहिनी नाडीला साथ देणारा अंडकोश कुसकरून टाक. शत्रूचे जननेंद्रिय ठेचून ते कृतिशून्य करून टाक.

## १३९. सौभाग्यवर्धनम् (सौभाग्यवृद्धि)

हे सहस्रापर्णी, तूं दुर्भाग्य लक्षणांना दूर करतेस. तूं मला सौभाग्यवान कर. तू अनेक शाखा आणि सहस्रपर्णयुक्त आहेस. तूं माझी कामुकता नाहीशी करतेस. तूं पीतवर्णी आहेस. तुझ्या फळांची आहुती दिल्यास पतिपत्नीचे हृदय अभिन्न करतेस. तहान लागलेल्या माणसाचें तोंड ज्याप्रमाणें शुष्क होतें त्याप्रमाणें स्त्री-पुरुष वियोगाग्नीच्या मुळे शुष्क होतात. ज्याप्रमाणें मुंगूस सापाला छिन्नविच्छिन्न करून पुन्हा जोडतें (यथा नकुलो विच्छिद्य संदधात्यहिं पुनः) त्याप्रमाणें ही शक्तिशाली सहस्रपर्णी वियोगी स्त्रीपुरुषांना एकत्रित आणते.

## १४०. सुमंगलौदन्तौ (मंगलमय दोन दांत)

जन्मतः निर्माण झालेले वरचे दांत अपत्याच्या मातापित्यांना भक्षण करतात. हे मंत्राधिरूप अग्ने, या बालकाला तूं अहिंसक बनव. हे दातांनों तुम्ही उडीद, तीळ आणि धान्य भक्षण करा आणि या बालकाच्या मातापित्यांना नष्ट करूं नका. हे दांत आम्हाला मित्ररूप होवोत. हे बालक, त्याचे माता-पिता यांच्यापासून दुष्कर्म दूर जावो. हे अग्ने, या बालकाच्या मातापित्यांना तूं नष्ट करूं नकोस.

## १४१. गोकर्णयोलक्ष्यकरणम् (गाईंचे पालन)

हे वायो, तूं गाईंचे कळप एकत्र आण. त्वष्टादेव या गाईंचें पोषण करील. इंद्र त्यांच्या बरोबर प्रेमानें बोलेल आणि शत्रूला त्रास देणारा रुद्र या गाईंचे सर्व दोष नाहीसे करील. या गाईंचें पालन करणारा गाईंच्या वारसांमध्ये नरमादी भेदासाठी लाल रंगानें चिन्ह करतो.

अश्विनीकुमार देखील अशीच चिन्हे रेखाटतात. ती संतती-दायक असतात. देव-दानवांनीं पशूंच्या आणि मनुष्यांच्या कानावर चिन्ह निर्माण केलें आहे. हे अश्विनीकुमारांनों, तुम्ही असंख्य गाईंना पुष्ट करा.

## १४२. अन्नसमृद्धि (अन्नाची विपुलता)

हे यवा, तूं उंच हो आणि आपल्या फलांनीं सर्व पात्रें भरून टाक. वज्र तुला नष्ट न करो. आमचें शब्द ऐकून हे यवा, समुद्र ज्याप्रमाणें कधीही क्षीण होत नाही त्याप्रमाणें तूं क्षीण न होता अंतरीक्षापर्यंत वृद्धिंगत हो. तुझ्या जवळ येणाऱ्या आणि कार्य करणाऱ्या व्यक्तींना चिरंतन सौभाग्य लाभो. धान्याची रास वाढत जावो. या धान्याचा घरांत आणून उपयोग करणारा मनुष्य क्षयरहित होवो.



# सप्तम काण्ड

### १. आत्मा

ज्या प्रजापति इंद्र आणि अग्नि वगैरे देवतांची कीर्ती परा वाणीने वर्णिली त्या देवता आमच्या इच्छा पूर्ण करोत. परब्रह्म परमात्म्यानें प्रजापति ब्रह्मदेवाला प्रथम उत्पन्न केलें. तो आपले मातापिता, प्रकृति, द्युलोक आणि पृथ्वी यांचा ज्ञाता आहे. तो सर्व प्राणिमात्राना कर्माची प्रेरणा देतो. त्यानें पृथ्वी, अंतरीक्ष आणि आकाश व्यापले आहेत.

### २. आत्मा

प्रजापति, मातृगर्भ, पित्याचें वीर्य, नित्य तरुण, देवबंधु या नात्यानें रक्षण करतो. अशा या ब्रह्माचा अनुभव घेणाऱ्या मोठ्या माणसाचें नांव मला सांग.

### ३. आत्मा

हा प्रजापति कर्माचें फल प्रदान करणारा, आदरणीय, सर्वांच्या अंतरांत असलेला आणि यज्ञादि कर्माची प्रेरणा देणारा आहे.

### ४. विश्वप्राण: (विश्वाचा प्राण)

सर्वांना कार्यप्रेरणा देणारा, आवडीनें ज्यांना बोलावले जाते असे ब्रह्म आणि वायु आपल्या अकरा, बावीस किंवा तेहतीस घोड्यांच्या

रथांत बसून आमच्या यज्ञांत येऊन आमची मनकामना पूर्ण करोत आणि यज्ञांत आल्यावर परत न जावोत.

### ५. आत्मा

जो देवत्वाला प्रथम प्राप्त झाला त्यानें यज्ञाच्या रूपानें भगवान विष्णूंचें पूजन केलें त्यामुळें त्याला सुखमय स्वर्गलोक प्राप्त झाला. त्याठिकाणीं साधनासंपन्न देवगण रहात होते. यज्ञाचा प्रसार झाला, तो ज्ञानाचें साधन आणि देवतांचा स्वामी झाला. हा यज्ञ आम्हाला धन प्रदान करतो. हविरूप मनानें देवतांसाठी यज्ञ करण्यांत येतो त्यामुळे देहामध्यें परमात्मरूपी सूर्याचा उदय होऊन साधकाला प्रकाश लाभतो. हविरूप मनानें देवांचें पूजन करण्यापेक्षां आणखी मोठी साधना कोणती ? ज्ञान-यज्ञ हीच सर्वश्रेष्ठ साधना आहे. मूर्ख आणि अविचारी लोक कुत्रे आणि गाईंच्या अवयवांचें हवन करतात. ही गोष्ट निंद्य आहे. आत्मज्ञ, पुरुष परम ज्ञानाचा उपदेश करण्यास योग्य आहे.

### ६. अदिति

ही पृथ्वीच स्वर्ग, अंतरीक्ष, माता, पिता, पुत्र, देव व पंचजन आहे. जें उत्पन्न झालें आहे, होत आहे आणि होणार आहे ते या अदिति –पृथ्वीपासूनच होणार आहे. शुभकर्मं करणाऱ्यांचे कल्याण करणारी, क्षात्रतेजयुक्त, सत्यपालक, अविनाशी, विशाल, सुखदा, अन्नदा, देवमाता अदितीरूपी पृथ्वीला आम्ही आवाहन करतो. आमचें संरक्षण करणारी व आम्हाला सुखी ठेवणारी पृथ्वी नौकेप्रमाणें आम्हाला तारते. अन्नाची उत्पत्ती करणाऱ्या या पृथ्वीचे भूमाता म्हणून आम्ही गौरवगान करतो. तिच्या भोंवती विस्तृत आकाश आहे. ही पृथ्वीमाता आम्हाला तीन-पटीनें सुख प्रदान करो.

### ७. आदित्या : (आदित्य)

दैत्य गंभीर समुद्रामध्ये राहतात. त्यांना या ठिकाणाहून काढून देवत्वाचा अधिकार प्राप्त करून दिला जातो. कारण दैत्यांना अदैत्य बनविणे आवश्यक आहे.

## ८. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणे)

भौतिक सुखाची इच्छा असणाऱ्यांची इच्छा पूर्ण करण्यासाठी मला बल लाभो. या मार्गावर महान ज्ञानी देवगुरुंचे मार्गदर्शन लाभेल. या पृथ्वीवर राहणाऱ्या सर्व शत्रूंना दूर करून हे स्थल मी शत्रुहीन करीन.

## ९. स्वस्तिदा पूषा (मंगलकारक पूषा देवता)

सर्वांचे पोषण करणारी पूषा देवता पृथ्वी, स्वर्ग. आणि अंतरीक्ष यांना व्यापून राहाते. या सर्व ठिकाणी प्राण्याचें कल्याण करण्यासाठी ती जा ये करीत असते. त्यांच्या कर्मांची ती साक्षी असते. ती दिशांना जाणते. ती आम्हाला निर्भय मार्ग दाखवो. कल्याणकारक, तेजस्वी, बलवान आणि दोषशून्य सूर्य आम्हाला उन्नतीचा मार्ग दाखवो. हे पूषन्, तू सांगितलेल्या मार्गाचा आम्ही अवमान करणार नाहीं. आम्ही नेहमी धन, पुत्र, मित्र वगैरेंनी समृद्ध होऊं. आपले व्रत आम्ही पालन करून तुझी स्तुती करीत आहोत. हे पूषन्, या संसारात ज्या ठिकाणीं सर्वोत्तम धन असेल ते आम्हाला प्रदान कर. नष्ट झालेल्या वस्तू आम्हाला परत मिळोत आणि आम्हाला यांचा उपभोग घेता येवो.

## १०. सरस्वती (विद्यादेवता)

ही ऋचा ऋग्वेदांत १.१६४.४९ या ठिकाणीही आलेली आहे. नवजात बालकाला प्रथम दुग्धपान देताना हा मंत्र म्हणतात. यामुळे बालक विद्यावंत होतो.

यस्ते स्तनः शशयुर्यो मयोभूर्यः सुम्नयुः सुहवो यः सुदत्रः ।
येन विश्वा पुष्यसि वार्याणि सरस्वति तमिह धातवे कः ॥

हे देवि सरस्वति, संपत्तिदायक, संपत्तिवर्धक आणि संपत्तीच्या विनियोगाचे ज्ञान करून देणारा, उदार स्तन आमच्या बाजूला करून तू आम्हाला स्तनपान दे.

## ११. सरस्वती (विद्युत्)

अत्यंत विस्तृत, गर्जना करणारी, विश्वाला व्यापून टाकणारी,

अत्यंत गतिमान आणि अत्यंत प्रकाशमान असणाऱ्या विद्युत् देवते, आमची धनधान्ये नष्ट न होवोत. आमच्या माणसांना त्रास न होवो. सूर्याच्या प्रखर किरणांनी आमच्या शेतातील धान्याला हानी मिळणार नाही असे कर. आमची तुला ही प्रार्थना आहे.

### १२. राष्ट्रसभा

सभा आणि समित्याचे राजा कन्येप्रमाणे पोषण करतो कारण या दोघी राजाचे रक्षण करतात. राजाला त्या उत्तम मार्गदर्शन करतात. हे पितृदेवांनो, अशा सभेमध्यें विद्वत्तापूर्ण आणि नम्र भावाने मी बोलीन. हे सभे तुला नरिष्टा म्हणतात. तुझ्यामध्ये बसणारे सर्व सभासद समतापूर्वक भाषण करणारे असतात. ह्यामध्ये राज्य शासना-संबंधी विशेष ज्ञानाची चर्चा होते. हे सभासदांनो तुमचे या सभेच्या व्यतिरिक्त अन्यत्र जाणारे मन या सभेमध्ये एकत्रित होवो. तुम्ही आमचे म्हणणे ऐकून ह्यावर विचार करा.

### १३. शत्रुनाशः (शत्रूचा नाश)

सूर्य उदयाला येतांच, नक्षत्राचे तेज ज्याप्रमाणे हरण करून आपल्या प्रकाशांत मिळवून घेतो त्याप्रमाणे द्वेषभाव करणाऱ्या स्त्रीपुरुषांचे तेज हरण करतो. आमच्याकडे येणाऱ्या शत्रूचे तेज देखील मी सूर्याप्रमाणे हरण करतो.

### १४. सविता (सूर्य)

सर्व जगताचा रक्षणकर्ता, सर्वांचा उत्पादक, जगत्‌नियामक, ज्ञानी, सत्यप्रेरक, आनंद देणाऱ्या पदार्थांचा जनक, ध्यान करण्यास योग्य, असीम तेजोमय, ऊर्ध्व दिशा आपल्या तेजाने विकसित करणारा, सर्वोत्तम कर्म करणारा ब्रह्मदेव ज्याच्या प्रेरणेमुळे आपल्या हातांनी सोम निर्माण करतो, त्या सवितृ देवतेची मी पूजा करतो. तो आम्हास पुत्र-पौत्र, यश, उत्तम पदार्थ आणि पशु प्रदान करो. हे सवितृदेवा, तू सर्वांचा प्रेरक, श्रेष्ठ आणि दीर्घायुष्य प्रदान करणारा आहेस. हा तयार केलेला, गतिमान आणि आनंद प्रदान करणारा सोम तू प्राशन कर.

## १५. सविता (सूर्य)

सवितृ देवतेची ही एक उत्तम प्रार्थना आहे. कण्व ऋषींना ज्या विविध पैलूयुक्त बुद्धीचा लाभ झाला त्यासाठी ह्यांनीच केलेली ही एक प्रार्थना आहे.

महान कण्व ऋषींना विविध प्रकारची बुद्धी प्राप्त झाली. त्या आनंददायी आणि सत्यप्रेरक बुद्धीचे दान मला सवितृदेव करो.

## १६. सविता (सूर्य)

जो यजमान विविध व्रतांचे पालन करतो त्याचे सर्व दोष दूर करून त्याची वृद्धि करण्याचे काम सवितृदेव करतो. हे सवितृदेवा, या यजमानाचे भाग्य उजळून जाऊदे. सर्व देव या यजमानाची स्तुती करोत.

## १७. द्रविणार्थ प्रार्थना (प्रसन्नतेसाठी प्रार्थना)

विश्वाला धारण करणारा धाता आम्हाला भरपूर संपत्ती प्रदान करो. तो सर्व काही करण्यास समर्थ आहे. तो मला अक्षय्यत्व आणि उत्तम कुशाग्र बुद्धी प्रदान करो. त्यासाठी मी त्या धात्याची प्रार्थना करीत आहे. पुत्राची इच्छा करणाऱ्या यजमानाला पुत्र आणि अन्य मंगल वस्तू धाता प्रदान करो. सर्वांचा धारणकर्ता, सर्वांचे कल्याण करणारा, प्रजा रक्षक, पुरुषार्थयुक्त, ज्ञानरक्षक, प्रकाशरूप, अग्निरूप, त्वष्टादि देवतांचा प्रेरक आणि सर्वव्यापक भगवान विष्णु आम्ही प्रदान केलेला हवि ग्रहण करो आणि आमच्या पुत्रपौत्रादिकांना या यज्ञाचे फल प्रदान करो.

## १८. वृष्टिः ( वर्षाव )

हे पृथ्वी, नांगराच्या सहाय्याने तुला व्रण केले तरी तू दिव्य मेघांनी महान पर्जन्यधारांचा केलेला वर्षाव सहन करतेस. ज्या ठिकाणी सोम निर्माण होतो, सोमाची पूजा केली जाते, त्या ठिकाणी पर्जन्य कल्याणमय वातावरण निर्माण करतो. ग्रीष्म असह्य ताप देत नाहीं आणि शीतता वस्तूंना थिजवून टाकीत नाही. पर्जन्यामुळें पृथ्वीला समृद्धि प्राप्त होते.

## १९. प्रजा: ( पुत्रपौत्र )

पुत्रादि संततींसाठी आणि संततीच्या समृद्ध आचारासाठी केलेली ही एक उत्तम प्रार्थना आहे.

प्रजापतिर्जनयति प्रजा इमा धाता दधातु सुमनस्यमानः ।
संजानानाः संमनसः सयोनयो मयि पुष्टं पुष्टपतिर्दधातु ॥

प्रजापति पुत्रपौत्रदिकांना उत्पन्न करतो. धाता यांचे पोषण करतो. हे पुत्रपौत्र एकत्रित येऊन एक मताने विवेकपूर्ण कार्य करोत. पोषण करणाऱ्या देवता आम्हाला पुष्ट करोत.

## २०. अनुमतिः ( अनुकूलता )

आमच्या यज्ञांतील सर्व कर्मांचा स्वामी चंद्र आम्हाला अनुकूल होऊन सर्व देवतांना अनुकूल करो. अग्नि आम्ही अर्पण केलेले हवि त्या त्या देवतांना पोहोचविण्याची कृपा करो. हे देवते आम्हाला बुद्धी आणि कल्याण कारक काम करण्याची प्रेरणा दे. आमच्या हवींचा उपभोग घेऊन आम्हाला संतति प्रदान कर. सुमति आणि सुख आम्हाला प्रदान कर. आमच्यावर प्रसन्न होऊन आम्हाला धनसमृद्ध कर. हे देवि, तू यशदेवता आहेस. आमचा यज्ञ तू सफल कर. आमच्या यज्ञाचे रक्षण कर. तुझ्या कृपेनेच आम्हाला चांगलें काम करण्याचीस्फूर्ति प्राप्त होते. तू ज्या सर्व वस्तूंत आहेस त्या सर्व वस्तू आम्हाला अनुकूल होवोत.

## २१. एको विभुः ( एक दिव्यता )

नवजात प्राणिमात्रांचा स्वामी, अतिथीप्रमाणें पूज्य आणि स्वर्गाचा अधिपति असलेल्या सूर्याची स्तुती करा. हे सूर्या या सर्व नवजातांना तू आपले मानून सर्वांचे कल्याण कर.

## २२. ज्योतिः ( ज्योत )

आत्म्याच्या रूपानें सर्व प्राणिमात्रांना व्यापून हजारों वर्षे स्थिर झालेला सूर्य आम्हाला जगण्याची शक्ति प्रदान करो. या सूर्य देवतेच्या साक्षीने केलेली सर्व कार्ये प्रदीर्घ काळपर्यंत टिकतात. हे सूर्यदेवते,

सत्कर्म करण्यासाठी तू आम्हाला दीर्घायुष्य प्रदान कर. ज्ञान प्रदान करणारी, पाप हारिणी आणि तेजोवान उषा भगवान सूर्यासमवेत आम्हाला प्रेरणा प्रदान करो.

२३. **दुःखस्वप्ननाशनम्** ( दुःखद स्वप्नांचा नाश करणे )

दुःख देणारी स्वप्नें, कष्टमय जीवन, हिंसकांचा उपद्रव, दारिद्रय, भय, अपभाषण, या सर्वांचा आम्ही त्याग करीत आहोत.

२४. **सविता** ( सूर्य )

इंद्र, अग्नि, विश्वेदेव आणि मरुत् वगैरे देवता आम्हाला जें फल देतात तें आम्हाला सत्यधर्मा प्रजापति अनुमती देवी आणि भगवान् सूर्य देवो.

२५. **विष्णु**: ( विष्णु )

भगवान विष्णु आणि वरुण या विविध लोकांमध्ये संचार करणाऱ्या आणि स्वतःच्या बळाने कर्तव्य पार पाडण्यास तत्पर असणाऱ्या दोघांच्यामुळें त्रैलोक्याचा संसार समृद्ध होतो. त्यांच्याच आज्ञेनें सर्व विश्व प्रकाशित होते. त्यांच्यामुळेच विश्वाला जीवन लाभते. प्रत्येकाला आपल्या कर्माची फळे प्राप्त होतात. यांना मी सकाळच्या हवनांत हविरन्न प्रदान करतो.

२६. **विष्णु** ( भगवान विष्णु )

सर्वव्यापक भगवान विष्णूंनीं या त्रैलोक्याची रचना केली. तीनही लोक पादाक्रांत केले आणि स्वर्ग मात्र आपल्याकडे राखून ठेवला. सिंह इच्छेला येईल त्याप्रमाणें वनांत कोणात्याही ठिकाणीं त्वरेने जातो त्याप्रमाणें स्वतःची स्तुती ऐकून भगवान विष्णू कितीही दूर असले तरी त्वरित येतात. हे विष्णो तूं आम्हाला निवासादी सुविधा प्रदान कर. अग्निरूपानें या यज्ञांत यजमानाची घृताहुती स्वीकार आणि त्याला समृद्ध कर. स्वतःच्या पराक्रमानें आपल्या तीन पावलांत सर्व जगत् व्यापून या विश्वाचें जीवन ज्यानें आपल्या स्वाधीन केलें, तो विष्णु इंद्राचा मित्र आहे. ज्ञानी आणि बुद्धिमान लोक विष्णूची उपासना करतात.

अंतरीक्ष सूर्य ज्याप्रमाणें व्यापतो त्याप्रमाणें भगवान विष्णूच्या साह्यानें ज्ञानीलोक प्रकाशतत्त्व जाणतात. भगवान विष्णू तीनही लोकांतील वैशिष्टचपूर्ण धन आम्हाला प्रदान करो आणि आम्ही ते दोन्ही हातांनी ग्रहण करो.

## २७. इडा (समृद्धी देवता)

ज्या देवतेच्या समोर आपली इच्छा प्रकट केली असतां यजमान पवित्र बनतो, सोमपृष्ठ आणि घृतपद् वैभवानें समर्थ होतो ती इडा देवता आमचा यज्ञ समृद्ध करो. ही देवता आम्हाला उत्तम फळ प्रदान करो.

## २८. स्वस्ति (कल्याण–मंगल)

हे दर्भानों, समिधा तोडण्यासाठी उपयोगांत येणारें हत्यारा, आम्हाला कल्याणकारक करो. देवांना प्रदान करणाऱ्या यजमानाचें मंगल करो.

## २९. अग्नीविष्णु (अग्नि आणि विष्णु)

हे अग्ने आणि विष्णो, आपण महान यशवान असून आमच्या तुपाच्या आकृती स्वीकारता. यजमानाचें घर, गाई अश्व वगैरे स्पष्ट धनांनी समृद्ध करता. आपला निवास आम्हाला अत्यंत प्रिय आहे. आपण आमच्या घृतादि हव्य पदार्थांचा स्वीकार करा आणि आमची घरे समृद्ध करा.

## ३०. अञ्जनम् (अंजन डोळयांत घालावयाचें औषध–काजळ)

द्यौ आणि पृथ्वी आमच्या डोळयांना अंजन प्रदान करोत. सूर्य ब्रह्मणस्पति आणि सविता आमच्या नेत्रांना स्वस्थता लाभेल असे औषध प्रदान करोत.

## ३१. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश)

हे इंद्रा, अनेक राक्षसांपासून तूं आम्हाला सुरक्षित केलें आहेस. आमचा जो द्वेष करतो तो पतन पावो. आम्ही ज्या शत्रूचा द्वेष करतो तो पराभूत होवो.

३२. **दीर्घायुः** (प्रदीर्घ आयुष्य)

सर्वांना आवडणाऱ्या, स्तुती करण्यास योग्य, तरुण, आहुतीच्या योगें प्रज्वलित होणाऱ्या अग्नीच्या जवळ आम्ही विनीत भावाने जातो आणि त्याला हवि अर्पण करतो. हे अग्ने आमचे आयुष्य तूं प्रदीर्घ कर.

३३. **दीर्घायुः** (प्रदीर्घ आयुष्य)

मरुत् आम्हाला पुत्रपौत्रादि प्रजा आणि धन अर्पण करो. पूषा, ब्रह्मणस्पति आणि अग्नि या देवतासुद्धां आम्हाला दीर्घायु प्रदान करोत.

३४. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा विनाश)

हे अग्ने, आमच्या शत्रूला तूं नष्ट कर. जे आमचे गुप्त शत्रू आहेत त्यांना देखील तूं नष्ट कर. जो आमच्याशीं युद्ध करण्याची इच्छा करतो त्याचा पराभव होवो. आपल्या सारख्या देवांच्या प्रसादानें आम्ही निष्पाप होऊन दारिद्र्यशून्य होऊं.

३५. **सपत्नीनाशनम्** (सवतीचा नाश)

हे जातवेद नामक अग्ने, जो आमच्या विरुद्ध वागतो आणि जो शत्रू गुप्तपणे आम्हाला त्रास देतो या दोन्ही शत्रूंचा तूं नाश कर. हे राष्ट्र समृद्ध कर. सर्व देवता आम्हाला अनुकूल होवोत. हे स्त्रिये, तुझ्या शेकडो नाड्या आणि सहस्रावधि रक्तवाहिन्या आहेत. त्यांचा प्रभाव मी कमी करतो. संतान निर्माण करणाऱ्याला मी तुझ्या समोर आणतो. तूं मला सामर्थ्यवान संतान प्रदान कर.

३६. **अञ्जनम्** (अंजन)

हे स्त्रिये. आपले नेत्र मधुरभावमय होवोत. आपण आपल्या डोळ्यांत अंजन घालूं. तूं मला आपल्या हृदयांत सांठव. आपण दोघे समान मनाचे (विचाराचे) होऊं या.

३७. **वास** (निवास)

हे स्वामी (पुरुषा) तुम्ही माझेच आहांत. या मंत्राच्या योगाने मी तुला वद्ध करते. मी सोडून तू अन्य स्त्रीचा विचार देखील करूं नकोस.

## ३८. केवल: पति: (केवळ पतीसाठी)

ही औषधी मी खणून काढतो, कारण आपल्या प्रिय माणसाला आपल्याकडे कर्षित करण्यांस ही वनस्पति समर्थ आहे. या वनस्पतीमुळे मी माझ्या पतीला अन्य स्त्रियांपासून परत आणते. या औषधीनें इंद्राला प्रभावशील केला. त्याप्रमाणें मी तुला वश करून तुझी धर्मपत्नी होऊन राहीन. हे शंखपुष्पी, तूं सोम आणि सूर्याला वश करतेस. सर्व देवतांना पण तूं वश करतेस. हे स्वामिन्, तूं विद्वत सभेंत बोलून तिला वश कर तिच्या समोर तूं अन्य स्त्रियांची स्तुती करूं नकोस. एखादी नदी जर तूं आणि मी यांच्यामध्यें अडथळा आणीत असेल तर ही शंखपुष्पी तुला बांधून माझ्या समोर आणील.

## ३९. आप: (पाणी)

सुन्दर वेगानें प्रवाहित होणारें, औषधांना गुणकारी करणारें, विश्वाला तृप्त करणारे, पावसाची काळजी करणाऱ्यांची इच्छा तृप्त करणारें आणि स्वादिष्ट असें पाणी आमच्या गोठ्यांत प्रस्थापित होवो.

## ४०. सरस्वान् (पोषण देवता)

ज्या देवतेसाठी सर्व लोक एकत्र येतात, पशु जिची वाट पाहातात, आणि प्राण्यांची जी पोषण करते अशा सरस्वान् नामक देवतेला आम्ही आमच्या रक्षणासाठी आवाहन करतो. हवि प्रदान करणाऱ्या यजमानाच्या समोर जाऊन इच्छित फल प्रदान करणाऱ्या, धनस्थित आणि धनपुष्ट करणाऱ्या आणि यजमानाला अन्न देण्याची इच्छा करणाऱ्या देवतेला आम्ही आवाहन करतो.

## ४१. सुपर्ण (पर्णवान वनस्पति)

सर्व प्राणिमात्रांना पाहाणारा, गतिमान व कर्मफल प्रदान करणारा सूर्य वाळवंटी प्रदेशांत वृष्टी करो. जो सूर्य आपला मित्र इंद्राच्या साहाय्यानें आमचें मंगल करतो, तो आमच्या नवीन घरांत आगमन करो. अगणित किरणयुक्त, नियमित गतिमान, अपरिमित फल देणारा आणि अन्न प्रदायक सूर्य आम्हाला पुष्कळ वर्षांचें आयुष्य प्रदान करो.

आम्ही अग्नीला यज्ञांत जे अर्पण केले त्यायोगे आमचे पितरही संतुष्ट होवोत.

**४२. पापमोचनम्** (पापापासून मुक्तता)

हे सोम-रुद्रांनों, आमच्या शरीरांतील विषमयता आणि कृमी-रोग नष्ट कर. या रोगाला कारण असणाऱ्या भूतपिशाच्चांना तुम्ही आमच्यापासून दूर घेऊन जा. आमच्या शरीरांतील पाप नाहीसें करा आणि रोग नाहीसा करण्यासाठी औषधींना प्रतिष्ठित करा.

**४३. वाक्** (वाणी)

हे पुरुषा, तुझी निंदा अगर स्तुती करणारी वाणी ऐकून तूं आपलें चित्त विचलित होवू देवूं नकोस. दोन्ही वाण्या प्रयोग करण्यास योग्य असल्याने संबंधित व्यक्तीने प्रसन्न राहिलें पाहिजे.

**४४. इंद्राविष्णू** (इंद्र आणि विष्णु)

हे इंद्रा आणि विष्णो, तुम्हाला पराजय कधीच माहीत नाहीं. तुम्ही नेहमी विजयी होता. तुम्ही राक्षसांच्या बरोबर वेद, वाणी किंवा वस्तूसाठीं युद्ध करतां आणि त्या सर्वांना आपल्या नियंत्रणांत घेता.

**४५. ईर्ष्यानिवारणम्** (स्पर्धा निवारण)

सर्वांचें हित करणारी व समुद्रापलीकडील दूर देशाहून आणलेली सक्तुमथ नामक औषधी मला ज्ञात आहे. ही औषधी राग नाहीसा करते. मनांतील स्पर्धा नाहीशी करते. अग्नि ज्याप्रमाणें पाण्याने शांत होतो त्याप्रमाणें ईर्षायुक्त माणसांची ईर्षा ती नाहीशी करते.

**४६. सिनीवाली** (एक देवता)

तूं अमावास्येची अधिष्ठात्री आहेस. तूं देवतांची भगिनी आहेस. तूं आम्हाला पुत्र प्रदान कर आणि आमचा हवि स्वीकार. हे ऋत्विजानों, ह्या देवतेचें हात आणि बोटें फार सुंदर आहेत. प्रजेचें पालन करणाऱ्या या देवतेला हवि अर्पण करा. ही देवता इंद्राची पूजा करते. हे देवपत्ने, इंद्र तुझा स्वामी आहे. त्याला आमचा हवि स्वीकारून आम्हाला धन देण्याची प्रेरणा दे.

४७. चंद्रहीन अमावस्येला मी आवाहन करतो. ती मला आवडता आणि पराक्रमी पुत्र प्रदान करो. ही कुहू देवी सर्व भूतमात्रांची आणि अमृताची रक्षणकर्ती आहे. ती पाणी अमृतमय करते. ती आमचें आवाहन ऐकून आमचें पोषण करण्यासाठीं येवो.

४८. **राका** (एक देवता)

पूर्णचंद्रयुक्त पौर्णिमेला राका म्हणतात. ती आमची स्तुतिवचनें ऐको. सोनें आणि वस्त्राचा उपयोग त्याच्या योग्यतेप्रमाणें होतो त्याप्रमाणें आमचें प्रजनन कार्य योग्यतेनुरूप होऊन आम्हाला पुत्र प्राप्त होवो. हे राका देवते, तूं कल्याणमय आणि उत्तम बुद्धियुक्त धन आम्हाला प्रदान कर. तूं तुझ्या कल्याणमय बुद्धीसहित आमच्याकडे आगमन कर.

४९. **देवपत्न्यः** (देवांच्या स्त्रिया)

देवपत्न्या आमचे रक्षण करून आम्हाला अन्न प्रदान करोत. पृथ्वी आणि अंतरीक्षांत राहाणाऱ्या देवता आम्हाला सुख प्रदान करोत. इंद्राणी, वरुणानी, रोदसी, अन्यानी आणि अश्विनीकुमारांची पत्नी सूर्या आमचें आवाहन स्वीकारोत आणि प्रत्येक ऋतूमध्ये आमचें हवि स्वीकारोत.

५०. **विजयः** (विजयप्राप्ति)

विद्युत् आणि अग्नि ज्याप्रमाणें वृक्षांना भस्म करतात त्याप्रमाणें सर्व जुगारी लोकांजवळ असलेल्या फाशांच्या द्वारें मी त्यांचें हनन करतो. द्यूत खेळावयाचें जे सोडत नाहींत त्यांचें सर्व धन मला प्राप्त होवो. मी स्वावसु नामक अग्नीची स्तुती करतो. तो आम्हाला सत्कर्म नामक फासा प्रदान करो. त्यानें मी शत्रूला पराभूत करीन. मी ज्याची इच्छा करतो ते इंद्राच्या सहाय्यानें मिळवितो. द्यूतामध्ये आम्हाला जो जिंकण्याची इच्छा करतो. त्याचें उच्चाटण होऊन त्याचें धन आमच्याकडे येवो. दोन बकरे ज्याप्रमाणें एकमेकावर मस्तक आदळून युद्ध करतात किंवा क्रीडापटु ज्याप्रमाणें एकमेकांबरोबर द्वंद्व करतात त्याप्रमाणें माझ्या शत्रूंशीं द्वंद्व करून मी त्यांना जिंकतो आणि त्यांचें द्रव्य कल्याणमय

कार्यांत उपयोगांत आणतो. आम्हाला यवादि धान्य, दारिद्र्यनाशक सद्बुद्धी आणि शत्रूपासून विजय प्राप्त होवो.

५१. **परिपाणम्** (संरक्षण)

चारही दिशांकडून बृहस्पति आमचें रक्षण करो. इंद्र पूर्व आणि मध्य भागाचें रक्षण करो. इंद्र त्याची स्तुती करणाऱ्याला महान ऐश्वर्य प्रदान करतो.

५२. **सामनस्यम्** (समविचार)

ही एक उत्कृष्ट प्रार्थना आहे. महान समारंभ, यज्ञ, परिषदा, वादसभा यांच्या सांगतासमयीं ही प्रार्थना करण्याचा पूर्वी प्रघात होता.

**संज्ञानं नः स्वेभिः संज्ञानमरणेभिः ।**
**संज्ञानमश्विना युवमिहास्मासु नि यच्छतम्**
**सं जानामहै मनसा सं चिकित्वा मा युष्महि मनसा दैव्येन ।**
**मा घोषा उत् स्थुर्बहुले विनिर्हते मेषुः पप्तदिन्द्रस्याहन्यागते**

आम्ही सर्व सारख्या विचाराचें व्हावें. आमच्या प्रतिकूल ज्यांची मनें आहेत ते सुद्धां आमच्या मताला अनुकूल होवोत. हे अश्विनी-कुमारांनों, तुम्ही आपल्या आणि इतरांना एक मताचे करा. आम्ही आपल्या मनाशीं दुसऱ्या मनांचा संगम करूं या. देवतांना आवडतील असें आमचें मन होवो. ज्या योगें दुसऱ्याच्या मनाला दुःख होईल असें इंद्राच्या वज्रासारखे कठोर शब्द आमच्या मुखांतून बाहेर न पडोत.

५३. **दीर्घायुः** (दीर्घायुष्य)

हे अग्ने, यज्ञाच्या निमित्तानें दिलेल्या हवींच्या योगें तूं सर्व

देवतांना प्रसन्न करतोस. यमाच्या भयभूत लोकापासून या बालाचें तूं रक्षण कर. तुझ्या कृपेनें अश्विनीकुमार या बालकाच्या मृत्यूचें कारण दूर करतील. प्राण आणि अपान वायूंनों, दीर्घायुष्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाच्या शरीरांत तुम्ही वास्तव्य करा. हे पुरुषा, हे प्राणादि वायू तुझ्या शरीरांत आश्रयाला आल्यानें तुझें गेलेले आयुष्य तुला पुन्हा प्राप्त झालें आहे. अग्नीच्या कृपेनें मिळालेल्या दिव्य मंत्रांच्या योगें मी तुझें आयुष्य वाढवतो. प्रदीर्घ आयुष्याची कामना करणाऱ्या या पुरुषाचा प्राणादि वायू त्याग न करोत. मी या पुरुषाला सप्त ऋषींना देतो. त्या ठिकाणीं हा पुरुष वृद्धत्वापर्यंत सुखानें राहील. बैल ज्याप्रमाणें आपल्या गोठ्यांत घुसतात. त्याप्रमाणें हे प्राणादि वायूनों, तुम्ही या पुरुषाच्या शरीरांत घुसा म्हणजे हा पुरुष वृद्धत्वापर्यंत जिवंत राहील. तुमच्या या पुरुषाच्या शरीरांतील वास्तव्यामुळें क्षय रोगाचें उच्चाटण होईल आणि अग्नि त्याला शतायुषी करील. हा पुरुष ज्या वेळीं आमच्यापासून दूर होईल तेव्हां तो स्वर्गांत, सर्व देवतांमध्यें श्रेष्ठ असलेल्या सूर्याच्या जवळ पोहोचेल.

### ५४. अध्यापक विघ्नशमनम् (शिक्षकांच्या विघ्नांचा नाश)

आम्ही ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद यांची पूजा करतो आणि त्यातील मंत्रांच्या द्वारा यज्ञ करतो. हा ऋग्वेद आणि साम आमचा यज्ञ देवतांप्रत घेऊन जातात. आम्ही ऋग्वेदाच्या योगें हवि, सामाच्या योगें तेज आणि यजुर्वेदाच्या योगें बल यांची इच्छा करतो. वेदपठण करणाऱ्यांचे कधीहीं हनन करूं नयें.

### ५५. मार्गस्वत्ययनम् (सन्मार्गदर्शन)

हे इंद्रा स्वर्गाकडे जाणारा जो मार्ग आहे, त्या योगें तूं सर्व प्राणिमात्रांना कर्माची प्रेरणा देतोस. त्या मार्गावर तू आम्हाला सुखी ठेवा.

### ५६. विषभैष्यमम् (विषावरील औषध)

तिरश्च, काळसर्प, नाग आणि कंकपर्व नामक सर्पांचे विष मधुक

नामक औषधी दूर करते. ही औषधी मधामुळे उत्पन्न झालेली असल्यानें ती महान विषाला आणि विषयुक्त दंश करणाऱ्या प्राण्याला नष्ट करण्यास समर्थ आहे. हे पुरुषा मशकाचें विषदेखील प्रभावहीन होतें. हे ब्रह्मणस्पते, हा पुरुष विषाच्या प्रभावामुळें संज्ञाहीन झाला आहे. त्याच्या अंगी असलेले विष तूं दूर कर. मी शर्कोटक नांवाच्या सापाचा त्याच्या विषासहित नाश केला आहे. हे वृश्चिका, तूं दुर्बुद्धियुक्त आहेस. तुझ्या शेपटींत जें विष आहे तें मी नष्ट करतो. हे औषधींनों, तुम्ही या सर्पांच्या मुखांतील, शेपटीतील अगर श्वासातील विष नष्ट करा.

(मधुक म्हणजे ज्येष्ठमध किंवा मोहाडा यांचा विषावर वमन प्रयोग करण्यांत येतो. मोहाडापासून दारू तयार करतात.)

## ५७. सरस्वती (विद्यादेवी)

ज्या पदार्थाच्या इच्छेमुळें माझें मन व्याकूळ होतें आणि प्रसंगीं क्षुब्ध होतें ते माझें मन देवी सरस्वती स्वस्त करो. वरुणासाठीं सात नद्या प्रवाहित झाल्या आहेत. आकाशरूपी पित्याच्या आणि प्रमुख देवतांसाठीं मनुष्य हवि प्रदान करतात. आकाश आणि पृथ्वी मानवांचें मंगल करतात.

## ५८. अन्नम् (अन्न)

हे इंद्रा, वरुणांनों, सोमपान करून तुम्ही प्रसन्न व्हा. तुमचा दिव्य रथ सोमयुक्त यजमानाकडे जावो. तुम्ही आमच्यावर इच्छित फलाचा वर्षाव करता. तुमच्यासाठीं चमसपात्र सोमानें भरून ठेविली आहेत. तुम्ही या ठिकाणी पसरलेल्या आसनावर बसून आमची इच्छित फलें आम्हास देण्यासाठीं सोम प्राशन करा.

## ५९. शाप मोचनम् (शापमुक्ती)

आम्ही निंदा करीत नाहीं परंतु जो कोणी निंदायुक्त आणि कठोर वाक्य उच्चारून वारंवार आमची निंदा करतो तो शत्रू, वीज पडल्यावर शुष्कवृक्ष ज्याप्रमाणे जळून नष्ट होतो त्याप्रमाणें, नष्ट होईल. त्याचे वाडवडील देखील नष्ट होतील.

६०. **रम्यं गृहम्** (आनंददायक घर)

ज्या ठिकाणीं समानता, मित्रभाव, स्नेहमयता, भरपूर अन्न, धन, शुद्ध बुद्धियुक्त प्रसन्न व्यक्ती व्यवहार करतात त्या माझ्या घरीं तुम्ही येऊन सुखी व्हा. माझ्याजवळ असलेल्या सर्व रसयुक्त अन्नानें, प्रवासांतून आलेल्या पुरुषाला सुख लाभेल आणि त्याला आपलेपणाचा अनुभव येईल. हे घर सर्व पदार्थांनी समृद्ध होवो. भूक आणि तहान यांची चिंता न राहो. या ठिकाणीं येणारे सर्व समृद्ध होवोत. माझ्या घरीं बकऱ्या, हरणे, गाई आणि भरपूर अन्न आहे. तुम्ही महान भाग्यवान आहांत. तुमची वाणी सत्यपूर्ण होवो. तुमचा आनंद सतत वाढत राहो. तुम्हाला या ठिकाणीं कोणतेही भय नाहीं. हे कल्याणकारक धन विविध देशांतून मी या ठिकाणीं घेऊन येईन आणि त्यायोगें समृद्ध होईन.

६१. **तपः** (तप)

हे अग्ने, तुम्हाला हवि वगैरे प्रदान करण्याचें जें कार्य करावयाचें असतें तें आम्ही तुझ्या सान्निध्यांतच करतो. विविध व्रतांच्या आचरणानें आम्ही तुला प्रसन्न करतो. त्यायोगें आम्हाला असीम सामर्थ्य प्राप्त होते. वेदाध्ययनानें मन प्रसन्न होऊन आम्ही दीर्घायु होवो. हे अग्ने, आम्ही तुझ्या सान्निध्यात तपाचरण करतो. त्यायोगें आमची धारणाशक्ती आणि आयुष्य वृद्धिगत होते.

६२. **शत्रुनाशनम्** (शत्रू नष्ट करणें)

हा गार्हपत्य अग्नि अत्यंत बलवान असून त्याला हवि देणाऱ्याचें तो पोषण करतो. हा विश्वस्वामी असल्यानें ऋत्विजांकडून सर्वप्रथम गौरविला जातो. बलवान मनुष्य ज्याप्रमाणें लोकांना नियंत्रणांत ठेवतो त्याप्रमाणें सर्व प्रजा या अग्नीच्या नियंत्रणाखाली आहे. उत्तर वेदीवर विराजमान झालेला अग्नि आमच्या शत्रूंना नष्ट करो.

६३. **दुरितनाशनम्** (दारिद्रयनाश)

देवतांसाठी हवि धारण करणाऱ्या शत्रूवर विजय मिळविणाऱ्या द्युलोकांत निवास करणाऱ्या अग्नीला आम्ही मंत्रांच्या साहाय्यानें

आवाहन करीत आहोंत. तो आम्हाला आमच्या संकटांतून पार करो. आम्हाला दुर्गतीला नेणारें पाय जाळून टाको.

**६४. पापमोचनम्** (पापापासून विमुक्ती)

आकाशमार्गानें उडत आलेल्या कावळयानें मला दंश केला त्यामुळे निर्माण झालेल्या पापापासून हें पाणी मला पवित्र करो. हे मृत्यो, या कावळयानें मला स्पर्श केला आहे. त्याला तूं अग्नीमध्यें ढकल.

**६५. दुरितनाशनम्** (दारिद्र्यनाश)

हे अपामार्ग (आघाडा) तूं पाप धुवून टाकणारी वनस्पती आहेस. माझ्या सर्व पापांना ती नष्ट करते. आमच्या हातून जें पाप घडलें, ज्या दुष्टबुद्धीमुळें पाप घडलें ते तुझ्या कृपेनें दूर होतें. वेडीवांकडी नखे व काळे-पिवळे दांत असलेल्या रोगी माणसावरोबर आम्ही भोजनादी क्रिया केल्या त्यामुळें उत्पन्न झालेले दोष तुझ्यामुळेच नष्ट होतात.

**६६. ब्रह्म** (ब्रह्म)

अंतरीक्षांत, वायुमंडलांत, अरण्यांत, वृक्षाखाली वसून, विविध प्रकारच्या धान्यांच्या जवळ, पशूंच्या सान्निध्यात ज्या वेदांचे पठण करण्यात येते तो वेद आम्हां वेदपाठकांना प्राप्त होवो.

**६७. आत्मा** (आत्मा)

माझी सर्व इंद्रियें मला पुन्हा प्राप्त होवोत. माझ्या शरीरांतून मुक्त झालेला आत्मा पुन्हा या शरीरात प्रवेश करो. वेद मला पुन्हा प्राप्त होऊन, हवनाच्या वेळीं वेदींच्या परिसरात राह णारा आणि रमणारा अग्नि मला पुन्हा प्राप्त होवो.

**६८. सरस्वती** (सरस्वती–शारदा)

हे सरस्वती देवते, आम्ही आमच्या घरांत तुला आवाहन करीत आहोंत. तूं या ठिकाणीं येऊन आम्ही दिलेलें हवि स्वीकार कर आणि आम्हाला संतती प्रदान कर. तुपासहित ज्या आहुती तुला दिल्या जातात त्यायोगें आमच्या पितरांना प्रेरणा दे. तुला दिलेल्या या मंगल हवीमुळें

तूं आम्हाला अन्नसमृद्ध कर. आम्हाला तुझ्या दर्शनापासून वंचित करूं नकोस. कारण तुझ्या दर्शनानें रोगादि आपत्ती दूर होऊन आम्हास सुख लाभो.

६९. **सुखम्** (सुख)

ही एक चांगली प्रार्थना आहे.

शं नो वातो वातु: । शं नो तपतु सूर्यः ।
अहानि शं भवतु नः । शं रात्री प्रति धीयतां ।
शमुषा नो व्यच्छतु ।।

वाहणारा वारा, तळपणारा सूर्य, दिवस, रात्र आणि उषा आमच्यासाठीं कल्याणकारक होवो.

७०. **शत्रुदमनम्** (शत्रूचें पारिपत्य करणें)

जो शत्रु अभिचार कर्माचा संकल्प करून यज्ञ करतो त्या शत्रूची वाणी, मन आणि देह यांच्या योगें होणारें कर्म फलद्रूप होण्यापूर्वीच पापदेवता निर्ऋति त्यांना नष्ट करो. शत्रूची सर्व कर्मे निर्ऋति आणि राक्षस असत्य करोत. आम्हाला मारण्याचा शत्रूचा संकल्प नष्ट होवो. अजिर आणि अधिराज हे यमदूत आमच्याशीं युद्ध करणाऱ्या शत्रूला अग्नींत नष्ट करोत. हे अभिचार कर्म करणाऱ्यांनों, तुम्हाला मी मंत्रानें बद्ध करतो. म्हणजे अग्नि तुम्हाला नष्ट करील.

७१. **अग्निः** (अग्नि)

मंथनांतून निर्माण झालेल्या अग्ने, यज्ञामध्यें विघ्न आणणाऱ्या राक्षसांना प्रत्यही नष्ट करण्यासाठीं आम्ही तुला धारण करतो.

७२. **इंद्रः** (इंद्र)

हे ऋत्विजानों, इंद्राला द्यावयाचा हविर्भाग जोपर्यंत पक्व झाला नाहीं तोपर्यंत तुम्ही इंद्राची स्तुती करून त्याला संतुष्ट करा आणि हविर्भाग पक्व होताच यज्ञांमध्यें इंद्रासाठीं आहुती द्या. हे इंद्रा, दधिधर्म नामक हवि तुझ्यासाठीं तयार झाला आहे. तूं त्वरित ये. सूर्य या ठिकाणीं आला आहे. तयार केलेल्या सोमासाठीं उपासना करण्यांत येत आहे.

दुग्धहवि दह्याच्या अवस्थेपर्यंत तयार झाला आहे. हे वज्रधारका, तूं सोमासह दही हवि स्वीकार.

७३. **धर्मः** (धर्म–आचार)

हे अश्विनीकुमारानों, तुम्ही इच्छित फलाचा वर्षाव करता. आकाशांतील देवतांचें नेतृत्व करतां. अध्वर्यूंनी तुमच्यासाठीं हवि तयार केला आहे. म्हणून या यज्ञासाठीं आम्ही तुम्हाला आवाहन करीत आहोंत. हे अश्विनीकुमारानों, अग्नि प्रदीप्त झाला असून तुमच्यासाठीं असलेल्या घृतांनीं अधिक तेजस्वी झाला आहे. हवि स्वीकारण्यासाठीं तूं या ठिकाणीं ये. या यज्ञाच्या निमित्तानें गाईनीं भरपूर दूध दिलें आहे. तुमची स्तुती करतांना आम्हाला अतिशय आनंद वाटतो. तुमच्यासाठीं प्रवार्य नामक यज्ञ करण्यांत येत आहे. तुमच्यासाठीं चमसपात्रांत सोम भरून ठेवला आहे. अन्य देवता अग्नीच्या मुखानें त्याचा आस्वाद घेतात. ज्यापासून तूप उत्पन्न होतें ते दूध या यज्ञपात्रांत ठेविलें आहे. तें तुमच्यासाठीं आहे म्हणून तुम्ही या ठिकाणीं या आणि हे दूध प्राशन करा. हे तूप तुमच्यासाठीं आहे. अध्वर्यु तुम्हाला घृतहवि देत आहेत. तुम्ही त्रीमधूचं पान करा. आदरणीय सूर्यानें स्वर्गाला प्रकाशित केलें. उषेमुळें तो अधिक तेजस्वी दिसत आहे. खूप दूध देणाऱ्या व या ठिकाणी बोलाविलेल्या गाईचें अध्वर्यु दूध काढीत आहेत. सर्व प्रेरक सविता हे दूध आम्हाला प्रदान करो. धनपोषक गाय वत्साची आठवण करून हंबरते आणि अश्विनीकुमारांसाठीं दूध देते. या गाई आमचें ऐश्वर्य वृद्धिगत करोत. हे अग्ने, तूं त्यांचे धन आम्हाला प्रदान कर. हे अग्ने तूं उदार आहेस. तुझें तेज सर्वगामी आहे. पतिपत्नीचे कर्म तूं समान कर. हे गाई तूं तृणभक्षक असूनही भाग्यदा आहेस. तूं तृण भक्षण कर, पाणी पी आणि आम्हाला भाग्यवान कर.

७४. **गंडमाला चिकित्सा** (गंडमालाचे निदान)

या गंडमालाची माता कृष्णा नावाची राक्षसी आहे. या गंडमालांना मी रुद्राच्या बाणानें विद्ध करतो. या योगें लहान अगर मोठ्या गंडमाला दूर होतात. हे ईर्षायुक्त पुरुषा, मी स्त्रियांचा राग शांत करतो

हे अग्ने आमच्या पूजाकर्मांनीं प्रसन्न होऊन तूं या यज्ञामध्यें प्रदीप्त हो. आम्ही सर्व तुझी प्रार्थना करीत आहोत.

### ७५. अघ्न्या: (गाय)

हे गाई, तूं जमिनीवर उगवणारें तृण भक्षण करतेस. पुत्रासह पाणी पिऊन चारही दिशांना संचार करतेस. व्याघ्रादि पशु तुझी हिंसा न करोत. ज्वरदेवता रुद्राचा बाण तुला न लागो. तूं दूध देऊन सर्वांना प्रसन्न करतेस. तुला आपला गोठा माहीत आहे. तूं आपल्या वत्सासह माझ्याजवळ ये आणि आमचें घर, गोठे दुग्धसंपत्तीने भरून टाक.

### ७६. गंडमाला चिकित्सा (गंडमालांचें निदान)

गंडमाला पूयुक्त झाल्यास पीडा देतात परंतु औषधींचा मंत्रा-सहित उपयोग केल्यास या बऱ्या होतात. मिठाने यांचा दाह कमी होतो. घसा, कांख, गुप्तांग या ठिकाणीं होणारे व्रण औषधी व मंत्र यांनीं बरे होतात. जो क्षय, हाडे आणि मांस यांना कमी करतो, कमरेच्या भागांत होणारी शक्तिशून्यता किंवा अतिसंभोगानें उत्पन्न होणारा तो क्षय नष्ट होतो. अधिक स्त्रीसंभोगानें प्राप्त होणारा क्षय पुरुषाच्या सर्व शरीरांत पसरतो. तो पुष्कळ काळ टिकणारा असला तरी मंत्रौषधानें बरा होतो. हे संभोगजन्य क्षया, या यजमानाच्या घरात इंद्रादि देवतांसाठीं केलेल्या यज्ञांत तूं कसा घुसलास ? हे इंद्रा या कलशांत ठेवलेला सोम तूं प्राशन कर. हे वृत्रंहत्या तूं आम्हाला धनसमृद्ध आणि ऐश्वर्यवान कर.

### ७७. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

हे मरुतांनों, तुम्ही आमच्या शत्रूला त्रास देतां. हा आमचा हवि स्वीकारून आमचें रक्षण करा. जो शत्रू गुप्तपणें आमचें मन प्रक्षुब्ध करतो तो वरुणपाशांत बद्ध होवो. या शत्रूला तूं तुझ्या बाणानें नष्ट कर. अंतरीक्षांत निवास करणारा, प्रत्येक वर्षी आविर्भूत होणारा, मंत्रांनीं स्तुती करण्यास योग्य आणि मनुष्यांचे हित साधणारा मरुद्गण पापबंधनातून आमची मुक्तता करो.

**७८. बन्धमोचनम्** (वंधनें नाहीसें करणे)

हे मनुष्या, रोगरूपी दोरी मी सोडतो. कंठ, वगल, मध्यप्रदेश आणि खालील अवयव यांमध्यें जी गांठ येते ती मुक्त करतो. हे अग्ने, या रोग्याला अनुकूल होण्यासाठीं तूं प्रदीप्त हो. देवांना हा हवि पोहोचविण्यासाठीं तुझी नियुक्ती आहे. तूं आमच्या पुत्रपौत्रादिकांना सुख प्रदान कर. यजमानाला वल प्रदान कर आणि या यजमानाच्या इच्छा इंद्राला सांग.

**७९. अमावास्या** (अवसेचा दिवस)

हे अमावस्ये, तुझें महत्त्व देवतांना माहीत झालें आहे. त्यामुळेंच यज्ञामध्यें तुला हविर्भाग दिला आहे. तो तूं ग्रहण कर आणि आमचा यज्ञ संपन्न कर. तूं आम्हाला रूपवान पुत्र आणि धन प्रदान कर. हे अमावास्ये, तुझ्यामुळें श्रेष्ठ कर्म करणाऱ्या इंद्रादि देवता माझ्यामध्ये स्थित झाल्या आहेत. ही अमावास्या रसपूर्ण अन्न आणि धन घेऊन आमच्याकडे येवो. हवि प्रदान करून आम्ही तिचें पूजन करतो. तुझ्याशिवाय सृष्टीची उत्पत्ती होत नाहीं. ज्या इच्छेनें आम्ही तुम्हाला हवि प्रदान करतो ती आमची इच्छा पूर्ण होऊन आम्ही धनपति होवूं.

**८०. पूर्णिमा** (पौर्णिमा)

पौर्णिमा पूर्वेला राहाते. तेथून ती आकाशमध्य आणि पश्चिमेस जाते. ह्या पौर्णिमेमुळें अग्नि, सोम वगैरे देवता निवास करतात. आम्हाला अन्नसमृद्ध करतात. अभीष्ट फलाचा वर्षाव करणाऱ्या पौर्णिमेची आम्ही पूजा करतो. त्यामुळें आम्हाला अविनाशी धन प्राप्त होते. हे प्रजापते, सृष्टीमध्यें तूं सर्वश्रेष्ठ आहेस. आम्ही तुला हवि देतो. त्यायोगें आम्हाला अभीष्ट फलाचा लाभ होवो. ही रात्र संपल्यावर तयार होणारी सोमादि हविर्द्रव्यें पूर्ण झाली आहेत. हे पौर्णिमे, यज्ञामध्यें यजमान आणि ऋत्विज तुझ्याकडून अभीष्ट फलाची इच्छा करतात. त्यांना स्वर्गामध्ये स्थान प्राप्त होतें.

**८१. सूर्याचन्द्रमसौ** (सूर्य आणि चंद्र)

सूर्य आणि चंद्र जलयुक्त आकाशात संचार करतात. त्या ठिकाणा-

हून सूर्य सर्व लोकांतील प्राणिमात्रांना पाहातो आणि चंद्र ऋतु आणि पक्ष रूपानें नित्य नव्यानें जगाकडे पाहातो. हे चंद्रा, प्रतिदिनी एक एक कला वाढतां वाढतां सर्व तिथी तुझ्या स्वाधीन होतात. तूं रात्रीचा जनक आणि नियंता आहेस. तुझ्यामुळेंच दिवसाचा जन्म होतो. शुक्ल पक्षांत पश्चिमेस आणि कृष्ण पक्षांत पूर्वेस तुझें दर्शन घडतें. तूं दीर्घायु प्रदान करतोस. चंद्राचा पुत्र बुध, वीरांचा पालनकर्ता, हविज्ञानानें प्रसन्न होणारा आणि पुत्रादि धनांनी लोकांना समृद्ध करणारा आहे. हे सोमा, तूं दर्शनयोग्य आहेस. तृतीयेपासून तुझें स्पष्ट दर्शन घडतें. पौर्णिमेला ते पूर्ण होतें. जो आमचा द्वेष करतो किंवा आम्ही ज्याचा द्वेष करतो त्याचा प्राण हे चंद्रा तू हरण कर आणि आम्ही, आमच्या गाई, अश्व आणि प्रजा यांना समृद्ध कर. जी देवता सोमाला कले-कलेनें वाढविते आणि क्षयशून्य सोमाचा पितर म्हणून आदर केला जातो त्या सोमासह इंद्र, वरुण, बृहस्पति आणि विश्वेदेव आमचे ऐश्वर्य वृद्धिंगत करोत.

## ८२. अग्निः (अग्नि)

हे गाईंनों, आदरणीय अग्नीची पूजा करा. आमच्याकडे मंगल-मयतेचा ओघ वाहता ठेवा. या यज्ञांत अग्नि आदिकरून देवतांना घृता-हुती घेण्यासाठीं पाचारण करा. या अग्नीच्या सेवेनें शारीरिक आणि आत्मिक बल प्राप्त होतें त्याप्रमाणें वैश्वनरापासून आरोग्य प्राप्त होतें. माझ्या ह्या समिधा अग्नीला अर्पण होवोत. हे अग्ने, तूं नेहमी प्रसन्नपणें आमचें ऐश्वर्य वाढवितोस आणि आमचा जे द्वेष करतात त्यांना नेहमी दूर ठेवतोस. तूं आपल्या बलानें वृद्धिंगत होतोस. त्याप्रमाणें तुझ्या सेवकांचे बलही तूं वृद्धिंगत कर. उषा देवीच्या बरोबर अग्नि प्रदीप्त होतो. दिवसा तो सूर्याच्या रूपानें सर्वत्र प्रकाशतो. सूर्यरूपी अग्नि आपल्या किरणांनी पृथ्वीवर प्रकाश पसरवतो. हे अग्ने मनु तुला तुपानें प्रदीप्त करतो. गाई तुझ्यासाठीं लागणाऱ्या तुपाकरितां भरपूर दूध देतात.

## ८३. पाशमोचनम्

जल हें वरुणाचें सुवर्णमय घर आहे. तें तूं आमच्यासाठीं स्थापन

कर. हे वरुणा, आमच्यामध्यें जी रुग्णता किंवा पाप असेल त्यापासून तूं आम्हाला मुक्त कर. आमच्या शरीरामध्यें ऊर्ध्व, मध्य आणि अधो-भागी जे बंधन असेल त्यापासून तूं आम्हाला मुक्त कर. म्हणजे आम्ही अविनाशी होऊं. दुःखद स्वप्न आणि तुझें पाश यांतून मुक्त झाल्यावर मला पुण्यलोक प्राप्त होईल.

८४. **क्षत्रभृदाग्नि** (रक्षण करणारा अग्नि)

हे अग्ने, उत्पन्न झालेल्या सर्व प्राणिमात्रांना तूं जाणतोस. तूं अमर्त्य आणि बलवान आहेस. या मंगलसमयीं तूं प्रदीप्त होऊन रक्षण-साधनांनीं आमचें संरक्षण कर. हे इंद्रा, तूं आमचें क्षयापासून रक्षण करण्यासाठीं ये. अभीष्टवर्षक अग्ने, आमच्या बरोबर शत्रूप्रमाणें व्यवहार करणाऱ्या लोकांचा नाश करण्यासाठीं तूं प्रकट हो.

८५. **अरिष्टनेमिः** (गरुड)

देवतांकरितां सोम घेऊन येणाऱ्या तृक्ष पुत्र सुपर्णाला आवाहन करतो. तो अरिष्टनेमीचा पिता शत्रूवर विजय प्राप्त करणारा आहे. या लोकीं त्याचा रथ सोम आणण्यासाठीं वेगानें जावो.

८६. **त्राता इंद्र** (रक्षक इंद्र)

(ही इंद्राची एक उत्तम प्रार्थना आहे. या ऋचेच्या उच्चारा-बरोबर यज्ञसमयीं अग्नीला आहुती प्रदान करून अभीष्ट प्रार्थितात.)

**त्रातारमिन्द्रमवितारमिन्द्रं हवे हवे सुहवं शूरमिन्द्रम् ।**
**हुवे नु शक्रं पुरुहीतमिन्द्रं स्वस्ति न इन्द्रो मघवान् कृणोतु ।।**

प्राप्त झालेल्या भयापासून रक्षण करणाऱ्या, सर्व प्रकारच्या युद्धा-मध्ये बोलाविला जाणाऱ्या, शक्र किंवा पुरुहूत इंद्राला आमचें मंगल करण्यासाठीं आम्ही आवाहन करीत आहोत.

८७. **व्यापको देवः** (सर्वव्यापक देव)

जो रुद्र ज्वालारूपानें अग्नीमध्यें, वरुणरूपानें पाण्यामध्यें आणि सोमरूपानें वेलीमध्यें स्थिर झाला आहे त्या रुद्रात्मक गुणवान अग्नीला मी वंदन करतो.

८८. **सर्पविषनाशनम्** (सर्पाच्या विषाचा नाश करणें)

हे विषा, दंश झालेल्या पुरुषापासून तूं दूर हो कारण तूं सर्वांचा

शत्रू आहेस. तूं सर्पांमध्यें प्रवेश कर. तुझी ज्या सर्पापासून उत्पत्ती झाली त्या सर्पाचा तूं नाश कर.

## ८९. दिव्या आपः (गुणवान पाणी)

पाण्यामध्यें औषधींचा रस मिसळून त्याच्या सेवनानें मी बलवान होईन. हे अग्ने, मी आणलेलें हे दूध तुझ्या तेजानें समृद्ध कर. तूं मला पुत्र पौत्रादिकांसह बलवान कर म्हणजे इंद्रही इतर ऋषींप्रमाणें मला पवित्र करील. हे उदका, पित्याचा अनादर करणें, कर्ज परत न करणें, असत्याचरण, यामुळें घडलेल्या पापापासून तूं मला मुक्त कर. तूं ज्याप्रमाणें प्रदीप्त होशील त्याप्रमाणें मला तुझ्यामुळें मिळणारें फळ-देखील उत्तम असेल.

## ९०. शत्रुबलनाशनम् (शत्रूचें सामर्थ्य नाहीसें करणें)

हे अग्ने, हिंसक शत्रू, त्याचें बल आणि वीर्य यांना तूं नष्ट कर. हे दुष्ट शत्रो, मी इंद्रापासून बल प्राप्त करतो आणि संतान उत्पत्तीला आवश्यक असणारें तुझें सामर्थ्य नष्ट करतो. वाक्ताडण करणारे आणि पीडा देणारे शत्रू नष्ट होवोत. स्त्रियांबरोबर दुष्ट कर्म करण्याचें त्याचें सामर्थ्य नष्ट होवो.

## ९१. सुत्राता इंद्र (तारक इंद्र)

हा इंद्र आम्हाला सुख प्रदान करो. आमचें रक्षण करो. आमच्या शत्रूचा नाश करो. आमचा शत्रू आमच्या भयानें दूर जावो. आम्ही वीर्यवान आणि धनिक स्वामी होऊं.

## ९२. सुत्राता इंद्रः (तारक इंद्र)

आमचें रक्षण करणारा इंद्र आमच्या शत्रूला दूर घालवो. त्या इंद्राच्या प्रसन्नतेमध्यें राहाणाऱ्या माझें सदैव मंगल होवो.

## ९३. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

युद्धेच्छु शत्रूला इंद्राच्या सहाय्यानें आम्ही वश करतो. इंद्र त्यांपैकीं सर्वांना ठार करील.

## ९४. **सांमनस्यम्** (एक विचार)

आम्ही सोमरूपी राजाला रथानें आणतो. इंद्र आमच्या पुत्र-पौत्रादिकांना एका विचार-आचाराचें तयार करो.

## ९५. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

शत्रूचें गोठे उद्ध्वस्त होऊन त्याचें प्राण गिधाडाप्रमाणें आकाशमार्गानें जावोत आणि मृत्यूचें दूत शत्रूच्या हृदयाला त्रास देवोत. वसलेल्या बैलाला उठविलें जातें, भुंकणाऱ्या कुत्र्याला घालवून दिलें जातें, गाईंचें पालन करतांना वकऱ्यांना घालवून दिलें जातें, त्याप्रमाणें शत्रूच्या प्राणांना आम्ही घालवून देतो. ज्या स्त्री-पुरुषांनीं आमचें धन हिरावून घेतलें आहे त्यांना मी बद्ध करतो.

## ९६. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

पक्षी ज्याप्रमाणें घरट्याकडे जातात किंवा गाई आपल्या गोठ्याकडे जातात पर्वत ज्याप्रमाणें आपल्या जागीं स्थिर आहेत, त्याप्रमाणें लांडगे शत्रूच्या सैन्याकडे धांव घेऊन तेथेंच स्थिर होवोत.

## ९७. **यज्ञः** (यज्ञ)

हे अग्ने, मी होता म्हणून तुझा स्वीकार करतो. आम्हाला इच्छित फल प्रदान करण्यासाठीं तूं आमच्याकडें ये. हे इंद्रा, आमची वाणी स्तुतिपूर्ण कर. आम्हाला पशुधन, वेदार्थज्ञान आणि विविध अनुष्ठानांनी संपन्न कर. देवतांचें हित करणाऱ्या इंद्रा, आम्हाला सर्व देवतांची कृपा लाभो. ज्या देवतांना जो हवि प्रिय असेल त्या देवता या ठिकाणीं येवोत. यज्ञाचा यजमान संपन्न होवो. हे देवतांनो, तुमच्यासाठीं आम्ही पवित्र स्थानें निर्माण केली आहेत. तुम्ही सूर्याप्रमाणें या पवित्र स्थानीं पदार्पण करा. हे यज्ञा, ज्या भगवान विष्णूमुळें तुला प्रतिष्ठा लाभली त्या देवतेकडें तूं जा. यजमानाला फलसमृद्ध कर आणि संसारी जीवनाला कारणीभूत हो. आम्ही तुला ही तुपाची आहुती प्रदान करतो. हे यज्ञपते, हा यज्ञ कल्याणमय होवो. ज्या देवतांची आम्ही अजून पूजा केली नाहीं त्यांना आम्ही घृताहुती प्रदान करतो. हे देवतांनों, ज्या

मार्गानें तुम्ही या यज्ञस्थळीं आलांत तो मार्ग संपन्न करा. मनाचें स्वामी असलेल्या देवतांनों, आमचा यज्ञ स्वर्गफलानें पृथ्वी, आकाश आणि अंतरीक्ष यांमध्ये स्थापन करा.

९८. **हवि** (आहुती)

स्रुवा वगैरे ठेवण्याचें स्थान बर्ही, पुरोडाश, घृतादि, वसुदेव, इंद्र, मरुत्‌गण आणि विश्वेदेव यांच्या योगें हा यज्ञ संपन्न झाला आहे. ही सर्व साधनें इंद्राच्या निमित्तानें यज्ञात समर्पित होवो.

९९. **वेदी** (यज्ञवेदी)

दर्भांनी ही वेदी झाकून टाका. या यज्ञाच्या यजमानांना नष्ट करूं नका. हे दर्भ हिरव्या रंगाचे असून होत्यासाठीं याचें आसन तयार केलें आहे. या यजमानाचें भोगस्थान सुवर्णमय राहो. हे दर्भांनों, तुम्ही ही वेदी झाकून टाका.

१००. **स्वप्ननाशनम्** (दुःखद स्वप्नांचा नाश करणें)

मी दुःखद स्वप्नापासून निर्माण होणारें पाप व दारिद्र्य यांपासून मुक्त होत आहे. कारण दुष्ट स्वप्नांचें निवारण करणारें मंत्र मला ज्ञात असून त्यांच्या साह्यानें मी माझ्या भोंवतीं कवच तयार करीत आहे.

१०१. **दुःस्वप्ननाशनम्** (दुःखद स्वप्नांचा नाश)

जें अन्न मी स्वप्नांत भक्षण करतो ते अन्न सकाळ होतांच दिसत नाहीं. हे स्वप्नांतील भोजन, अखाद्य भक्षण, वगैरे सर्व माझ्यासाठीं कल्याणमय होवो.

१०२. **आत्मनोऽहिंसनम्** (आत्म्याला त्रास न देणें)

आकाश, पृथ्वी, अंतरीक्ष आणि मृत्यू यांना वंदन करणारा मी या लोकीं पुष्कळ काळपर्यंत राहीन. या स्थानाचें स्वामी अग्नि, वायु आणि सूर्य मला त्रास न देवोत आणि मृत्युदेखील मला न मारो.

१०३. **क्षत्रियः** (क्षत्रिय)

ह्या पिशाच्चापासून कोण माझें रक्षण करील ? आम्ही संपन्न

करीत असलेला यज्ञ कोणास आवडेल ? आम्हाला धन कोण प्रदान करील किंवा आम्हाला कोण दीर्घायु करील ?

१०४ **गौः** (गाय)

भिन्न वर्णाच्या, वत्सयुक्त आणि अथर्व ऋषीनें वरुणाला दान केलेल्या गाईंना बृहस्पतिमित्र प्रजापती शरीर-सामर्थ्य प्रदान करतो.

१०५. **दैव्यं वचः** (दैवी वाणी)

हे मनुष्या, लौकिक कर्में बाजूला करून, दैवीवाणीचा अभ्यास करून, सहाध्यायीच्या बरोबर वेदाध्ययन करणाऱ्या नम्र लोकांचा तू आश्रय कर.

१०६. **अमृतत्वम्** (अमृतमयता)

हे अग्ने, आम्ही जें कर्म विस्मरणामुळें केलें नाहीं किंवा ज्या कर्माचा आम्ही लोप केला त्यापासून निर्माण झालेल्या पापापासून आमचें रक्षण करा. तुमच्या कृपेनें आमची यथोचित कर्में पूर्ण होऊन आम्हास अमरत्व प्राप्त होईल.

१०७. **संतरणम्** (वरून जाणें)

कश्यप नामक सूर्याचे सात किरण जलरूपानें पृथ्वीवर अवतरतात. हे रोगग्रस्त पुरुषा, हे जलरूप किरण, तुझे पीडादायक कफादि रोग नष्ट करतील.

१०८. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

हे अग्ने, जो आम्हास मारण्याची इच्छा करतो किंवा आमचे तेज नष्ट करतो किंवा जो आम्हाला नष्ट करण्याची इच्छा करतो यांना राक्षसी, घर–पुत्रादि पासून वंचित करो. झोपेंत, जागेपणीं, बसलेले असतांना अगर फिरतांना आमचा घात करण्याची जो इच्छा करतो त्या शत्रूला वैश्वानर अग्नि भस्मसात करो.

१०९. **राष्ट्रभृतः** (राष्ट्रीयता)

आम्हाला विजय प्राप्त करून देणाऱ्या देवतेला आमचा नमस्कार

असो. मंत्र आणि घृतानें तयार केलेल्या पाशानें बभ्रु देवता आम्हाला विजय प्राप्त करून देवो. हे अग्ने अंतरीक्षांतील अप्सरांना तूप नेऊन दे. आमच्या शत्रूला मात्र माती दे. इंद्रादि देवता हवि भक्षण करून प्रसन्न होवोत. अप्सरा माझ्या हातांना यश देवोत आणि आमच्या शत्रूचा पराभव करोत. वीज ज्याप्रमाणें वृक्षांना भस्म करते त्याप्रमाणें त्यांना भस्म करो. जिनें शत्रूचें धन आणि दृष्टीवर विजय प्राप्त केला आहे ती देवता आमचा हवि स्वीकारो आणि आमच्यावर प्रसन्न होवो. हे गंधर्वांनों तुम्ही धनद आहांत. राष्ट्रभृत नामक अक्षरांचे नातेवाईक आहांत. या गंधर्वांची आम्ही सोमानें पूजा करतो त्यामुळें आम्ही धनपति होऊं. धनप्राप्तीसाठी मी अग्नीला आवाहन करीत आहे. हा बभ्रू आमचे पाश नाहीसे करो आणि आम्हाला विजय आणि सुख प्रदान करो.

### ११०. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

हे इंद्राग्नीनों, तुम्ही वृत्राचा वध केलांत. तुम्हाला हवि देणाऱ्या यजमानाचें पाप तुम्ही नाहीसे करा. तुमच्यामुळें अन्य देवतांना स्वर्गाची प्राप्ती झाली. तुम्ही सर्व प्राणिमात्रांमध्यें आहांत. तुम्ही सर्व कर्मांचे साक्षी व इच्छित फल देणारे आहांत. बृहस्पतीनें सोमामुळें तुम्हाला वश करून घेतलें. सोम सिद्ध करणाऱ्या यजमानाला धनादि देऊन त्याचें पालन करा आणि त्यांनीं केलेली स्तुती श्रवण करा.

### १११. आत्मा (आत्मा)

हे देवते, तूं सोमधारक आहेस. तूं या लोकामध्यें प्रजा निर्माण कर. यजमान आणि त्याच्या गाई यांची प्रजा सुखरूप राहो.

### ११२. पापनाशनम् (पापाचा नाश करणें)

हे आकाश आणि पृथ्वी अत्यंत शोभायमान असून त्या ठिकाणी अनेक प्रकारचे जीव राहतात आणि पाण्याचे प्रवाह वाहतात. विशाल कर्म करणारी द्यावापृथ्वी आम्हाला पापातून मुक्त करो. ब्राह्मणाचा आक्रोश आणि असत्य भाषणरूपी पाप माझ्यापासून दूर राहो. देवतांच्या बाबतीत माझ्याकडून घडलेलें पाप नष्ट होवो आणि माझें रक्षण होवो.

## ११३. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

काम आणि धनतृष्णा स्त्रीपुरुषांमध्यें कलह निर्माण करते. या तृष्णेमुळें आपल्या वीर्यवान पुरुषाचासुद्धां स्त्री द्वेष करते. हे तृष्णे तूं दाहक व विषरूप आहेस. बैल वंध्या गाईचा ज्याप्रमाणें त्याग करतो त्याप्रमाणें या तृष्णेचा त्याग करावा.

## ११४. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

हे द्वेषी आणि अधम स्त्रिये, तुझ्या मांड्या, कंबर, पाय वगैरे अवयवांमध्यें जे सौंदर्य आहे ते मी काढून घेतो. तुझे मुख-सौंदर्यही मी नाहीसे करतो. सर्व अवयवांचे तेज क्षीण करतो. तुझ्या पीडा आणि राक्षसांची स्मृती नाहीशी होवो. निंदा नाहीशी होवो. अग्नि राक्षस व पिशाच्च यांचा संहार करील. अनिष्ट चिंतन करणाऱ्यांना सोम नष्ट करील.

## ११५. पापलक्षणनाशनम् (पाप लक्षणांचा नाश)

हे पापदेवते या ठिकाणाहून तूं दूर निघून जा. शूलधारी शत्रूशी तुझी गाठ पडो. जी पापदेवता मला सुख देत आहे त्या दारिद्र्य देवतेला या ठिकाणाहून दूर घालविणारा सूर्य आम्हाला सुवर्ण प्रदान करो. मनुष्याच्या जन्माबरोबर शतावधि दोष निर्माण होतात. त्यामध्यें जे पापमय आहेत त्यांना मी दूर करीत आहे. हे अग्ने, कल्याणमयी देवतेला माझ्या घरी स्थापन कर. यजमान गोठ्यांतील गाईंना ज्याप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं बांधतो त्याप्रमाणें लक्ष्मी निरनिराळ्या घरी स्थिर होते. त्यांतील कल्याणमय लक्ष्मी माझ्याजवळ राहून पापयुक्त धन नष्ट करो.

## ११६. ज्वरनाशनम् (तापाचा नाश करणें)

उष्णज्वर, रूरज्वर, शरीरपीडक शीतज्वर आणि अन्य पीडादायक ज्वर यांना माझा नमस्कार असो. हा ज्वर बेडकाकडे निघून जावो.

## ११७. शत्रुनिवारणम् (शत्रूचा नाश करणें)

हे इंद्रा, तूं मदयुक्त आणि मोराप्रमाणें लव असलेल्या घोड्यांच्या साहाय्यानें या ठिकाणीं ये. तुला कोणीही अडथळा करणार नाहीं.

तहानेला मनुष्य ज्याप्रमाणें वाळवंटाचा त्वरित त्याग करतो त्याप्रमाणें अन्यांचा त्याग करून तूं सत्वर या ठिकाणीं आगमन कर.

## ११८. वर्मधारणम् (मर्मस्थानांचे ज्ञान करून घेणें)

हे राजा तूं विजयाची इच्छा करतोस. मी तुझी मर्मस्थाने कवचानें आच्छादित करतो. राजा सोम तुला कधीही कमी न होणाऱ्या तेजानें तेजस्वी करो. इंद्र तुला शत्रुसेनेवर विजय प्राप्त करण्याची स्फूर्ति देवो. वरुण तुम्हाला महान सुख प्रदान करो.



# अष्टम काण्ड

## १. दीर्घायुः प्राप्तिः ( दीर्घायुष्य प्राप्ति )

मृत्युदेवतेला आमचा नमस्कार असो. तिच्या कृपेनें प्राणापान या शरीरांत संचार करतात. प्राणादि सतत राहावेत म्हणून सूर्याचा एक भाग बनलेल्या पृथ्वीवर तो निवास करतो. भग देवता त्याचा उद्धार करते. चंद्र, मरुत आणि इंद्र त्याचे रक्षण करतात. हे जगण्याची इच्छा असणाऱ्या मनुष्या प्राण आणि मन तुझ्या शरीरांत संचार करतो. मृत्यूला बाजूला कर. सर्व बंधनें तोडून टाक. सूर्य, अग्नि आणि पृथ्वीचा त्याग करू नकोस. अंतरिक्षांत संचार करणारा वायु तुला सुख देवो. पाणी तुला अमृताप्रमाणें साथ करो. सूर्याचे तेज तुला सुखावह होवो आणि मृत्यु तुझ्यावर दया करो. तू मृत्युपाशातून मुक्त हो. औषधी तुला मदत करतील. तुझे मन यमाचा विचार न करो. मानवांचा तुला तिरस्कार न वाटो. इंद्रादि देव तुझें रक्षण करोत. पितरांकडे जाण्याचाही विचार तूं सोडून दे. तुला ते या ठिकाणी परत येवूं देणार नाहीत. त्या अंधःकारातून निघून तूं प्रकाशाकडे ये. मी तुला सहाय्य करतो. यममार्गामध्ये असलेला काळा व पांढरा कुत्रा तुला त्रास न देवोत. त्या कुत्र्यांचे भक्ष्य न बनतां आणि सर्व विषयांतून निवृत्त होऊन तूं ये. मृत्यूच्या मार्गानें जाणाऱ्यांचें तूं अनुकरण करुं नकोस कारण मृत्यूच्या पूर्वी त्या मार्गाचें ज्ञान होत नाही. मृत्यूचा मार्ग भयप्रद आहे

आणि आमचा मार्ग भयमुक्त आहे. समुद्रांत निवास करणारा वडवानल तुझे रक्षण करो. आहवनीय, वैश्वानर, वैद्युत्, ऋत्याद्, संकुसुम नावाचा अग्नि, सूर्य, चंद्र, आकाश, अंतरिक्ष, पृथ्वी, बोध, प्रतिबोध व अस्वप्न तुझें रक्षण करोत. त्या देवतांना नमस्कार पूर्वक ही आहुती समर्पण होवो. वायु, इंद्र, धाता आणि सूर्य तुला पुत्रादि प्रदान करून रक्षण करोत. जंभ राक्षस तुझ्यापर्यंत न येवो. धाता, अष्टावसु, इंद्र, अग्नि, आकाश आणि पृथ्वी तुला मृत्यूपासून वाचवोत. प्रजापती तुला मृत्युपासून परत आणील आणि औषधी तुझें रक्षण करतील. हा मनुष्य या ठिकाणीच राहील. स्वर्गांत येणार नाही. कारण अत्यंत परिणामकारक साधनांनी आम्ही याला मृत्यूपासून परत आणले आहे. जगण्याची इच्छा असणाऱ्या पुरुषा देव तुझें पोषण करोत. तुझ्या बंधूजाया व बंधू दुःख न करोत. तुला मृत्यूपासून परत आणण्याने तुझा पुनर्जन्म झाला आहे. तुला शंभर वर्षांचे आयुष्य प्राप्त झाले आहे. तुझी सर्व इंद्रियें कार्यक्षम आहेत. हे पुरुषा तुझें अज्ञान दूर झाले आहे. पाप आणि मृत्यु दूर गेले आहेत. सर्व रोगही नष्ट झाले आहेत.

## २. **दीर्घायुः प्राप्तिः** ( दीर्घायुष्य प्राप्ति )

जगण्याची इच्छा असणाऱ्या पुरुषा, वृद्धत्वापर्यंत स्थिर राहून तूं अमृतत्त्वाचा अनुभव घे. राजस आणि तामस गुणांचा आश्रय करून तूं हिंसक बनू नकोस. तुझ्यासाठी मृत्यूकडून प्राणापानादि वायू प्राप्त केले आहेत. तुला चैतन्य प्राप्त होवो. निंदा आणि रोग यांचा त्याग कर म्हणजे दीर्घायुष्य लाभेल. तुझ्या प्राणांचें पोषण केलें आहे. सूर्यानें तुझ्या नेत्रांचें रक्षण केलें आहे. मरणसमयीं निघून गेलेल्या मनाची तुझ्यामध्ये मी स्थापना केली आहे. वायू ज्याप्रमाणें अग्नीला प्रज्वलित करतो त्याप्रमाणें तुझ्या प्राणांना मी चैतन्यमय केले आहे. ह्या पुरुषाला मरण न येवो. आम्ही त्याला जिवंत ठेवीत आहोत पाठा नामक औषधी, जीवन प्रदान करणारी आणि सदैव ताजी आहे. ती नाहीशी न होवो. सर्व भूमीवर ती निर्माण होवो. हे मृत्यो या पुरुषावर दया कर. त्याची सर्वांगें सदृढ राहोत आणि त्याला शतवर्षांचें आयुष्य प्राप्त

होवो. तुझ्यावर देवतांची अस्त्रे न पडोत. तुला जिवंत राहतां यावे म्हणून मी अग्नीची साधना करतो. हे मृत्यो, तुझ्या मार्गानें जाणाऱ्यास अडथळा करण्यास कोणीही समर्थ नाहीं. या पुरुषाचें रक्षण करून मंत्राचें कवच तो धारण करो. जरा तुला स्पर्श करणार नाही. यमदूत तुला स्पर्श करणार नाहीत. पापदेवता निर्ऋति मांसभक्षक पिशाच्च आणि अंधकाराचा आश्रय करणाऱ्या राक्षसांना मी ठार करतो. निर्ऋति तुझे पाप हरण करील. म्हणून अग्नीकडे तुझ्या प्राणांची प्रार्थना करतो. सर्व गतिकर्मे तुला पोषक ठरोत. पृथ्वी आणि आकाश तुला मंगल-दायी होवोत. तुझी समृद्धी होवो. सूर्याचा ताप, वायूचे वहन व जलाचा स्वादिष्टपणा तुला रोचक होवो. औषधी, पृथ्वी, सूर्य, चंद्र, वस्त्र तुला सुखद होवोत. हे बालका तूं संसारक्षम आणि तेजस्वी हो. तुला भक्षण करण्यास योग्य असें अन्न तुला कधीही क्षीण न करो. तूं जे अन्न भक्षण करतोस आणि दूध प्राशन करतोस ते सर्व मी विषरहित करीत आहे. रात्र आणि दिवसांच्या देवता या बालकाचें सर्वांपासून रक्षण करोत.

हे बालका, तुला शतवर्षांचें आयुष्य लाभो. तुझ्यासाठीं आम्ही दांपत्यरूपी युग निर्माण केलें आहे. देव त्याला अनुमति देवोत. तुझे रक्षण व्हावें म्हणून शरद, हेमंत, वसन्त आणि ग्रीष्म हे चार ऋतु, वर्षांचे तीनशेंसाठ दिवस आणि सर्व प्रकारच्या औषधी तुला देण्यांत आल्या आहेत. मृत्यु, पशु आणि पक्षी या सर्वांचा स्वामी आहे. त्याच्या पाशापासून मी तुझी सुटका करतो त्यामुळें तूं मृत्यूची भीती बाळगूं नकोस. पिशाच्च आणि राक्षस यांना आवरून धरण्यासाठी जी शांति-कर्मे केली जातात ती तुझे रक्षण करोत. शत मृत्यू आणि नाष्ट्रा शक्तीला उल्लंघता येतां नाही. देवता त्यापासून तुझें रक्षण करोत. अग्नि तुझे रक्षण करो. हे पूतद्रु नामक वृक्षा, तूं औषधरूप, रोगनिवारक, शत्रूंचा संहारक व बालकांची कामना पूर्ण करणारा आहेस.

### ३. शत्रुनाशनम् (शत्रूचा नाश करणें)

घृतानें प्रज्वलित केलेल्या अग्नीला, कामनापूर्तीसाठीं मी शरण

आहे. आपल्या तीक्ष्ण ज्वालांनी तो आमचें रक्षण करो. प्रज्वलित झालेल्या अग्ने तूं तुझ्या ज्वालांनी हिंसक राक्षसांना स्पर्श कर आणि अभिचार करणाऱ्यांचें आणि पिशाच्चांचें भस्म कर. तूं महान शक्ति-संपन्न आहेस. आमच्या लहान मोठ्या आणि निरनिराळ्या ठिकाणी संचार करणाऱ्या शत्रूला नष्ट कर. राक्षसांना तेजहीन कर. मेलेल्या राक्षसांना लांडगे भक्षण करोत. उपद्रव देणाऱ्या सर्व राक्षसांना तूं आपल्या ज्वालांनी नष्ट कर. आमच्या मंत्र अनुष्ठानानें बाण तीक्ष्ण होवोत आणि ते राक्षसांची हृदयें विदीर्ण करोत. तू त्यांच्या भुजा तोडून टाक. हे अग्ने, आम्ही तुझी स्तुती करतो. तूं आमचें पोषण कर. राक्षसांना नष्ट कर. त्यांचें मांस धवलवर्णाचे पक्षी भक्षण करोत. आपल्या ज्वालांनी तूं राक्षसांचें भस्म कर. आपल्या उग्र रूपानें आमच्या यज्ञाचें रक्षण कर. आमचा यज्ञ भगवंतांपर्यंत पोहोचव. हे अग्ने, तूं मनुष्यांना दण्ड देण्यास किंवा त्यांच्यावर अनुग्रह करण्यास समर्थ आहेस. तूं आपल्या तेजाने राक्षसांचे तीन ठिकाणी तुकडे कर.

हे अग्ने, माझ्या यज्ञामध्यें विघ्न आणणाऱ्या राक्षसांना तूं आपल्या ज्वालांनीं नष्ट कर. या राक्षसांच्या भीतीनें लोक आक्रोश करीत आहेत तर स्तोत्यांना नीट मंत्रोच्चार करतां येत नाहीं. दुसऱ्यांचे प्राण हरण करणाऱ्या या राक्षसांना तूं आपल्या तेजानें भस्म कर. म्हणजे ते पुन्हा या ठिकाणीं येणार नाहींत. हे राक्षस असत्य बोलणारे आणि सज्जनांना शाप देणारे आहेत. हे घोडा अगर मनुष्यांचें मांस भक्षण करतात. गाईचे दूध जबरदस्तीनें काढून घेतात. हे गाईंना त्रास देणारे आणि पृथ्वीवरील पदार्थ विषयुक्त करणारे आहेत. हे अग्ने, सूर्य यांना अन्न देणार नाहीं, आमच्या गाई आम्हाला वर्षभर दूध देतील, असे कर. मांसभक्षक, चारही दिशांमध्यें संचार करणारे राक्षस आपल्या संरक्षण आयुधांनी नष्ट कर. अग्ने तूं माझा मित्र आहेस, अमर आणि अजर आहेस. तूं मरणशील आणि जीर्ण झालेल्या माझें रक्षण कर.

हे राक्षस पशुरूप धारण करून आम्हाला त्रास देतात. हे घर्षणोत्पन्न अग्ने, तूं आपल्या तेजांनी यांना भस्म करून टाक. हा अग्नि आपल्या तेजानें सर्व वस्तु प्रकाशित करतो. राक्षसांची मायावी कृत्ये नष्ट करतो.

राक्षसांना ठार करण्यासाठी आपल्या ज्वाला मोठ्या करतो. हे अग्ने, तुझें रूप आणि आयुधें राक्षसांना पीडा निर्माण करणारी आहेत. तूं गौरवपात्र आहेस. अमर आणि प्रदीप्त ज्वालायुक्त आहेस.

### ४. शत्रुदमनम् (शत्रूला दण्ड देणें)

हे इंद्र आणि सोमा, तुम्ही मंगलाचा वर्षाव करणारे, पापी लोकांना दण्ड करणारे, दुष्ट कर्म करणाऱ्या राक्षसांना आश्रयहीन करणारे आणि आयुधयुक्त आहात. आम्हाला त्रास देणाऱ्या, दुष्ट कर्म करणाऱ्या आमच्यामध्यें द्वेषभाव उत्पन्न करणाऱ्या, प्राण्यांचीं हिंसा करणाऱ्या राक्षसांना आपल्या वज्रानें ठार कर. अग्नीमध्यें लोह ज्याप्रमाणें तप्त होते त्याप्रमाणे ह्या राक्षसांना ताप निर्माण कर. अंतरीक्ष आणि आकाशांत संचार करणाऱ्या राक्षसांना मार म्हणजे ते पृथ्वीवर मृत होऊन पडतील. चांगली दोरी ज्याप्रमाणें अश्वांना बांधते त्याप्रमाणें आम्ही स्तुतीने तुम्हाला वद्ध करीत आहोंत. तुम्हाला त्यामुळें प्रेरणा प्राप्त होईल. राजाचे बंदीजन ज्याप्रमाणे राजाला स्फूर्ति देतात त्याप्रमाणें आमच्या स्तुतीनें तुम्हाला पराक्रमाची प्रेरणा प्राप्त होईल. तुम्ही तुमच्या वेगवान अश्वांच्या साहाय्यानें आमच्याकडे या. दुष्टकर्म करणाऱ्यांचे जीवन दुःखमय करा. आमचा जो शत्रू आम्हाला पुन्हा पुन्हा त्रास देतो त्याला दुःख द्या. असत्य वाणीनें जो आम्हाला शाप देतो, सत्य कथन करणाऱ्या लोकांना जो हिंसित करतो, जो माझ्या मंगल कार्यांत विघ्न निर्माण करतो त्यांना विषारी सर्पाकडे पाठवा किंवा पापदेवता निर्ऋतीच्या स्वाधीन करा. जो आम्ही आमचा परिवार, पशु, पुत्र वगैरेंच्या शरीरांतील जीवनरस शुष्क करण्याची इच्छा करतो त्या दुष्टाची हिंसा करा.

जो शत्रू रात्रंदिवस आमचा वध करण्याची इच्छा करतो त्याला हे इंद्रा, तूं पुत्रहीन कर आणि त्याला तमलोकांत पाठव. सत्य आणि असत्य एकमेकांच्या विरुद्ध आहेत हे विद्वान जाणतात त्यांतील सत्याचें रक्षण सोम करतो आणि असत्य वचनी लोकांना तो हिंसित करतो. पापी आणि असत्य वचनी लोकांना सोम शिक्षा करतो. हे अग्ने, देवतांवर

विश्वास न ठेवणारा अगर मिथ्थ्याचरणीं असा मी नाहीं. जो देवतांचा द्रोह करतो तो वाईट गतीला प्राप्त होतो. मी जर कोणाला ताप दिला तर मला मृत्यु येवो. जो दुष्ट स्वतःला सज्जन म्हणवून घेतो आणि सत्याचरणी पुरुषाला अपराधी ठरवतो त्याला हे इंद्रा, तुझ्या वज्रानें ठार कर. जी राक्षसी आम्हाला मारण्यासाठी रात्री धावते आणि स्वतः अदृश्य होऊन त्रास देते ती अंधःकारमय विवरांत पडो. हे मरुतांनो, या लोकांमध्यें अनेक प्रकारचा दुष्टाचार करणाऱ्यांना ठार करा. हे इंद्रा, सोमाच्या साहाय्याने तीक्ष्ण झालेल्या वज्रानें, पूर्वादि दिशांमध्यें राहा-णाऱ्या राक्षसांचा तूं संहार कर. कुऱ्हाड ज्याप्रमाणें वृक्ष तोडते आणि दंड ज्याप्रमाणें मडके फोडून टाकतो त्याप्रमाणें इंद्र राक्षसांचे अवयव तोडो. लोकांना यातना देणाऱ्या राक्षसांचें हवन होवो. अंतरीक्ष आम्हाला सुखद होवो. पृथ्वी रोगमुक्त होवो आणि आमचें रक्षण होवो. जे अभि-चार कर्म करतात त्यांचा शिरच्छेद होवो. हे इंद्रा, आमच्या संरक्षणासाठीं तूं नेहमी दक्ष राहा.

**५. प्रतिसरो मणि : (प्रतिकारक रत्न)**

हे रत्न वाईट कृत्य करणाऱ्यांचा प्रतिकार करणारें, यजमानाचें संरक्षण करणारें आणि मंगलता निर्माण करणारें आहे. हे रत्न शत्रूचा विनाश करणारें, अभिचार कर्म करणाऱ्यांना त्रास देणारें त्यांच्या विरुद्ध कर्म करण्यास प्रोत्साहन देणारें असल्यानें ते दंडामध्यें बांधलें जातें. त्यामुळें अभिचार कर्म करणारे लोक पराभूत होतात. आकाश पृथ्वी आणि चारही दिशांचे स्वामी या रत्नामुळें वश होतात. द्वेष करणाऱ्यांना जवळ येऊ न देणारें, रोगप्रतिकारक, सर्वांना वश करणारें आणि शत्रूला पळवून लावणारें हें रत्न आहे. अग्नि म्हणतो कीं हें रत्न संपत्ति वृद्धिगत करणारें आहे. सूर्य, इंद्र आणि बृहस्पति यांचाही हाच अनुभव आहे. या रत्नामुळें शत्रूनें कांही अभिचार कर्म केलें असेल तर ते फलहीन होईल. जो मनुष्य हे रत्न जवळ बाळगतो तो शत्रूवर विजय मिळवतो. अभिचार कर्माचा प्रतिकार करण्याच्या निमित्तानें रुद्र, अग्नि, सूर्य, विष्णु, प्रजापति, वैश्वानर, हिरण्यगर्भ, विराट आणि सर्व ऋषि

अभिचार कर्म नष्ट करणारे कवच धारण करवितात.

भारवाहकांमध्यें वृषभ व वन्य पशूंमध्यें सिंह श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें, ज्याच्यापासून आम्ही बलाची इच्छा करतो तो वृक्ष आणि त्याच्यापासून प्राप्त होणारा हा बीजरूप मणि श्रेष्ठ आहे. हा मणि जो जवळ बाळगतो तो सिंहाप्रमाणें बलवान होतो. वृषभ गाईंच्या कळपांत ज्याप्रमाणें स्वैरपणें संचार करतो, त्याप्रमाणें हा मणि जवळ बाळगणारा शत्रूमध्यें निर्वेध संचार करून त्याला वश करतो. हे मणे कश्यपानें या मण्याची उत्पत्ती केली आणि वृत्रहननासाठीं इंद्रानें तो धारण केला. शांतीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें तो जवळ बाळगावा. तो मणि वीर्यशाली, सर्वरक्षक आणि संतान प्रदान करणारा आहे. हे इंद्रा, चारही दिशांचे शत्रू नाहीसे करण्याचें सामर्थ्य या मण्यामध्यें आहे. त्या मणि रूपानें केलेल्या कवचाचें रक्षण सर्व देवता करतात. माझ्या मंगलत्वासाठीं इंद्र हा मणि माझ्या स्वाधीन करो. त्यामुळें मला सर्व सुखें आणि ऐश्वर्य प्राप्त होईल. शतवर्षाच्या आयुष्याची इच्छा करणारा वृद्धावस्थेपर्यंत निरोगी राहील. आपल्या भक्ताचें मंगल करणारी देवता मला हा मणि प्रदान करो.

### ६. गर्भदोषनिवारणम् (गर्भाचे दोष नाहीसे करणें)

हे गर्भवती, तुझ्या जन्मापासून, तुझ्या पतीला अर्पण करीपर्यंत, तुझ्या मातेनें जे कार्य केले त्यामधून दोष, विविध रोग तुला बाधा न करोत. गर्भिणीला पीडा देणाऱ्या, पलाल, अनुपलाल, शर्कु, कोक, मलिम्लुच, पलीजक, आश्रेष, प्रमीलिन आणि ऋक्षग्रीव नावाच्या राक्षसांना मी ठार करतो. हे दुर्नामनामक रोगा, तूं गर्भिणी स्त्रीच्या मांड्या आणि अंतरगर्भ संकुचित होऊं देऊं नकोस. दुर्नामाला आम्ही नष्ट करतो. केशी, स्तम्बज, तुर्णडिक हे रोग गर्भिणीला शुष्क वेदना व कटिवेदना निर्माण करतात त्यांना मी दूर करतो. गर्भाला त्रास देणाऱ्या प्रमृश, सूधकर, रेरिह वगैरे राक्षसांना मी ठार करतो. झोंपल्यावर किंवा जागेपणीं गुप्तपणें त्रास देणाऱ्या राक्षसांना सूर्य आपल्या तापाने नाहीसे करो. हे औषधे, ह्या गर्भवतीच्या गर्भाला मृतवत् करणाऱ्या रोगाला तूं दूर कर.

कोंबड्याप्रमाणें आवाज करणाऱ्या, दूषित कर्म करणाऱ्या व वेड्याप्रमाणें अंगविक्षेप करणाऱ्या पिशाच्चांना या गर्भिणीपासून मी दूर करतो. सूर्याचा प्रकाश सहन करणाऱ्या, बकरीचें कातडें धारण करणाऱ्या, कच्चे मांस भक्षण करणाऱ्या, रक्तानें मुख लाल झालेल्या व हाडांचे अलंकार धारण करणाऱ्या राक्षसांना मी मारतो. गर्भिणी स्त्रीला स्थूलता प्राप्त करून देणाऱ्या, तिच्या कटिप्रदेशाला वेदना निर्माण करणाऱ्या, तिला ताप देणाऱ्या, उलटे पाय असलेल्या, छिन्नमस्तक आणि शीघ्रगामी राक्षसांचा नाश होवो. झोंपलेल्या स्त्रीला वश करणाऱ्या पिशाच्चाचा मी नाश करतो. मुनिकेश, मरीमृश, उदुम्बल, आणि शावड नामक पिशाच्यांना मी मारतो. हे गर्भिणी, तुला अगर तुझ्या गर्भाला नष्ट करणाऱ्या राक्षसाला मी व्यथित करतो. जो राक्षस अगर पिशाच्च अर्धं जन्म झालेल्या गर्भाला त्रास देतो अगर ठार मारतो त्याला मृत्यू येतो. हवनाच्या योगें गर्भिणी स्त्रीचे संरक्षण होईल. हे गर्भिणी तंगत्व व नग्नक नांवाच्या असुरांपासून तुझें रक्षण होवो. हे औषधे, विपरीत गर्भ निर्मितीपासून या गर्भिणीचें तूं रक्षण कर. जो या गर्भाचें मांस खाण्याची इच्छा करतो तो राक्षस या गर्भिणीपासून दूर जावो. सासऱ्याच्या आज्ञेनें वधू ज्याप्रमाणें त्याच्या पुत्राजवळ जाते त्याप्रमाणें सूर्याच्या आज्ञेने गर्भ पृथ्वीकडे जावो. उत्पन्न होणाऱ्या गर्भाला पिशाच्च बाधा होणार नाहीं असे सूर्य करतो. या गर्भिणीला संतान प्रदान होवो. दुःखामुळें तिचें रडणें ऐकायला न येवो.

### ७. ओषधयः (औषधी)

ही औषधी अभिमंत्रित असून सर्व प्राणिमात्रांचे रक्षण करणारी आहे. ह्या लतारूपी औषधीची पानें फुलें, मुळें आणि मध्यभाग मधुर फल देणारा आहे. जो ही औषधी सेवन करतो त्याला अमृत प्राप्त होतें. ती सर्वांना निरोगी करते. पृथ्वीवर निर्माण होणाऱ्या असंख्य औषधी रोगापासून प्राणिमात्रांचा बचाव करतात. अग्नीला ज्याप्रमाणें प्राणिमात्र भितात किंवा सिंहाच्या गर्जनेला वन्यपशु घाबरतात त्याप्रमाणें या औषधींना रोग आणि व्याधी घाबरून त्या नदीच्या पलीकडे निघून

जातात. महर्षी अंगिरा ऋषींनी शोधलेली ही औषधी पर्वत प्रदेशांत उत्पन्न होते. ती दुधाप्रमाणें सुखद आहे. दृश्य आणि अदृश्य दोन्ही प्रकारच्या औषधी मला ज्ञात आहेत. त्यामुळें रोगरूपी पापाचें मी उच्चाटण करतो. या औषधी अंतरीक्षांतून वृष्टी झाल्यावर उत्पन्न होतात. विजेचा कडकडाट, मेघांचा गडगडाट, पर्जन्याचें वेगवान पाणी यांच्यापासून या औषधींचे रक्षण मी करतो. औषधीमध्यें अमृतत्त्व प्रदान करण्याचें सामर्थ्य आहे म्हणूनच लोक ती सेवन करतात. ज्या औषधी वराह, सर्प, गंधर्व, मुंगुस यांना माहीत आहेत त्या औषधीच्या योगें मनुष्यांचें रक्षण होतें. अंगिरा ऋषीनीं सुन्दर पानें असलेली औषधी आणली. काहीं औषधी हंस आणि अन्य पक्षीही आणतात. या औषधींना मी आवाहन करतो. गायी ज्या औषधींचें सेवन करतात, बकऱ्या ज्या वनस्पती खातात त्या सर्व औषधी वनस्पती आहेत. वैद्यांना ज्या औषधी माहीत आहेत त्या सर्वांचा संग्रह या ठिकाणीं आहे. त्या औषधी रोगग्रस्त पुरुषाला मुक्त करतात. यमाच्या पाशातून मुक्त करतात. त्यांना मंत्रशक्तीनें अधिक प्रभावित केलें आहे.

## ८. शत्रुपराजयः (शत्रूचा पराजय करणें)

शत्रुसेनेचें निर्दालन करणारा इंद्र, अग्नीच्या साहाय्यानें अधिक बलवान होवो व शत्रूला जीर्ण करो. हे पिंपळ, खैर आणि एरंड शत्रूला आपल्या आघातानें नष्ट करोत. बाणानें ज्याप्रमाणें शत्रू नाहीसा होतो त्याप्रमाणें या वनस्पतीच्या साहाय्यानें शत्रूचे तुकडे होतील. अंतरीक्ष आणि सर्व दिशांमधून निर्माण होणाऱ्या ज्वालांच्या साहाय्यानें इंद्र शत्रूला नष्ट करतो. त्यांच्यापैकीं कोणी मागे राहात नाहीं. हे इंद्रा, तूं शत्रूला आपल्या विशाल जाळ्यामध्यें पकडून नष्ट कर. या जाळ्यामुळें शत्रू अंधकारात जाईल त्याला निद्रा, तंद्री, मोह, आर्त, व्याधी आणि पाप झांकून टाकोत आणि मृत्यूचे पाश त्याच्या भोंवती आवळले जावोत म्हणजे सर्व शत्रु मृत्यूच्या स्वाधीन होतील.

हे यमदूतांनो या शत्रूच्या सहस्त्रावधि वीरांना तुम्ही घेऊन जा आणि त्यांची यज्ञांत आहुती द्या. रुद्र यांना नष्ट करो. रुद्र, वसु, आणि

आदित्य हे दंड धारण करून शत्रूचा नाश करतात. वरुण विश्वेदेव, व मध्यभागी रुद्र शत्रूचा संहार करतात. वनस्पती आणि औषधींना मंत्रानें प्रेरित केल्यानें त्या शत्रूचा संहार करतात. हे शत्रू, या मृत्युपाशाला तू तोडू शकत नाहीस. हा व्यूह शत्रुसेनेचा संहार करील. हा अग्नि आणि सोम शत्रुनाशक शक्तीनीं युक्त आहेत. भूक, दारिद्र्य आणि भय यांनी शत्रु पीडित होवो आणि मृत्यूच्या मुखांत पडून नष्ट होवो. मंत्रस्वामी, बृहस्पति, शस्त्र ग्रहण करणारे शत्रूचे हात दुर्बल करोत, त्यांच्या हातातून शस्त्रें गळून पडोत. आकाश, पृथ्वी, अंतरीक्ष, आणि देवगण यांना निराश्रित करोत. त्यांच्या परस्परामध्यें द्वेष निर्माण होऊन ते आपसांत प्रहार करून नष्ट होवोत. अग्नीचा रथ खेचून नेणाऱ्या चार दिशा त्याचे अश्व, पुरोडाश, जोखड, अंतरीक्ष आसन, आकाश, पृथ्वी, महिने, पक्ष, ऋतु, लगाम, वाणी, सेविका, संवत्सर, रथ, परिवार रथांतील बैठक, ईर्ष्या, अग्निमुख, आणि उजव्या बाजूस वसलेला चंद्र सारथी आहे. हे राजा, सर्व बाजूंनी विजय मिळण्यासाठीं मी अग्नीला आहुती देतो त्यामुळे शत्रूचा पराजय होईल.

## ९. विराट् (भव्यता)

हें विराट कोठून उत्पन्न झालें. पृथ्वी आणि हे लोक कसे उत्पन्न झाले ? हे सर्व पाण्यापासून उत्पन्न झालें. ज्यानें पाण्याच्या आश्रयानें शयन केलें होतें त्याने आपल्या मोठेपणासाठीं जलापासून आपलें विराट्-वत्स निर्माण केलें. हे सर्व कल्याणमयी आहे. या मध्यें तीन महान तत्त्वें व त्राणी असून एकाकी झाल्यानें ज्याची उत्पत्ती केली तें ब्रह्म जाणणें आवश्यक आहे. या बृहत्-द्वारा आकाश व पृथ्वी निर्माण झाली. माता बृहतीच्या योगें निर्माण झाली. माया प्रकट झाली. जोपर्यंत आकाश आणि पृथ्वीच्या मर्यादा आहेत तोपर्यंत अग्नीचें तेज पसरतें. वैश्वानर अग्नीमुळे द्युलोक स्थिरावला आहे. हे कश्यपा, तुम्ही चांगल्या गोष्टींचा आश्रय करतां. तुमच्या बरोवर आणखी सहा ऋषींचा पिता ब्रह्मदेव आहे. त्यामुळेंच या विशाल विश्वाची उत्पत्ती होते. त्याच्यापासून यज्ञाची निर्मिती झाली. यज्ञ विविध कर्मांमुळें प्रकट होतात. ज्याची

यावर श्रद्धा आहे त्याला विराट्-व्योमाप्रमाणें अनुभवास येतें. हे ऋषींनों, अचेतन विराट, प्रजेमध्यें प्राणरूपानें प्रविष्ट होतें. त्याचें स्वराट् असें रूप होतें. तुझ्या विराटाचें दर्शन केलें जातें. प्रजापति या विराटरूपी दांपत्य, ऋतु किंवा कल्प यांचा ज्ञाता आहे.

हे विराट उषेच्या रूपानें प्रथम अवतरले. उषा रूपानें सृष्टीचा अंधकार दूर केला. उषेबरोवर सोम, सूर्य, अग्नि वगैरे देवता या विराटाचा आश्रय करून राहातात. म्हातारपणाला प्राप्त न होणारे छंद उषेवरोवर आपले रूप प्रकट करतात. सूर्याची पत्नी उषा सूर्याचा पराक्रम जाणते. ती सूर्य, चंद्र, अग्नि यांचे सामर्थ्य जाणते आणि त्यामुळें ती ऋत्विजांना तृप्त करते. दुसऱ्या शक्तीनें ती सर्वांचें पोषण करते आणि तिसऱ्या शक्तीनें राष्ट्राचे रक्षण करते. चवथ्या शक्तीनें अग्नि, सोम आणि अन्य ऋषी यांना धारण करते. सर्व छंदांना धारण करून यज्ञ निर्माण करते. पांचव्या शक्तीनें पांच देह, पांच गाई आणि अनुकूल असे पांच ऋतु निर्माण होतात. त्यातून दिशा समर्थ होतात. ऋतूचे सहा भाग आहेत. यांना साम साथ देतो. आकाश, पृथ्वी आणि उर्वी यांचे सहा प्रकार आहेत. पैकी सहा महिने उष्ण ऋतु आणि सहा महिने शीत ऋतु असतात. विद्वान लोक, सप्त छंद, सप्त वर्ण, सप्तदीक्षा, सात होम, सात मधु, सात प्रकारचें घृत, सात गृध्र, सात छंद, आणि सप्त स्तोम सर्मपित आहेत. त्रिवृत् गायत्री कशा प्रकारें व्याप्त आहे, पंचदशापासून त्रिष्टुप कसा निर्माण होतो, अनुष्टुप, जगतीं वगैरे कसे निर्माण होतात ?

ऋतूंपासून आठ भूतांची, त्यांच्यापासून दिव्य ऋत्विजांची व त्यांच्यापासून अष्टपुत्रा अदिति, निर्माण झाली. तुमच्यामधील सत्यभाव पाहून मला आनंद झाला. तुम्हां सर्वांचें कल्याण करणारे ऋतु सर्वत्र पसरले आहेत. इंद्राच्या आठ, यमाच्या सहा, ऋषींच्या सत्याहत्तर, औषधीं जलापासून उत्पन्न होतात. प्रथम जन्मलेल्या गाईनें अमृतरूप दुग्ध दिलें. त्यानें देव, ऋषी, मनुष्य आणि असुरांना सुद्धां संतुष्ट केलें. ही धेनू कोणती, त्याचा ऋषी कोण ? एक धाम एक आशीर्वाद या पृथ्वीवर पूजनीय आहे.

## १०. विराट् (भव्यता)

पूर्वी संसार हा महान होता. ही भव्यता पाण्याचें उल्लंघन करून गार्हपत्य नांवाच्या अग्नीमध्यें प्रवेशली. त्यामुळें या भव्यतेला जाणणाऱ्याला गृहस्थ, यजमान या नांवानें संबोधण्यांत येऊं लागलें. यांतून पुढें आहवनीय अग्नीचा जन्म झाला. या अग्नीचें ज्ञान असलेला मनुष्य देवांना प्रिय आहे. त्यामुळें सर्व देवता त्याच्या आवाहनाला मान देऊन आगमन करतात. यांतून दक्षिणाग्नि प्रकट झाला. या अग्नीचा ज्ञाता दक्षिणकडे निवास करणारा होतो. ही भव्यता पुढे सभा रूपानें प्रकट झाली. सभेचे ज्ञान असलेल्याला सभासद म्हणतात. सभेचे असे सभासद एकत्र येतात. यांतून समितीचा जन्म झाला. या समितीमध्यें सर्व सैनिक एकत्र येतात. आमंत्रण हें त्याच भव्यतेचें स्वरूप आहे.

ह्या विराटाचे चार भाग झाले. अंतरीक्ष, देवता, मनुष्य आणि जीवन यामध्यें या विराटानें आपलें स्थान पक्कें केलें. ऊर्जा, स्वधा, सुनृता आणि इरावती यांनीं या ठिकाणीं आगमन केलें त्यावेळीं इंद्र त्यांचा वत्स बनला. गायत्री संभाषणाच्या रूपानें आणि मेघ मस्तक रूपानें प्रकटले. बृहत्, रथंतर, यज्ञ, यज्ञीय आणि वामदेव्य हे साम स्तन रूपानें प्रकटले देवतांनीं, बृहत्, व्यच् आणि रथंतर सामांतून औषधी प्राप्त केल्या. यज्ञायज्ञीय सामातून यज्ञ आणि वामदेव्य सामातून उदक उत्पन्न केलें.

ही भव्यता वनस्पतींच्या रूपानें प्रकट झाली. त्यांतून संवत्सर निर्माण झालें. कापलेल्या वनस्पतीपासून संवत्सरांग निर्माण झालें आणि त्यांनी शत्रूचा नाश केला. नंतर विराट पितरांकडे गेला. त्यांतून महिने निर्माण झाले म्हणून प्रत्येक महिन्यास पितरांना अन्न दिलें जातें. या योगें यजमान पितृयान मार्गाचा ज्ञाता होतो. या विराटापासून देवतांनीं वृक्ष तयार केले त्यामुळे 'वषट्'ची निर्मिती झाली. वषट् या मंत्रानें कृती करणारा यजमान देवयान मार्गाचा ज्ञाता होतो. त्यांतून मनुष्याचें घर आणि त्यामुळें अन्नसमृद्धि झाली.

या विराटानें असुरांना स्पर्श केला. असुरानीं त्याला 'माय ऐहि' असें आवाहन करतांच त्यांतून विरोचन निर्माण झाला. लोखंडाची

पात्रें त्याला आवडूं लागली. दोन मस्तकें असलेल्या अल्र्यानें मायेपासून असुर निर्माण केले. पितरांना या विराटानें स्पर्श करतांच 'स्वधे एहि' म्हणून आवाहन करतांच चांदीचें पात्र धारण करणारा यम निर्माण झाला. मृत्युदेवता यमानें स्वधेच्या योगें पितरांना जीवन प्रदान केलें. विराटानें मनुष्यांना स्पर्श केला. मनुष्यांनी 'इरावति एहि' असें आवाहन केलें. त्यावेळीं विवस्वान मनु त्याचा पुत्र होऊन भूमि हें त्याचें पात्र बनलें.

वेनपुत्र पृथूनें या भूमीतून धान्य निर्माण केलें. त्यामुळे प्राणिमात्रांचें जीवन स्थिर झालें. त्यांतून सप्त ऋषीनीं विराटाला 'ब्रह्मणवति एहि' म्हणून आवाहन केलें. सोम त्यांचा पुत्र बनला व छन्द हे त्याचें पात्र झालें. अंगीरस बृहस्पतीनें, तप व ब्रह्म यांचें ज्ञान प्राप्त केलें. या योगें सप्तर्षींनी जीवन धारण केलें. यांचा ज्ञाता ब्रह्मवर्चस्वी होतो आणि प्राणिमात्रांचे जीवन चालवितो.

या विराटानें देवतांना स्पर्श केला. देवतांनीं 'ऊर्जे एहि' म्हणून आवाहन केलें. इंद्र पुत्र झाला व तो चमसपात्रासहित प्रकट झाला. सवितृ देवानें देवतांचें जीवन समृद्ध केलें. या विराटानें गंधर्व आणि अप्सरा यांना स्पर्श करतांच 'पुण्यगंधे ऐहि' असें आवाहन केलें. सूर्यवर्चाचा पुत्र चित्ररथ निर्माण झाला. पुष्करपर्ण त्याचें पात्र बनलें. त्याचा पुत्र वररुचीनें या गंधाच्या योगें अप्सरांचें जीवन समृद्ध केलें. याचें ज्ञान असलेला मनुष्य पुण्यगंध होतो. मनुष्यांनी 'तिरोधे एहि' म्हणून केलेल्या आवाहनामुळें विश्वापुत्र कुबेर जन्मला. या विरोधाच्या योगें प्राण्यांचें जीवन समृद्ध झालें. विराटानें नंतर सर्पांना स्पर्श केला. त्यावेळी 'विषवर्त एहि' म्हणून त्यांनी आवाहन केलें. त्या वेळी तक्षक पुत्र रूपानें प्रकटला. एरावतीय धृतराष्ट्र नामक पुत्रानें या विषाचें दोहन केलें. विषानें सर्पामध्यें निवास केला. यायोगें सर्प आपलें जीवन व्यतीत करतात.

या सर्पांच्या विषानें मनुष्यावर प्रहार केल्यास तो मृतवत् होतो. मी मनापासून या मनुष्याला मारीत नाहीं असें म्हणणारा सर्प विषाच्या सिंचनानें मनुष्याचे प्राण घेतो. हे ज्ञान ज्याला आहे तो शत्रु किंवा अप्रिय गणला जातो.

--



# नवम काण्ड

### १. मधुविद्या (कल्याणकारक ज्ञान)

अंतरीक्ष, स्वर्ग, पृथ्वी, समुद्र, अग्नि आणि वायु यांच्यापासून मधुकशा- (कल्याणकारण सुखरूपी गाय) उत्पन्न झाली. तिच्यामुळे सर्व प्राणिमात्र आनंदित झाले. या गाईच्या दुधाला समुद्राचें पाणी असें म्हणतात. तिच्या प्रसन्नतेमुळें, सर्वांचे प्राण अमृतमय होतात. तिच्या चरित्राची वाखाणणी केली जाते. तिला लोक अनेक रूपांनीं पाहातात. या मधुकशेला देवांनीं उत्पन्न केलें. विश्व हा तिचा गर्भ आहे. ती उत्पन्न झाल्यावर सर्व प्राणिमात्रांना तिनें मोहित केलें. तिचें हृदय म्हणजे सोम ठेवण्याचा कलश असून तो कधीही क्षय पावत नाहीं. हजारों धारा असलेला तो स्तन आहे. तो नेहमी दूध देतो. याची महती फक्त ब्रह्मांला ज्ञात आहे. हवि धारण करणारी, शब्दवती मधुकशा अग्नि, सूर्य, चंद्र यांच्यावर अधिकार गाजवत देवांच्या आश्रयाला जाते. तिच्याजवळ अभीष्टवर्षक जल व बलदायक अन्न, आहे. हे प्रजापते, तूं या मधुकशेचा पृथ्वीवर वर्षाव कर

प्रात:सवनामध्यें अश्विनीकुमारांना सोम प्रदान केला जातो त्याप्रमाणें अश्विनीकुमार मला तेंज प्रदान करोत. इंद्र आणि अग्नीला द्वितीय सवनांत सोम प्रदान केला जातो त्याप्रमाणें इंद्राग्नि माझ्यामध्यें तेज प्रदान करून प्रस्थापित करोत. ऋभुगण तिसऱ्या स्वप्नांत सोमप्रिय होतात त्याप्रमाणें त्यांनी माझ्यामध्यें तेजाची स्थापना करावी. हे अग्ने, माझ्याजवळ दुग्धादि हवि आहेत. तूं माझें कल्याण करण्यासाठीं मधुतेला

प्रकट कर. हे अग्ने, तूं मला अन्नतेज, संतती आणि दीर्घायुष्य प्रदान कर. सर्व देवता आणि ऋषींचे आम्ही सेवक आहोत. मधुता ज्याप्रमाणें आपलें वर्चस्व स्थापन करते त्याप्रमाणें अश्विनीकुमार माझ्यामध्यें श्रेष्ठत्व प्रस्थापित करोत. मधमाशा मध गोळा करून संचय करतात त्याप्रमाणें हे अश्विनीद्वय, माझ्यामध्यें वर्चस्व, तेज, वल, ओज एकत्रित करोत. रम्य पर्वत व वृष्टी यांमध्यें जी मधुता आहे ती अश्विनीकुमार माझ्यामध्यें प्रस्थापित करोत. सुन्दर अलंकार धारण करणाऱ्या अश्विनीकुमारांनों, मधमाशांच्या संचित मधाप्रमाणें ओजस्वी आणि मधुर वाणी माझ्याकडून वोलवा. हे प्रजापते, गर्जना तुझी वाणी असून पृथ्वी आणि स्वर्गावर तूं वल आणि अभिष्ट यांचा वर्षाव करतोस. सर्व प्राणिमात्र त्यानें आनंदित होतात. या मधुतेचा ज्ञाता मधुमान होतो. ब्राह्मण, गाय, धान्य, मध, यव, वैल आणि राजा सातांना मधुमान अशी संज्ञा आहे हे जाणणारा मधुमान होऊन सर्वत्र विजय, मधुमय अन्न आणि मधुर भोजन करतो.

## २. कामः (इच्छा)

शत्रूचा नाश करणाऱ्या काम-वृषभाला हवि प्रदान करून आमच्या शत्रूला नष्ट करण्याची प्रार्थना करतो. ज्या दुःखद स्वप्नामुळें माझें मन आणि नेत्र विचलित होतात, जे स्वप्न मला भक्षण करील म्हणून भीती वाटते ते दुःस्वप्न शत्रूच्या वाटचाला जावो अशी मी कामदेवाला प्रार्थना करतो. हे कामदेवा, तूं पराक्रमी व सर्वांचा स्वामी आहेस. तूं दुःस्वप्न, दारिद्र्य, संततीहीनता, यांना आमचा पराभव करून आमच्यावर संकट आणणाऱ्या शत्रूकडे पाठव. दारिद्र्याला माझ्यापासून दूर कर. हे अग्ने, माझ्या शत्रूची घरें तूं भस्म कर. कवी ज्याला तेजस्वी, ओजस्त्री वाणी असें म्हणतात ती हे अग्ने, तुझी कन्या आहे. त्या वाणीनें माझे शत्रू नाश पावतील. शक्तिमान पुरुष, वल्हृयाच्या योगानें नांव चालवतो त्याप्रमाणें हे कामदेव वरुण, इंद्र, विष्णु आणि सोम यांच्या बलानें, आमच्या यज्ञाच्या शत्रूला दूर घालवून दे. आमचा यज्ञ हवींनीं संपन्न होवो. सर्व देवता माझ्या यज्ञांत येवोत. हे देवगणांनों, घृताहुती स्वीकारून

तुम्ही प्रसन्न व्हा. हे अग्ने, रथारूढ होऊन तूं आमच्या शत्रूला निर्वीर्य कर म्हणजे तो मृत्यु पावेल.

कामदेवानें माझ्या शत्रूंचा नाश केला. मला मोठें करण्यासाठी महान लोकाची प्राप्ती करून दिली त्यामुळें सर्व दिशांकडील लोक माझ्या समोर नत झाले. सहा ऊर्वीनीं मला घृत प्रदान केलें. बंधन नाहीसे होतांच नाव जशी प्रवाहाच्या गतीनें खाली जाते त्याप्रमाणें माझा शत्रू नीचावस्थेला जात आहे. इंद्र, अग्नि, सोम यांनीं माझ्या शत्रूला दूर करून माझें रक्षण केलें. या मंत्राच्या प्रभावामुळें माझा शत्रू पुत्र, पौत्र, बल आणि योद्धे यांना पारखा होईल. त्याचे नातेवाईक त्याला सोडून जातील. विद्युत् त्याचे तुकडे करील आणि देवता त्याचें मर्दन करतील. मेघांना समृद्ध करणारी वीज शत्रूवर पडेल आणि सूर्य आपल्या तेजानें शत्रूचा नाश करील. हे कामदेवा, आपल्या ब्रह्ममय कवचानें माझ्या शत्रूचा संहार कर. तो प्राण आणि जीवनशून्य होवो. ज्या शक्तीच्याद्वारें इंद्रानें राक्षसांचा पराभव केला त्या शक्तीनें माझ्या शत्रूचा तूं पराभव कर. देवांनीं ज्याप्रमाणें दैत्यांना पळवून लावलें आणि इंद्रानें राक्षसांना घोर अंधःकारांत ढकललें त्याप्रमाणें हे कामदेवा, तूं माझ्या शत्रूंची दैना कर. देवता अथवा पितर महान कामदेवाची बरोबरी करूं शकत नाहींत. त्या महान कामदेवाला मी हविरन्न प्रदान करतो. कारण आकाश, पृथ्वी आणि सर्व प्राणिमात्रांना त्यानें व्यापून टाकलें आहे.

हे कामदेवा, सर्व दिशा आणि स्वर्ग यांच्यापेक्षा ‘ तू ’ मोठा आहेस म्हणून मी तुला आदरपूर्वक हवि प्रदान करतो. हे कामदेवा, तूं सर्व वृक्ष, जंतु, समुद्र, झेप घेणारे पक्षी, सर्व शक्तिमान प्राणी यांपेक्षां तूं महान असल्यानें तुला मी हविरन्न प्रदान करतो. तूं चंद्र, सूर्य, वायु किंवा अग्नि यांच्यापेक्षां सुद्धां मोठा आहेस. सर्वव्यापक, कल्याणकारी शरीर-धारक आणि महान असल्यानें तुला मी वंदन करतो. तूं आपल्या बुद्धि-रूपानें आमच्या शरीरांत प्रविष्ट होऊन पापबुद्धीला घालवून दे.

३. शाला (शाळा-घर)

उपमित, प्रतिमित आणि परिमित शालांनों, बृहस्पतीच्या मंत्र-बळानें मी तुम्हाला सर्वांसाठी मुक्त करीत आहे. कारागिरांनीं तुला विस्तृत बनविली आहे. तूं सर्वांना आदरणीय आहेस. तुझे सर्व बंध आम्ही बाजूला करतो. हे मानपत्नी, तुझा संदेश आम्ही स्पष्ट केला आहे. तूं कल्याणदायिनी आणि आम्हाला स्वर्ग प्रदान करणारी आहेस. तूं हव्ययुक्त अग्निकुण्ड, देवतांची आसनें आणि यजमान पत्नीच्या बरोबर असतेस. हे विषूवति, शयन कक्षाची द्वारें आम्ही मंत्राने उघडतो. ज्यानें तुला निर्माण केलें त्याला आणि जो तुझा स्वामी आहे त्याला वृद्धत्वा-पर्यंत आयुष्य प्रदान कर आणि अंती त्यांना स्वर्ग दे.

हे शाले, ज्या वनस्पतींपासून तुझी निर्मिती करण्यात आली त्या सर्व वनस्पती प्रजापतीनें त्या साठींच निर्माण केल्या आहेत. या शालेचा कर्ता, स्वामी, दाता, आणि अग्नि यांना नमस्कार असो. या शालेमध्यें जन्म घेणाऱ्या गाई व अश्वांना या ठिकाणीं अन्न आहे. हे शाले, तूं पशु, पुरुष यांना आपल्यामध्यें लपवितेस. आकाश आणि पृथ्वी यांच्यामध्यें व्यच नामक जे विस्तृत आकाश आहे यामुळें ही शाळा व्याप्त आहे. यांमध्यें जी शक्ती आहे ती या शाळेमध्यें समाविष्ट आहे. यामुळें या शाळेतूनच मला स्वर्गप्राप्ती होईल. बल प्रदान करणारी, धान्योत्पादक पृथ्वीमध्यें निर्माण झालेली ही शाला अन्नसमृद्ध आहे. हे हरण कर-णाऱ्यांचा हे शाले तूं नाश कर. तृषाच्छादित, आश्रय देणारी ही शाला हत्तीच्या पायाप्रमाणें या पृथ्वीवर स्थिर झाली आहे. गेलेल्या वर्षाप्रमाणें तुझें द्वार मी उघडतो. विद्वानांच्या मंत्राच्या साहाय्यानें निर्माण झालेल्या या शालेचें सोमप्रिय इंद्र आणि अग्नि रक्षण करोत. या घर रूपी देहांत गर्भाशय आहे. मरणाधीन मनुष्य यांतूनच जन्म घेतो आणि आपला संसार वाढवितो.

दोन, चार, आठ किंवा दहा दालनांनी युक्त अशीं घरें निर्माण केली जातात. पत्नीच्या गर्भाशयांत गर्भ ज्याप्रमाणें निर्भयपणें राहातो त्याप्रमाणें मी या घरांत निर्भयपणें निवास करतो. हे गृहा, तुझ्यामध्ये मी, अग्नि आणि पाणी यांच्यासह प्रवेश करतो. क्षयादी रोगांचें उच्चाटण

हे पाणी करील आणि अग्नि अमृततत्त्व प्रदान करील. एखाद्या वधू-प्रमाणें मी तुझें पालन करीन. या घराच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर ऊर्ध्व, आणि इतर दिशांतील देवतांना मी वन्दन करतो. आमच्या आहुती त्यांना समर्पित होवोत.

### ४. ऋषभः (बैल)

कांतिमान, वीर्यवान आणि विविध रूपी ऋषभ बृहस्पतीन निर्माण केलेल्या गाईंपासून प्रजा निर्माण करो. पृथ्वीचा स्वामी, गाईंचा पति, वासरांचा पिता आणि पाण्याजवळ उभा असलेला ऋषभ आम्हास संपत्तिवान करो. हा बैल, वीर्य, शक्ति, पौरुष आणि अग्नियुक्त आहे. अग्नि त्याला देवयान मार्गानें आपल्याकडे नेवो. हा बैल रक्षणशील, घृत प्रदान करणारा आणि इंद्ररूप धारण करणारा असून आमचें कल्याण करणारा आहे. या ऋषभाचें तेज म्हणजे इंद्र–तेजाचा एक भाग आहे. याचे पुढील पाय वरुणापासून, वशिंड मरुतापासून व खांदे अश्विनीकुमारांपासून निर्माण झालेले आहेत. देवतांसाठी दुग्धादि हवि तूं देतोस म्हणून तुला इंद्र म्हणतात. यज्ञांत ऋषभ दान करणाऱ्याला अनेक गाईंच्या दानाचें श्रेय लाभतें. सूर्य आयुष्य रूपानें, त्वष्टा आणि वायु आत्मा रूपानें यामध्यें राहातात. मीं माझ्या मनानें अंतरीक्षांत तुला आहुती प्रदान करतो.

देवतांमध्यें इंद्र, त्याप्रमाणें गाईमध्यें बैल श्रेष्ठ आहे. ब्रह्मा त्यांचें मंगल करो. या बैलाची कटी सूर्यापासून, शेपटी वायूपासून व श्रोणी बृहस्पतीपासून, उत्पन्न झाली. वायुदेवता शेपटीच्या योगानें सर्व औषधी कंपायमान करतो. या ऋषभाची त्वचा सूर्याची, गुद सिनीवालींचें आणि पाय उत्थाताचे आहेत. सोमानें कलश धारण केला. देवांनी सर्व गोष्टी एकत्र करून ऋषभाची निर्मिती केली. हा बैल आपल्या शिंगांच्या साहाय्याने राक्षसांना पळवून लावतो, नेत्रांनी दारिद्र्य दूर करतो, कानांनी मंगल ऐकतो. बैल दान करणाऱ्याला अग्नि कधीही त्रास देत नाहीं. त्याचे गोठे गाईंनी भरून जातात. हविर्वान इंद्र भरपूर दूध देणाऱ्या गाई देवो, इंद्राचे बल आम्हास प्राप्त होवो. हे गाईंनो, या तरुण बैला-

बरोबर क्रीडा करून तुम्ही प्रजावान व्हा आणि आमचा त्याग न करतां आम्हाला पुष्ट करा.

## ५. पंचौदनो अजः (पंचकल्याणी बकरा)

या अजाच्यामुळें यज्ञ करून हा जीव अंधारांतून स्वर्गांत पदार्पण करतो. हे अजा, तूं इंद्राप्रमाणें यजमानाच्या सान्निध्यांत आहेस. तूं आमच्या शत्रूच्या मस्तकीं पाय ठेव आणि यजमानाचें पुत्रपौत्र पापरहित कर. तूं स्वतः स्वर्गारोहण कर. हे शोभने, तूं याचें रक्षण कर. हा अज अग्निरूप झाला आहे. श्रद्धेनें अजाचें दान करणारा पापशून्य होतो. हे ज्या ठिकाणीं शरभ जाऊ शकत नाहीं, अशा दुर्लभ पदार्थांनी युक्त, पुण्यवंतांचा आश्रय अशा लोकीं हे अजा, तू आरोहण कर. अजदाता स्वर्गाचा स्वामी होतो. हे अजा, दात्याच्या सर्व कामना तूं पूर्ण कर आणि तूं मोठा हो.

हे पितरांनो, श्रद्धेनें ज्या अजाचें दान केलें जाते तो परलोक पापरूपी अंधःकारापासून मुक्त करतो. पुण्यलोकाची इच्छा करणारा पंचौदन अजाचें ब्रह्मासाठीं दान करतो. हा अज ब्रह्माचा ज्ञाता, बलाचा ज्ञाता आणि अग्नीच्या ज्वालेपासून उत्पन्न होणारा आहे. याच्यापासून देवांनीं विविध कर्मे निर्माण केली. वस्त्रांमध्यें आच्छादून सुवर्ण दान करणारा दिव्य लोकाला प्राप्त करतो. हे अजा, हे घृत आणि सोम तुला प्राप्त होवोत. तूं सूर्याच्या वर असलेल्या स्वर्गामध्यें पृथ्वी आणि द्युलोक स्थिर कर. अंगिरा ऋषीनें तुझ्यामुळेंच स्वर्गाचें ज्ञान मिळविलें. हे अग्ने, ज्या बलामुळें तूं सर्व देवतांजवळ राहातोस, त्या बलानें आमचा यज्ञ संपन्न करून देवतांपर्यंत ने. पंचकल्याणी अज स्वर्गांत आरोहण करून पापदेवता निर्ऋतीला अडवून धरतो.

व्यावहारिक सत्य, पारमार्थिक सत्य, दृष्टी, शिर, प्राण, श्रद्धा, विश्वावर असलेली दृढ श्रद्धा हा अपरिमित यज्ञ म्हणजे पंचौदन अज आहे. अशा अजाच्या दानानें दाता महान लोकाची प्राप्ती करतो. यासाठीं महान कष्टांची आवश्यकता नसून श्रद्धेनें याचा स्वीकार करणें आवश्यक आहे. त्यायोगें अन्न, बल आणि यश यांची प्राप्ती होते. जो

सुवर्ण वस्त्र व पांच गाई, दान करतो तो आपलें कल्याण करतो. यासाठी पंचरुक्मा नामक ज्योती या देहाचें कवच बनते. वाग्दानानें जी स्त्री आपल्या पतीला जाणते आणि दुसऱ्याची अपेक्षा करते ती या पंचौदन अजामुळें पतीपासून निराळी होत नाही. पंचौदन अजाच्या दानानें पुर्नविवाहित स्त्रीचा पतीसुद्धां उत्तम लोकांची प्राप्ती करतो. जो सवत्सधेनु, सुवर्ण, वस्त्र आणि उपवस्त्र दान करतो तो स्वर्गांत स्थान प्राप्त करतो. मी माझ्या सर्व संबंधितांना यासाठी जवळ बोलावीत आहे.

पंचौदन अज म्हणजे वसन्त ऋतु आहे. त्याला ग्रीष्म ऋतूचें ज्ञान आहे. अशा वेळी जो या अजाचें दक्षिणासहित दान करतो तो आपल्या पुण्यकृतीनें शत्रूचें ऐश्वर्य नष्ट करतो. कुर्वन्त ऋतूचा ज्ञाता आपल्या शत्रूचें ऐश्वर्य पंचौदन अजाच्या दानानें नष्ट करतो. हा अज म्हणजे संयत, पिन्वन्त, उधन्त, अभिभू हे ऋतु होत. या अजाच्या दानाने दाता शत्रूचे ऐश्वर्य नष्ट करतो. आपल्या यज्ञाचें रक्षण करतो. यासाठीं या अजास आम्ही हवि प्रदान करतो.

### ६. अतिथी सत्कार (अतिथींचा आदर करणें)

जो प्रत्यक्ष ब्रह्माचा ज्ञाता आहे. पौरुष हा भार आहे. अनुक्य ह्या ऋचा आहेत, हृदय यजुर्वेद, अंगावरील लव हा साम, परिस्त-रण हवि आहे व जो अतिथीला देव म्हणतो, तो यज्ञाचा ज्ञाता आहे. अतिथीचें भाषण ह्याच उपदेश आणि त्यानें केलेली उदक प्रार्थना ही जीवनाची गती आहे. यज्ञीय पशुबंधन हें तर्पण आहे. धान्य हवि आहे. जागरण स्वर्ग आहे. खाद्यपदार्थ पुरोडाश आहे. जो भोजनार्थ अतिथीला आमंत्रण करतो तो देवांना हवि ग्रहण करण्यासाठी आवाहन करतो. धान्य आणि यव हे सोम आहेत. उखळ आणि मुसळ ग्रावन् पाषाण आहेत. सूप, भूमी आणि सोमरसकृती जल आहे. दर्वी (पळी) स्रुवा, घागर द्रोणवलश अ हे आणि कृष्णमृगचर्म हे वायव्यपात्र आहे.

अतिथीपती यजमान ब्राह्मण असून तो सर्व जाणणारा आहे. या,

बसा, उठा, खा, अशा तऱ्हेनें अतिथीची सेवा करणारा हवि प्राप्त करतो आणि अतिथी या हवीला अंतरांत हविरूपानें स्वीकारतो. तो हात रूपी स्त्रुवा, प्राणरूपी यूप, वषट्काररूपी स्त्रुकार यायोगे हवि स्वीकारतो. अतिथीरूप ऋत्विजांना स्वर्गाची प्राप्ती होते. त्याच्या शत्रूंना याची प्राप्ती होत नाहीं. जो अतिथी अन्न खात नाही तो यजमानाचें पाप खात नाहीं. अतिथीला जो अन्न देतो तो पवित्र यज्ञकर्ता होतो. अतिथीला वळी देणे म्हणजे प्राजापत्य यज्ञ होय. अतिथीचा सत्कार करणारा प्रजापतीच्या पावलावर पाऊल ठेवून जाणारा होतो. अतिथीचें आवाहन म्हणजें आहवनीय अग्नि, घरामध्यें स्थिर असलेला गार्हपत्य आणि पाकसिद्धी करणारा दक्षिणाग्नि होय.

अतिथीच्या पूर्वी भोजन करणारा आपल्या अभीष्ट कर्मांचा नाश करतो. घरांतील दुग्ध आणि अन्य अन्न रस यांचा नाश करतो. आपल्या घरांतील समृद्धी, प्रजा, पशुधन, गृहयज्ञ, घरची लक्ष्मी, समान बुद्धी, यांचा स्वत: नाश करतो. म्हणून अतिथीच्या अगोदर भोजन करूं नये. अतिथीच्या भोजनानंतर भोजन करणें हा गृहस्थाचार आहे. त्याने या वेळी गोदुग्ध आणि आमिष यांचें सेवन करूं नये.

अतिथीच्या सेवेमुळे, अग्निष्टोम यज्ञाचें फळ प्राप्त होतें. तो स्वर्गाचा अधिकारी होतो. मधुरस हवि देऊन जे फळ मिळतें ते तो प्राप्त करतो. वस्त्र दानानें वस्त्रसमृद्धि, जल दानानें जलसमृद्धि, भोज्य पदार्थाच्या दानानें संतति, सत्कारानें प्रतिष्ठा आणि प्रेमळ आचारानें तो सर्वांचें प्रियत्व प्राप्त करतो.

अतिथीसेवक यजमानाला सूर्य यशस्वी करतो. बृहस्पति अन्नरसानें प्राप्त होणारी पुष्टी आणि सामवाणी, विश्वेदेव त्याची स्तुती करतात. सूर्य उदयाला येतांच आपल्या किरणांनीं त्याला स्पर्श करून त्याचा मृत्यु नष्ट करतो, त्याची प्रशंसा करतो, त्याला अन्न देतो आणि त्याचा निर्धनपणा हरण करतो.

इच्छित कार्याची इच्छा करणारा क्षताचें आवाहन करतो तो श्रुती श्रावक होतो. प्रतिज्ञा करणारा प्रतिश्राव होतो. हातांत पात्र घेऊन मागें पुढें चालणारा चमस-अध्वर्यु होय. या अतिथीमध्यें यज्ञ न करणारा

कोणीही नाहीं. अतिथीला घरी घेऊन येणारा अवभृत स्नान करून घरी बसणारा होय. त्याला विविध भोजनपदार्थ आणि दक्षिणा देणारा पवित्र होतो. पृथ्वी, अंतरीक्ष आणि स्वर्ग यांमध्यें जेवढे प्राणी आहेत त्या सर्वांना बोलावून तो अन्न देतो. देवतांना बोलावून त्यांना अन्न देतो. विश्वांतील शोभायमान पदार्थ त्याला बोलावतात. हा, परलोक आणि ज्योतिर्लोक त्याला बोलावतात.

## ७. गौ (गाय)

ह्या गाईची शिंगे, म्हणजे प्रजापति, इंद्र मस्तक, अग्नि कपाल, आणि यम भुवया आहे. मेंदू सोम, द्यौ वरचा जबडा, पृथ्वी खालचा जबडा, मरुतगण दांत, विद्युत जिव्हा, कृत्तिका खांदे, रेवती– मान, स्वर्ग, विश्व, वायु, आणि कृष्णद्र विधरणी, बृहस्पति वशिड, बृहति हाडें, व अंतरीक्ष पाय आहे. मित्र आणि वरुण दोन खांदे, त्वष्टा व अर्यमा दोन भुजा, इंद्राणी कंवर, वायु शेपटी आणि पवमान तिचें केंस आहेत. वल जंघे, ब्राह्मण आणि क्षत्रिय नितंब, धाता आणि सविता, मांड्या, अदिती घोटे आणि अप्सरा खूर आहेत. बुद्धी यकृत, चेतना हृदय, पूरितत् नाड्या, पर्वत प्लाशि, इडा मोठें दांत आणि भूक कुशी होय. प्रजा जननेंद्रिय, मन्यु अण्डकोश व क्रोध वृक्क आहे. पर्जन्यस्वामी स्तन, नदी सूत्री, विद्युत हंवरणें, औषधी आंगावरील लोम, नक्षत्र व विश्वव्यचा कातडी, देवता गुद, मनुष्य आंतडी आणि अन्न हे उदर आहे. राक्षस हे रक्त आणि इतर मनुष्यें उबध्य आहे. निधन मज्जा आणि अभ्र पुष्टी आहे. अग्नि ही बैठक, उठणें अश्विनीद्वय, पूर्व बाजू इंद्र, दक्षिण यम, पश्चिम धाता आणि उत्तर सविता आहे. तृण सोमरूप, दृष्टी मित्रता व ढेंकर हा आनंद आहे. हें संपूर्ण विश्व गोरूप आहे. (एतद् वै विश्वरूपं सर्वरूपं गोरूपं ।।) हिच्या मध्यें सर्व पशूंचा वास आहे.

## ८. यक्ष्मनिवारण (क्षयाचें निवारण करणें)

मस्तकाशी संबंधित असलेले शीर्षवेदना, अर्धशिशी, कर्णशूल आणि अन्य रोग मी दूर करतो. तुझ्या कानांचा कर्णशूल आणि कर्णबधिरता

या रोगांना मी बाहेर घालवून देतो. कान आणि मुखाला क्षयानें ग्रासल्यानें होणारी डोकेदुखी मी दूर करतो. जो रोग माणसाला आंधळें करतो, अंग दुखविणारा ताप, अंगाला कंप निर्माण करणारा शीत ज्वर, सर्व नाड्यांना दुर्बल करणारा यक्षरोग, हृदय क्षीण करणारा कामरोग, पोटाचा अघा, अंगाचा प्रदिम आणि अंतरांतील यक्ष्मोघ, मूत्ररोग, कफक्षय व विषवान रोग मी दूर करतो.

पोटांतील शूळ निर्माण करणारा, नाभी हृदय आणि यांना दोषयुक्त करणारा, कीकस नांवाचा हाडांचा रोग, अस्थिक्षयता, पृष्टिनाशक, शुद्रजाल, भ्रम, अस्थि-संधी-रोग (संधिवात), अंगावर मांस न येऊं देणें, वातसार, विषमयता, विविध अवयवांमध्यें असणारी दग्धता निर्माण करणारा यक्ष्म नामक रोगाचें मी उच्चाटण करतों. सूर्य उदयाला येतांच त्यानें आपल्या किरणरूपी हातांनीं तुला स्पर्श केला आणि तुझ्या अंगातील रोग नष्ट केलें. चंद्रानें तुझ्या हृदयांत आणि मस्तकांतील अशांतीचें शमन केलें.

## ९. आत्मा (आत्मा)

वायु आणि अग्नि सूर्याचे सखे आहेत. सूर्यांचे किरण अन्य तेज बाजूला करतात. या सूर्याला सप्तऋषी नमस्कार करतात. सूर्य आपल्या सप्ताश्वांच्या रथानें भ्रमण करतो. त्यामुळें ऋतूंचा काळ नियमित केला जातो आणि संपूर्ण विश्व या काळाचा आश्रय करून राहातें. सात अश्व सूर्याचा रथ ओढतात त्या वेळीं सात ऋषी त्यांच्या जवळ उभे राहातात. किरण त्या सूर्याची स्तुती करीत विकास पावतात. गायींना रससंपन्न करतात आणि भूमीमध्यें प्राण निर्माण करतात. अरुण सूर्याचा सारथी आहे. सूर्यामुळेंच गाई दूध देतात आणि त्याच्यामुळेंच झालेल्या पावसाचें पाणी पितात. इतकेंच नव्हें तर सर्व देवतांचें रक्षणसुद्धां सूर्यामुळेंच होते. सूर्यमाता सूर्याच्या उत्पत्ती कालापर्यंत सेवा करून मन आणि बुद्धीनें समृद्ध होते. ही गर्भरसाची स्वामिनी आहे. बलवती स्त्रियांमध्यें ती गर्भ स्थिर करते. वासरूं गाईकडे पाहातांच हंबरतें. ते तीन प्रकारचें स्वरूप होय. या रूपानें सूर्याला जाणणारे विशाल होतात.

पांच आरे असलेल्या एका चक्रावर हें संपूर्ण विश्व स्थिर आहे. हे चक्र पुरातन असूनही कधीं श्रांत होत नाहीं. पितारूपी बारा महिने आणि ऋतुरूपी पांच पदें यांना स्वर्गाच्या विशालतेंत वावरणारा काल म्हणतात. मेघ सात चक्रांकित आहे आणि तो सहा आरे जगाला अर्पण करतो. बारा आंस असलेले हे चक्र कधीहीं थांबत नाहीं. सूर्याच्या नेत्रापुढें अंधार येतांच संसार निर्माण होतो. कारण तो ज्ञानशून्य आहे. या अंधाराला जाणणारा चिरंजीव होतो आणि इतरांचें पालन करतो. देवतांनीं जे सहा ऋषी निर्माण केलें ते साकंज नामक ऋषी अभीष्ट स्थानाचें ज्ञाते आहेत. ते अनेक रूपें धारण करतात. पांढऱ्या रंगाची गाय पुढच्या पायांनीं अन्न आणि मागच्या पायांनीं वासराला धारण करते. याचा ज्ञाता प्रजापति आहे. प्रजापती इंद्रियांचा स्वामी असून इंद्रियें त्याचेच कथन करीत असतात. हे सोमा आणि इंद्रा तुम्ही ज्यांना आपले म्हणता ते या लोकांचे पालन करण्यास समर्थ होतात. सर्वांवर, सारखे प्रेम करणारें आणि सर्वांना उजेडांत आणणारे असे दोन आत्मे एकाच झाडावर वसले आहेत. एक अत्यंत मधुर फळांचा आस्वाद घेतो तर दुसरा काहीहीं न खातां खाणाऱ्याकडे पाहातो. वृक्षाच्या ज्या बाजूला मधुतेचा आस्वाद घेणारा पक्षी आहे तो सृष्टीचा विस्तार करतो याचें कारण जो जाणत नाहीं त्याचा संसार नष्ट होतो. ज्या ठिकाणीं पक्षी कर्मरूपी अमृताच्या फळाप्रमाणें बोलतात ते संसाराचे रक्षक असून सूर्याच्या परिसरांत ते प्रवेश करूं शकत नाहींत.

## १०. आत्मा (आत्मा)

गायत्री, त्रिष्टुभ, आणि जगती यांचे स्वरूप जाणणारा अमृतत्वाचा उपभोग घेतो. गायत्रीपासून अर्क, अर्कापासून साम, त्रिष्टुभापासून त्रैष्टभ, त्रैष्टभापासून वाणी, वाणीपासून अन्य द्विपदा, चौपदा, सप्त वाणीरूप शब्द बनले. संसाराच्या द्वारे समुद्राने अंतरीक्षाला प्रेरित केलें. रथंतर सामानें सूर्य-दर्शन करविलें. गायत्रीच्या तीन समिधाहुती देऊन आपल्या श्रेष्ठत्वाने प्राप्त झाला. गाईचें आपल्या चांगल्या हातानें दूध काढणाऱ्याला मी आवाहन करतो. वनांत गेलेली, वासराच्या भेटीची

इच्छा करणारी गाय धन म्हणून पालन करण्यास योग्य आहे कारण ती स्वत: धनवती असून यजमाच्या घरीं सौभाग्य वृद्धिगत करते. या समृद्धीमुळे अश्विनीकुमारांसाठी आम्ही गाईचे दूध काढतो. गाईचा शब्द ऐकून वत्स हंबरत तिच्याजवळ जातें तेव्हां ती त्याला दूध देऊन प्रवृद्ध करते. गडगडणाऱ्या मेघांनी वाणीला झाकून टाकलें परंतु ती सूर्याप्रमाणें त्याच मेघात राहातें. ही मेघवाणी मनुष्यांना भयभीत करते, विद्युत् रूपाने प्रकट होते आणि पर्जन्यवृष्टि होतांच स्वत:ला लपविते. यमलोकाचे भय वाटणाऱ्या लोकांच्या घरांत मी झोंपतो आणि श्वासोच्छ्वास करतो. अमर्त्य प्राणी मरणशील प्राण्याचे भक्ष्य होतात. ईश्वराची ही किमया आहे की जो चंद्र आज मृत झाला तो दुसऱ्या दिवशी प्राणमय असतो. ही ईश्वराची कृती आहे. गर्भ प्रस्थापित करणारा गर्भत्वाला जाणत नाहीं. गर्भाच्या अंतरांत प्रवेश करणारा तो हे सर्व जाणतो. मातेच्या भोजनामुळें पुष्ट झालेला गर्भ योग्य समयीं उत्पन्न होतो आणि वारंवार निर्मितीच्या जाळचांत सापडतो.

ही वाचारूपी गाय संसार निर्माण करते. मध्यमाच्या साक्षीनें एकपदी, सूर्याच्या साक्षीनें द्विपदी, दिगांच्यामुळे चतुष्पदी, आवांतर दिशांमुळे अष्टपदी, दिशा-विदिशा आणि सूर्य यांच्यामुळे नवपदी होतें. ती परमात्म्यामध्ये मिळून विश्वरचना करते. तिच्यामुळे मेघ वर्षतात. पाणी ग्रहण करणारे सूर्याचे किरण, सूर्याकडे परत जात नाहीत परंतु ज्योतिर्मय होतात. सूर्य दक्षिणायनांत प्रवेशतो तेव्हां पृथ्वी भिजून जाते. सूर्य आणि वरुणाचें स्वरूप कोण जाणतो ? पाय नसलेले सूर्याचे किरण पाय असलेल्यांपेक्षा अधिक गतीनें येतात. पृथ्वी त्यांना धारण करते. सत्य सांगणाऱ्यांचे पृथ्वी पालन करते आणि असत्यवादीयांचा नाश करते. अंतरीक्ष, वाणी, प्रजापति आणि मृत्यू विराट आहेत. भूत भविष्य या विराटांत समाविष्ट आहेत आणि या भूत-भविष्याच्या आधीन आहे. यज्ञाच्या साहाय्यानें मी जो शकयुक्त धूर पाहिला तो उषा आणि पृश्नि यांनी जवळ केला. सूर्य अग्नि आणि वायु संसारी जीवावर जी कृपा करतात त्यातील एक अग्नि एका वर्षात पृथ्वीचें भस्म करतो. त्यामुळें ती उत्पत्तियोग्य होते. सूर्य आपले काम करतो

आणि वायु त्या कर्माचे फल प्रदर्शित करतो. वाणीचे चार प्रकार विद्वानांना माहीत आहेत. त्यांतील तीन गुप्त असून एक दर्शनीय आहे. तत्वज्ञ अग्नि, मित्र, वरुण, द्युलोकांत प्रकाशणारा सूर्य– सर्वांना अग्नि असेंच म्हणतात. ह्या एकाच अग्नीला आत्मज्ञ लोक मातरिश्वा, यम, अग्नि वगैरे अनेक नांवानी हांकारतात.



# दशम काण्ड

## १. कृत्यादूषणम् (अभिचार कर्म करणाऱ्या स्त्रीचा तिरस्कार)

नववधूप्रमाणे शृंगारलेल्या, नाक, कान, मस्तक यांनी युक्त शूद्र, स्त्रिया, राजपुरुष यांच्याकडून प्रेरित केलेल्या कृत्याला मी घालवून देतो. घर, गाय, पुरुष यांच्यावर केलेली वाईट कृती व हिंसारूपी पाप करणाऱ्या कृत्याला मी दूर करतो. अंगिरा वंशातील हे पुरोहिता, समोर आलेल्या कृत्येचे तुकडे कर. हे कृत्ये, माझ्याजवळ येण्यासाठीं ज्याने तुला पाठविले त्याच्याकडे तूं परत जा. निरपराधी असलेल्या आमच्याकडे तूं येऊं नकोस, अभिचार कर्म करण्याची इच्छा करणाऱ्या माणसाकडे तूं परत जा. अभिचार कर्मामुळे आमच्यावर जो दुःखद प्रसंग ओढवला आहे त्या पापापासून आम्ही मुक्त होऊन धनसमृद्ध होऊं.

पितरांना यज्ञामध्ये ज्या औषधी अर्पण केल्या त्या पापापासून दूर राहोत. देवतांच्या अपराधरूपी किंवा पितरांच्या अपराधरूपी पापानें युक्त असलेल्या या औषधी, तपोबलानें किंवा मंत्रबलाने मुक्त होवोत. वायू पृथ्वीवरील धूळ अंतरीक्षांत उडवतो त्याप्रमाणें मंत्राच्या योगे माझें पाप उडून जावो. बंधनमुक्त गाढवी ज्याप्रमाणें ओरडत वाटेल तशी पळत सुटते त्याप्रमाणें हे कृत्ये, तूं मंत्राचा मार खाऊन परत जाऊन तुला बंधमुक्त केलेल्याचा नाश कर. तुला ज्या शत्रूने प्रेरित केली त्याच्याकडे परत जाऊन त्याच्या वीरांचा तूं नाश कर. तुझा निवास

आमच्यापासून दूर राहो. सर्व नद्यांच्या पलीकडे तूं जा. वायू ज्याप्रमाणें झाडें उन्मळतो त्याप्रमाणें तूं आमच्या शत्रूचे सैन्य, निवास, घोडे आणि वीर पुरुष यांना समूळ नष्ट कर. स्मशानात तुला ज्यानें अग्नीच्या साहाय्याने प्रेरित केली किंवा गार्हपत्य अग्नीच्या साहाय्याने प्रेरित केले त्याला मी निर्बल करतो. कपट कृत्य करणाऱ्याकडे तूं परत जा. हे कृत्ये तुला मी जाणतो. घरात लोखंडी शस्त्रें आहेत. त्यामुळे तूं परत जा.

हे कृत्ये, तुझे पाय आणि कंठ छेदण्यासाठी मला स्फूर्ती आली आहे तेव्हां तूं परत जा. प्रजेचे पालनकर्ते इंद्र आणि अग्नि आमचे रक्षण करोत. सर्व प्राणिमात्रांना सुख प्रदान करणाऱ्या भव आणि शर्व नामक देवता, अभिचारी कृत्येवर विजेचा आघात करोत. हे कृत्ये, कन्या ज्याप्रमाणें आपल्या मातेला जाणते त्याप्रमाणें तूं तुला प्रेरणा देणाऱ्याला जाणतेस. या ठिणाणी तू जराही न थांबता, सिंह ज्याप्रमाणें आपल्या भक्ष्याकडे जातो त्याप्रमाणे तूं परत जा. हे कृत्ये, निरपराध प्राण्यांची हत्या करणे पापकर्म आहे. तूं गाई, पशू आणि मनुष्यें यांची हत्या करूं नकोस. ज्या ठिकाणीं तुझा गौरव केला त्या ठिकाणाहून तुला आम्ही नष्ट करतो. अभिचार कर्म करणाऱ्यांची संतती तूं नष्ट कर. सूर्य ज्याप्रमाणें अंधःकाराला बाजूला सारतो त्याप्रमाणें अभिचार कर्म करणाऱ्यांना मी बाजूला करतो.

## २. ब्रह्मप्रकाशनम् (ब्रह्माचें प्रकट दर्शन)

मनुष्यांच्या टांचा, मांस, सुंदर बोटे, घोटे, पचनेंद्रियें जंघे, उदर, स्कंध, श्रोणी, कंठ, हृदय, स्तन, मान कोणी उत्पन्न केलें ? मनुष्याचे वीर्य कोणी पुष्ट केले ? एक शिरामध्यें नाक, कान, नेत्र, मुख, सप्तछेद-युक्त कवटी कोणी निर्माण केली ? दोन पायांचे किंवा चार पायांचे प्राणी कोणी उत्पन्न केले ? मुखांतील जिभेचा ओलेपणा, डोळ्यांतील आर्द्रता कोणी प्रस्थापित केली ? वाणी, जीवन, ललाट, हनुवटी यांना कोणी निर्माण केले ? त्याचप्रमाणें स्वप्नांपासून मिळणारा आनंद अगर दुःख, प्रिय किंवा अप्रिय वाणी, संताप, समृद्धी, बुद्धी आणि सिद्धी कोठून प्राप्त झाली ?

अनेकांना आवश्यक असणाऱ्या पाण्याला, प्रवाहशील, विविध रंग समाविष्ट करून घेण्याचे सामर्थ्य, पुरुषांमध्यें रूप, महिमा, ज्ञान, चारित्र्य गति, प्राण, अपान, उदान, व्यान, समान हे वायु, यज्ञरूप कर्म करण्याची प्रेरणा, मरणे, जगणे, सत्य, असत्य या क्रिया कोणी प्रस्थापित केल्या. ज्या कातड्यानें हा देह झाकला जातो ते कातडें कोणी निर्माण केले. त्याला सर्व सहन करण्याचे सामर्थ्य कोणी दिलें ? पाणी, प्रकाश, उषा, सायं-काळ यांची रचना कोणी केली ? प्राण्यामध्यें पुनरुत्पत्तीसाठी लागणारे वीर्य आणि बुद्धी कोणी प्रतिष्ठित केली ? ही भूमी कोणी पसरली ? स्वर्ग, पर्जन्य कोणी निर्माण केली ? या संवत्सराची उत्पत्ती कोणी केली?

श्रोत्रीय, परमेष्ठी आणि अग्नि ब्रह्माला प्राप्त होवोत. त्यानेंच हे संवत्सर निर्माण केलें. कोणती कर्मे केली असतां देवता अनुकूल होतात? मंत्र ही देवांना अनुकूल करण्याचें साधन आहे. ब्रह्माने पृथ्वी, अंतरीक्ष, द्यौ, उत्तर भाग, नीच दिशा यांची निर्मिती केली. प्रजापतीने मस्तक आणि हृदय यांचे संबंध निर्माण केले. प्राण, अन्न आणि मन यांचें रक्षक आहेत. ज्या नगरांत देव शयन करतो त्याला पुरुष म्हणतात. त्याला त्याचे ज्ञान आहे तो सर्व दिशांमध्यें प्रकट होतो. या ब्रह्मदेवाच्या अक्षय्य नगराचे ज्याला ज्ञान आहे, त्याला प्राण आणि नेत्र वृद्धावस्थेपर्यंत सोडत नाहींत. आठ चक्रें व नवद्वारें असलेली ही देवनगरी हिरण्मय ज्योतीनें झाकलेली आहे. ब्रह्मज्ञानी या ज्योतीला ओळखतात. या ब्रह्मपुरीमध्यें पापनाशक प्रवेश करतात.

### ३. **सपत्नक्षयणो वरणमणिः** (शत्रुनाशक रत्न)

हे रत्न शत्रूचा नाश करण्यास आणि इच्छित फल प्रदान करण्यास समर्थ असल्यानें तें तूं धारण करून शत्रूचा नाश कर. तुझ्या रक्षणासाठीं हे रत्न आहे. या रत्नाच्या साहाय्यानें देवता राक्षसांनी केलेली अभिचार कृत्ये लगेच नष्ट करतात. या रत्नामुळें रोगाचें ज्ञान होतें. पराक्रम वाढतो, शत्रूचा पराजय होतो. तुझ्यावर कोणी अभिचार कर्म केलें तर त्याला हें रत्न शांत करील. भय नाहीसे करील आणि तुझें पापही दूर करील. ज्याच्या शरीरात यक्ष्मादि रोगांनीं प्रवेश केला असेल

त्या रोगाचा, दुःखस्वप्नांचा आणि भयाचा नाश करील. अपशकुन, भय आणि मरणयातना यांच्यापासून तुझें रक्षण करील. हे रत्न, तुझे आई-वडील, भाऊ आणि अन्य स्वकीय यांनी केलेलें पाप नाहीसे करील. शत्रूंना व्यथा निर्माण होईल. मी हिंसारहित आणि शान्त होईन. पुत्र-पौत्र, नोकर-चाकर यांच्या परिवारामध्यें मी दीर्घायुषी होईन.

इंद्र ज्याप्रमाणें राक्षसांना दुःख देतो त्याप्रमाणें मी धारण केलेलें हें रत्न माझ्या शत्रूंना दुःखदायक होईल. मला शंभर वर्षांचें आयुष्य लाभेल. माझें राष्ट्र, पशु आणि वल यांचे रक्षण करील. वायु ज्याप्रमाणें वृक्षांना उन्मळून टाकतो त्याप्रमाणें हे रत्न सर्व रोगांना उन्मळून टाकून माझें रक्षण करील. वायु आणि अग्नि वनस्पतींच्या जवळ गेले की त्यांचे भस्म करतात त्याप्रमाणें माझ्या सर्व शत्रूंना हे मणे, तूं भस्म कर. सुकून गेलेले वृक्ष वाऱ्यामुळें ज्याप्रमाणें पृथ्वीवर पडतात त्याप्रमाणें या यजमानाचे राष्ट्र, पशु यांचे अपहरण करणाऱ्यांचें आयुष्य आणि भाग्य तूं हिरावून घे. हे रत्न सूर्याप्रमाणें तेजस्वी आहे. ते मला तेजोवान करून सुयश प्रदान करो. चंद्र ज्याप्रमाणें सर्वांचा आवडता आहे त्याप्रमाणें मी सर्वांचा आवडता व्हावे. पृथ्वीमध्यें ज्याप्रमाणें अग्नि प्रतिष्ठित आहे त्याप्रमाणें हे रत्न मला प्रतिष्ठित करो.

सोमपीथ, मधुपर्क, अग्निहोत्र, वषट्कार आणि यज्ञ यांच्या योगे यश प्रतिष्ठित होतें त्याप्रमाणें हे रत्न मला यश प्रतिष्ठित करो. प्रजापती परमेष्ठी आणि अन्य देवता माझ्यामध्यें अमृतत्व प्रतिष्ठित करोत. हे रत्न प्रतिष्ठा निर्माण करणारें आहे.

## ४. **सर्वविषदूरिकरणम्** (सर्व प्रकारचे विष नाहीसें करणें)

पहिला इंद्राचा, दुसरा देवतांचा, तिसरा वरुणाचा रथ आहे. सर्पांचा अपमा नामक शिवांकडे जाणारा रथ आहे. हे दर्भ सर्पांना त्रास-दायक आहेत. तरुणक आणि अश्व नामक विषाला ते अडथळा करतात. तर परुष नामक विष दूर करतात. हे श्वेत सर्षप, ( मोहरी ) तूं सर्पांचे विष नाहीसें कर. हे अरंघुष, तूं या सर्पांचें विष निष्फल कर. हे पैद्व, तूं रथर्व्या आणि प्रदातु नामक सर्पांचें शिर तोडलेस. आमची

प्रार्थना आहे तूं आम्ही ज्या मार्गानें जातो त्या मार्गावरील सर्पांना बाजूला फेकून दे. जो सर्प चावतो त्याचे तोंड उघडणार नाहीं असे कर. या ठिकाणीं असलेले नर-मादी सर्प विषशून्य होवोत. विंचू सर्पांना मारो. अघ्वश्व आणि स्वज नामक औषधीनें माणसांना मारण्याची इच्छा करणाऱ्या सर्पांना मी माझ्या नियंत्रणांत ठेवतो.

पैद्व शोक करीत राहतो कारण या सर्पांचें विष इंद्रानें त्याला मारून नाहीसें केलें आहे. तिरश्चि व पृदातु नामक सर्प मंत्रशक्तीनें नष्ट झाले. श्वेत व कृष्ण वर्ण करिक्रत सर्प दर्भामुळें नष्ट होतात. सका-कुमारी नामक औषधी पर्वतांत असते. त्या वैद्याला सतत यशस्वी करतात. ती औषधी स्वज नामक सर्प आणि विंचू यांना ठार करते. इंद्र, वायु, मित्र, वरुण आणि पर्जन्यद्वय हे त्या सर्पांना आपल्या नियंत्रणात ठेवतात. पृदाकु, प्रदाक्व, खज, तिश्चिराज, कर्सणील आणि दशोनिस या सर्पांना इंद्रानें मंगल कारणासाठी वश केलें. हे सर्पांनों तुम्हाला उत्पन्न करणाऱ्याला इंद्रानें नष्ट केलें. या सर्पांचा संहार झाला तेव्हां शक्तिशाली सर्प उरला होता. सर्व नद्या या सर्पांचे विष वाहून नेवोत.

उर्वरी नामक औषधींच्या साहाय्यानें मी सर्पांचे विष दूर करतो. सूर्य, अग्नि, पृथ्वी, औषधी, पाणी आणि सर्प यांच्या योगें जें भीषण कर्म घडले आहे ते हवीच्या रूपानें मी सर्मपित करतो. तौदी आणि घृताची मी तुमच्यामुळें निर्विष झालो आहे. इतकेच नव्हे तर नवीन विष सुद्धा त्यावरोवर नष्ट झालें. कारण सोमानें त्यांना दूर नेलें. दंश करणारें सर्प नष्ट झाले.

## ५: **विजयप्राप्तिः** (विजयाची प्राप्ती)

हे उदका, तूं इंद्राचें ओज, बल, तेज व विजयाची शक्ती आहेस. त्यामुळें तूं जयशील, क्षत्रयोगसंपन्न, तिरस्कृती शक्तिसंपन्न, सोमयोग-संपन्न, जयशील, प्रतिष्ठित रूपानें अग्नि, प्रजापति आणि वरुणाचा भाग म्हणून आम्हाला मोठे कर. हे उदका तूं मित्रावरुण, यम, पितर, सविता यांचा अंश आहेस. हे उदका तुझ्यामध्यें असलेल्या जल लाटा वत्सलता, वीर्य, हिरण्यगर्भ, अग्नि यांचा भाग आहे तो यजुर्वेद मंत्राच्या द्वारा

सेवनीय आहे. त्यामुळें देवतांचें सान्निध्य लाभेल. पुष्टता प्राप्त होईल. या मंत्राच्या योगें अभिचार कर्माला अडथळा होईल आणि आमच्या शत्रूचें बल नष्ट होईल.

हे उदका, तुझ्यामध्यें जो पृथ्वीचा अंश आहे तो यजुर्वेदाच्या मंत्रासहित अनुभवात येतो. त्यामुळें देव सान्निध्य, शरीरपुष्टता, शत्रु-हीनता आणि अभिचार कर्मापासून रक्षण लाभतें. गेल्या तीन वर्षांत मिथ्या भाषणाचें मी जें पाप केलें असेल तें तुझ्यामुळें धुऊन जावो. तुला सर्वत्र गति आहे म्हणून मी तुला समुद्राकडे जाण्याची प्रेरणा देतो. तूं हिंसा नाशक आहेस. त्या समुद्रामध्यें तूं मिळून जा. तूं पापरहित आहेस. पापापासून तूं मला मुक्त कर. विष्णूसारखा पराक्रम तुझ्याजवळ आहे. अंतरीक्ष दिशा आशा, ऋक् व पृथ्वीनें तुला सूक्ष्म आणि अग्नीनें तेजयुक्त केलें आहे. आमचा शत्रु पृथ्वीवर न राहो.

हे जला, तूं शत्रुनाशक व पराक्रमी आहेस. यज्ञ, औषधी, कृषि, प्राण, यांनीं तुला पुष्टी दिली आहे. तुझ्यामध्यें विष्णु , वरुण, यांचे तेज आहे. तुझ्यामुळें प्राप्त झालेल्या पदार्थांची रास समोर आहे. शत्रूच्या सेनेला मी वश केलें आहे. मी सूर्याच्या मार्गानें जाणारा आहे. सर्व दिशा मला ब्रह्मतेज प्रदान करोत. सर्व दिशांनीं प्रदक्षिणा करतांना त्या मला संपन्न करोत. सप्त ऋषींच्या समोर मी उभा आहे ते मला धन व ब्रह्मवर्चस्व प्रदान करोत.

मी ब्राह्मणांना प्रदक्षिणा करतो. या समिधांनी युक्त असलेला हवि मी अग्नीला देत आहे. वरुणाचा पाशमंत्र माझ्या शत्रूला बाधक होवो. देवतांनों या पृथ्वीवर जें अन्न आहे, यांतील साररूपी बल आम्हाला लाभो. मी दिव्य जलाच्या सान्निध्यांत आहे. अग्नींच्या समोर उभा आहे. हे अग्ने तू मला तेज आयु आणि संतान यांनी संपन्न कर. ज्या शत्रूच्या भीतीने लोक धावपळ करतात त्या शत्रूची पीडा तूं नाहीशी कर. पीडा देणाऱ्यांना भस्म कर. राक्षसी कृत्य करणाऱ्या हिंसकांना आपल्या ज्वालांनीं चाटून घे. दुसऱ्याचा वध केल्यानें ज्यांना संतोष होतो त्यांचा संहार कर. मला मंत्रशक्तीचें ज्ञान आहे. त्या शक्तीनें हातांत घेतलेलें पाणी वज्र रूपानें मी शत्रूवर फेंकतो. त्यामुळे शत्रूची मस्तकें तुटून

पडतील. माझ्या या कार्यांत मला देवता अनुकूल होवोत.

६. **मणिबन्धनम्** (मनगटात बांधावयाचें सूत्र)

जो माझ्याशीं वैरभावानें वागतो त्याचे मस्तक मी मंत्राने छेदतो. हें रत्न माझें कवच आहे. हें सुवर्णमय यंत्र आमचें घर सुशोभित करो. पिता ज्याप्रमाणें पुत्राचें कल्याण करतो त्याप्रमाणें हे रत्न मला लाभदायक होवो. रत्नाची, घृत, मध, अन्न आणि सुरा यांची भेट होते. हें देवदेय रत्न आहे. खैराच्या निखाऱ्याप्रमाणें ओजस्वी असलेलें हें रत्न वीर्य आणि बल प्रदान करतें. ह्या रत्नाचें महत्त्व सोमानें वाढविलें. सर्व इंद्रियांच्या बलवृद्धीसाठीं, सर्व पदार्थांचें सार असणारें हे रत्न सोमानें बांधलें. मी त्यानें शत्रू नाहीसा करतो. हे रत्न सर्व पदार्थांचा वर्षाव करणारें आहे. बृहस्पतीनें हें रत्न, सूर्य, चंद्र, वायु, अश्विनीकुमार, सविता, जल, वरुण व अन्य देवता यांना बांधलें. यायोगें सूर्याला सर्वत्र विजय, राक्षसांच्या सुवर्णमयी नगरांचा लाभ, वायूला गतिमानता, अश्विनीकुमारांना कृषिफल, सवित्याला स्वर्गवाणी, जलाला प्रवाह, वरुणाला कल्याणमयता व अन्य देवतांना आनंद प्राप्त झाला. हें रत्न माझ्या शत्रूला दुर्गति देवो. अथर्ववेदाच्या मंत्रासहित हे रत्न ज्यानें धारण केलें त्याचा शत्रू नष्टवीर्य होतो.

या रत्नाच्या साहाय्यानें प्रजापतीनें प्राण्यांची उत्पत्ती केली. असुरांचा नाश केला. गाय व बकरी त्यांच्या परिवारासह निर्माण झाली. यवादि धान्यें, घृतादि मधुर अन्न, यश, कीर्ति, श्रेष्ठ विभूति, क्षात्रबल, शत्रुसंहारक शक्ती निर्माण झाली. हे रत्न सर्वांचें कल्याण करणारें असल्यानें मी ते मंत्रासहित धारण करतो. यामुळें माझ्या शत्रूला दुर्गति प्राप्त होईल.

या रत्नाचा देवतांनी स्वीकार केला. यायोगे मला श्रेष्ठत्व प्राप्त झाले. फाळाच्या साहाय्यानें नांगरलेल्या जमिनीतून ज्याप्रमाणें बीज अंकुरतें त्याप्रमाणें यज्ञांतून फल अंकुरतें व फलांतून कल्याण साधतें. हे अग्ने, मंत्राच्या सहाय्यानें तूं प्रदीप्त होऊन आम्ही प्रदान केलेला हवि सेवन करतोस. या श्रेष्ठ अग्निदेवाची, वृद्धि, प्रजा, चक्षु, पशु, आणि

सर्व प्रकारच्या कल्याणासाठी आम्ही प्रार्थना करतो.

## ७. सर्वाधारवर्णनम् (सर्वांचा आधार असलेल्याचें स्वरूप वर्णन)

विश्वाचा आधार असलेल्या या देवाच्या कोणत्या बाजूला तप, पारमार्थिक सत्य, श्रद्धा, प्रापंचिक सत्य आणि व्रत यांचा ठाव आहे ? कोणत्या बाजूनें वायू वाहतो ? कोणत्या बाजूला अग्नि प्रज्वलित होतो? चंद्र, भूमी, अंतरीक्ष, द्युलोक व द्युलोकापेक्षां श्रेष्ठ स्थान कोणत्या अंगाला आहेत? या ठिकाणी असणारा अग्नि आणि वायु कोठे जाण्याची इच्छा करतात? जन्ममरणाधीन असलेले प्राणी कोठे जातात ? संवत्सर मास, पक्ष, याच्या कोणत्या अंगीं आहेत? दिवस आणि रात्र यांची अनेक रूपें आहेत. एकमेकाच्या मागून ती ये जा करतात. ती कोठें जातात आणि येतात कोठून ? हे प्रवाहित पाणी कोठे जातें ? हा प्रजापति सर्वांना धारण करतो? तो कोठे आहे? भूत–भविष्य काळाचा कितवा अंश आहे? ज्यामध्यें सत्, असत् आणि जीवनाच्या सर्व अवस्था आहेत तो सर्वाधार कसा आहे ?

ज्याठिकाणीं व्रतधारी आणि तपोवान पुरुष राहातात, ज्या ठिकाणीं श्रद्धा,ऋतु, जल, आणि ब्रह्म स्थित आहे, ज्यामध्ये अग्नि, सूर्य, चंद्र, वायु, पृथ्वी, अंतरीक्ष व दिव्य लोक प्रतिष्ठित आहेत, ज्याच्यामध्यें तेहतीस देवता आहेत, ज्याच्यापासून प्रारंभीच ऋषी, पृथ्वी, ऋक्, यजुस्, साम निर्माण झाले, जन्म, मरण स्थिर झाले, समुद्र ज्याच्या नाडया आहे, चार दिशा ज्याचें रूप आहे, यज्ञ ज्याच्यामध्ये स्थिर होतो, तो सर्वाधार पुरुष कोण ? जो ब्रह्म, परमेष्ठी, प्रजापति आणि अग्रज ब्राह्मण यांचा ज्ञात आहे, ज्याचें मस्तक वैश्वानर, ज्याचे नेत्र अंगिरावंशीय ऋषी, अंग यातु आहे, जीभ मधुकशा असून मुख ब्रह्म असल्यानें याला विराट् म्हणतात तो कोण आहे? ज्याच्यापासून यजुर्वेदाचे मंत्र आणि अथर्वरूपी मुख आणि सामरूपी केस निर्माण झाले तो पुरुष कोण आहे ?

जी गोष्ट उत्पन्न होणे अशक्य आहे ती उत्पन्न झाली तर तिच्या-बद्दल नवल वाटून त्या गोष्टीचें महत्त्व वाढतें. लोक ज्याची स्तुती

करतात तो नेहमी मोठा असतो. ज्याच्यामध्यें सूर्य, रुद्र, वसु, भूत, भविष्य आणि सर्व लोक वसती करतात, ज्याच्यामुळें तेहतीस देवतांचें रक्षण होतें अशा सर्वाधार तत्त्वाचा ज्ञाता कोण आहे? ब्रह्मज्ञ देवता ज्या ठिकाणी ब्रह्माची स्तुती करतात याचें ज्याला ज्ञान आहे तो ब्रह्मज्ञ होय. असत् पासून निर्माण होणारी देवतासुद्धां या सर्वाधार तत्त्वाचें एक अंग आहे. तेहतीस देवता, ज्याचें वर्णन शब्दांनी करतां येत नाही असा हिरण्यगर्भ, ज्यामध्यें तप व ऋतु वसती करतात, इंद्रामध्यें सुद्धां ज्याचा अंश आहे असें सर्वाधारतत्त्व कोणाला ज्ञात आहे?

जो अजन्मा आहे, ज्याच्या पूर्वी कोणी जन्मला नाहीं तो आत्मा सूर्य आणि उषा या नावानें संसार निर्माण करतो. पृथ्वी हें त्याचें तेज, अंतरीक्ष हें पोट आणि द्युलोक ज्याचें मस्तक आहे, त्या ब्रह्माला (आत्म्याला) नमस्कार असो. चंद्र आणि सूर्य ज्याचे नेत्र, अग्नि ज्याचें मुख आहे, प्राणापान वायु, अंगिरा दृष्टी, दिशा, आकाश, पृथ्वी, अंतरीक्ष उपदिशा या सप्त ऊर्वी आहेत अशा ब्रह्माला माझा नमस्कार असो. सर्वांना ज्यानें भोग प्रदान केले, तपस्येच्या योगें जो प्रकट होतो, ज्यानें सोम निर्माण केला, ज्याच्या इच्छेनें जल प्रवाहित होतें, वायु प्रवाहित होत नाहीं आणि रममाण होत नाहीं, जो पूजनीय आहे, सर्व देवता ज्याच्या आश्रित आहेत, हात, पाय, नेत्र, वाणी वगैरे ज्याची सेवा करतात, जो सूक्ष्मरूपानें सर्वांमध्यें स्थित आहे अशा सर्वाधारतत्त्वाला माझा नमस्कार असो. या तत्त्वाला जाणणारा, ज्ञानवान, पापरहित आणि तीन ज्योतिरूप होतो.

### ८ ज्येष्ठब्रह्मवर्णनम् (परब्रह्माचे वर्णन)

जो भूत, भविष्य, सर्वव्यापक आणि दिव्य लोकाचा अधिष्ठाता आहे त्या परब्रह्माला नमस्कार असो. पृथ्वी, आकाश, याच्यामुळेंच योग्य ठिकाणीं आहे. तीन तऱ्हेच्या प्रजा याच्यामध्यें आणि अन्य सर्व सूर्यामध्यें समाविष्ट होतात. पृथ्वीची रचना करणारें ब्रह्म हरितवर्णाच्या हरिणींमध्यें प्रविष्ट होतें. बारा आरे, तीन आंस, तीनशें साठ सांधे अस-

लेल्या या संवत्सररूपी चक्रामध्यें दोन महिन्यांचा एक या प्रमाणें सहा ऋतु आहेत. ब्रह्मापासून निर्माण होणारे प्राणि ब्रह्म जाणण्याची इच्छा करतात. देहरूपी गुहेमध्यें आत्मा राहातो. श्वासवान विश्व त्यामध्येंच समाविष्ट आहे. एक चक्र, एक आंस सहस्र आऱ्यांच्या सहित गतिमान आहे. त्याच्या अर्ध्या भागातून विश्व झालें पण अन्य अर्ध्या भागाचें ज्ञान कोणाला आहे? या विश्वाचें येणें समजतें पण जाणें मात्र समजत नाहीं. जवळच्या वस्तूपेक्षा जवळ आणि दूरच्या वस्तूपेक्षा दूर आहे. वरतीं या शरीराचे रक्षण करणारे सात ऋषी आहेत. ज्या योगें यज्ञ विकसित होतो, असे मंत्र कोणते ?

जो हालचाल करतो, स्थिर राहातो, श्वसन करतो किंवा करीतही नाहीं, ज्याचें आयुष्य निमिषाने मापलें जातें, ज्यानें भूमि धारण केली आहे, सर्व रूपानें जो नटतो, जो अनन्त, सीमित, अनेक वस्तूंमध्यें विस्तारलेला स्वर्गसुखाला दृष्टी देणारा, भविष्य हें ज्याचें कर्म आहे, जो गर्भात अदृश्य असतो, अनेक रूपांनीं जो जन्म घेतो आणि ज्याच्या अर्धांशानें हे जगत् निर्माण झालें ते ब्रह्म होय. आपल्या नेत्रांनीं जो सर्वांना पाहातो परंतु मनानें जाणत नाहीं, जो सर्वांपासून दूर राहातो, जो पूजनीय आहे, ज्याच्यामुळें सूर्याचा उदयास्त होतो, ज्याला ओलांडून कोणी जाऊ शकत नाहीं, जो सर्वांचा ज्ञाता असून सर्वांच्या मागेपुढें आहे, ज्याला सूर्य अशी संज्ञा लाभते, अग्नि आणि त्रिवृत् हंस म्हणून ज्याचे वर्णन केले जातें, जो हंस पापनाशक आहे, ज्याचे पंख स्वर्गांत जाण्यासाठी हजारों दिवस पसरलेले असतात आणि जो सर्वांच्या हृदयांत वास करणारा आहे त्याला ब्रह्म म्हणतात. जो सत्य, तप, मंत्र यांचें सामर्थ्य आहे त्याला ब्रह्म म्हणतात. विद्वान या महान ब्रह्माचे ज्ञाते आहेत.

उदकाच्या नंतर जन्माला आलेला, प्रथम एकच असलेला परंतु नंतर चार प्रकारानें विस्तृत झालेला स्वर्ग उपभोग्य झाला. या स्वर्ग-स्वामीची आराधना करणारा अन्नप्रदायक होतो. या सनातन स्वर्ग-देवतेमुळें सूर्य आणि सूर्यामुळें दिवस आणि रात्र निर्माण होतात. काळ यामध्यें लीन होतो. यालाच आत्मा म्हणतात. तो अत्यंत सूक्ष्म असल्यानें दिसत नाहीं परंतु तो सर्वांचा आवडता आहे, तो कल्याणमय, जरारहित, व

मर्त्यांना अमृताप्रमाणें वाटणारा आहे. त्याचा उपासक सुद्धां माहान होतो. आत्मा, कुमारी, स्त्री पुरुष, जो सर्वकांहीं आहे जीर्णपणें तो प्राणिवियोग करतो आणि प्रकट होऊन विश्वाचे दर्शन घडवितो, तो सर्व प्राणिमात्रांचा पिता, पुत्र व ज्येष्ठ – कनिष्ठ आहे. तोच मन आहे. गर्भांत तोच राहातो. उत्पन्न तोच होतो. तो पूर्ण आहे त्यांतून पूर्णाचाच जन्म होतो. तपानें तो ज्ञाता होतो. त्यामुळेंच पृथ्वी स्थिर राहून सर्व जीव हालचाल करतात.

अवि नामक देवाला ऋतूंनीं झांकून टाकलें. या देवतेमुळें वृक्षांना हरितवर्ण प्राप्त होतो. तो कधी नाश पावत नाहीं की कधी क्षीणही होत नाहीं. वाणीच्या प्रेरणेनें सत्यासत्य बोललें जातें. वाणी ज्या ठिकाणी लीन होऊन मंदावते त्याला ब्रह्म म्हणतात. ज्याच्या प्रेरणेनें वायु वहातो, ज्याला यज्ञाहुती प्रिय आहेत आणि जो जलाचा नेता आहे त्यानें ही सर्व पृथ्वी आच्छादित केली आहे. अंतरीक्ष स्थिर केले आहे आणि जीवांना स्वर्ग मोकळा केला आहे. दिक्पाल दिशांचे रक्षण करतात ते त्याच्याच प्रेरणेनें. यांना जाणणारा ब्रह्मज्ञ होय. सर्वांचे भस्म करण्याचें सामर्थ्य असलेला अग्नि आकाश आणि पृथ्वी यांच्यामध्यें स्थिर आहे. या ठिकाणी प्राणिमात्रांचे पोषण करणाऱ्या देवता राहातात. वायु पाण्यांत असल्यानें पृथ्वीला जन्म देणाऱ्या देवता त्या ठिकाणीं निवास करतात. त्या पापनाशक, आहेत. गायत्रीमध्यें समाविष्ट असलेला साम कोण जाणतो ? तो अजन्मा आहे. देवतांमध्ये सविता महान आहे. तो सत्यपालक असून, पुण्यवान प्राणि त्याच्या प्रेरणेनें स्वर्ग मिळवितात. नवद्वारांनी सुशोभित असलेल्या शरीररूपी घरांत आत्मा राहातो. ज्ञानी लोक त्याला जाणतात. तो आत्मा कामनारहित, धैर्ययुक्त, स्वयंभू, तृप्त, सर्व कर्मे करण्यास समर्थ, मृत्युस्पर्शरहित आणि चिरतरुण आहे.

### ९. शतौदना गौः (शतकल्याणी गाय)

शत्रूचा नाश करणारी, स्वर्गलाभ करून देणारी, इंद्र प्रदत्त, हिंसक शत्रूला थोपविणारी आणि गतिमान गाईचे केंस हे दर्भ व चर्म यज्ञवेदी असून दोरीच्या साहाय्यानें बद्ध केलेली ही गाय नृत्य करीत

आहे. हे गाई, तुझी जीभ मार्जनी व केंस प्रोक्षणी आहेत. तू स्वर्गाला जाणारी, सर्वांच्या इच्छा पूर्ण करणारी आणि ऋत्विजांना प्रसन्न करणारी आहेस. सुवर्णालंकृत गाईचें दान करणारा दिव्य लोक मिळवतो. हे देवि तुला या ठिकाणी भय नाहीं. दक्षिण दिशेकडून वायु उत्तरेकडून मरुत आणि मागून सूर्य तुझें रक्षक आहेत. तूं स्वर्गाकडे गमन कर. त्या ठिकाणीं, मनुष्य, पितर, देवगण, गंधर्व आणि अप्सरा तुझें सतत रक्षण करतील. अशा गाईचें दान करणारा मनुष्य अंतरीक्ष, द्युलोक, पृथ्वी, मरुत्गण, आणि सर्व दिशा यांचा आणि अन्य सर्व लोकांचा आवडता होतो.

घृत प्रोक्षण करणारी, हिंसाशून्य, भाग्यवान शतौदना गाय देवाकडे प्रयाण करते. पृथ्वी, स्वर्ग व अंतरीक्ष यांमध्यें निवास करणाऱ्या देवतांना दूध, तूप आणि मध प्रदान करणारी ही गाय आहे. हे धेनू, तुझें मस्तक, मुख, कान, नेत्र, ओठ, नासिका, शिंगे, हृदय, कण्ठ, यकृत, आंतडी, गुद, प्लीहा, कुक्षि, चर्म, मज्जा, अस्थि, मांस, रक्त, पाय, वशिंड, मान, खांदे, पृष्ठ, मांड्या, श्रोणी, कटि, गाल, नितंब, दात्याला, भरपूर दूध, तूप, आणि मध प्रदान करोत. हे गौ देवते हा पुरोडाश घृतयुक्त होवो. जे धान्य काढून स्वच्छ करण्यांत येत आहे त्याला वायू साथ करतो. होतागण त्याची आहुती यज्ञामध्ये देतात. हे ब्राह्मणानों कल्याणाच्या इच्छेनें मी तुम्हास दान देतो. ती कल्याणमय अवस्था आणि धनसंपन्नता मला प्राप्त होवो.

## १० वशा गौः (स्त्रीरूपिणी गाय)

हे अन्ध्ये, उत्पन्न होणाऱ्या तुला, तुझ्या वासरांना आणि खुरांना नमस्कार असो. जवळच्या आणि दूरच्या स्त्रियांच्या सात गोष्टी जाणणारा समर्थ होतो. आकाश, पृथ्वी, जल जिच्या सामर्थ्यानें रक्षित केलें जातें तिच्याशी मंत्रालाप करण्यांत येतो. त्या गाईजवळ दुधाची शेकडों पात्रे आहेत. त्या ठिकाणी लक्ष ठेवणारे या गाईस जाणतात. ही गाय म्हणजे यज्ञपदी इरा, क्षीरा, स्वधा, प्राणा आणि वृष्टी अशा स्त्री रूपानें तंत्रशक्तीनें देवतांना संतुष्ट करते. हे वत्सले, तुझ्यामध्यें सोम आणि अग्नि यांनीं

प्रवेश केला. पर्जन्य तुझी कांस आणि विद्युत स्तन आहेत. तूं जलप्रदायिनी अन्न, दूध आणि अन्य वस्तु प्रदान करणारी आहेस. आदित्यानें बोलावतांच त्याच्याकडे जाणारी आणि इंद्रानें दिलेला सोम प्राशन करणारी आहेस. तूं इंद्राच्या जवळ असतांना वृषभानें तुला बोलवलें तेव्हा इंद्रानें तुझे दूध हरण केलें होतें.

स्त्रीरूपी गाईनें तीन पात्रांमध्यें सोम भरला. सर्व प्राणिमात्रांच्या संगतीत ती जलप्रतिष्ठित झाली. वायुच्या बरोबर राहून ऋचांना धारण केले. सूर्याच्या योगें नेत्रांना ज्योतीच्या रूपानें समुद्राला समृद्ध केलें. हे गाई, अलंकारांनी विभूषित असलेली तू समुद्राकडे जातेस. त्या ठिकाणी यज्ञकर्ते कुशासनावर विराजमान झाले आहेत. तूं त्यांचें मंगल कर. तूं क्षत्रियांना उत्पन्न करणारी आहेस. ब्रह्माच्या एका अंशानें तूं जन्मलीस तुझ्या मुखांतून स्तुती बाहेर पडली. बल निर्माण झालें आणि बलातून यज्ञ संपन्न झाला. त्याच्या किरणांतून तुझे स्तन निर्माण झाले.

हे वशे, तुझ्या शरीरापासून लता निर्माण झाल्या. तूं वरुणाच्या उदरांत गेलीस. तेथून ब्रह्मदेवान तुला मुक्त केलें. तुझी दृष्टी त्यालाच ज्ञात आहे. त्या दृष्टीनें तूं सर्वांना जन्म देतेस आणि मंत्राच्या सामर्थ्यानें कर्माची प्रेरणा देतेस. यज्ञाचा स्वीकार वशा करते. सूर्याला योग्य ठिकाणीं प्रस्थापित करते. सर्वांचें भोजन वशा देते. ती अमृतरूपा असून प्राणिमात्रांना मृत्यूपासून दूर ठेवणारी असल्याने उपास्या आहे. देवता पितर आणि ऋषि वशेच्या सान्निध्यांत राहातात. यजमानाला जयफळ तीच देते. वरुणाच्या मुखांत तीन जिभा आहेत. बीजरूप आणि सुशोभित जिव्हा हे वशेचें रूप आहे. जल, अमृत, पशु, आणि यज्ञ हे वशेचे अंश आहेत. तीच द्यौ, पृथ्वी, विष्णु, प्रजापति, वसु रूपानें गोचर होते. हिचे दूध प्राशन करणारा सूर्यमंडळांत स्थिर होतो. कोणी सोम, घृत प्रदान करून स्वर्गाचा लाभ घेतात. सत्य, तप आणि ब्रह्म वशाच्या सान्निध्यांत आहेत. देव आणि मनुष्यांना तिच्यामुळें जीवन प्राप्त होतें. सूर्याचा प्रकाश ज्या ठिकाणापर्यंत जातो त्या ठिकाणापर्यंत वशाचा वास आहे.





# एकादश काण्ड

## १. ब्रह्मौदनम् (ब्रह्मरूपी अन्न)

देवमाता अदिती ब्रह्मरूपी अन्नाची कामना करते. हे अग्नें, मंथनातून तुझा जन्म झाला. मरीच्यादि ऋषींनी प्राणिमात्रांना निर्माण केलें. देवयज्ञामध्यें त्यानी मंथन करून तुला उत्पन्न केलें. सप्तऋषी अभीष्टवर्षक आहेत. अग्नि यज्ञमानाचें रक्षण करतो. या ऋचारूपी स्तुती शत्रूनाश करतात. देवतांनीं या मंत्रांच्या साह्याय्यानें शत्रूवर विजय मिळविला. हे अग्ने, उत्पन्न झालेल्या प्राणिमात्रांचा तूं ज्ञाता आहेस. तूं दाहक व वीर्य प्रदायक, असून मंत्र शक्तीनें प्रदीप्त होतोस. सप्तर्षीनी ब्रह्मौदनासाठीं तुला निर्माण केलें. हे अग्ने, समिधांमुळें तूं यज्ञामध्यें प्रदीप्त होतोस. यज्ञीय देवतांना तूं या ठिकाणीं घेऊन ये. या यज्ञामध्यें देवता, अग्नि, पिता, पितामह, प्रपितामह आणि ब्राह्मण यांच्यासाठीं निरनिराळे भाग बाजूला ठेवले आहेत. ते त्यांनी स्वीकारावेत आणि यजमान पत्नीला अभीष्ट फल प्रदान करावें. हे अग्ने, तूं बलवान, शत्रूला वश करणारा आणि कल्याणकारक फल देणारा आहेस. तूं पुत्रपौत्रादि प्रदान करून यजमानाचें कल्याण कर. देहपातानंतर त्याला स्वर्गात स्थान दे. ही पृथ्वी कल्याणकारक आहे. तिच्या प्रसादामुळें यज्ञादि कर्मांचे शुभफल आम्ही प्राप्त करतो. हे ऋत्विजांनों, तुम्ही आसनें, उखळी, मुसळ यांना स्थापन करा. हे यजमानपत्नी, आमच्या पुत्र–पौत्रांना नष्ट करणाऱ्या शत्रूला आवरून ठेव. त्यांची संतती नष्ट होईल असें कर. हे अध्वर्युंनों,

तुमच्या हातांनीं तुम्ही हे यज्ञ-साहित्य धारण करा. देवता तुमच्या यज्ञांत आलेल्या आहेत. हे यज्ञमान, कर्म-फल समृद्धी आणि परलोक निवास या गोष्टी यज्ञाच्या द्वारा तुला प्राप्त होतील.

तांदुळामध्यें असलेला कोंडा आणि तूस बाजूला करणें हे सुपाचें कार्य आहे. देवमाता अदिती हे सूप हाती घेते. हे अदिती, स्त्रीच्या हत्येसाठीं जो सैन्य जमा करतो त्या शत्रूचा नाश करून, भूसहीन तांदूळ, पुत्रादी संतती आणि धन या यजमान पत्नीला तूं प्रदान कर. तांदूळ सत्यकर्मफल प्रदायक आहेत. तुम्ही तुसापासून वेगळे व्हा. तुमच्यापासून आम्हाला समृद्धी लाभो. हे स्त्रिये, तूं गाई पाणी पितात त्या जलाशयातील पाणी घेऊन लवकर परत ये. कारण ते पाणी यज्ञयोग्य आहे. सालंकृत स्त्रिये, पाणी घेऊन स्त्रिया आलेल्या आहेत. त्याचा तूं स्वीकार कर. तूं चांगला पती व पुत्र लाभलेली सौभाग्यवान स्त्री आहेस. हा जलकलश तूं घे. ब्रह्मानें सारभूत भाग या पाण्यांत स्थापन केला आहे. हा कलश तूं चर्मासनावर स्थापन कर. म्हणजे ब्रह्मदेव तुला गवादि धन आणि पुत्रसंतती प्रदान करील. हे अग्ने, हवि सिद्ध करण्यासाठीं तुझ्यावर पात्र ठेवण्यांत आलें आहें ते तप्त कर. ऋषी, आर्षेय ब्राह्मण आणि इंद्रादिकांचे भाग या पात्रांत एकत्रित केले आहेत ते तूं शिजव. ब्रह्मौदन तयार करणारा यजमान स्वर्ग प्राप्त करतो. दूध आणि तूप यांच्यासह शिजवून पवित्र झालेले तांदूळ सोमाचा अंश आहेत. अग्नीवर ठेवलेल्या पात्रांत पाणी आहे. त्यांत तांदूळ स्थिर होवोत. हा तयार झालेला भात, यजमानाचे पिता-पितामहादि सात पुरुष, पुत्र-पौत्र प्रपौत्रादि आणि पुत्री- पौत्री आणि प्रपौत्री आदी सात पिढ्यांना तृप्ती प्रदान करील. इतकेंच नव्हे तर हा भात तयार करणाऱ्याला सुद्धां तृप्तता लाभेल. यजमाना हे सहस्रपृष्ठ आणि सहस्रधारयुक्त आहे. त्याचा कधीही क्षय होत नाहीं. यामुळें यज्ञसाधक देवाला प्राप्त होतात आणि सर्व सुखांचा उपभोग घेतात.

हे शिजलेल्या भाता, तू हविरूपानें या वेदीमध्यें स्थिर हो आणि यजमान पत्नीला संतानयुक्त कर. हिंसक असुरांना घालवून दे. आमच्या बरोबरच्या लोकांसह आम्हाला संपत्तिवान कर. पशुधन देऊन यजमानाला

तूं संतुष्ट कर. हृ यजमान दंपती तुम्हाला शोक न होवो. अभिचार कर्म तुम्हाला स्पर्श न करो. तुम्ही रोगरहित आणि ऐश्वर्याचा उपभोग घेणारे व्हा. ब्रह्मदेवानें हृया वेदीची रचना केली. हिरण्यगर्भानें ती प्रस्थापित केली. ऋषींनी ब्रह्मौदन तयार केलें. हे स्त्रिये, तूं सर्वांचा आश्रय असलेल्या या वेदीजवळ जा आणि ऋषींनीं तयार केलेलें ब्रह्मौदन तूं त्या ठिकाणीं ठेव. ऋषींनी निर्माण केलेल्या ह्या स्रुवा म्हणजे देवमाता अदितीचे हात होत. ही स्रुवा आणि दर्वी या ओदनाला स्पर्श करतात. हृया ओदनाजवळ पवित्र देवता एकत्र येतात. दूध, दही आणि सोम यांनी शुद्ध झालेलें हें ब्रह्मौदन ब्राह्मणांच्या उदरांत जावो. कोणाचीही हिंसा त्याच्याकडून न होवो. हे ब्रह्मौदना, तुला सोमाचा स्पर्श झाला आहे. तूं या ब्राह्मणांना मोहशून्य ज्ञान प्रदान कर. यांना तपोत्पन्न पत्नी प्राप्त होवो. मी यज्ञोपयुक्त निर्मल आणि पवित्र पाणी ब्राह्मणांच्या हातावर घालतो. या जलानें त्यांचें कल्याण होईल. कारण हे पाणी अभीष्टकारक आहे. माझें इच्छित अभीष्ट इंद्र आणि मरुत पूर्ण करोत. हे ब्रह्मौदन म्हणजे कामधेनु आहे. हें माझ्या स्वर्गाच्या मार्गात साथ करणारें आहे. दक्षिणारूपानें मी हे ब्राह्मणांना प्रदान करतो. त्यामुळें पितरांना स्वर्ग लाभेल. हे ऋत्विजांनों, ब्रह्मौदनांतील तांदूळा पासून बाजूला झालेलें तूस तुम्ही अग्नीला अर्पण करा. कारण पापदेवता निर्ऋतीचा तो अंश आहें. हे ब्रह्मौदन, पाचरण करणारें, सोम रस निष्पन्न करणारें आणि स्वर्गाच्या मार्गावर यजमानाला आरूढ करणारे आहे. श्येन पक्षी ज्याप्रमाणें आपल्या भक्ष्यावर झडप घालून ते मिळवितो त्याप्रमाणें आम्हाला स्वर्ग प्राप्त होवो.

हे ऋत्विजांनों, हृया ब्रह्मौदनानें तुम्ही तुमचें मुख शुद्ध करा. या मध्यें जे तूप आहे तें तुमच्या सर्व अवयवांना स्पर्श करील. त्यामुळें स्वर्गाचा मार्ग तुम्हाला लाभेल. अन्यांना हे ब्रह्मौदन प्रदान करूं नका. हे ब्रह्मौदन भक्षण करणारे ज्ञाते ऋषी संपन्न होवोत. त्यांचा नाश न होवो. हे ओदना, मी तुला आर्षेय ब्राह्मणांना प्रदान करतो. अग्नि, मरुद्गण, मित्रावरुण आणि अर्यमादी देवता या ब्रह्मौदनाचे रक्षण करतात. हे ब्रह्मौदन यज्ञप्रेरक, यज्ञवर्धक, धनाचा सांठा आणि पौरुषत्वाचें

रूप आहे. त्याच्यामुळें पुत्र–पौत्रादि संतति, धनपुष्टता आणि दीर्घायुष्याचा लाभ घडतो. सर्वांच्या कामना तृप्त करणारें, स्वर्ग प्रदान करणारें, पुण्यात्मांना स्वर्गाचा मार्ग दाखविणारें आणि मनुष्यांना संस्कारक्षम करणारें असें हे ब्रह्मौदन यज्ञकर्त्या यजमानाला प्राप्त होवो. हे अग्ने या ब्रह्मौदनाच्या गमनासाठीं देवमार्गाला जाणाऱ्या साधनाची उत्पत्ती कर. आम्हाला देखील या मार्गानें स्वर्गाला जातां येईल. आम्ही यज्ञ करणारे होऊं असें कर. त्या ब्रह्मौदनाच्या आश्रयानें जे कर्म झालें त्याच्या फलामुळें इंद्रादि देवतासुद्धां स्वर्गाला जाणाऱ्या मार्गावर पदार्पण करूं शकल्या. या मुळेंच या मार्गाला देवयान मार्ग असें नाव पडलें. आम्ही देखील आमच्या पुण्यकर्मांनीं, या मार्गाचा अवलंब करून प्रथम स्वर्गलोकामध्यें जाऊं आणि त्यानंतर कांहीं काळानें नाकपृष्ठ नामक तृतीय स्वर्गामध्यें नित्य स्थित होऊं.

२. रुद्रः (रुद्र देवता)

हे भव आणि शर्व देवतांनो आम्हाला सुख प्रदान करा. आमच्या समोर राहून आमचें रक्षण करा. आमच्या गवादि पशूंचे पालन करा. मी तुम्हाला नमस्कार करतो. तुम्ही माझ्यावर प्रसन्न व्हा. आम्ही आणि आमचे पशु यांच्यावर वाण सोडून तुम्ही त्यांचा संहार करूं नका. आमच्या शरीरांतील मांस, गिधाडें, कुत्रे वगैरेंना देऊं नका. तुमच्या मायामय शरीराला नमस्कार असो. हे रुद्रा, सर्व दिशांकडून तुला वन्दन असो. तूं सर्वांचा नियंत्रक आहेस. हे भव तुझे नेत्र, मुख, त्वचा, यांना नमस्कार असो. तुझें उदर, जिव्हा, दांत, नाक आणि अन्य अवयव, निळे केंस, अश्वासमान वेग, शीघ्र शत्रुनाशक अशा रुद्राला नमस्कार असो. अग्निदेव ज्याप्रमाणें पाण्याला वाजूला करतो त्याप्रमाणें रुद्र आम्हाला वाजूला घेवो. मला तो पीडा न करो. हे पशुपते, तुला आठ दहा वारा, वेळां सर्व दिशांकडून नमस्कार असो. हे रुद्रा तुझें वल महान आहे. या चारही दिशा तुझ्या पराक्रमानें भरून गेल्या आहेत. हा स्वर्ग, पृथ्वी, अंतरीक्ष आणि सर्व दिशा हें तुझेंच शरीर आहे. तूं सर्वांवर कृपा करणारा आणि सर्वांना पूजनीय आहेस.

हे पशुपते, तूं ज्या ठिकाणी निवास करतोस त्या ठिकाणीं सर्व मंगल कर्में केली जातात. मांसभक्षक प्राण्यांपासून आम्हाला दूर ठेव. अमंगलकारी पिशाच्चांना अन्यत्र घालवून दे. प्रलयकाळीं तूं संहारक धनुष्य धारण करतोस. त्या हरित् वर्णाच्या धनुष्यानें तूं अनेकांचा एकच वेळीं संहार करतोस. तुझे बाण अरुद्ध गतीनें जातात. त्यांना वन्दन असो. हे रुद्रा, जो पुरुष असमर्थपणें तुझ्यापासून दूर जातो त्याला तूं दण्ड करतोस. तो पळून गेला असेल तर त्याच्या पावलांचा मागोवा घेऊन तूं त्याला गाठतोस आणि दंड करतोस. भव आणि रुद्र महान पराक्रमी आहेत. त्यांना नमस्कार असो. आमच्याकडे येणाऱ्या, दूर जाणाऱ्या, वसणाऱ्या, थांबणाऱ्या, रुद्रास आमचा नमस्कार असो. सायंकाळी सकाळीं रात्रीं आणि दिवसांदेखील तुला नमस्कार असो. तूं हजारो नेत्रयुक्त, बुद्धिमान, असंख्य बाण सोडणारा आणि संसार व्यापून टाकणारा आहेस. पिंगट वर्णाचा, अश्वावर आरूढ होणारा, केशी नामक दैत्याचा संहार करणारा, त्याचा रथ पाडणारा, अशा सर्वरक्षक रुद्राला सर्व लोक जाणतात. हे रुद्रा, आम्ही मरणाधीन आहोत. परंतु आमच्यावर तुझा बाण टाकूं नकोस. आमच्यावर रागावूं नकोस. तुला आमचा नमस्कार असो. आमच्याकडे हिंसात्मक दृष्टीनें पाहूं नकोस. तुझी शस्त्रें आमच्यापासून दूर राहोत. तुझ्या क्रोधापासून आम्ही दूर राहो. तुला नमस्कार असो.

हे रुद्रा, आमचें यवादि धन, पुत्र–पौत्र, आणि पशु यांच्यावर तुझें शस्त्र उगारूं नकोस. जे देवविरोधी आहेत त्यांना त्यांच्या संततीसह नष्ट कर. ज्वरादि पीडा हे तुझें शस्त्र अपराधी लोकांकडे जावो. तूं अंतरीक्षांत स्थिर होऊन अज्ञानी लोकांचा संहार करतोस. तुला आमचें वन्दन असो. हे पशुपते, वनांत, सिंह, हरिण, हंसादि पक्षी आणि अन्य वनचर तुझ्यासाठींच निर्माण करण्यांत आले आहेत. त्यांचा स्वीकार कर. ग्रामपशूंना मारू नकोस. जल हें तुझेंच पवित्र रूप असल्यानें देवांच्या अभिषेकास ते प्रवाहित जल उपयुक्त आहे. अनेक जलचर तुझ्यासाठींच निर्माण केलें आहेत. आपलें तेजरूपी शस्त्र तूं त्यांच्यावर फेंक. तूं क्षणांत पृथ्वीला व्यापून टाकतोस. हे रुद्रा, ज्वरादि रोगापासून तूं आम्हाला दूर

ठेव. स्थावर जंगमांत असलेल्या विषापासून आम्हास दूर ठेव. विद्युत आणि अग्नि आमच्यासाठीं दाहक न होवोत. जंगली पशूनां आमच्यापासून दूर ठेव. हे भवा, तूं पृथ्वीचा अधिपति आहेस. पृथ्वी आणि आकाश यांच्या मध्यें असलेलें अंतरीक्ष तूं तेजानें भरून टाकतोस. सर्व दिशा व्यापून टाकणाऱ्या तुला नमस्कार असो. तुझ्यासाठीं जे प्राणी यज्ञ करतात किंवा यज्ञाला साहाय्य करतात व इंद्रादि देवांना आपले रक्षक मानतात त्या सर्वांना तूं सुख प्रदान कर. त्यांचा संहार करूं नकोस. आमचें माता पिता, आम्हाला साहाय्य करणारे व नियत कर्म करणारे पुरुष यांचा तूं संहार करू नकोस. कटुभाषी, शिकारी, कुत्रे आणि महान गर्जना करणारी रुद्राची सेना यांना आम्ही नमस्कार करतो. तुझ्या कृपेनें आम्ही कुशल आणि भयशून्य होऊं.

### ३. ओदन (शिजवलेले अन्न)

ह्या ब्रह्मौदनाचें बृहस्पति हें शिर, ब्रह्मा मुख, आकाश आणि पृथ्वी दोन कर्ण, चंद्र-सूर्य दोन नेत्र, प्रदीच्यादि सप्तऋषी प्राण, मुसळ हे उपादन उखळ ही कामना, सूप ही दीप्ति आणि ह्या ओदनासाठी जी स्त्री सुपानें पाखडते ती देवी अदिती, ओदन कण हे अश्व, तांदूळ ही गाय आणि तांदुळातील कोंडा हे मच्छर आहे. कुदळ वगैरे अवजारांचा काळा व मांसाचा लाल रंग होतो. ओदन शिजविल्यावर जी राख राहते ती सीमा, ओदनचा वर्ण सुवर्ण, गंध—कमल सूप हे पात्र, गाडी हे अवयव व बैलाच्या गळयांत बांधलेली दोरी हे बंधन आहे.

पृथ्वी हे अन्न शिजविण्यासाठीं असलेले कुंभपात्र, द्युलोक हे झाकण, नांगराच्या फाळानें तयार केलेल्या सऱ्या ह्या कांठ, वाळू उवध्य, संसार हे हात धुण्याचें पाणी आणि लहान जलौघ उपसेचन (पाणी शिंपडणें) आहे. असें हें ओदनपात्र ऋग्वेद रूपी अग्नीवर स्थापन केले जाते. अथर्वानें ते स्थिर केलें असून सामरूपी अग्नि चारही बाजूनीं लावलेला आहे. या पात्रांत घातलेले तांदूळ हे बृहत्साम, ढवळण्यासाठी असलेली पळी हे रथंतर साम, ऋतु अन्न शिजविणारे, दिवस व रात्र प्रज्वलन आहे. या भाताला सूर्य तप्त करतो. अग्निष्टोमादि यज्ञ जे लोक

करतात त्यांना हे ओदन प्रभावशाली आहे. या ओदनाच्या चारही बाजूस पृथ्वी, समुद्र व आकाश आहे.

या ओदनाच्या उच्छिष्ट अंशापासून चारशें ऐंशी देवता सामर्थ्यसंपन्न झाल्या. सर्व लोकांनाही त्याची प्राप्ती होईल. याचें महत्त्व जो जाणतो तो सांगेल यांत तूप आणि दूध यांची आवश्यकता आहे. वसयज्ञ नामक यज्ञ करणारे ज्या फळाची अपेक्षा करतात तें त्यांना लाभतें. ब्रह्मवादी लोक सांगतात कीं, सांसारिक अगर पारमार्थिक दोघांनीहीं या ओदनाचा उपभोग घ्यावा. या ओदनाचा जो कोणी आस्वाद घेणार नाहीं, त्याला प्राणवायू सोडून जाईल. हें ओदन प्रपंचरूप आहे.

पूर्वी हें ओदन ज्याप्रमाणें भक्षण करण्यांत आलें होतें त्याप्रमाणें ते भक्षण न केल्यानें भक्षण करणाऱ्याची संतती नष्ट होऊ लागली. माझ्या समोर असलेलें हे ओदन मी भक्षण केलें नाहीं. बृहस्पतीच्या कृपेनें ऋषीनीं हे ओदन प्राशन केलें त्याप्रमाणें मी तें केलें. त्याच्या प्रभावानें माझें सर्व अंग निरोगी आणि संपन्न झालें त्यामुळें मला स्वर्गातील मार्ग मोकळा झाला. पूर्वीच्या ऋषींनी हे ओदन कशाप्रकारें भक्षण करावें याचा परिपाठ निश्चित केला आहे. त्याप्रमाणें तूं जर ते सेवन केलें नाहीस तर तूं बहिरा होशील. द्यौ आणि पृथ्वीरूपी श्रवणांवयवांच्या द्वारा मी ते ओदन भक्षण केलें. माझ्या प्राकृतिक शोभा अवयवांना नाहीं. त्यामुळें सर्वांग उत्तम होऊन मला स्वर्गमार्ग लाभला. पूर्वीच्या ऋषींनी ज्याप्रकारें हे ओदन नेत्रांच्या शक्तीनें प्राशन करावें असें सांगितलें त्याप्रमाणें जर तूं ते प्राशन केले नाहीस तर तूं आंधळा होशील. चंद्र आणि सूर्य रूपी नेत्रांच्या शक्तीनें मी ते सेवन केलें असल्यानें माझा देह परिपूर्ण झाला. ह्या प्रमाणें जो या ओदनाचा आस्वाद घेतो त्याला स्वर्गमार्ग मोकळा होतो. ज्या ब्रह्मानंदाच्या प्रभावानें पूर्वीच्या ऋषींनी हे ओदन भक्षण केले होते त्याप्रमाणें न करतां तूं जर हे ओदन प्राशन केलेंस तर तुझी संतती तुझ्या समक्ष नष्ट होईल. मी त्या ब्रह्मरूपी मुखानें या ओदन च आस्वाद घेतला. त्यामुळें ते सर्व प्रकारचें शुभ फल देणारें ठरलें. जो कोणी या प्रकारें हें ओदन प्राशन करतों त्याला स्वर्गफलाचा लाभ होतो. पूर्वीच्या ज्या जिभेच्या योगे हे

ओदन प्राशन केलें होतें त्या प्रकाराशिवाय अन्य तऱ्हेनें हें ओदन प्राशन केलेंस तर तुझ्या जिव्हेचा स्वादस्पर्श नाहीसा होईल. अग्नीरूप जिव्हेनें मी ते ओदन प्राशन केलें त्यामुळें माझ्या सर्वांगाला पुष्टीरूपी फल मिळालें. त्यायोगें मला स्वर्गाचा मार्ग प्राप्त झाला. पूर्वीच्या ऋषींनी दातांनी हें ओदन कसें खावें असें सांगितलें आहे. त्या प्रकाराशिवाय अन्य प्रकारें जर तूं हें ओदन भक्षण केलेस तर तुझें दांत नाहीसे होतील. ऋतुरूपी दातांनीं मी ते भक्षण केलें त्यामुळें माझें सर्वांग पुलकित झालें. जो हा प्रकार उत्तम प्रकारें जाणतो तो स्वर्गाचा अधिकारी होतो. ज्या प्राणादिकांच्या प्रभावानें पूर्वीच्या ऋषींनी ह्या ओदनाचा आस्वाद घेतला त्याप्रमाणें तूं जर केलें नाहीस तर प्राणादि वायु तुझ्या शरीराचा त्याग करतील. सप्तऋषीरूपी प्राणांनीं मी ते ओदन भक्षण केलें त्यामुळें माझें शरीर सक्षम झालें. ही पद्धती जो जाणतो तो स्वर्गामध्यें स्थिर होतो. ज्या विधीप्रमाणें पूर्वीच्या ऋषीनीं या ओदनाचा आस्वाद घेतला त्याप्रमाणें न करतां लौकिक विधीप्रमाणें जर तूं हें ओदन खाल्लेस तर तुला यक्ष्मादि रोग नष्ट करतील. अंतरीक्षरूपीं विधीनें मी ते प्राशन केलें त्यामुळें सर्वांगपूर्ण होऊन मला स्वर्गलाभ झाला. पूर्वीच्या ऋषीनीं ज्या पृष्ठाचा उपयोग करून हे ओदन भक्षण केलें त्याप्रमाणें ओदन भक्षण न केल्यास विद्युत् तुझा संहार करील. मी द्यौरूपी पृष्ठाच्या साहाय्यानें या ओदनाचा आस्वाद घेतल्यानें मला योग्य स्थानाचा लाभ झाला. याप्रमाणें ओदनाचा आस्वाद घेणारा पुरुष सर्वांग-समर्थ होऊन त्याला प्राप्त होणाऱ्या फळाच्या योगानें तो स्वर्गादि लोकांमध्यें स्थिर होतो.

पूर्वीच्या ऋषीनीं ज्या वक्षाच्या आधारानें हे ओदन भक्षण केलें त्याप्रमाणें तू न केल्यानें तुझी शेती सफल होणार नाहीं. मी पृथ्वीरूपी वक्षःस्थलाच्या योगें याचा उपयोग केला त्यामुळें सर्वांगसुंदर फल प्राप्त झालें. जो मनुष्य हें जाणतो तो स्वर्गाचा अधिकारी होतो. पूर्वीच्या ऋषीनीं ज्या उदराचा, आसनाचा, मांड्यांचा, कंबरेचा, पायांचा, बोटांचा, हातांचा उपयोग करून ह्या अन्नाचा उपभोग घेतला त्याप्रमाणें तूं न केल्यानें तुला अतिसार, जलमज्जन, मांड्या दुखणें, कंबर कृश

होणें, अस्थिरता प्राप्त होणें, सर्पदंश आणि ब्रह्महत्या या प्रकारच्या दुःखांना तोंड द्यावें लागेल. मी समुद्र, मित्रावरुण, त्वष्टा, अश्विनीकुमार, सविता आणि ब्रह्म यांनीं प्रदान केलेल्या सामर्थ्यानें या ओदनाचा आस्वाद घेतला त्यामुळें सर्वांग–परिपूर्णत्वाचा लाभ झाला. ही क्रिया जो पुरुष जाणतो तो स्वर्गादि लोकांचा अधिकारी होतो. ज्या ब्रह्म-प्रतिष्ठेचा उपयोग करून ह्या ओदनाचा पूर्वीच्या ज्ञात्या ऋषींनी आस्वाद घेतला त्याच प्रतिष्ठेचा उपयोग करून मी त्या ओदनाचा आस्वाद घेतला त्यामुळें मला स्वर्गाचा लाभ झाला.

ज्याचा महिमा मोठा आहे, असें हे ओदन, विश्वाची रचना करणाऱ्या, सूर्याच्या मंडलामध्यें प्रस्थापित झालेल्या शक्तीमध्ये सर्व-शक्तिमान असें मंडलरूप आहे. जो पुरुष या सूर्यमंडलांत स्थिर असलेल्या या ओदनाला जाणतो तो सूर्यलोकाचा अधिकारी होतो. प्रजापतीनें सूर्य-स्पर्शित, सूर्यमंडलस्थित ओदनाच्या साहाय्यानें आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य प्रजापति, वषट्कार आणि अन्य तेहतीस देवतांची उत्पत्ती केली आणि अन्य लोकांना देखील उत्पन्न केलें. या सर्वांना सुखाची प्राप्ती व्हावी म्हणून प्रजापतीनें यज्ञाची स्थापना केली. जो उपासक या सर्व क्रियांचा ज्ञाता आहे तो सर्वसाक्षी होतो. आपल्या शरीरामध्यें सतत गतिमान असणाऱ्या प्राणादि वायूंची गती तो थांबवू शकतो कारण अशा उपासकाच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी होतात. त्याच्या विरुद्ध आचरण होत नाहीं. परंतु जो या क्रिया जाणत नाही तो पशुपेक्षांही हीन होऊन त्याच्या संततीची हानी होऊन तो वृद्धावस्थेला पोहोचण्या-पूर्वीच त्याचे प्राण त्याच्या शरीराचा त्याग करतात.

### ४. प्राण (सचेतनता)

ज्याला सर्व वश आहेत, ज्याच्यामध्यें सर्व विश्व प्रतिष्ठित आहे आणि जो सर्वांचा स्वामी आहे अशा प्राणाला नमस्कार असो. हे प्राणा, तूं गर्जना करणारा, मेघांमध्यें विद्युत् रूपानें गर्जना करीत गतीनें जाणारा, प्रकाशमान आणि जल वर्षाव करणारा आहेस. तुला नमस्कार असो. विद्युत् गर्जनेच्या योगें प्राण ज्या वेळीं औषधी वनस्पतींना स्पर्श करतो

त्या वेळीं या वनस्पती औषधी गर्भ धारण करतात. वर्षा ऋतूच्या वेळीं ज्या वेळीं प्राण जलवर्षाव करीत गर्जना करतो तेव्हां सर्वांना आनंद होतो. पृथ्वीवरील सर्व प्राणिमात्र आनंदतात. प्राण ज्या वेळीं जलवर्षावानें विस्तृत अशा पृथ्वीला ओलीचिंब करतो त्या वेळीं गाई वगैरे सर्व पशु आनंदित होतात आणि आनंदित राहतात. जलवर्षावानें आनंदलेल्या औषधी वनस्पती त्या प्राणाला म्हणतात, हे प्राणा, समोर येऊन त्वरेनें परत जाणाऱ्या हे प्राणा, तुला वन्दन असो. तूं आम्हाला गंधवान करून चिरंजीव करतोस. तूं ज्या ठिकाणीं असशील त्या ठिकाणींच तूं आमचा नमस्कार स्वीकार. हे प्राणा, अपानत, पराचीन, प्रतीचीन या तुझ्या सर्व रूपांसहित सर्वत्र संचार करणाऱ्या तुला प्रणाम असो. हे प्राणा, हे शरीर तुला प्रिय आहे आणि शरीराला तूं प्रिय आहेस. तुझ्या प्रेमानें पुष्ट झालेल्या आणि अमरत्व प्रदान करणाऱ्या ज्या औषधी आहेत त्यांमधून जीवनाला अमृतत्व प्रदान करणारें सामर्थ्य तूं प्रदान कर. पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्रावर प्रेमाचें आवरण घालतो त्या प्रेमानें प्राण मनुष्याला झांकतो. जो सर्व जगातील वस्तूंना चलनवलन करावयास लावतो, स्थावर वस्तु प्राणहीन असूनही प्राण त्यांच्या गतीला कारणीभूत होतो, असा सर्व स्थावर जंगमात्मक संसाराचा स्वामी केवळ प्राण हाच आहे.

प्राण शरीरांतून निघून जाऊन मृत्यूला कारणीभूत होणारा, शरीराला वेदना निर्माण करणारा आणि ज्वरादि रोग उत्पन्न करणारा आहे. इंद्रियें या प्राणाची आराधना करतात. हा प्राण सत्याचरणी लोकांना सर्वश्रेष्ठ लोकांमध्यें प्रतिष्ठित करतो. प्राण हा विश्वाला व्यापून टाकणारा, विश्वाला पाहाणारा, सर्वांनी उपासना करण्यास योग्य, प्राण हेच चंद्र व सूर्य असून प्रजापति हा देखील प्राणच आहे. प्राण व अपान ह्या प्राण्याच्या वृत्ति असून अनड्वान् ही प्राणाचीच आवृत्ती आहे. स्रष्टयानें ज्या प्राणापानादि वृत्ति निर्माण केल्या त्या योगें प्राण आपलें कार्य करीत राहातो. व्रीहि हे देखील प्राणाचेच रूप आहे. शरीर धारण करणाऱ्या जीवांमध्यें स्त्रीच्या गर्भांत प्रवेश करून हा प्राणच प्राणापानादि व्यापार करीत राहातो. मातेनें खाल्लेल्या अन्नामुळें गर्भांत असणाऱ्या शिशूचें पालन करून त्याला पुष्ट बनविण्याचें कार्य हा प्राणच करतो.

नंतर हाच गर्भ पुण्य आणि पापाची फळें भोगण्यासाठीं या जगांत जन्म घेतो. मातरिश्वा नामक वायूला प्राण अशी संज्ञा आहे. या प्राणाच्या आश्रयानें भूतकालीन आणि भविष्यकालीन विश्वाचा विस्तार प्रतिष्ठित होतो. हे प्राणा जलवर्षावाच्या योगानें ज्या वेळीं तूं पृथ्वीला तृप्त करतोस त्या वेळीं अथर्व आणि अगदा वंशातील लोक आणि देवता यांनीं निर्माण केलेल्या औषधी वनस्पती उत्पन्न होतात. हा प्राण वर्षारूपानें पृथ्वीवर जलसिंचन करतो तेव्हां व्रीहि वगैरे धान्यें, लता आणि औषधी वनस्पती उत्पन्न होतात. हे प्राणा, ज्या विद्वान माणसामध्यें तूं प्रवेश करतोस, जो तुझा महिमा जाणतो त्याला सर्व देवता स्वर्गामध्यें सर्वश्रेष्ठ अमृतत्व प्रदान करतात. हे प्राणा, मनुष्य आणि देवता तुला उपयुक्त असें अन्न मिळवितात. त्याप्रमाणेंच तुझा महिमा जाणणाऱ्या विद्वान लोकांसाठी देखील ते अन्न मिळवोत. केवळ मनुष्यांमध्येंच नाही तर देवतांमध्यें सुद्धां प्राण गर्भरूपानें संचार करतो. त्याच्या प्राप्तीमुळें, भूत, वर्तमान आणि भविष्यात निर्माण होणाऱ्या वस्तूमध्यें पिता, पुत्रादि शक्तीच्या रूपानें प्रवेश करतात. शरीरांत व्याप्त असलेल्या प्राणाला हंस अशी संज्ञा आहे. तो पंचात्मक वृत्तीनें शरीरांत संचार करतो. तो प्राण या शरीरांतून निघून गेल्यावर शरीरांत अंधःकार होतो. हे शरीर अष्टधातूरूप चक्र असून प्राण हा त्या चक्राचा कणा आहे. या चक्राला अनेक आरे आहेत. अशा या रथरूपी शरीराच्या पूर्वभागांत आणि नंतर वरच्या भागांत तो प्राण व्याप्त होतो. त्याच्या अर्ध्या अंशानें प्राणिमात्रांची उत्पत्ती करतात आणि अर्ध्या अंशानें त्यांना शक्तिमान करतात. जो प्राण चराचर विश्वाचा अधिपती आहे तो शरीरधारी प्राण्यांमध्यें प्रतिष्ठित होतो. अशा सामर्थ्यसंपन्न प्राणा, तुला नमस्कार असो. प्राण हा संसाराचा अधिपति असून तो प्रमादशून्य आणि प्राणिमात्रांच्या व्यवहारांत चैतन्यमय होऊन राहातो. निद्रेमध्यें सर्व प्राणिमात्र पराधीन असतात. त्यांचें रक्षण प्राण करतो. प्राणि झोंपतात परंतु प्राण कधीही झोंपत नाहीं. हे प्राणा, तूं माझ्यापासून दूर जाऊ नकोस. माझें जीवन सफल व्हावे म्हणून मी तुला माझ्या शरीरांत कोंडलें आहे. वैश्वानर अग्नीला ज्याप्रमाणें मी या देहांत धारण करतो

त्या प्रमाणें तुलाही मी या देहांत धारण केलें आहे.

५. **ब्रह्मचर्यं** (ब्रह्मचारी जीवन)

स्वर्ग आणि पृथ्वीला आपल्या तपानें व्याप्त करणारा ब्रह्मचारी सर्व देवतांना सारखाच आवडतो. आपल्या तपानें तो आकाश आणि अंतरीक्ष यांचे पोषण करतो आणि आपल्या तपाच्या साहाय्यानें आपल्या गुरूंनादेखील समाधान प्रदान करतो. ब्रह्मचाऱ्याच्या रक्षणासाठीं त्याचे पितर, इंद्रादि देवता आणि विश्वावसु त्याच्या मागून जातात. तेहतीस देवतांच्या तीनशे तीन विभूती आणि सहा सहस्र अन्य देवता यांचें आपल्या तपानें हा ब्रह्मचारी पोषण करतो. उपनयन करणारा विद्यावान आचार्य, ब्रह्मचारी वटू आपल्या विद्यामय शरीरांत गर्भ रूपानें स्वत: प्रस्थापित करतो. तीन रात्रीपर्यंत तो विद्यागर्भ आपल्या उदरांत ठेवून चौथ्या दिवशीं तो त्याच्या समोर प्रकट होतो. पृथिवी ही पहिली आणि आकाश ही दुसरी समिधा आहे. पृथ्वी आणि आकाश यांच्यामध्यें असलेल्या अग्नीमध्यें या समिधांचें हवन करून ब्रह्मचारी संसारी विश्वाला संतुष्ट करतो. याप्रमाणें समिधांच्या योगें अग्नीला संतुष्ट करणें, दण्ड, मुंज नांवाच्या गवताच्या दोरीनें कटिबद्ध होणें, निवास मर्यादाचें पालन, इंद्रियनिग्रहात्मक होणाऱ्या दु:खाचा आणि खेदाचा त्याग करणें अशा आचारांचा अवलंब करून, पृथिव्यादि लोकांचे हा ब्रह्मचारी पोषण करतो. ब्रह्मचर्य ब्रह्माच्या पूर्वीच उत्पन्न झालें. त्या ब्रह्मचर्य-तपानें, ब्रह्मदेवाकडून वेदात्मक ब्रह्म प्रकट झालें. ब्रह्माच्या तेजानें ब्राह्मण आणि अग्नि आदि अमृतत्वानी समृद्ध देवता देखील प्रतिष्ठित झाल्या. सकाळीं आणि संध्याकाळीं अग्नीला अर्पण केलेल्या समिधांमुळें निर्माण झालेल्या तेजानें स्वत: तेजोवान झालेला ब्रह्मचारी भिक्षाचर्यादि नियमांचें पालन करतो. मृगचर्मधारी व श्मश्रुवंत ब्रह्मचारी शीघ्रतेनें पूर्व सागराकडून उत्तर सागरापर्यंत पोहोचतो आणि सर्व लोकांना आपल्या समोर पाहातो. या ब्रह्मचर्यातून ब्राह्मण जन्म पावले. हा ब्रह्मचारी गंगा वगैरे नद्या, स्वर्ग, प्रजापति, परमेष्ठी आणि विराट

रूपाची उत्पत्ती करतो. तो ब्रह्माचा तम– रज– सत्त्व गुणरूप प्रकृतीचा गर्भ होऊन सर्व प्राणिमात्रांना उत्पन्न करतो आणि इंद्र रूपानें राक्षसाचा नाश करतो. या विशाल आकाश आणि पृथ्वीच्या उत्पादकाचे देखील ब्रह्मचारी रक्षण करतो. सर्व देवता या ब्रह्मचाऱ्यावर नेहमी प्रसन्न राहतात. आकाश आणि पृथ्वीचा या ब्रह्मचाऱ्यानें प्रथम भिक्षा रूपानें स्वीकार केला. नंतर त्यांचे समिधारूपानें, अग्नीची उपासना करतांना हवन केलें. या विश्वातील सर्व प्राणी याच पृथ्वी आणि आकाशाच्या आश्रयानें राहातात. पृथ्वीमध्यें गुरूंच्या हृदयरूपी गुहेमध्यें ज्ञानरूपी फार मोठा निधी आहे. दुसरा एक निधी गुरूच्या मस्तकरूपी गुहेत आहे. आपल्या तपाच्या साहाय्यानें ब्रह्मचारी केवळ त्याचें रक्षण करतो असें नाहीं तर विद्वान ब्राह्मणांना शब्द आणि अर्थांच्या रूपानें वेदविद् करून या निधीचें रक्षण करतो आणि त्या वेदविद् ब्राह्मणांचें ब्रह्म करतो.

उदय न पावलेला सूर्यरूपी सूर्योदय अग्नि पृथ्वीच्या उदरांत राहतो आणि प्राकृतिक अग्नि पृथ्वीवर राहतो. सूर्योदय होतांच पृथ्वी आणि आकाश यांच्या मध्यें दोन्हीं अग्नींचा संयोग होतो. दोघांची किरणें एकरूप होऊन दृढ होतात आणि पृथ्वी व आकाश यांचा आश्रय घेतात. या दोन्ही अग्नींच्या साहाय्यानें संपन्न झालेला ब्रह्मचारी आपल्या तेजानें देवता होतो. वरुण मेघांमध्यें प्रवेश करून आपल्या वीर्यानें पृथ्वी संतुष्ट करतो परंतु ब्रह्मचारी आपल्या वीर्यानें उंच प्रदेश तृप्त करतो. त्यामुळें चारही दिशा संतृप्त होतात. (वीर्य स्खलन झाल्यास आपल्या इंद्रियानें ते पुन्हा आपल्या वीर्यग्रंथीपर्यंत शोषून घेणें ही क्रिया या ठिकाणीं संभवते. ही ऊर्ध्वरेत क्रिया होय.) ब्रह्मचारी पार्थिव अग्नीमध्यें सूर्य, चंद्र, वायू आणि जलरूपानें समिधा प्रदान करतो. त्या अग्नीचें तेज अंतरीक्षांत विविधरूपानें प्रत्ययाला येतें. ब्रह्मचाऱ्यानें समृद्ध केलेल्या अग्नीमुळें, वृष्टि, जल, घृत आणि प्रजा आपापली कामें करतात. मृत्यु, वरुण, सोम, औषधी, दुग्धादि पदार्थ, व्रीहि-यवादि धान्य आचार्यांच्या कृपेनें आपलेसे होतात किंवहुना तेच आचार्य होतात. आचार्य रूपानें वरुणानें जें जल आपल्या जवळ ठेवलें व जो वरुण प्रजापतीकडून ज्या फलाची अपेक्षा करतो ते फल सूर्यानें आचार्यांना दक्षिणारूपानें प्रदान केलें. ज्ञानाचा उपदेश

करणारे आचार्यच ब्रह्मचारी रूपानें प्रकट झाले. आपल्या तपाच्या महनीयतेनें ब्रह्मचारी प्रजापती झाला. या प्रजापतीपासून विराट् उद्भवलें आणि विराट् विश्वसृजक परमात्मा झालें. वेदांना ब्रह्म म्हणतात. वेदांच्या अध्ययनासाठीं ज्या कर्माचा आचार केला जातो त्याला ब्रह्माचार म्हणतात.

ब्रह्मचर्यामुळेंच ज्या गोष्टी होतात त्यांचा खुलासा खालील ऋचांमध्यें आहे.

ब्रह्मचर्येण तपसा राजा राष्ट्रं विरक्षति ।
आचार्यो ब्रह्मचर्येण ब्रह्मचारिणमिच्छते ।।
ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम् ।
अनड्वान् ब्रह्मचर्येणाश्वो घासं जिगीर्षति ।।
ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमपाघ्नत ।
इंद्रो ह ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्वराभरत् ।।
ओषधयो भूतभव्यमहोरात्रे वनस्पतिः ।
संवत्सरः सहर्तुभिस्ते जाता ब्रह्मचारिणः ।।

ब्रह्मचर्याच्या आचाररूपी तपानें (संयमी जीवन जगूनच) राजा राष्ट्राचें रक्षण करतो. ब्रह्मचारी आचार-संपन्न गुरु ब्रह्मचारी आचाराचें पालन करणाऱ्या शिष्याची इच्छा करतो. अविवाहित कन्या ब्रह्मचाऱ्यालाच आपला पती म्हणून स्वीकारते. वृषभ आणि अश्व ब्रह्मचर्यामुळेंच उत्तम अन्न भक्षण करतात. ब्रह्मचर्याच्या योगानेंच देवांनी मृत्यूला जिंकले. इंद्रानें याच तपाच्यायोगें देवांना स्वर्ग प्राप्त करून दिला. व्रीहि, यव, औषधी, वनस्पति, दिवस, रात्र, भूत, भविष्य, संवत्सर, ऋतु हे ब्रह्मचर्याच्या महानतेमुळेंच निर्माण झाले.

पृथ्वीवरील सर्व प्राणि, पशु, अरण्यें, गावें, पंख असणारे प्राणि व पंख नसणारे प्राणि ब्रह्मचर्याच्या प्रभावामुळेंच उत्पन्न झाले. प्रजापतीनें निर्माण केलेल्या सर्व देवता, मनुष्य आणि अन्य प्राणिमात्र यांचे पोषण ब्रह्मचर्याच्या प्रभावामुळेंच होतें. आचार्यांच्या मुखातून निघालेली आणि ब्रह्मचर्याच्या हृदयांत प्रस्थापित झालेली विद्या ब्रह्मचर्याच्या साहाय्यानेंच प्राण्यांचें रक्षण करण्यास समर्थ होते. सर्व देवता ब्रह्मचर्याला सामोऱ्या

येतात. तेजानें त्या संपन्न होतात. ब्राह्मणांचें सर्वश्रेष्ठ धन वेद आहे. त्यापेक्षां कोणी श्रेष्ठ नाहीं. ब्रह्मचारी या वेदात्मक ब्रह्माला धारण करतो. सर्व प्राण्यांना प्राणापानादिकांचे दान करून अमृतत्व प्रदान करतो. त्यानंतर व्यान नामक वायु, शब्दमय वाणी, भावरूप अंतःकरण, हृदय, वेदात्मक ब्रह्म व विद्यात्मक बुद्धी, यांना ब्रह्मचारी प्रकट करतो. हे ब्रह्मचारी, तूं आमच्यामध्यें संपन्न अशा, नेत्र, कान, नाक, यश, कीर्ति अन्न, वीर्य, रक्त, उदर यांची प्रस्थापना करून आम्ही ब्रह्मचर्यामध्यें लीन होऊन, स्नानादि कर्मांनीं पवित्र होऊन तेजसंपन्न होऊ असें कर.

## ६. पापमोचनम् (पापापासून मुक्तता)

आम्ही अग्नि, वनस्पति, औषधी लता, इंद्र, बृहस्पति, सूर्य, राजा वरुण, मित्र, विष्णु, विवस्वान्, देव-सविता, धाता, पूषन्, त्वष्टा, गंधर्व, अप्सरा, अश्विनीकुमार, ब्रह्मा, अर्यमा, दिवस, रात्र, चंद्र, सूर्य, विश्व, आदित्य, वायु, पर्जन्य, अंतरीक्ष, दिशा, यांची स्तुती करून त्यांना प्रार्थना केली की तुम्ही आम्हाला पापापासून मुक्त करा. त्याचप्रमाणें उषा, सोम, पृथ्वी, पशु, अरण्य, मृग, पक्षी आमची पापातून सुटका करोत. भव, शर्व, रुद्र, पशुपति, बाण, आमचें कल्याण करोत. दिवस, नक्षत्र, भूमी, यक्ष, पर्वत, समुद्र, नद्या, यांची आम्ही स्तुती करतो ते आमची पापातून मुक्तता करोत. सप्तर्षी, आपोदेवी, प्रजापति, पितर, यम, अंतरीक्ष, पृथ्वी, शक्र, श्रित, आदित्य, रुद्र, वसु, दिशापती, अथर्वा, अंगीरस, यज्ञ, यजमान, ऋचा, साम, औषध, यजुर्वेद होते यांची आम्ही स्तुती केली. आमचें पाप ते नाहीसे करोत. मूल, खोड, पान, पुष्प आणि फळ अशा पंच प्रकारांनीं समृद्ध असलेली सोमवल्ली, दर्भ, भंग, यव आणि सहदेवादि औषधींची आम्ही स्तुती केली. दान देण्यांत अडथळा आणणारे राक्षस, पिशाच्च, सर्प, पितर, मृत्यूची देवता, वसंतादि ऋतु, ऋतुपती देवता, वसु, रुद्र, आदित्य, ऋतू, मरुत्, प्रत्येक ऋतूमध्यें उत्पन्न होणारे पदार्थ, चंद्र संवत्सर, सौरसंवत्सर, चैत्रादि महिने यांची आम्ही स्तुती केली आहे. पापापासून आमची ते सर्व मुक्तता करोत. पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर दिशेमध्यें राहणाऱ्या

देवतांनों, तुम्ही आपापल्या दिशांतून शीघ्रतेनें या आणि पापापासून आमची मुक्तता करा. पत्नीसहित आम्ही विश्वेदेवाची स्तुती करून पापमुक्ती प्रार्थिली. भूत, भूतांचे स्वामी आणि भूतनियामक देवता एकत्रित येऊन आमचें पाप नाहीसें करोत. पांच दिशा, बारा मास, संवत्सर आम्हाला सुख प्रदान करोत. इंद्राचा सारथी मातली याला अमृतमय औषधीचे ज्ञान आहे. त्याचा स्वामी इंद्र यानें त्या औषधी जलांत बुडविल्या. हे उदका, तुमच्यामध्यें जो औषधी अंश आहे तो आम्हाला प्रदान करा.

**७. उच्छिष्ट ब्रह्मसूक्तम्** (ब्रह्म उच्छिष्ट आहे. त्याची ही स्थिती व स्तुती आहे)

(यज्ञ पूर्ण झाल्यावर जे अन्न शिल्लक राहातें तें खाण्यासाठीं उपयोगांत आणीत असत. यज्ञावशिष्ट अशा या अन्नास उच्छिष्ट असें म्हणतात. अन्न हें ब्रह्म आहे. म्हणून या यज्ञावशिष्ट अन्नाला उच्छिष्ट ब्रह्म अशी संज्ञा आहे. हे अन्न अत्यंत पवित्र आणि वेदमंत्रांच्या साहाय्याने सर्व-समृद्ध झालेलें असतें. त्या अन्नाच्या सेवनामध्यें असलेली गुणवत्ता दर्शित करणारें हे सूत्र आहे.)

या उच्छिष्टामध्यें सर्व लोकांचा वास आहे. स्वामी इंद्र आणि पृथ्वीचा स्वामी अग्नि या उच्छिष्टामध्यें समाविष्ट आहेत. सर्व विश्व यामध्यें सामावलें आहे. या उच्छिष्टामध्यें, आकाश, द्यौ, भूत, समुद्र, चंद्र, वायु, सत्, असत्, मृत्युदेवता, प्रजापति, लोकप्रजा वरुण, सोम, आणि अमृतत्व यांचा समावेश या उच्छिष्टान्नांत आहे. (या देवतांचें बल यामध्यें आहे असा अर्थ) सुन्दर देह धारण करणाऱ्या देवता स्थिर लोकांतील सर्व प्राणी, विश्वोत्पादक नवम आणि दशम ब्रह्म देखील याच्या आश्रयानें राहातें. वेदगान, ऋक्, यजुस् यांच्या मंत्रांचें पठण, इंद्राग्नीची स्तुती, पवमान सोम, साम–ऋचा, हे यज्ञाचा गर्भ आहे. तो या उच्छिष्टाच्या आश्रयानें राहातो. राजसूय, वाजपेय, अग्निष्टोम, अर्काध्वर, अश्वमेध हे सर्व या ब्रह्माचा स्पर्शानें समृद्ध होतात. अग्निहोत्र, श्रद्धा, वषट्कार, व्रत, तप, दक्षिणा आणि अभीष्ट या उच्छिष्टामध्यें समाविष्ट आहेत. एक किंवा दोन दिवस चालणारा सोमयाग वगैरे सूक्ष्म

यज्ञ सुद्धां याच ब्रह्माच्या आश्रयानें राहातात.

चार, पांच, सहा किंवा याच्या दुप्पट दिवस चालणारे सर्व यज्ञ अमृतमय फल प्रदान करणारे असले तरी ते ब्रह्माच्या आश्रयानेंच राहातात. प्रतिहार, निधन, विश्वजित, आर्तजित, अतिरात्र द्वादशाह हे सर्व यज्ञ यामध्येंच सामावलेले आहेत. सूनृता, संनति, क्षेत्र, स्वधा, ऊर्जा, अमृत, हे सर्व काम्य यज्ञ यजमानाला तृप्ति देणारे आहेत. नवखण्ड पृथ्वी, सात समुद्र, आकाश, सूर्य व यज्ञ या ब्रह्माचा स्पर्श झालेले आहेत. हे उच्छिष्ट ओदन संसाराचें पोषण करणारें, दिव्य देह प्रदान करणारे व दिव्यलोक देणारे आहे. हें ओदन, प्राणरूप, पौत्ररूप आणि अभीष्ट फल देणारें आहे. ऋत, सत्य,तप,राष्ट्र, श्रम, धर्म, कर्म, भूत, भविष्य, वीर्य, लक्ष्मी, समृद्धी, तेज, संवत्सर, ऊर्जा, इडा, प्रैष, ग्रह, हवि, वैश्वदेव, मास, ऋतु, आर्तव, घोप, जल, मेघ, आणि पृथ्वी या उच्छिष्ट ब्रह्माचा अंश आहेत. साखर, रेत, पाषाण, औषधी, लता, तृण, विद्युत्, सिद्धी, प्राप्ती, समाप्ति, व्याप्ति, तेज, आभिवृद्धि समृद्धी, प्राणव्यापार, दृष्टी, स्वर्गांतील देवता, पृथ्वीवरील देवता, ऋक्, साम, छन्द, पुराण व यजुर्वेद हे सर्व त्या उच्छिष्ट ब्रह्मांत समाविष्ट आहेत.

## ८. अध्यात्मम् (आत्म्याविषयक विवरण)

संकल्परूपी घरांतील कन्येचा, मन्यूनें जाया म्हणून स्वीकार केला. त्यावेळीं सृष्टीची रचना झालेली नव्हती. त्यामुळे वरपक्ष आणि वधूपक्ष कोण, वराकडील ज्येष्ठ लोक कोण हें माहित नव्हतें परंतु नंतर तप हा वर, कर्म ही वधू आणि ब्रह्मा वरज्येष्ठ झाला. यांच्यातून प्रथम दहा देवता निर्माण झाल्या. त्यांच्या रूपाची ओळख पटल्यानें त्या ब्रह्मोपदेशास पात्र झाल्या. त्यांना प्राणादि वृत्ति, नेत्र, कर्ण क्षिती, अक्षिती, वाणी, मन, इंद्रियें, आणि कामना यांनी पूर्णत्व लाभलें. यापूर्वी सृष्टी ऋतु, धाता, बृहस्पति, इंद्र, अग्नि, किंवा अश्विनीकुमारही उत्पन्न झालेले नव्हते. तप व कर्म ही साधनें होती. कर्मातून तप निर्माण झालें. त्यानेंच धाता वगैरे देवतांच्या उत्पत्तीकरतां प्रयत्न केले. या पृथ्वीच्या पूर्वीं गेल्या काळात जी पृथ्वी होती त्यामध्यें असणाऱ्या ऋषींनीं आपल्या

तपाच्या प्रभावानें, पृथ्वीवरील वस्तू जाणल्या होत्या. त्यांना वर्तमान कालीन पृथ्वीचें ज्ञान होतें. इंद्र, सोम, अग्नि, त्वष्टा, किंवा धाता कां उत्पन्न झाले. गत युगामध्यें ह्या देवता जशा होत्या तशाच या काळांतही निर्माण झाल्या. अग्नि वगैरे देवतांनीं आपल्या पुत्रांना स्थिर करून वर्तमान सृष्टी स्थिर केली. विधात्यानें केंस, अस्थि, स्नायु, मांस, मज्जा, निर्माण करून कोणत्या शरीरांत त्यांची स्थापना केली ? हे सर्व कोठून निष्पन्न झालें ? संसिच नामक देवता मरणशील देहाला रक्तानें भिजविते आणि आपण त्यांत पुरुष रूपानें प्रविष्ट होते. गुडघे, जघन, पाय, शिर, हात, मुख, पाठ, शिर, हात, मुख, जीभ, कंठ, अस्थि, कातडी, यांच्या उपयोग करून कर्मद्वारा मूर्ति निर्माण केली. सधात्री नामक देवतेच्या साहाय्यानें या सर्व अवयवांची जोडणी केली गेली. देहाला गौर आणि श्याम वर्ण दिला. या देहाच्या जवळ सर्व देवता राहण्याची इच्छा करतात. वधू बनलेल्या पहिल्या वधूनें सहा कोश निर्माण करून त्यांना वर्णात्मक रूप दिले. पुरुष देहाला आपलासा केलें. या देहांमध्यें स्वप्न, निद्रा, आळस, निर्ऋति, पाप यांनी प्रवेश केला. त्या बरोबर या देहांचे आयुष्य जीर्ण करणाऱ्या जरादिकांनीही त्यांत प्रवेश केला. चोरी, दुष्कृत्य, पाप, सत्य, यज्ञ, बल, धर्म, आणि ओज यानीही या देहांत प्रवेश केला. त्यांच्या पाठोपाठ समृद्धि, दारिद्र्य, शत्रु, मित्र, क्षुधा, पिपासा, निन्दा, स्तुती, हर्ष, दुःख, श्रद्धा, दक्षिणा, ज्ञान, अज्ञान, उपदेश, वेद, आनंद, मोद, प्रमोद, हास्य, शब्द, स्पर्श, विष, नर्तन, आलाप, आयोजन, प्रयोजन, प्राण, अपान, नेत्र, मन, वाणी, मनाच्या वृत्ति, जल, वीर्य, अस्थि, आणि त्यांच्या अधिष्ठात्या देवता यांनीं या देहामध्यें प्रवेश केला. इंद्र, विराट्, वगैरे देवता, पुत्र रूपानें प्रसविणारा जीव आणि अदृष्ट ब्रह्म यानीही या देहांत प्रवेश केला. सूर्यानें नेत्र, वायूनें नाक, यांचा स्वीकार केला. यामुळेच ज्ञानी पुरुष ह्या देहाच्या आत आणि बाहेर ब्रह्मच असल्याचा अनुभव घेतात. गाई ज्याप्रमाणें एका गोठ्यांत राहातात त्याप्रमाणें सर्व इंद्रिये आणि त्यांच्या देवता या शरीरांत एकत्र राहातात. या देहामध्यें नांदणारा आत्मा देहत्यागानंतर पुण्याच्या बलानें स्वर्गाला, पापानें नरकाला आणि पापपुण्य समानतेनें पृथ्वीवर स्थिर होतो.

या सर्वांना व्यापून नियंत्रण करणारा ईश्वर असून त्याला सूत्रात्मा असें म्हणतात.

### ९. शत्रुनिवारणम् (शत्रूचें निवारण करणें)

शस्त्र धारण करण्यास ज्यांचे हात समर्थ आहेत अशा हजारो वीरांच्या हातांमध्यें खड्ग, धनुष्य बाण किंवा परशु आहे. यांना पाहून शत्रुसैन्य भयभीत होईल. अनेक युद्धांत विजय प्राप्त करून देणाऱ्या देवतांनों या संग्रामांत देखील तुम्ही या. तुमच्यामुळें आमच्या वीरांना धीर येईल. अर्बुद आणि न्यर्बुद, तुम्ही दोघांनीं शत्रुसैन्याला वद्ध करा. (अर्बुद व न्यर्बुद या सर्पदेवता आहेत) तुमच्यामुळें हा सर्व संसार भरून गेला असून तुम्ही विश्वाला आणि भूमीलाही वांधून टाकले आहे. या दोन देवतांच्या वलानें आम्ही शत्रूवर हल्ला करून विजयी होऊं. तुम्ही आमच्या शत्रूला दंश करा आणि त्यांना ठार करा. शत्रूच्या स्त्रिया शोकाकुल होऊन आपले दागिनें काढून टाकतील. तुमच्या विषाच्या प्रभावानें स्त्रिया सुद्धां वेचैन होतील. विषाचा प्रतिकार करण्यास कोणी समर्थ नाहीं. तुमच्या दंशानें पिडलेल्या लोकांच्या मरणाची वाट पाहाणारे श्येन, कावळे, गिधाडे वगैरे पक्षी मांस भक्षणानें तृप्त होतात. सडलेल्या मांसावर तुटून पडणारे किडे शत्रूवर हल्ला करोत.

हे सर्व देवतांनों, तुमच्या दंशानें शत्रू हैराण होईल. त्याला कंप सुटेल आणि तो खाली कोसळेल. त्यामुळे त्याच्या अवयवांचे व्यापार थांवतील. त्यांचे हात शस्त्र धारण करण्यास समर्थ होणार नाहीत: त्यांचे अश्व, रथ आणि आयुधें नष्ट होतील. शत्रू नष्ट होतांच त्यांच्या स्त्रिया शोकानें रुदन करतील. हे सर्पदेवतांनों, शत्रूवर उल्कापात होवो. आपल्या मायेनें तुम्ही आमच्या शत्रूला पीडा करा. तुम्ही दोघे इंद्राचे मित्र आहांत. आमच्या शत्रूचा पराजय केलात म्हणजे आम्हाला विजय प्राप्त होईल. आमचा शत्रू जळून जावो. त्यांपैकी कोणीही शिल्लक न राहो.

शत्रूच्या देहापासून त्याचे अंतःकरण आणि प्राणवायू अलग होवोत. त्यांचे मुख भयामुळे सुकून जावो. मित्रा, शत्रूला पाठ दाखवून पळून जाणारा आणि कर्तव्यविमुख असा जो वीर आमच्या सैन्यांत असेल

त्याला हे देवतांनों, शत्रूच्या समोर न्या. इंद्र ज्या विविध प्रकारांनी आपला शत्रू नष्ट करतो त्या प्रकारांनीं त्यांना तुम्ही नष्ट करा. त्रिसंधि आणि अर्बुद नामक देवता आमच्या शत्रूला अनेक प्रकारांनी नष्ट करोत. वृक्ष, वृक्षापासून निर्माण झालेल्या वस्तू, जव, लता, गंध, अप्सरा.आणि अन्य पुरुष शत्रूला भयभीत करोत. हे शत्रू, मरुतगण तुम्हाला दण्ड करोत, इंद्राग्नि नियंत्रित करोत. ब्रह्मणस्पति, धाता, मित्र, प्रजापति, अथर्वा व अंगिरा तुम्हाला शासन करोत. हे देवगण, तुम्ही आमचे मित्र बनून शत्रूला शासन करा आणि ह्या युद्धांत आम्हाला विजय मिळवून देऊन आपल्या स्थानीं परत जा.

१०. **शत्रुनाशनम्** (शत्रूचा नाश करणें)

हे सेनापति, तुम्ही आपली ध्वजा उंच करा, कवच घाला आणि रणक्षेत्राकडे गमन करा. त्रिसंधि नामक वज्राची अभिमानी देवता शत्रूला दंड देण्यास तयार आहे. हे त्रिसंधि, आपल्या अरुणध्वजासह अंतरीक्ष, आकाश आणि पृथ्वीवर जे वीर त्यांना उत्थान दे. तुझ्या अंतः-करणांत जी वाईट इच्छा आहे, ती शत्रूकडे जावो. मांसभक्षक पक्षी आमच्या शत्रूकडे जावो. हे अग्ने, तूं आदित्याला झांकून टाक. त्रिसंधि देवतेची सेना मला साहाय्यभूत होवो. त्यामुळें आम्ही शत्रूवर विजय प्राप्त करू. हे अर्बुददेवते, आमची ही आहुती तुला तृप्त करो. तुझी सेनादेखील या आहुतीनें तृप्त होवो. त्यामुळें आमच्या शत्रूचा नाश होईल. ही चार पायांची गाय कृत्या होऊन आमच्या शत्रूच्या सैन्याचा नाश करो. मायेनें निर्माण केलेल्या धुरानें शत्रूच्या सैनिकांचे डोळे त्रस्त होवोत. नगाऱ्यांच्या घोषानें त्यांची श्रवणशक्ती नाहीशी होवो. त्रिसंधि देवता आपल्या ध्वजाचा रंग तांबडा करील तेव्हां शत्रूचे सैनिक रडू लागतील. शूलानें मरण पावलेल्या सैनिकांचे मांस भक्षण करण्यासाठी आकाशांत संचार करणारे पक्षी खालीं झेंप घेतील. कोल्हे आणि माशा त्यांच्यावर तुटून पडतील. गिधाडें आपल्या चोंचींनी आणि पायांनीं त्या मृतदेहांचे लचके तोडतील. हे बृहस्पते, इंद्र आणि ब्रह्मदेवाकडून तूं संधान विद्या ग्रहण केली आहेस त्यामुळे मी इंद्रादि देवांना युद्धार्थ बोलावीत

आहे. ते आम्हाला विजय प्राप्त करून देवोत. अंगिरापुत्र आणि बृहस्पती आपल्या मंत्राच्या तेजानें, राक्षसांचा नाश करणाऱ्या वज्राची धार वाढवितात.

त्रिसंधि देवतेनें, राक्षसांच्या उत्पादाचें निराकरण करून सूर्याचे रक्षण केलें. त्यामुळेच सूर्य आणि इंद्र स्वर्गामध्यें निर्भयपणें राहतात आणि त्रिसंधीची सेवा करतात. अंगिरापुत्र बृहस्पतीनें संहार अस्त्र निर्माण केलें. इंद्रादि देवांनी पृषदाज्य नामक यज्ञाच्या द्वारा राक्षसांचा संहार केला. जे वज्र अंगिरापुत्र बृहस्पतीनें आपल्या मंत्रप्रभावानें अधिक तेजोवान केलें त्यानें मी राक्षसांचा संहार करतो. हवीमुळें तृप्त झालेला इंद्र शत्रूवर विजय संपादन करून आमच्याकडे येत आहे. आमच्या हवीनें त्रिसंधि देवता तृप्त होवो. इंद्र शत्रूच्या सैन्याच्या हातांतील शस्त्र धारण करण्याचें सामर्थ्य नाहीसें करो. वायू शत्रूच्या बाणांना अन्यत्र घेऊन जावो. सूर्य त्या बाणांतील शक्ती नाहींशी करो आणि चंद्र आमच्याकडे येणारे मार्ग शत्रूच्या सैन्यापासून लपवून ठेवो. आमचे शत्रू मांसभक्षक दैत्यांचें भक्ष्य होवोत. हे त्रिसंधि, तूं आपल्या मायेनें शत्रूच्या समोर अंधःकार निर्माण कर. या शत्रूपैकीं एकही जिवंत राहाणार नाही असे कर. हे अर्बुद, तूं शत्रूसैन्याला भ्रम निर्माण कर. त्यांना आपल्या कर्तव्याचा विसर पडो आणि त्यांचा नाश होवो. कवचधारी, कवचहीन, रथी किंवा अरथी शत्रू मंत्रबंधनानें बांधला जाऊन नष्ट होवो. जो शत्रू आमच्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत आहे आमच्या बाणांनीं त्यांची शस्त्रे भेदून टाकली जावोत. वज्रासाठीं पृषदाज्य यज्ञ देवगण करतात. त्यामध्यें प्रदान केलेले हवि कधीं निष्फल होत नाहींत. या यज्ञद्वारा उत्पन्न झालेल्या वज्रानें देवाधिपति इंद्र शत्रूचा संहार करो.



# द्वादश काण्ड

## १. भूमिसूक्तम्

ब्रह्म, तप, सत्य, यज्ञ, दीक्षा आणि विपुल जल हे पृथ्वीचें वैभव आहे. झालेल्या आणि होणाऱ्या जीवांना आश्रय देणारी पृथ्वी आम्हालाही आश्रय देवो. या पृथ्वीमध्यें, उंच, सखल आणि सपाट भाग असून तिच्यावर अनेक औषधी, समुद्र, नद्या आणि विविध प्रकारचे जल आहे. शेतीच्या योगें निर्माण झालेल्या अन्नानें अनेक जीव संतुष्ट होतात. या कृषीच्या आश्रयानें अनेक जीवांचे संसार विकसित होतात. पूर्वींच्या लोकांनी या पृथ्वीच्या आश्रयानें अनेक कर्मे केली. देवांनीं याच पृथ्वीवर दैत्यांबरोबर युद्ध केलें. गाई, घोडे आणि पक्षी याच पृथ्वीच्या आश्रयानें राहातात. ही पृथ्वी धनगर्भा, संसारविकासी, सुवर्णधारिणी, विश्वाश्रया, आणि सर्वपोषक वैश्वानर अग्नि धारण करणारी आहे. या पृथ्वीचें रक्षण जागृत देवता करतात. ही पृथ्वी पूर्वी जलाश्रयानें राहात होती. विद्वान लोकांनी ती उत्पन्न झाल्यावर अनेक कार्ये केली. या पृथ्वीचें हृदय आकाश असून ती अमृतस्राविणी आहे. या पृथ्वीवर पाणी नद्यांच्या रूपानें प्रवाहित होते. तिच्या आश्रयानें दिवस आणि रात्र गतिमान झाले. या पृथ्वीला अश्विनीकुमारांनीं तयार केली. विष्णूनें पादाक्रांत केली. इंद्रानें या पृथ्वीच्या शत्रूला बलहीन केलें. अशी पृथ्वीमाता, माता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राला सर्वान्नसार असणारें दूध देऊन पोषण करते त्याप्रमाणें आम्हाला पुष्ट करो. आमच्या कामना सफल करो. आम्हाला

आपल्या स्थानीं प्रतिष्ठित करो. सर्व ऐश्वर्य, तेज, धन, सामर्थ्य आणि सत्ता प्रदान करो.

हे पृथ्वी, तुझ्या आश्रयानें राहणारे पर्वत, हिमप्रदेश, आणि अरण्यें आम्हाला सुखप्रद होवोत. या विविधवर्णा, इंद्रगुप्ता पृथ्वीवर आम्हाला क्षयरहित व पराजयरहित राहू दे. हे पृथ्वी, तुझ्या मध्यभागात जीवांच्या शरीराला पुष्ट करणारे जें पदार्थ उत्पन्न होतात त्यांचा मला लाभ होवो. हे पृथ्वी तूं माझी माता असून मेघ हा पिता आहे. ते मला तृप्त करोत. पृथ्वीवर निर्माण केलेल्या यज्ञदेवींच्या साहाय्यानें अनेक कर्मांचा आश्रय असलेला यज्ञ करून हवनीय द्रव्य अर्पण केल्यानें तृप्त झालेली पृथ्वी आमची उन्नती करो. हे पृथ्वी, आमचा जो शत्रू सैन्य एकत्र करून आमच्या नाशाची इच्छा करतो त्या शत्रूला तूं नष्ट कर. तुझ्या आश्रयानें जन्म घेणारे, तुझ्यावर संचार करणारे मानव, पशु आणि पक्षी त्यांचें तूंच पोषण करतेस. सूर्य आपल्या किरणांनी प्राणिमात्रांना जीवनाला आवश्यक असणाऱ्या वस्तूंचें प्रदान करतो. हा सूर्य आमची प्रजा प्रवृद्ध करो. हे पृथ्वी, तूं औषधी उत्पन्न करणारी, संसार सजविणारी ऐश्वर्य-रूपा, धर्मरूपा, कल्याणमयी, निवासप्रदायिनी, इंद्राश्रिता, वेगवती, कंपन-संपन्ना आणि प्रियरूपा आहेस. तूं आमचे सर्व दोष दूर कर. जल अग्नि धारण करणारें आहे. पृथ्वी, पुरुष, गाई, अश्व आणि अन्य पशू यांमध्यें अग्नि प्रतिष्ठित आहे. स्वर्गांत व अंतरीक्षांत निवास करणारे देव आणि मरणाधीन लोक हव्यवाहक अग्नीला प्रदीप्त करतात.

धुरामध्यें अग्नीचा वास आहे. या धूमाचें ज्ञान असणारी पृथ्वी आमचें रक्षण करो. या सुशोभित पृथ्वीवर यज्ञामध्यें देवतांसाठीं हवि प्रदान केला जातो. मरणधर्मी प्राणि अन्न आणि पाण्याच्या साहाय्यानें आपलें जीवन व्यतीत करतात. ही पृथ्वी आम्हाला प्राणादि वायु आमच्या वृद्धावस्थेपर्यंत प्रदान करो. पृथ्वीच्या गंधानें औषधी आणि पाणी सुगंधित केलें. याचा उपभोग घेऊन संचार करणारे गंधर्व आणि अप्सरा आम्हालाही गंध प्रदान करोत. माझा कोणीही शत्रू न होवो. हे पृथ्वी, तुझा जो गंध कमळामध्यें असून, सूर्यपुत्री सूर्याच्या विवाहसमयीं मरणाधीन मानवानीं धारण केला होता त्या गंधानें मला सुगंधित कर.

तुझा जो गंध स्त्री, पुरुष, अश्व, मृग, हत्ती यांमध्यें आहे या गंधानें तूं मला संपन्न कर. विशाल दगड, माती आणि धूळ यांना धारण करणाऱ्या विशालरक्षा पृथ्वीला माझा नमस्कार असो. या पृथ्वीवर निर्माण होणारे वृक्ष औषधी रूपानें सर्वांची सेवा करतात. या धर्माश्रिता पृथ्वीची आम्ही स्तुती करतो. तूं पोषक अन्न आणि वल प्रदान करणारी आहेस. तुला आम्ही घृताहुती अर्पण करतो. पवित्र जलाचें आमच्यावर सिंचन होवो. त्यामुळें आमचा देह पवित्र होईल.

हे पृथ्वी, तूं माझ्या चारही वाजूला उभी राहून मला चारहीं दिशांमध्यें संचार करण्याचें वल प्रदान कर. हिंसक लोकांच्या हातीं मी पडणार नाहीं, माझी हिंसा होणार नाहीं आणि माझें सर्वत्र मंगल होईल असें कर. सूर्याच्या समोर असलेल्या तुझें दर्शन जोपर्यंत मला घडतें आहे तोपर्यंत माझी दृष्टी चांगली राहो. तुझ्या पृष्ठभागावर शयन केल्यावर माझी हिंसा न होवो. तुझ्यामुळें होणारे सहा ऋतु, दिवस, रात्र आणि संवत्सर आम्हाला शुभ फल देवोत. जी पृथ्वी सर्पाच्या हिंसक नादानें कंपित होते, विद्युत् रूपानें अग्नि जिच्या उदरांत राहातों, जिनें वृत्रासुराचा त्याग करून इंद्राचा स्वीकार केला, देवांना त्रास देणाऱ्यांना जी फलदायिनी होत नाहीं, जी वीर्यवान पुरुषांची स्वामिनी आहे, जिच्यावर यज्ञ केले जातात, जिच्यावर यज्ञस्तंभ उभारले जातात, जिच्यावर ऋग्वेदादि मंत्रांच्या साह्यानें देवादिकांना संतुष्ट केलें जातें, इंद्राला सोम प्राप्त होतो, जिच्यावर स्थिर राहून पूर्वीच्या सात ऋषीनीं, ब्रह्मयोग आणि स्तुतिरूप वाणीनें देवांना संतुष्ट केलें ती पृथ्वी इंद्राला आमच्या अग्रणी करून आमचें परम मंगल करो.

ज्या पृथ्वीवर मनुष्य नाचतात, गातात, युद्ध करतात, आक्रोश करतात, रडतात, दुंदुभी वाजवतात, जिच्यामध्यें धान्य निर्माण केलें जातें, वर्षावानें मेघ जिला तृप्त करतात त्या पृथ्वीला माझा नमस्कार असो. देवतांनी निर्माण केलेले पशु जिच्यावर क्रीडा करतात, जिच्या सर्व दिशा प्रजापतीनें मंगलमय केल्या आहेत, जी अनेक प्रकारचे द्रव्यनिधी धारण करते, प्राणिमात्रांना अन्न प्रदान करते ती पृथ्वी आम्हाला

सुवर्णादि धन देऊन आमच्यावर प्रसन्न राहो. अनेक धर्म धारण करणारी पृथ्वी, आम्हाला गोधन प्रदान करो. या पृथ्वीवर राहाणारे, आपल्या दंशाने त्रास देणारे, हेमंत ऋतूमध्यें शयन करून, वर्षा ऋतूमध्यें प्रसन्नतेनें संचार करणारे विंचू वगैरे विषदंशक प्राणी आमच्या जवळ न येवोत. केवळ कल्याणकारी जीवांचेंच मला साहाय्य मिळावें. मनुष्य आणि रथादि वाहनें ज्या मार्गावरून जातात त्या मार्गावरून पुण्यवान, पापी, आणि चौरकर्म करणारेही चालतात. तो मार्ग आम्हाला कल्याणप्रद होवो. हे पृथ्वी, तुझ्यावर संचार करणाऱ्या हिंस्र पशु, राक्षस, पिशाच्च, गंधर्व, आसरा वगैरे सर्वांना आमच्यापासून दूर ठेव.

ज्या पृथ्वीवर हंस, कावळे, गिधाडे वगैरे पक्षी राहतात, वायू जिच्यावरची धूळ उडवतो, वृक्षांना हलवतो. आपल्या तीव्रतेनें अग्नीला साथ करतो, जिच्यावर अंधार आणि प्रकाशमय दिवस वावरतात, वर्षा ज्या पृथ्वीला पाण्यानें भिजवते, ती पृथ्वी आमचें प्रसन्नतेनें पालन करो. आकाश, पृथ्वी, अंतरीक्ष, अग्नि, सूर्य, जल आणि मेघ वगैरेंनी मला गतिमान केलें आहे. शत्रूचा तिरस्कार वाटणारा मी या पृथ्वीवर शत्रूचा पराभव करतो. प्रत्येक दिशेकडे असणाऱ्या शत्रूला मी वश करतो. हे पृथ्वी, तूं विस्तृत आहेस. देवतांनी तुला विस्तृत होण्यासाठीं सांगितलें होतें. तुझ्यामध्यें ज्यावेळीं या भूतमात्रांनी प्रवेश केला तेव्हां तूं चार दिशांइतकी मोठी झालीस. हे पृथ्वी, तुझ्यावर गांव वसले आहेत. जंगले आहेत, युद्ध-भूमी आहे. आमचें तुला वन्दन आहे. पृथ्वीवर निर्माण होणारे पदार्थ पृथ्वीवरच राहातात. आपल्या गतीनें ती धूळ उडवते. वनस्पती आणि औषधी यांच्या योगे लोकांना निर्भय करून त्यांचे पोषण करते. मी ज्याला कांहीं देईन तो माझा मित्र होईल. मी यशस्वी, गतिमान व अन्यांचें रक्षण करणारा आहे. जो मला भीति निर्माण करील त्याचा मी संहार करीन. ही पृथ्वी मला सुख, शांति, अन्न, दूध आणि अन्य साररूप पदार्थ देणारी गाय आहे. राक्षसांनी ग्रासलेल्या पृथ्वीला हविर्दानानें सुरक्षित करण्याची विश्वकर्म्यानें इच्छा प्रदर्शित केली. पृथ्वीतील अन्नाचा उपभोग घेतांना ते अन्न प्रदर्शित होतें. हे पृथ्वी, तूं सर्व कामनापूरक, विश्वाचें क्रीडास्थान, यक्ष्मरोग

रहित, दीर्घायुषी आणि हविग्राहक आहेस. हे पृथ्वी, तूं माझ्यामध्यें मंगलता, लक्ष्मी आणि सुख प्रतिष्ठित कर. तूं आम्हाला ऐश्वर्य आणि श्रेष्ठ विभूतींच्या सान्निध्यांत ठेवून स्वर्गाचा लाभ करून दे.

## २ अग्नि (अग्नि)

हे क्रव्याद अग्ने, तूं या बंधनावर मात कर. मनुष्यें आणि गवादि पशूंमध्ये जो राजयक्ष्मा रोग आहे तो दूर जावो. तूं आपल्या भाग्यानें प्रसिद्ध हो. पाप आणि दुष्ट भावना यांचा नाश करणारा अग्नि असुरांपासून यक्ष्मा रोगाला दूर करतो. मृत्यूला देखील मी दूर करतो. मी पापदेवतेला बाजूला करतो. हे अग्ने, आमच्या शत्रूला आम्ही तुझ्याकडे पाठवतो तूं त्याला खाऊन टाक. अग्नि किंवा व्याघ्र यांनी आमच्या गोठ्यांत प्रवेश केला तर मी त्याला दूर करतो. तो जलनिवासी अग्नीकडे जावो. पुरुषाचा घात करणाऱ्या क्रोधित प्राण्यांनीं हे अग्ने तुला, प्रदीप्त केलें. वसु, ब्रह्मणस्पति, ब्रह्मा, रुद्र, सूर्य आणि वसुनीति यांनी तुला शतवर्षांचें जीवन प्राप्त व्हावें म्हणून पुन्हा प्रदीप्त केलें. अन्य अग्नीच्या रूपांना पाहाण्यासाठीं क्रव्याद अग्नि आमच्या घरांत आला तर पितृयज्ञ करण्यासाठीं मी त्याला दूर करीन. तो आकाशांत राहून धर्माची वृद्धि करो. हा क्रव्याद अग्नि, पापासहित यमाकडे जावो. जातवेद अग्नि या ठिकाणीं प्रतिष्ठित होऊन देवतांना दिलेले हवि घेऊन जावो. मी मंत्ररूपी वज्रानें ह्या क्रव्याद अग्नीला दूर करतो. गार्हपत्य नामक अग्नीच्या योगें या अग्नीला शासन करतो. हा पितरांना सहाय्यक होणारा क्रव्याद अग्नि या लोकीं स्थिर होवो. पितृदान मार्गानें तो पुढें जावो. पितरांना प्रवृद्ध करो आणि त्या ठिकाणीं जागृत राहो. हा अग्नि देवयान मार्गानें पुन्हा या लोकी न येवो.

यवभक्षक अग्नीला प्रदीप्त करून आणि पापाला जाळून अग्नि शुद्ध होतो. यवभक्षक अग्नि स्वतः पापापासून मुक्त होतो आणि अमंगलत्वापासून आमचें रक्षण करतो. तो आमची पापें शोधून नाहीशी करतो त्यामुळें आम्ही शुद्ध होतो. हा अग्नि आम्हाला दीर्घायुषी करो. शंकसुक विकसुक, निऋथ आणि निस्वर हे अग्नि यक्ष्माच्या बरोबर दूर निघून

गेले. त्यावेळीं तें नाश पावले. आमचे अश्व, गाई, वकऱ्या वगैरे पशु आणि पुत्र-पौत्रादिकांमध्ये प्रवेश करणाऱ्या क्रव्याद अग्नीला आम्ही दूर घालवतो. कारण तो अग्नि आमचा जीवनक्रम विघडवतो. हे अग्ने, आम्ही तुला मंत्राच्या साहाय्यानें दूर करतो. हे अग्ने, ज्या योगें देवता आणि मनुष्य पवित्र होतात त्या योगें तूं पवित्र होऊन स्वर्गांत आरोहण कर. हे गार्हपत्य अग्ने, तूं आमचा त्याग करूं नकोस. तूं उत्तम प्रकारें प्रदीप्त हो. तुझ्यामध्यें आम्ही आहुती देतो. सूर्य असेपर्यंत तुझें दर्शन आम्हाला सतत होवो. मनुष्यांच्या मस्तकांतील व पशु वगैरे मध्यें असणारा रोग नाहीसा करून तूं त्याला शुद्ध करून स्वतःदेखील शुद्ध हो.

हे मृत्यो, या ठिकाणीं आमचे पुत्रादिक वीर राहातात. तूं देवयान मार्गाच्या व्यक्तिरिक्त अन्य मार्गानें जा. मृत्यूपासून संरक्षण करण्याचें सामर्थ्य या प्राण्यांमध्यें आहे. आम्ही व आमचे वीर संपन्न होऊन नृत्य गायनांत दंग झालो. यज्ञाची प्रशंसा करून देवतांसाठी अग्नीला आहुती देणें खरोखरीच कल्याणकारक झालें आहे. हे मनुष्यांनों, दगडाच्या आघातापासून निर्माण होणाऱ्या मृत्यूला तुम्ही बाजूला करून संरक्षित व्हा. मी तुम्हाला हे मंत्रकवच देतो. त्यानें तुम्ही संरक्षित व्हाल आणि शतवर्षाचें आयुष्य उपभोगाल. तुम्ही वृद्धावस्थेपर्यंत जिवंत राहाल. तुम्ही उत्तम जन्म प्राप्त होणारे आणि समान होम करणारे आहांत. तुम्हाला त्वष्टा दीर्घायुष्य प्रदान करो. एका दिवसाच्या पाठोपाठ ज्याप्रमाणें दुसरा दिवस आणि एका ऋतूच्या मागें दुसरा ऋतु येतो किंवा जुन्याच्या त्यागाबरोबर नवीनता प्राप्त होते त्याप्रमाणें जुन्यानंतर नवीन आयुष्य प्राप्त होवो. हे मित्रांनों हें पाणी पाषाणांनी भरलेल्या नदीच्या पात्रांतून वाहात आहे. यामध्यें तुम्ही तुमचे पाप सोडून देऊन या. नदीच्या पैल-तीरीं या नदीचा प्रवाह आम्हाला सुखद आणि कल्याणप्रद होवो. हे पवित्र अग्ने, आम्हाला शुद्धता प्रदान करणाऱ्या देवतांची आम्ही स्तुती करतो. ऋग्वेदमंत्राच्या साहाय्यानें आम्ही पाप नाहीसें करून शत हेमंत ऋतूंपर्यंत पुत्रपुत्रादिकांसहित आनंदानें राहूं. परलोकी जाण्यामध्यें उत्त-रायणमार्गानें वायूच्या साहाय्यानें जाणाऱ्या ऋषींनीं मनुष्यांना मागें टाकलें, मृत्यूलाही त्यांनीं मागें टाकलें. मृत्यूचें लक्ष दुसरीकडे वेधणारे

ऋषी पूर्णायुषी आणि मृत्यूला मागें टाकणारे आहेत. यज्ञाची लोक स्तुती करतात आणि जीवन प्राप्त करतात.

या ठिकाणच्या स्त्रिया आपल्या पतीसमवेत दीर्घकाळ राहोत. त्यांना वैधव्य प्राप्त न होवो. त्या दुःखाश्रु-रहित आणि घृतान्नानें संपन्न होवोत. या स्त्रिया अलंकार धारण करणाऱ्या आणि संतानासाठी पुरुष-युक्त राहोत. या दोघांना मी मंत्राच्या साहाय्याने सामर्थ्यवान आणि दीर्घायुषी करतो. आमच्या हृदयांत कधीही नष्ट न होणारें फल प्रदान करणारा अग्नि वास करतो. तो आमचा द्वेष न करो आणि आमच्या मनांत सुद्धां त्याच्याबद्दल द्वेष निर्माण न होवो. हे प्राण्यांनों, गार्हपात्य अग्नीपासून दूर जाऊन क्रव्याद अग्नीकडे दक्षिणेंस जा आणि पितरांना प्रिय वाटणारी कर्मे करा. जो पुरुष क्रव्याद अग्नीचा त्याग करीत नाहीं तो आपले पुत्र, धन, कृषि, सेवनीय वस्तु यांच्यासह नष्ट होतो. त्याचें तेज नष्ट होतें आणि तो यज्ञाचा अधिकारी राहात नाहीं. देवता त्याच्या आवाहनाला साथ देऊन त्याच्याकडे येत नाहींत. त्याचें ऐश्वर्य नष्ट होतें. क्रव्याद अग्नि त्याला ताप देतो, व्यथा निर्माण करतो आणि नित्यावश्यक वस्तूंसाठींदेखील तो याचक बनतो. त्यांचें घर त्यालाच कारागृह वाटूं लागतें. स्त्री असेल तर तिला हा क्रव्याद अग्नि वैधव्य देतो. अशा प्रसंगीं अनुभवी विद्वानाचा आदेश मानला पाहिजे तरच शवभक्षक अग्नीच्या स्पर्शानें निर्माण झालेल्या दोषापासून पाणी आम्हाला मुक्त करील.

हें पाणी दक्षिणेपासून उत्तरेपर्यंत पसरतें आणि वर्षारूपानें पर्वता-वरून नदी म्हणून वाहातें. हे गार्हपत्य अग्ने, क्रव्यादापासून पुरुषाला तूं दूर कर आणि देवपूजनादी सामग्री वाहून ने. त्या पुरुषाने क्रव्यादाग्नीला नष्ट केलें आणि तो त्याच्या मागून गेला. हे दोघेही व्याघ्राप्रमाणें आहेत. कल्याण मार्गाच्या आड येणाऱ्या ह्या क्रव्याद अग्नीला मी बाजूला करतो. गार्हपत्याग्नि देवतांसाठी अन्तर्धि आणि मनुष्यांसाठी परिधी रूपानें नांदतो. हे अग्ने, प्राणिमात्रांचें आयुष्य तूं वाढव. आमच्या मृतात्म्यांना पितृलोकाला ने. आमच्या शत्रूला जाळून टाक. उपेला आमच्यामध्यें प्रति-

ष्ठित कर. शत्रूचे धन आणि बल हिरावून घेऊन आम्हाला दे. हे प्राण्यांनों, या ऐश्वर्यवान अग्नीचें स्तवन करा. तो तुम्हाला पापमुक्त करतो. त्याच्या कृपेने रुद्राचे तीक्ष्ण बाण आम्हाला लागणार नाहींत. हवि रूप भार वाहणाऱ्या या नौकारूप अग्नीचें तुम्ही स्तवन करा. हे अग्ने, दिवस आणि रात्र तुझ्याच आश्रयानें राहतात. पुत्रपौत्रादि संपत्तीच्या रूपानें लोकांना तूं सधन करतोस. तू आमच्या आराधनेनें संतृप्त होऊन प्रदीर्घ काळपर्यंत प्रदीप्त राहा. घोडा ज्याप्रमाणें गवत एकत्र करतो त्याप्रमाणें क्रव्याद अग्नीला जो जवळ करतो तो आपल्या पायानें आपलेंच जीवित आणि यज्ञादि क्रिया नष्ट करतो.

धनाच्या आशेनें जो क्रव्याद अग्नीची सेवा करतो तो पुरुष सदैव अन्य लोकांचे द्रव्यघट घेतो. ज्या पुरुषाच्या जवळ येऊन क्रव्यादि अग्नि प्रदीप्त होतो तो वारंवार जन्म-मरणादि चक्रांत सांपडून अधोगतीला जातो. हे क्रव्याद अग्ने, काळी भेड, शिसे, चंद्र हे तुझे भाग आहेत असे ज्ञानी लोक म्हणतात. दळलेले उडीद तुझें हवनद्रव्य आहे. म्हणून तूं घोर जंगलांत प्रयाण कर. जुने लांकूड इंधन म्हणून इंद्रानें निर्माण केलें आणि यमापासून या अग्नीला त्यानें दूर केलें. गार्हपत्याग्नि सूर्याला शरण गेला आणि देवयान मार्गावर प्रतिष्ठा पावला. त्यानें यजमानाला दीर्घायुष्य प्रदान केलें.

## ३ स्वर्गौदन (स्वर्गाचे सौंदर्य जीवन ओदन)

हे वीर पुरुषा, तूं आपल्या प्रिय बांधवाना बोलाव आणि या चर्मावर उभा राहा. तुम्हाला एकच प्रकारचें फळ प्राप्त होईल. तुम्ही पक्व ओदनाच्या साहाय्याने स्वर्गामध्यें जाल. स्वर्गांत अग्नि तुमच्या शरीराचें रक्षण करील. तुम्हाला प्राप्त होणाऱ्या पुत्राला अग्नीप्रमाणें तेज प्राप्त होईल, तो दर्शनीय होईल आणि यज्ञ त्याला साथ देईल. या स्वर्गौदनामुळें तुम्ही दोघे (पति-पत्नी) या ठिकाणीं आणि स्वर्गांत देखील बरोबर राहा. कारण या यज्ञामुळें तुम्हाला पावित्र्य प्राप्त झालें आहे. ज्या कार्यरूपी जलाचें तुम्ही सिंचन केलेंत त्या कार्यातून फल निर्माण झालें. वीर्यरूपी जलाचा तूं पुत्र असून धन्य जीवनाचें श्रेय तुम्हाला लाभलें

आहे. तुम्हाला उत्पन्न करणाऱ्या पाण्यापासून हे ओदन पक्व झालें आहे. या जलांतील अमृतमय अंश तुम्ही सेवन करा. या ओदनाने शब्दजन्य, वाणीजन्य आणि इतर पापें नाहीशी होतात. या ओदनाची महती स्वर्गापर्यंत गेली आहे. हे पति-पत्नींनो, आकाश आणि पृथ्वीवर तुमचा यजमान म्हणून जो अधिकार आहे त्यामुळें मधुमय व प्रकाशपूर्ण लोकामध्यें तुम्ही तुमच्या संततीसह वृद्धत्वापर्यंत जिवंत राहा. श्रद्धावान लोकांनाच स्वर्गाची प्राप्ती होते. तुम्हीं अग्नीमध्यें ठेवलेल्या ओदनाचे रक्षण करा. दक्षिण दिशेच्या बाजूनें तुम्ही प्रदक्षिणा करा. त्यामुळें यमराज तुम्हांला तुमच्या पितरांशी सहमत होऊन अनेक प्रकारचें कल्याण प्रदान करील. पश्चिमेला तुम्ही जा. त्या दिशेचा सुखप्रदान करणारा स्वामी चंद्र आहे. तुम्ही हे ओदन पश्चिम दिशेला अर्पण करून कल्याणरूपी फलाचे स्वामी व्हा. या पात्रतेमुळें तुम्हाला पृथ्वी आणि स्वर्ग या दोन्ही ठिकाणची ऐश्वर्यें प्राप्त होतील. उत्तर दिशा प्रजेनें युक्त आहे. ती श्रेष्ठता प्रदान करते. पंक्ती नांवाचा छंद या ओदनामुळें प्रकट होतो त्याप्रमाणें आम्ही पृथ्वी आणि स्वर्गामध्यें आपल्या सर्वांगासहित प्रकट होतो.

ही पृथ्वी, विराट् आणि श्रेष्ठ आहे. ती आम्हाला सुख प्रदान करते. आमच्या पुत्रांचे कल्याण करते. रक्षकाप्रमाणें रक्षण करते. पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राला जवळ घेतो त्याप्रमाणें तूं हे ओदन जवळ कर. या ठिकाणी मंगलता प्रवाहित होत आहे. तूं या ओदनाला तप्त कर. कावळ्यानें कपटानें याला स्पर्श केला असेल अगर एखाद्या दासीनें ओल्या हातांनीं मुसळ आणि उखळ यांना स्पर्श केला असेल तर तें जल मंगलमय होवो. हा पाषाण हविधारक आहे. तो पवित्र होऊन राक्षसांना नष्ट करतो. हे ओदना, तूं आमच्या पुत्र-पौत्रांना पापमुक्त कर. राक्षस आणि पिशाच्च यांना अडथळा करणारी औषधी आम्हाला प्राप्त झाली आहे. या धान्यामध्यें जो पातळ रस आहे तो पशुसमान लोकांनीं ग्रहण केला आहे. तेहतीस देवतांनाही तो आवडतो. रसपूर्ण असलेलें हें ओदन आम्हाला स्वर्गाला नेवो. आम्ही तुझ्यामुळें स्वर्गात पदार्पण करूं. पापदेवता निर्ऋति आणि अन्य शत्रूंना वश करून आमच्यासाठीं स्वर्गांत जातोस त्यावेळीं मी तुझा हात धरतो. हे वनस्पति पापामुळें

निर्माण झालेला शोक रूपी अंधःकार दूर करून तूं मधुर नाद करतेस. आम्ही पापमुक्त होतो. ह्या वनस्पतींचा पालक माझी आणि मला देव-मार्गाची प्राप्ति करून देणाऱ्या ओदनांतील तांदळाची हिंसा न करो. हे ओदना तूं परलोकांतही आमच्या बरोबर राहा. वर्षा ऋतूमध्यें प्रवृद्ध होणारे तांदूळ सुपाचा आश्रय करतांच सूप त्यांतील कोंडा दूर करतें. त्यामुळें तांदूळ त्याचे ओदन सर्वांना आवडते. आकाश, अंतरीक्ष आणि पृथ्वी तिन्ही लोक श्रेष्ठांना प्राप्त होतात. हे दंपती तुम्ही तांदूळ स्वच्छ केलेत तर तुम्हाला देखील सूपभर सुख प्राप्त होईल.

पशु विभिन्न असतात परंतु हे तांदुळानों तुमचें रूप मात्र एकच आहे. पाषाणाच्या साह्यानें तुम्ही तुमच्या बरोबर असलेल्या कोंड्याचा त्याग करतां. हे मुसळा तूं पृथ्वीपासून जन्म घेतला आहेस. हे तांदळांनों मुसळाच्या योगें तुम्हाला जी पीडा होते ती तुषाच्या त्यागानें नाहीशी होईल. मी तुम्हाला मंत्राच्या पठणानें अग्नीला अर्पण करतो. माता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राला प्राप्त करते त्याप्रमाणें पृथ्वी तुम्हाला जवळ करते. वेदीच्या भोंवती थाळी आहे. घृतयुक्त असलेले तुम्ही या यज्ञाचें एक आयुध आहांत. अग्नि तुम्हाला शिजवतो आणि रक्षण करतो. पूर्वे-कडून इंद्र, दक्षिणेकडून मरूतगण्, पश्चिमेकडून वरुण आणि उत्तर दिशेकडून सोम तुझें रक्षण करतात. पुण्य कर्मानें जल शुद्ध होऊन मेघांच्या माध्यमांतून ते द्युलोकांत प्रवेशतें आणि नंतर पृथ्वीवरील लोकांना तृप्त करते. द्युलोकांतून आलेलें हें पाणी पृथ्वीची सेवा करतें आणि पुन्हा अंतरीक्षांत जाऊन स्थिर होतें. हें पवित्र जल आम्हाला शुद्ध करून स्वर्ग प्राप्त करून देवो. या जलाचा रंग पांढरा असून चव अमृतासारखी आहे. हे उदका या दंपतीनें तुला ओदनाच्या साहाय्यासाठीं दिलें आहें. तूं ते ओदन चांगलें पक्व कर. प्राणादि वायूंच्या संगमानें, औषधीच्या सानि-ध्यानें, शुद्धवर्ण पाणी सर्व प्राणिमात्रांमध्यें प्रवेश करतें. पाणी तप्त करतांच फेस आणि बुडबुडे युद्ध करीत नाद करतात. पतीला पाहतांच स्त्री ज्याप्रमाणें त्याच्या बरोबर जाते त्याप्रमाणें प्रत्येक ऋतूमध्यें होणाऱ्या यज्ञाच्या वेळी तांदुळांबरोबर हे उदका तूं एकरूप हो. या ओद-नाची अधिष्टात्री देवता हें पाणी तांदुळाशीं एकरूप करो. हे यजमान,

तांदूळ या तप्त जलांत घालण्याची तूं अनुज्ञा दे.

सर्व लतांचा राजा सोम असून तो मोक्ष प्रदान करणारा आहे. या वनस्पतीच्या प्रत्येक अवयवांमध्यें औषधी गुण आहे. दर्भ औषधी गुणयुक्त आहेत. या ओदनासाठीं दर्भासन तयार केलें जातें. तें नेत्रांना आणि हृदयाला सुखद वाटते. देवता या कुशासनावर वसून या ओदनांचा आस्वाद घेतात. हे वनस्पतींनों देवता तुम्हाला अग्निष्टोम यज्ञाप्रमाणे मानतात. स्वधितीनें त्वष्ट्याप्रमाणें या ओदनाला उत्तम रूप दिलें असून हे ओदन या पात्रांत स्थिरावलें आहे. या ओदनाचा रक्षक यजमान साठ वर्षांनंतर स्वर्गाला जातो. यज्ञदेवता त्याला योग्य मान देऊन त्याला पितर आणि पुत्रांचा सहवास घडवितात. हे ओदना तूं या भूमीवर स्थिर हो. तूं देवतांना अस्थिर करूं नकोस. दंपतीना पुष्ट कर. आपल्या वत्साला दूध दिल्यावर गाय समाधानानें हंबरते त्याप्रमाणें यजमान या ओदनाच्या आस्वादानें आनंदित होतो. हे ओदन यजमानाला स्वर्गफळ प्रदान करतें. त्याला देवतांचें सांन्निध्य लाभतें. हे स्त्रिये तूं अन्न तयार करतेस या अन्नाच्या योगें तूं स्वर्गात प्रथम जा. म्हणजे तुझा पती तुला येऊन भेटेल. पुत्रांना या ओदनाचा आस्वाद घेण्यासाठीं आम्ही बोलावतो.

हें घृतयुक्त ओदन अमृतरूप आहे. यजमान या ओदनाची इच्छा करतो. त्याला स्वर्गांचा लाभ होतो. माझ्या कर्माच्या आड येणाऱ्या राक्षसांचा अग्नि नाश करो. क्रव्याद आणि पिशाच्च यांचा स्पर्श आम्हाला न होवो. अंगिरस आणि सूर्य आम्हास वश होवोत. त्यांच्यासाठी घृतयुक्त मधु हवि मी प्रदान करतों. ब्राह्मणांच्या हातांनीं स्वर्गाचा मार्ग मोकळा होतो. सत्याच्या रूपानें हें ओदन आम्ही देवतानां समर्पण करतो. हें ओदन आमच्यापासून दूर न जावो. अन्य पुरुषांना याचा लाभ न घडो. पाकक्रिया करणारी माझी पत्नी आहे. आमच्या कुमारावस्थेतील पुत्रांना या अन्नाचा लाभ होवो. यजमानाचा द्वेष करणारे लोक नरकाचे अधिपती होवोत. गाई, बैल, अन्न, आयुष्य आणि पुरुषार्थ आमच्याकडे येवोत आणि अपमृत्यू आमच्यापासून दूर निघून जावो. औषधींच्या आणि पाण्याच्या गर्भांत असणारा अग्नि सर्वांना जाणतो.

त्यांची कार्यं त्याला ज्ञात असतात. सुवर्णादि पदार्थांचा तो पालनकर्ता आहे.

पुरुषामध्यें स्थिर असलेल्या चर्मांनीं हें ओदन आच्छादित केलें आहे. धनाच्या अभिलाषानें द्यूत आणि युद्ध करतांना तूं जे असत्य भाषण आणि कर्म आचरलेंस तें या ओदनाच्या वस्त्रानें निर्दोष होईल. हे ओदना, तूं देवतांच्या जवळ जाऊन आपलें शरीर शुद्ध कर. तुला अनेकजण मान देतात. त्यांना स्वर्गाचा मान मिळतो. हे ओदन स्वर्गामध्यें अनेक रूपानें नटते. आत्मा ज्याप्रमाणें अनेक प्रकृतीच्या रूपानें नटतो, कृष्णा व रुश-तीना शुद्ध करतो त्याप्रमाणे ओदनामध्यें असलेल्या अनेक रूपात्मक अग्नीला आहुती समर्पण करतों. हे ओदना, तुला आम्ही पर्व, दिशा, अग्नि, काळा सर्प आणि आदित्य यांचें जवळ ठेवतों. तूं आम्हां सर्वांचें रक्षण कर. आमच्या वृद्धावस्थेपर्यंत आम्हाला सर्व उपभोग भोगतां येतील असें कर. त्यानंतर आम्हाला मृत्यु येवो. त्यामुळें आम्हांस स्वर्गास जातां येईल. दक्षिण दिशा, यम, इंद्र, तिरश्चिनामक सर्प, पश्चिम दिशा, वरुण पृदाकु सर्प आणि अन्न, उत्तर दिशा, सोम, स्वजनामक सर्प, आणि अशनि यांच्या सान्निध्यांत ठेवतो. त्यामुळें वृद्धावस्थेपर्यंत सर्व भोग भोगून आम्ही स्वर्गांत प्रवेश करूं. हे ओदन, ध्रुव, विष्णु, कल्माष नामक सर्प, इशुमति नामक औषधी, ऊर्ध्व दिशा, बृहस्पति, श्वित्रसर्प, इषुमान, आणि वर्षा यांच्या सान्निध्यांत आणतें. सुपक्व ओदन आम्हाला स्वर्गगामी करून आनंद प्रदान करो.

### ४ वशा गौः (ऐश्वर्यरूपी गाय)

याचक ब्राह्मणानें याचना करतांच ब्राह्मण या यजमानाचें संता-नादि ऐश्वर्य वाढो असें म्हणतात. जो ऋषितुल्य ब्राह्मणांना गोप्रदान करीत नाहीं तो आपल्या अपत्यांची विक्री करतो. दान देणाऱ्याच्या अंगाचा दाह होतो, गृह अग्नि वेढतो, डोळा तिरळा होतो आणि त्याचें धन त्याच्यापासून दूर जातें. गोस्वामीला वशा गाईच्या पावलांना दुःख देणाऱ्यांना विपत्ती प्राप्त होते. सुविधा नष्ट होतात. जो कोणी आपल्या-कडे दोष आहे असें समजून आपणास लहान समजतो तो अपराधी होय.

भोगासाठीं जो आपले केंस कापतो त्याच्या पुत्रांना मृत्यु येतो किंवा कोल्हे त्याला आपलें भक्ष बनवतात. या गाईचा कोणी अपमान केल्यास त्याला क्षयरोग प्राप्त होतो. जो तिचें शेण फेकून देतो तो कुरूप होतो. वशा, देव आणि ब्राह्मण यांच्यासाठीं दान करण्यानें स्वतःचें रक्षण होतें.

या गाईची जो कोणी सेवा करतो तो ब्रह्मज्ञ होतो असें विद्वान म्हणतात. जो मनुष्य देवता, ऋषी आणि ब्राह्मण यांना गोदान करीत नाहीं तो ब्रह्मकोपास कारण होतो आणि त्यामुळें त्याचा नाश ओढवतो. वशागौ ज्या ब्राह्मणाच्या घरी जाईल त्याठिकाणीं ब्राह्मण तिचें स्वागत करतो. तिचा आदर न करतां तिला परत पाठवणें म्हणजे स्वतःस हानी पोहोचविणें आहे. जो कोणी जाणीवपूर्वक या गाईचें दान करतो त्याला ती फल प्रदान करते. जो कोणी, याचकानें मागणी केल्यानंतरसुद्धां या गाईचें दान करीत नाहीं तो महान दुर्दशेमध्यें अडकतो. जो तिला केवळ दुसऱ्याला न देतां स्वतःजवळच ठेवतो त्याचेही अभीष्ट पूर्ण होत नाहीं. ब्राह्मणाचें मुखानें देवता वशा–गाईची मागणी करतात. तिला दान न देणारा मनुष्य तिच्या क्रोधाला कारणीभूत होतो.

जो मनुष्य देवतेच्या या रूपास अत्यंत प्रिय समजून जवळ करतो, परंतु जो वशारूपी गाईचें ब्राह्मणांना दान करीत नाहीं तो पशूंच्या क्रोधाला कारणीभूत होतो. ही वशा विद्वान ब्राह्मणाकडेच जाते अशी देववाणी आहे. जो मनुष्य विद्वानाखेरीज अन्याला गाय दान करतो त्याला देवतांसह पृथ्वीदेखील कृपावंत होत नाही. ज्याच्यासमोर वशा प्रकट होते देवता त्याच्याकडे तिची मागणी करतात. हे जाणून नारद-देखील त्या ठिकाणीं जाऊन पोहोचले. ब्राह्मणांनी मागणी केलेल्या गाईला आपलें समजून जो कोणी दान करीत नाहीं, त्याचें संतान कमी होतें आणि त्याचें पशुधनदेखील कमीं होतें. ब्राह्मण अग्नीसाठीं सोम व मित्रावरुणाकडे कामनापूर्तीची याचना करतात. त्या कामना वशाच्या-मुळें पूर्ण होतात. जो कोणी या गाईच्याबद्दल काहीं संकल्प करीत नाहीं तोंपर्यंत त्याच्याकडे गाय जाणार नाहीं आणि राहाणारही नाहीं. जो संकल्पाप्रमाणें गायीबद्दल आचरण करीत नाहीं तो देवतांचा अपमान करतो आणि आपलें आयुष्य आणि आपलें ऐश्वर्य क्षीण करतो. वशा-

गाय देवतांचा धननिधी आहे. ती अनेक रूपांनी प्रगट होते. जोपर्यंत ती एखाद्या गोष्टीचा नाश करण्याची इच्छा करते त्या वेळीं ब्राह्मणांनी तिची याचना करावी म्हणून अनेक रूपानें ती प्रगट होते.

वशा ज्या वेळीं इच्छा प्रगट करते तेव्हां ती देवतांपर्यंत जाते. तेव्हां ब्राह्मण तिची याचना करण्यासाठीं देवतांपर्यंत जातात. पितरांसाठी तपर्णादि क्रिया करून आणि देवतांसाठी यज्ञादि क्रिया करून वशा-गायीच्या दानानें देवता क्रोधापासून दूर राहातात. क्षत्रियांची माता वशा आहे. ती प्रथम प्रगट झाली. दान करण्यापूर्वी तिला अनर्पण असें म्हणतात. पळीमध्यें घेतलेलें तूप यज्ञांतील अग्नीला अर्पण करतांना ज्याप्रमाणे अलग होतें त्याप्रमाणें ब्राह्मणांना गाय दान करणारा, पापापासून अलग होतो. या लोकीं दुग्धवती ही गाय यजमानाजवळ राहाते आणि दात्याला सर्व कल्याणकारी वस्तूंचें दान करते. यमाच्या राज्यांत ही वशा-गाय सर्वांच्या कामना पूर्ण करणारी होते. याचकाला वशा न दिल्यास प्रज्ञावंत लोकसुद्धां नरकाचे स्वामी होतात. क्रोधाविष्ट गाय यजमानाला दु:ख देते. अशी वशा गर्भघातिनी आहे. अशा गायीला जो आपली मानतो, बृहस्पती, त्याच्या पुत्र-पौत्रादिकांचा विकास नष्ट करतो. ही वशा अन्य गायींना त्रास देत फिरते. अशा गायीचें तिच्या मालकानें दान केलें नाहीं तर ती त्याला विषासमान त्रासदायक होते. ब्राह्मणांना या गाईचें दान केल्यास पशूंनासुद्धां आनंद वाटतो. गायीला आनंद वाटतो. देवतांना ती हवि रूपानें प्रदान केली जाते.

यज्ञाच्या योगें संतुष्ट होऊन देवतांनी ही वशा निर्माण केली. नारदानें तिचा स्वीकार केला. त्या वेळीं देवता म्हणाल्या, ही वशा अवशा आहे परंतु नारदांनीं तिला उत्तम वशा बनविली. हे नारदमहर्षे, तुम्हांला अशा मनुष्यांमध्यें प्रगट होणाऱ्या वशांचे ज्ञान आहे. तुम्ही प्रज्ञावंत असल्यानें मी तुम्हाला विचारीत आहे. अब्राह्मण मनुष्य ज्या वेळीं ऐश्वर्याची इच्छा करतो त्या वेळीं त्याला तूळवशा प्राप्त होईल. हे नारदमहर्षे, तुम्हाला आमचा नमस्कार असो. ही वशा विद्वान लोकांनी केलेल्या स्तुतीला अनुकूल होते. तिच्यामध्यें भयकारी गुण कोणता आहे? तिचें दान न केल्यानें पराजय प्राप्त होतो. हे बृहस्पते, अब्राह्मणाच्या

प्रार्थनेप्रमाणें त्याला विलप्ती, सूतवशा, आणि वशा प्राप्त होतात. वशेंचे हे तीन भेद आहेत. क्रोधित देवतांनी वशाला सांगितलें कीं जो हिचे दान करणार नाही तो सर्वत्र पराभूत होईल. इंद्रानें प्रार्थना केल्यावर वशेंचे दान केले नाहीं तर तो यजमान अहंकारानें नाश पावतो. रुद्राच्या क्रोधाला कारण होतो. या लोकांत त्याला चांगली गती प्राप्त होत नाहीं.

५. **ब्रह्मगवी** (ब्राह्मणाची गाय)

जो क्षत्रिय ब्राह्मणाच्या गायींचे अपहरण करून त्यांचे आयुष्य क्षीण करतो त्या क्षत्रियाचें ओज, तेज, बल, वाणी, इंद्रिय, लक्ष्मी, धर्म, क्षात्रबल, राष्ट्र, दीप्ति, यश, सत्ता, धन, आयुष्य, रूप, नांव, कीर्ति, वायु, नेत्र, कान, दूध, रस, अन्न, अग्नि, ऋत, सत्य, इष्ट पूर्त, प्रजा याचा संपूर्ण नाश होतो.

ब्राह्मणाची अशी गाय महाभयंकर होते. हिंसात्मक विषानें ती कृत्या बनते आणि मृत्यूला कारणीभूत होते. त्यामुळें सर्व प्रकारचा नाश ओढवतो. ब्राह्मणापासून पळवून नेणाऱ्याला आणि ब्राह्मणत्वाचा अपमान करणाऱ्याला मृत्युबंधनानें बद्ध करते. ब्राह्मणाचें आयुष्य जो क्षीण करतो त्याचा क्रोधहीं अस्त्रें बनतात. म्हणून ज्ञाते लोक ब्राह्मणांच्या गायींना भिऊन वागतात. हीं गाय अग्नीप्रमाणें ताप देणारी, वज्राप्रमाणें जखम करणारी, मोठ्यानें हंबरणारी आणि जोरानें पुच्छ फिरविणारी होते. ती कान हलवते, मूत्राचा त्याग करते, तिला त्रास देणाऱ्यांना क्षय प्रदान करणारीं होते. जबरदस्तीनें तिचें दोहन केलें तर ते अस्त्राप्रमाणें तीक्ष्ण होतें. तिला मारणारा दुर्गतीला प्राप्त होतो. ही ब्राह्मणाची गाय तिला हानी पोहोचविणाऱ्यांचें प्राण क्षीण करते.

ब्राह्मणाच्या गायीचें जो कोणी अपहरण करतो त्याचे पुत्र क्षय पावतात. त्याला ती कठोरपणें त्रास देते. विषाप्रमाणें संकट निर्माण करते. पचनक्रिया नष्ट करते, शोक निर्माण करते, चैतन्याचा नाश करते. दारिद्र्य प्रदान करते. इतकेंच नव्हे तर या लोकी आणि परलोकीं असणारें सुख संपुष्टांत आणते. या धेनूचें मांस मरणास्त्र आहे. तिचें

शेण शपथ घातल्याप्रमाणें सर्व क्रिया थांबविणारें आहे ती क्रव्याद होऊन नष्ट करणारी, पित्याच्या बांधवांचा उच्छेद करणारी, संतान नष्ट करणारी आणि गृहहीन करणारी होते.

हे ब्राह्मणधेनु, तूं तुझ्या अपहरणकर्त्याचें घर, ऐश्वर्य, आयु आणि सत्ता नष्ट करतेस.

*



# त्रयोदश काण्ड

## १) अध्यात्म (अध्यात्म)

अंतरीक्षांत लपलेल्या सूर्या, तूं उदयाला ये. सत्य आणि प्रिय वाणी या राष्ट्राला प्रदान कर. या राष्ट्राला प्रकाशमान करून पुष्ट कर. पाण्यांत राहणारे प्राणी आणि अन्न तूं घेऊन या ठिकाणीं असणाऱ्या द्विपाद आणि चतुष्पाद प्राण्यांना ते औषधरूपानें प्रदान कर. हे मरुद्-गणांनों, तुम्ही इंद्राचे मित्र आहांत. तुम्ही शत्रूचा नाश करा. मधुर पदार्थांनी तुम्हाला संतोष होतो आणि त्यामुळें तुम्ही वृष्टी करतां. सूर्य तुमचें म्हणणें ऐकतो. तो उदित होऊन वर वर येत आहे. तोच स्त्रियांच्या उदरांत गर्भरूपानें उत्पन्न होतो. सहा प्रकारच्या सृष्टीचा तो पालक होतो. हे पुरुषा, तुझ्या राष्ट्रावर सूर्य उगवला आहे. तूं आतां युद्धाचें वळ वाळगूं नकोस. तूं पठण केलेल्या मंत्रामुळें पृथ्वी आणि आकाश तुला संपत्ती प्रदान करतील. सूर्यानें पृथ्वी व आकाशांची उत्पत्ती केली. प्रजापतीनें त्यामध्यें तुला वाढविलें. आकाश आणि पृथ्वी यांना वलसमृद्ध केलें. सूर्यानें आकाश आणि पृथ्वी यांना स्थिर केलें. दुःखरहित स्वर्गाला आणि त्यावरोबरच अन्य लोकांना स्थिर केलें. देवांनीं त्यांना अमृतत्व वहाल केलें. उगवणें आणि तळपणें या क्रिया सूर्यच निर्माण करतो. सूर्य हें सर्व राष्ट्राला प्रदान करतो. त्यायोगें प्रजा समृद्ध आणि विकसित होईल. ज्या पृथ्वी, आकाश आणि अंतरीक्ष यांचें सूर्य पोषण करतो तो सूर्य तुमची कर्में आणि वल वाढवो. जी प्रजा सूर्याच्या तपानें निर्माण

झाली ती जणूं सवत्स धेनूच सर्वांचें कल्याण करण्यासाठींच आली असून ती त्या ठिकाणीं रमते.

सूर्य उगवल्यावर वर वर येत ज्या वेळीं तो स्वर्गात प्रतिष्ठित होतो त्यावेळी त्याची विविध रूपें दिसतात. अग्नीची तीक्ष्ण ज्योत ही त्याचीच ज्योत असून ती तृतीय लोकांत फलद्रूप होते. सहस्र ज्योतियुक्त, तुपाच्या आहुती बरोबर आवाहन करण्यांत आलेला, इष्टपूर्ती, सोमपृष्ठ, वीर-वान, जातवेद अग्नि माझा त्याग न करो. मला गोधन आणि पुत्रपौत्रा-दिकांच्या योगे पुष्टी प्रदान करो. सूर्य यज्ञ प्रकट करणारा आणि यज्ञ प्रशंसक आहे. सर्व यज्ञीय देवता त्याच्या जवळ जातात. सूर्यानें विश्व-कर्म्यासाठीं यज्ञाला समृद्धी प्राप्त करून दिली. त्या यज्ञांचें तेज मला प्राप्त होवो. हे अग्ने, वेदाच्या बृहती, पंक्ती, ककुप, उष्णहा आणि अक्षर या छंदामध्यें सूर्यानें प्रवेश केला आहे. वषट्कारामध्येंसुद्धां सूर्याचेंच तेज आहे. सूर्य आपल्या तेजानें अन्य वस्तूंमध्यें प्रविष्ट होतो. सूर्य पृथ्वीचा गर्भ असून आकाश आणि अंतरीक्ष यांना आच्छादित करतो. या संसारात वद्ध झालेले लोक या लोकांचा आश्रय करतात. हे वाचस्पते, आम्हाला पृथ्वीपासून सुख प्राप्त होवो. प्राण आमच्याशीं मैत्री करो. हे प्रजापते, अग्नि तुला तेज आणि आयुष्य प्रदान करतो तर आम्ही कर्मं करतो. त्या वेळीं प्राण आमचा मित्र होऊन पांचही ऋतूंमध्यें तो आमच्या सम-वेत राहो. आमचें मन प्रसन्न आहे. तूं आमच्या गोठ्यांत गाईंची समृद्धी कर आणि आम्हाला संतान प्रदान कर. हे राजन्, सवितृ देव सर्व बाजूंनीं तुझें पोषण करतो. अग्नि, मित्र आणि वरुण हे देखील तुझें पोषण करतात. तूं तुझ्या सर्व शत्रूंना वश करून या राष्ट्रामध्यें पदार्पण कर. सर्व प्रजा सत्य आणि प्रिय वाणी बोलेल असें कर.

हे सूर्या, तूं रथाधिष्ठित होऊन प्राणिमात्रांचे कल्याण करण्यासाठीं जलांतून सुद्धां गमन करतोस. उदयाला येणाऱ्या रोहिताची रोहिणी, तेजसंपन्न, सौंदर्यवती आणि गुणवान अनुव्रता आहे. ती सर्व प्राणिमात्रां-वर विजय संपादन करते. शत्रूवर विजय मिळविते. हें त्या उभयतांचे घर आहे. या मार्गानें पृषती गमन करते. गंधर्व तिला ऊर्ध्वगतीला नेतात. प्राणिमात्र या वृषतीचें रक्षण इच्छितात. सूर्याच्या रथाचे अश्व

ज्ञानवान आणि वेगवान आहेत. सूर्याच्या अक्षय्य रथाला ते सहजपणे वाहून नेतात. सूर्य आणि पृषती स्वर्गांत आली. ती रोहित किरणांनी संपन्न आणि अभीष्टवर्धक आहे. जो अग्नि सूर्याच्या बरोबर राहून पृथ्वी व आकाशाला स्थिर करतो त्याच बलानें देवता या सृष्टीला आकार देतात. सूर्य समुद्रातून वर येतो आणि सर्व वस्तूंना स्पर्श करतो. देवांनी गौरविलेली पयस्विनी गाय आणि अग्नि लोकांचें मंगल करो. इंद्र सोम प्राशन करो. हा अग्नि घृताच्या योगानें समृद्ध झाला आहे. त्याला घृताहुतीनीं संपन्न करा. म्हणजे तो शत्रूचा संहार करील. जो शत्रू सेने-सह आमच्यावर चालून आला आहे त्याला क्रव्याद अग्नि भस्मसात करील. हे इंद्रा, तूं बाहुबली आहेस. तूं शत्रूला मार. अग्नि शत्रूचें जाळून भस्म करील.

हे अग्ने; आमच्या शत्रूला तूं पाडून टाक. हे बृहस्पते, तूं शत्रूचे निर्दालन कर. हे इंद्राग्नींनों आणि मित्रावरुणादि देवतानों, जो शत्रू आमचा द्वेष करील त्याचा पराजय होवो. उदयाला येणाऱ्या सूर्या तूं आमच्या शत्रूचा संहार कर आणि त्यांना अंधारात ढकलून दे. विराट्-पुत्र सूर्य अंतरीक्षामध्यें प्रवेश करतो तेव्हा मंत्रांच्या सामर्थ्यानें त्याचें तेज वाढविलें जातें. हे राजा, या पृथ्वीवर स्थिरपणें राहा. राष्ट्र आणि धन अंकित कर. प्रजेला छत्राप्रमाणें सांभाळ. अमृताचा स्पर्श तुला लाभेल. त्यायोगें तूं सूर्याला स्पर्श करण्यास समर्थ होशील आणि स्वर्गाचा मानकरी ठरशील. राष्ट्राचें रक्षण करणारा सूर्य चारही बाजूनें भ्रमण करतो. सूर्याप्रमाणें वुद्धि असणारा रोहित हे राष्ट्र समृद्ध करो. हे सूर्या, हा मंत्रपूत यज्ञ तुला गति प्रदान करतो. तुझे अश्व तुला वाहून नेतात. तूं समुद्राला देखील शोभायमान करतोस. रोहिताच्या सर्व प्रकारांत आकाश आणि पृथ्वी यांना आश्रय लाभतो. हे रोहिता तूं आपलें यश चारही दिशांमध्यें भरून टाकतोस आणि गमन करतोस. तुझ्या यशामुळें पशु आणि मनुष्यें आनंदित होतात. मी सवितृ-देवतेच्या प्रमाणें या पृथ्वीवर यशवान होऊं शकेन. हे सूर्या, तूं अन्य लोकांत राहात असलास तरी या लोकांतील प्राणिमात्रांच्या कर्मांवर तुझी सक्त नजर आहे. तूं स्वतः देवता आहेस. तूं देवतांना कर्मप्रेरणा देतोस आणि

अंतरीक्षांत सतत संचार करतोस. अग्निला नित्य प्रदीप्त करणाऱ्या प्रज्ञावंताना ही तुझी अवस्था ज्ञात आहे.

एका बाजूला अन्न आणि दुसरीकडे आपल्या वत्साला जवळ करणारी, शुभ्रवर्णा गाय अन्य कोणत्याही स्थळीं पृथक्पणें राहात नाहीं. ती सूर्याबरोबर एकपादी, दिशांबरोबर चारपादी, अवांतर दिशामुळें अष्टपदी आणि नवपदी होते. ती मेघाचें रक्षण करणारी, जलपूर्णा, आणि लोकपावन आहे. हे सूर्या, तूं अमृतरूप आहेस. तूं उदयाला येतांच माझ्या वचनांचें रक्षण कर. मंत्रयुक्त यज्ञ आणि वेगवान अश्व तुला गतिमान करतात. हे सूर्या तूं अविनाशी असून आपल्या लोकासहित सर्व लोकांत संचार करतोस. आकाशांत असलेलें तुझें निवासस्थान तुझ्या उपासकांना माहीत आहे. तूं आकाश, पृथ्वी आणि जल यांचा साक्षी आहेस. सर्व प्राणिमात्र तुझ्या शक्तीनेंच तुला पाहतात. ही पृथ्वी परिधी बनली असून वेद हें तिचेच रूप आहे. अग्नि, हिम आणि प्रकाश हें तिला सूर्यच प्रदान करतो. सूर्यानें परिवेष्टित केलेल्या स्वर्गाला जाण्यासाठीं, यजमान पर्वतावर धूप तयार करतात. वर्षाज्य अग्नीचें पूजन करतात. स्वर्गाची इच्छा करणारे अग्नि प्रज्वलित करतात. सत्य हें अग्नीचें स्वरूप आहे. मंत्रज्ञ पुरुष या अग्नीची उपासना करतात.

ज्याला वायु, इंद्र आणि बृहस्पती सुशोभित करतात, अशा सूर्याच्या प्राप्तीची इच्छा करणारे पुरुष मंत्रांनीं प्रवृद्ध झालेल्या अग्नीची पूजा करतात. ते पृथ्वीला यज्ञवेदी करतात. आकाशाला दक्षिणा व दिवसाला अग्नि मानतात, वृष्टीला घृतरूपी आहुती मानून आत्म्याला या योगें संतुष्ट करतात. या पुरुषांच्या स्तुतीनें समृद्ध झालेल्या अग्नीनें पर्वतांचा उद्धार केला. स्तुतीनें उन्नत केलेल्या पर्वताधार पृथ्वीला भूत आणि भविष्याचा आधार रोहितानें प्रदान केला. जो मनुष्य सूर्याच्या समोर मूत्र-विसर्जन करतो किंवा गाईला लाथ मारतो त्याचा मी संपूर्ण नाश करतो. त्याच्यावर दयेची छाया करीत नाहीं. जो मी आणि अग्नि यांच्यामधून जातो किंवा माझ्या छायेला ओलांडून जातो त्याचे पाय निरुपयोगी होतील. हे सूर्या, तूं आणि आम्ही यांच्यामध्ये येऊन जो आम्हाला त्रास देण्याची इच्छा करतो त्याला पाप, दुःस्वप्न

आणि दुष्कर्म यांनी वेढून टाकलें जातें. हे इंद्रा, ज्या यज्ञामध्यें सोम आहे त्या यज्ञापासून तूं दूर होवूं नकोस. आम्ही या यज्ञाची वृद्धी करतो.

२. **अध्यात्मम्** (आत्म्यासंबंधी)

सूर्य सर्व प्रकारच्या कर्मांची प्रेरणा देणारा, सर्वोत्पादक, प्रत्यक्ष गोचर होणारा, निर्मल रश्मिवंत, आकाशांत तळपणारा, सर्व दिशांमध्यें गमन करणारा आहे. आपल्या तेजाने तो रात्र आणि दिवस निर्माण करतो. आपलें तेज पसरविणारा, सर्वांगसुंदर, लोकरक्षक आणि प्रकाशवंत सूर्याचिं आम्हीं स्तवन करतो. हे सूर्या, तुला अर्पण केलेल्या हवीमुळें तूं पूर्व आणि पश्चिम दिशांमध्यें गमन करतोस. आपल्या तेजाने रात्र आणि दिवस निर्माण करतोस. या संसारी जीवनांत तुझाच आधार सर्वश्रेष्ठ आहे. त्यामुळें सर्व लोक तुझी प्रशंसा करतात. भवसिंधु पार करण्यासाठी नावेप्रमाणें सहायक होणारा, तेजस्वी सूर्याला त्याचे सात किरणरूप घोडे, ब्रह्मसागराच्या पैलपार घेऊन जातात. हे सूर्या, पृथ्वी आणि आकाशांत दिवस आणि रात्र यांना समान वागणूक देऊन तूं भ्रमण करतोस. अत्यंत दुर्गम स्थळेंदेखील तूं ओलांडून जातोस. तुला कोणीही वश करूं शकत नाहीं. हे सूर्या, तूं ज्या रथाच्या सहाय्यानें अतिशय जलद गतीनें प्रवास करतोस तो तुझा रथ मंगलमय होवो. तुला सहस्र, सात किंवा असंख्य हरिदाश्व वाहून नेतात त्यांचे देखील कल्याण होवो. अग्नीप्रमाणें तेजोवान सूर्या तूं तुझ्या वेगवान रथावर आरूढ हो. तुझ्या रथाला अनेक अश्व जोडलेले आहेत. सूर्य आपल्या रथाला शीघ्रतेनें गमन करणारे, स्वर्णवर्ण त्वचायुक्त सात विशाल अश्व जोडतो. वेगांना भ्रमण करतांना लोकांतील अंधःकार दूर करीत तो सूर्य-लोकाला गमन करतो. सूर्याच्या रथावर महान ध्वज आहे. सूर्य वेगानें जातांना हा ध्वज अंधःकाराला दूर होण्यास सांगतो. सुवर्णाप्रमाणें कान्तिमान असलेला अदितीपुत्र सूर्य सर्व लोकांमध्यें ख्यात झाला आहे. सूर्य उदयाला येतांच त्याचे किरण रूपवान पदार्थांना स्पर्श करतात आणि त्याचें पोषण करतात. हे सूर्या प्राचि-प्रतीचीच्या सागरांना आणि सर्व लोकांना तूं प्रकाशमान करीत गमन करतोस.

मायेच्या योगाने लहान वालकांप्रमाणें करीत सूर्य दोन्ही सागरां-

कडे गमन करतो. तो सर्व लोकांना प्रकाशित करतो. सुवर्णाप्रमाणें कांतिमान घोडे सूर्याच्या रथाचें वहन करतात. हे सूर्या, त्रितापासून मुक्त झालेल्या अत्रि ऋषीनीं तुला काल-परिमाणासाठीं प्रस्थापित केलें. तूं आपल्या तेजानें सर्व भूतमात्रांना प्रकाशित करतोस. लहान बालक ज्याप्रमाणें आपल्या माता-पित्यांकडें सरळ जातें त्याप्रमाणें हे सूर्या, तूं आणि तुझे अश्व समुद्रापर्यंत जाता तेव्हां सर्व देवता तुम्हालाच ब्रह्म समजतात. जो मार्ग समुद्रापर्यंत जातो तो मार्ग सूर्य अन्यांना दाखवितो. त्याच्यापूर्वी अन्य मार्गाला जाणारे लोक अत्यंत विस्तृत आणि प्रदीर्घ मार्गानें गमन करतात. हे सूर्या, अत्यंत द्रुत गतीनें जाणाऱ्या अश्वांच्या साहाय्यानें तूं या मार्गानें जातोस तेव्हां अमृत सेवन करणाऱ्या देवतांना अडथळा होत नाहीं. उत्पन्न झालेल्या सर्व प्राणिमात्रांना सूर्याचें दर्शन घडावें म्हणून सूर्याच्या तेजशलाका उन्नत होतात. रात्र संपतांच चोर ज्याप्रमाणें दडून वसण्यासाठीं पळून जातात त्याप्रमाणें सर्व नक्षत्रांच्या सहित रात्र सूर्यापुढून पळून जाते. सूर्याचे किरण अग्नीप्रमाणें प्रदीप्त होऊन प्रत्येक व्यक्तीला ज्ञानदान करीत प्रवास करतात. सूर्या, तूं नौकेसमान आहेस. तूं सर्वांना तेज प्रदान करतोस, सर्वांना पाहातोस, आपल्या किरणरूपी हातांनीं प्रेमस्पर्श करतोस आणि सर्व विश्वाला प्रकाशांत आणतोस. तूं सर्व मानवी जीवांना तुझें दर्शन घेता यावें म्हणून तूं स्वतःच उदित होऊन त्यांच्यासमोर प्रकट होतोस.

हे सूर्या तूं पापनाशक आहेस. पूर्वेच्या बाजूस ज्यावेळीं तूं उदयास येतोस त्या वेळीं पुण्यकर्म करणाऱ्या लोकांवर तूं आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव करतोस. सर्व जीवांवर कृपा करतोस म्हणून लोक तुझें दर्शन घेतात. रात्रंदिवस यांना निर्माण करीत तूं अंतरीक्षांत भ्रमण करतोस. सर्व जीवांवर कृपा करतोस. दीप्तिमान रथाला जोडलेले सात घोडे तुला वाहून नेतात. तुझे ते अश्व अत्यंत पवित्र आहेत. सूर्य आपल्या नेत्रानें आकाशांत भ्रमण करतो. तो सर्वांचा उत्पत्तिकर्ता असून सर्व देवतांचा स्वामी आहे. अनेक मुखें आणि अनंत भुजांनीं युक्त असलेला सूर्य आपल्या किरणांच्या द्वारा आकाश आणि पृथ्वीवरील सर्व जीवांचे पोषण करतो. अज्ञानरहित सूर्य ज्या वेळीं विश्रांती घेतो तेव्हां त्याची

दोन रूपें होतात. सूर्य उदयाला येतांच सर्व लोकांना वश करतो. हे सूर्या, तूं महान असून तुझी कीर्तीही महान आहे हे सत्य आहे. तूं आकाश, पृथ्वी आणि पाण्यामध्यें आपल्या नेत्रकिरणांनी प्रवेश करतोस. स्वर्गांतील तूं एक पूजनीय देवता आहेस.

दक्षिण दिशेकडून येणारा सूर्य आपला मार्ग त्वरेनें आक्रमण करतो. तो अत्यंत ज्ञानी असून आपल्या शक्तीनें सर्व विश्वाला चेतन करतो. हा सूर्य सर्वांना पूज्य आहे. तो नेहमी शुभमार्गानेंच गमन करतो. आकाश आणि पृथ्वीवरून प्रवास करतांना तो दिवस आणि रात्र यांना आश्रय देतो. सर्व प्राणिमात्रांना तो तप्तता प्रदान करतो. दीप्तिमान, कीर्तिवान व अन्नाला समृद्ध करणारा सूर्य सर्व दिशा प्रकट करतो. तो अंधःकाराला दूर सारीत प्रकाश पसरतो. पापाचा नाश करतो. या सूर्याचे किरण मित्रावरुणांचे नेत्ररूप आहेत. सूर्य सर्व जगताचा आत्मा आहे. (सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च – १३.२.३५) तो भूतमात्रांमध्यें प्रविष्ट झाला आहे. तो ऊर्ध्वगामी, अरुणवर्ण व शोभायमान आहे. सूर्य आकाशमध्यात आला की त्याचें सर्वांना दर्शन घडतें. हे सूर्या तुझ्यामुळें रात्री पापरहित होतात. या पापाला भिऊन द्रुतगामी सूर्याचें आम्ही स्तवन करतो आणि त्याचे आश्रित होतो. हे सूर्या, तुझ्या कृपेमुळें आम्हाला हिंसा आणि पाप यांच्यापासून दूर कर आणि प्रदीर्घ जीवन प्रदान कर. पापनाशक आणि स्वर्गगामी सूर्य दोन अयनांचे नियमन करतो व सर्व देवतांना आपल्या तेजानें झाकून टाकतो. तो सूर्य रोहित, प्रजापति, यज्ञमुख, स्वर्गपोषक, स्वर्गगामी आणि समुद्रगामी असून आपल्या किरणांनीं पृथ्वीला स्पर्श करतो तेव्हां तो दर्शनीय होतो.

स्वर्गाधिपति, सर्वप्रेरक आणि सर्वरक्षक सूर्य स्वर्गातून समुद्राकडे जातो. तो सर्वांना प्रकाश प्रदान करतो. दिवस आणि रात्र यांच्यामुळें सूर्याचें रूप लोकांच्यासमोर येतें तर दुसरें त्याचें गमनशील रूप लोकांना सर्वगामी, अंतरीक्ष सहवासी आणि मित्रमय वाटतें. अशा सूर्याला आम्ही आवाहन करतो. त्या सूर्याची कृपादृष्टी कधीं कमी होत नाहीं. तो अत्यंत ज्ञानी आणि सर्वांना पाहणारा आहे. हे सूर्या तूं मी करीत असलेलें

स्तवन ऐक. तूं आपलें मोठेपण पृथ्वी आणि अंतरीक्ष यांमध्यें भरून टाक. तूं महान विद्यावान आणि पूजनीय आहेस. तुझ्या आगमनापूर्वी येणाऱ्या उषेच्या वेळीं हे लोक समिधांच्या योगानें अग्नि प्रज्वलित करतात. त्या प्रज्वलित अग्नीच्या ऊर्ध्वगामी ज्वाला आणि तेजशलाका स्वर्गाकडे वेगानें जातात. मी ह्या सूर्य आणि अग्नीचा आश्रय करून राहतो.

**३. अध्यात्मम्** (आत्म्यासंबंधी)

ज्यानें पृथ्वीला जन्म देऊन स्थिर केलें, सर्व लोकांना आश्रय दिला, ज्याच्यामध्यें सहा कक्षा आणि दिशांचा समावेश असून दिशांना जो प्रकाशित करतो, ज्याच्या अस्तित्वामुळें ऋतु होतात, वायु वाहतो, समुद्र आनंदानें गर्जना करतो, जो मनुष्यांना प्राणाचा आधार देतो, प्राणवायु प्रदान करून आकाश आणि पृथ्वीला जो संतुष्ट करतो, ज्याच्या आश्रयानें वैश्वानर, प्रजा, अग्निसहित निवास करते, जो यज्ञाचें आश्रयस्थान आहे, आकाश आणि पृथ्वीच्या मध्यभागीं जो तृप्त होऊन संचार करतो, जो ब्रह्मणस्पतीच्या रूपानें जगाला ज्ञात आहे जो अन्नाचा पालक आणि आस्वाद घेणारा आहे, भूत-भविष्याचा जो स्वामी आहे, ज्यानें तीस रात्री आणि तीस दिवसांचा समूह आणि तेराव्या महिन्याची उत्पत्ती केली आणि जो सर्वांना पाहातो अशा सूर्याचा जो अपमान करतो किंवा विद्वान ब्राह्मणाला जो दुःख देतो त्याला देवता बद्ध करून क्षीण करोत. सूर्याचें सुन्दर किरण स्वर्गाला स्पर्श करतात तर दक्षिणायनांत पाण्याला स्पर्श करतात. हे कश्यप ऋषे, तुम्हाला आवडणाऱ्या चित्रभानू नामक कक्षेत सात सूर्य एकत्र राहातात.

देवतांनीं रोहिताला उत्पन्न केलें त्या वेळीं एका बाजूला बृहत् आणि एका बाजूला रथंतर साम असे दोन पंख निर्माण झाले. ते दोन्हीही शक्तिशाली आहेत. हा वरुण संध्याकाळीं अग्नीच्या रूपानें वावरतो आणि उदित होतांच सूर्याचा मित्र बनतो. तो सविता रूपानें अंतरीक्षांत आणि इन्द्र रूपानें स्वर्गांत स्थिर होतो. स्वर्गगामी सूर्याचें दोन अयनकाल आहेत. ते अनंत कालपर्यंत असेच गतिमान राहतात. सर्व देवतांना आपल्यामध्यें लीन करून तो सूर्य अन्य प्राणिमात्रांकडे पाहातो. सर्व प्राणिमात्रांना ज्यानें प्रकाश प्रदान केला, देवांना प्रकाशित केलें ते देव

जलाच्या आश्रयानें राहातात. आपल्या किरणांनीं प्रकाशित होणारा सूर्य स्वर्गाला दीप्तिमान करतो आणि आपल्या सुवर्णवर्ण तेजशलाकांनीं सर्वत्र प्रकाश पसरतो. सूर्याच्या प्रभावानेंच सूर्याचे अश्व त्याला वाहून नेतात. यज्ञीय लोक यज्ञ संपन्न करतात. सूर्य एकरूप ज्योतीप्रमाणें असून तो अन्य ज्योतींना प्रकाशहीन करतो. सूर्य सप्तऋषींना वन्दन करीत, सात घोड्यांच्या रथानें भ्रमण करतो. तो ग्रीष्म, वर्षा आणि हेमंत ऋतूंना धारण करतो. या ऋतुकालांत सर्व लोक आश्रयसंपन्न होतात. अग्नीचे आठ प्रकार अत्यंत दीप्तिमान आहेत. ते देवतांचें पालन करतात. प्राणवायूला शुद्ध करतात आणि प्राणिमात्रांना वृद्धी प्रदान करतात. गायत्रीच्या उदरांत अमृत गर्भ असून तो सर्वांकडून पूजनीय आहे. वायू आणि जल सूर्यामुळें पवित्र होतात. विद्वान ब्राह्मणांचा जो द्वेष करतो तो देवांचा अपराधी असून देव त्याला क्षीण करतात.

हे अग्ने, घर्षण, स्पर्श आणि आघात ह्या तुझ्या तीनही उत्पत्ती आम्हाला माहीत आहेत. दीप्तिता, ज्वाला आणि सुप्तता या तुझ्या गती वस्तूचें भस्म करणाऱ्या असून त्या आम्हाला माहीत आहेत. तुझ्या आश्रयानें राहाणाऱ्या तीन स्वर्गांची आम्हाला माहिती आहे. उत्पन्न होतांच जो पृथ्वीला आच्छादून टाकतो, जल आणि अंतरीक्ष यांना स्थिर करतो, अशा अग्नीचा अपमान करणारे क्षय पावतात. हे अग्ने, ज्ञानयज्ञामध्यें तुला प्रदीप्त केलें जातें. प्रश्निमातृक मरुद्गण तुझी पूजा करतात. स्वर्गाचें तूं साधन आहेस. तूं बलदाता, आत्मप्रेरक आणि प्राणिमात्रांचा ईश्वर आहेस. तूं द्विपाद, चतुष्पाद किंवा षट्पाद प्राण्यामध्ये प्रवेश करतोस. लोक तुझी पूजा करतात. अंधःकारमय रात्रीचा पुत्र अर्जुन सूर्य झाला आणि आकाशांत संचार करूं लागला. या अग्नीचा जो कोणी अपमान करील त्याला रोहित देव कंपित करून क्षीण करील.

## ८. (१) अध्यात्मम् (आत्म्याविषयीं)

हा सूर्य आकाशांत प्रदीप्त होऊन संचार करीत आहे. आपल्या तेजकिरणांनीं त्यानें सर्व आकाश भरून टाकलें आहे. हा सूर्य म्हणजेच धाता, विधाता, वायु, आकाश, अर्यमा, वरुण, रुद्र, महादेव, अग्नि आणि

यमरूपानें उदित होतो तेव्हां लोक याची आराधना करतात. सूर्य उदयाला येतांच प्रकाशमान होतो आणि त्याचे तेजकिरण चारही बाजूला पसरतात. शिक्यारूप एक मरुत्‌गण त्या सूर्याचा साथी आहे. तो देखील सूर्याबरोबर आगमन करतो. तो इंद्ररूपाने देखील प्रकाशतो. सूर्य स्थावर जंगम पदार्थांचा साक्षी असल्याने सर्व पदार्थ सूर्यकिरणांनीं प्रकाशित होतात. सर्व देवता सूर्याचा स्वीकार करतात.

## ४. (२) अध्यात्मम्

ब्रह्म, तप, कीर्ति, यश, जल, ब्रह्मवर्चस्, अन्न पचण्याची क्रिया आणि शक्ती, या सूर्यापासून प्राप्त होतात. या गुणांच्या अनेक आवृत्यांचा स्वामी सूर्य आहे. सर्व स्थावर आणि जंगम पदार्थांचा तो ज्ञाता असून सर्व देवता त्याच्यामध्यें एकभूत होतात.

## ४. (३) अध्यात्मम्

कीर्ति, यश, जल, आकाश, ब्रह्मवर्चसम्, अन्न, अन्न पचण्याची क्रिया आणि शक्ती, भूत, भविष्य, श्रद्धा, रुचि, स्वर्ग, स्वधा, सर्व कांही सूर्य आहे. तोच मृत्यु, अमृत, अम्व, रुद्र, वसु, राक्षस, आदरयुक्त वाणी, वषट्कार, सर्व यातनांना दूर करणारा आणि नक्षत्रांसहित चंद्राला वश करून घेणारा आहे.

## ४. (४) अध्यात्मम्

सूर्य दिवसां प्रकट झाला आणि दिवस त्याच्यापासून प्रकट झाला. रात्रही त्याच्यापासून निर्माण झाली आणि रात्रीतूनच सूर्य उदयाला आला. अंतरीक्ष, वायु, आकाश, अग्नि, जल, ऋचामंत्र आणि यज्ञ हे सर्व सूर्यापासून निर्माण झाले आणि यामुळें सूर्याला प्रतिष्ठा प्राप्त झाली. यज्ञ हा सूर्याचें मस्तकरूप आहे. तो कल्याणकारी पुरुष आणि औषधी यांना उत्पन्न करतो. पृथ्वीवर, कल्याणमय वृष्टि करतो आणि स्वतः विकास पावतो. हे सूर्या, तुंलाच मघवन् म्हणतात. तूं अनेक देहांचा आश्रय करून राहतोस आणि अनेक बंधनांना मुक्त करतोस.

## ४. (५) अध्यात्मम्

हे इंद्रा, तूं श्रेष्ठ आहेस. तूं ज्ञान आणि दान करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. तूं शक्ती आणि वैभवाचा स्वामी आहेस. आम्ही तुझी आराधना करतो. हे इंद्रा, तूं आम्हाला यश, तेज, ब्रह्मवर्चस् आणि सामर्थ्य प्रदान कर. जल, पौरुष, महनीयता आणि संपन्नता ही तुझीच रूपें असून त्या रूपांत आम्ही तुझी आराधना करतो. जल, अरुण, रजत, रज वगैरे रूपांनीं नटलेल्या तुझी आम्ही आराधना करतो. तू आम्हाला अन्नसमृद्ध कर. आम्ही तुला आदरानें वन्दन करतो.

## ४. (६) अध्यात्मम्

अरु, पृथु, सुभू, भुव, प्रथ, वरव्यच, लोक, भवद्वसु, इदद्वसु, संयद्वसु, आणि आयद्वसु या रूपानें प्रकट झालेल्या इंद्राची आम्ही आराधना करतो. हे इंद्रा, तूं आम्हाला अन्न, यश, तेज, आणि ब्रह्मवर्चस्व देऊन आमच्याकडे दृष्टी ठेव. आम्ही तुला पुन्हा पुन्हा वन्दन करीत आहोंत.



# चतुर्दश काण्ड

## १) विवाह प्रकरणम्

सत्यामुळें ही पृथ्वी आणि सूर्यामुळें द्युलोक स्थिर झाला आहे. पारमार्थिक सत्याच्या आधारानें, आकाशांत सूर्य स्थिर झाला आहे. सोमाच्या योगानें ह्या पृथ्वीला आधार लाभला आहे. सोमामुळें पृथ्वी, आदित्य, नक्षत्रें आणि औषधी वलपूर्ण झाल्या आहेत. सोम नक्षत्रांच्या जवळ राहातो. जो कोणी सोमवल्ली कुटून रस काढतो आणि प्राशन करतो त्याला सोमप म्हणतात. ज्ञानी लोक ज्या सोमाला जाणतात त्याला, सामान्य प्राणिमात्र स्पर्श करीत नाहींत. हे सोमा, लोक तुला प्राशन करतात तरी तूं वृद्धिगत होतोस. मास रूपानें वर्षाचें संरक्षण हा सोमच करतो. वृहती नामक छन्दांतील मंत्रानीं मानवाचें रक्षण साधतें. सोमवल्ली कुटण्याच्या पाषाणाच्या नादानें सर्व स्तब्ध होतात. सामान्य जीव सोमाचें भक्षण करीत नाहींत. सूर्या ज्यावेळी आपल्या पतीजवळ गेली तेव्हां ज्ञान उपवर्हण, चक्षु, अंजन आणि आकाश-पृथ्वी कोश झाली. न्योचिनी रैभ्या सूर्याजवळ गेली, त्या वेळीं सूर्या-देवीचें उपवस्त्र हातीं घेऊन ती तिच्या मागून चालत होती. त्या वेळीं छंद त्या स्त्रीचे केंस वनले, अग्नि पुरोहित आणि अश्विनीकुमार वर वनले. पतीची इच्छा करणाऱ्या सूर्यादेवीला ज्या वेळी अश्विनीकुमारांना प्रदान केली त्या वेळीं अश्विनीकुमारांनीं तिचा स्वीकार केला. सूर्या ज्यावेळी आपल्या पतीसमवेत गेली तेव्हां मन रथ झालें. शुभ्रता वृषभ आणि द्युलोक हार

बनलें.

ऋग्वेद आणि सामवेद यांच्या मंत्रांनी स्तुती केलेले आणि रथाला जोडलेले दोन बैल तुला अनुकूल होऊन चालत आहेत. तुझे दोन कान द्यौ आणि आकाशरूपानें तुझ्याजवळ आहेत. हे सूर्य आणि चंद्र रथाची चाकें बनले. व्यान नामक वायू कणा बनला. अशा प्रेमळ रथावर सूर्या आरूढ होते आणि आपल्या पतीकडे गमन करते. सूर्यानें आपल्या कन्येला पुष्कळ परितोष वस्तु अर्पण केल्या. या सर्व वस्तूंचा भार पुढें चालला होता. जो पिता आपल्या कन्येला अशा वस्तु दान करतो तो फाल्गुनी नक्षत्रावर बैलांकडून रथ ओढवतो आणि मघा नक्षत्रापर्यंत तो रथ इच्छित स्थळीं जातो. हे अश्विनीकुमारांनों, तुम्ही आपल्या तीन चक्रांच्या रथानें सूर्याकडे आलांत तेव्हां तुम्हाला विचारण्यांत आलें की तुमच्या रथाचें एक चक्र कोठे आहे? तुम्ही, आपलें विहित कर्म करणाऱ्या लोकांमध्यें किती काळ राहिलांत? सूर्यादेवीचें श्रेष्ठत्व लक्षात आल्यानें तुम्ही सूर्याकडे आलांत आणि सूर्यादेवीचें पाणिग्रहण केलेंत. त्या वेळीं विश्वेदेवानें सूर्याचा गौरव केला. हे सूर्या, तुझ्या रथाची गती ऋतूला अनुसरणारी व प्रज्ञावंतांच्या द्वारें जाणली जाणारी आहे. तुझें एक चक्र गुप्त आहे हे प्रज्ञावंतांना माहीत आहे. प्रेमळ नातेवाइकांच्या बरोबर राहाणारी आणि पतीच्या सहवासाची इच्छा करणारी स्त्री अर्यमाचें पूजन करते. काकडी ज्याप्रमाणें मूळ देहापासून आपोआप निराळी होते त्याप्रमाणें ही स्त्री आपल्या माहेरापासून अलग होते परंतु पतीपासून मात्र अलग होत नाहीं. या वधूला मी तिच्या कुटुंबाशी एकरूप करतो. अशी ही वधू सुपुत्रवान आणि सौभाग्यवान होऊं दे. (यथेयमिन्द्र मीढवः सुपुत्रा सुभगा सति । हा वधूला दिलेला एक चांगला आशीर्वाद आहे) सूर्यानें ज्या वरुणपाशानें तुला बद्ध केलें होतें त्यांतून तुझी मुक्तता केली आहे. हे मधुरभाषिणी स्त्रिये सत्यमय कर्म करणाऱ्या आणि त्याचें फल प्राप्त करणाऱ्या लोकांत तूं सुखाने कालक्रमणा कर. (हा पुढील आशीर्वाद देखील तसाच सर्वोत्तम आहे–)

भगस्त्वेतो नयतु हस्तगृह्याश्विना
त्वा प्र वहतां रथेन ।
गृहान् गच्छ गृहपत्नी यथासो
वशिनी त्वं विदथमा वदासि ॥ २० ॥

हे सूर्यादेवी, भगदेवता तुझा हात धरून आणि अश्विनीकुमार आपल्या रथानें तुला घेऊन जावोत. तूं गृहस्वामिनी होऊन आपल्या घरीं जा.सर्वांना आपलेसें कर आणि सदैव मधुरवाणी बोल. (ऐश्वर्य, निरोगी-पण, गृहसत्ताधीश असून आपल्या बोलण्यानें सर्वांना आपलेसें करणें यांचा संगम व्हावा.)

तुझ्या घरांत जे लोक असतील त्यांना तूं सर्व बाजूनें समृद्ध कर आणि गृहस्थधर्म पालनासाठीं सदा तत्पर आणि जागृत राहा. पतीची तूं आवडती हो. तुझ्या अपत्यांना संतोष प्राप्त होईल अशा वस्तूंची तुझ्या घरात समृद्धी होवो आणि तुझें आयुष्य आहे तोपर्यंत तुझी वाणी सचेतन राहो. तुम्ही उभयतां एकत्र रहा. वेगळे होऊं नका. आयुष्यभर उत्तम पदार्थांचें सेवन करा. आपल्या पुत्रपौत्रादिकांसमवेत खेळकर वृत्तीनें राहा आणि मंगलमय वातावरणांत निरंतर प्रसन्न राहा. (सूर्यपुत्री सूर्या आणि अश्विनीकुमार यांच्या विवाह सोहळ्याचें वर्णन ऋग्वेद मंडल १० सूक्त ८५ मध्यें समाविष्ट आहे. सूर्याची पाठवणी करतांना तिला जो आशीर्वाद दिला तो या वेदांत वर आला आहे.)

सूर्य आणि चंद्र खेळत खेळत पूर्वेकडून पश्चिमेकडे गमन करतात. त्यांच्यापैकीं सूर्य सर्व लोकांना पाहतो आणि ऋतूंच्या निर्मितीनें नव-नवीन रूपें धारण करतो. चंद्र रोज नवीन रूपें धारण करतो. आपल्या कला कमी कमी करीत तो प्रतिपदेला स्पर्श करतो. सूर्य उषेच्या मागोमाग येऊन सर्व प्राणिमात्रांना प्रदीर्घ जीवन प्रदान करतो.

वधूच्या वस्त्रानें आपलें अंग झांकणारा पती नेहमी दोषी होतो. त्याचे शरीर अमंगल होतें. सूर्यादेवीच्या आशसन, विशसन, अधिविकर्तन या रूपांचें दर्शन होतें. ब्रह्मा तिला शृंगारतो. हे वधूवस्त्र पतीला तृष्णा निर्माण करतें. तें विषासमान आहे. ज्या वस्त्रांच्या योगें वधूला दोष

लागत नाहींत, तिला प्रायश्चित्त घ्यावें लागत नाहीं आणि तिला मृत्यू प्राप्त होत नाहीं असें मौल्यवान वस्त्र ब्रह्मानें सूर्याला प्रदान केलें.

सत्याचा आश्रय करणाऱ्या तुम्हां दोघांना सौभाग्य प्राप्त होवो. हे ब्रह्मणस्पते, तूं ह्या वधूच्या पतीला आपलेसें कर म्हणजे वधू मधुरवाणीनें बोलूं लागेल. ह्या उभयतांना संतान प्राप्त होवो. विश्वेदेव तुमचे मन उल्हसित करो. या गायी या उभयतांच्या गोठ्यांत जावोत. पूषा, धाता, मरुद्गण आणि सविता तुम्हाला गृहस्थधर्माची प्रेरणा देवोत. ज्या मार्गानें तुमचे मित्र जातील तो मार्ग कंटकरहित होवो. धाता तुम्हाला तेज आणि ऐश्वर्य प्रदान करो. गाय, पाश, सुरा यामध्यें जे गुणदोष आहेत ते अश्विनीकुमार तुला समजावून देवोत, म्हणजे तुझें रक्षण आपोआप होईल. जो प्रदीप्त असून आपल्या तेजानें दुसऱ्याला त्रास देत नाहीं, जलांचें रक्षण करतो आणि अग्नीच्या बरोबरच यज्ञाच्या वेळीं ज्याची स्तुती करतात तो इंद्र प्रसन्न होवो. शरीराला दूषित करणारा मल मी शरीरापासून दूर करतो आणि कल्याणमय पदार्थ शरीरावर धारण करतो. ज्या जलाच्या योगानें मल दूर होईल असें मंत्रशुद्ध पाणी यांना ब्राह्मण प्रदान करोत. शत्रूचा नाश करणारें पाणीही त्यांना प्रदान करोत. हे पूषन्, अर्यमा देवतेच्या साहाय्यानें गृह्याग्नीची प्राप्ती कर कारण या वधूचे सासरे आणि दीर या अग्नीची प्रतीक्षा करीत आहेत. हे वधू, हें पाणी तुला कल्याणमय होवो. सुवर्णाप्रमाणें ऐश्वर्यवान होवो. आपल्या पतीच्या अंगस्पर्शानें तूं सौभाग्यवान हो.

विविध कर्में करणाऱ्या इंद्रा, मी अपालाला पवित्र करून तिची त्वचा सूर्याप्रमाणें तेजस्वी केली. हें स्त्रिये, तूं प्रजा, धन, ऐश्वर्य आणि प्रसन्नतेची सतत इच्छा करतेस. तूं पतीसमवेत, पतीला अनुकूल होऊन, अमृतमय सुखाचा उपभोग घे. (पत्युरनुव्रता भूत्वा सं नह्यस्वामृताय । ही श्रेष्ठांची आशीर्वादवाणी आहे. याप्रमाणें पत्नीनें आचार केल्यास तिला आणखी कसें वैभव प्राप्त होईल याचे स्पष्टीकरण या ठिकाणीं आहे.)

नद्या समुद्रगामिनी होऊन, विशाल होतात. समुद्र त्यांच्यावर नियंत्रण करूनही त्यांना आपलेसे करतो. त्याप्रमाणें तूं आपल्या पतीकडे जाऊन समृद्ध हो. तूं स्वामिनी हो. तूं, श्वशुर, सासू, दीर, नणंद आणि

भावजया या सर्वांच्या मतानें सम्राज्ञी हो. ज्या स्त्रियांनीं स्वतः हें वस्त्र तयार करून तुला अर्पण केलें त्या तुला दीर्घायुषी करोत. हे आयुष्यमती असें वस्त्र तूं धारण कर. कन्यारूपी यज्ञफल वर घेऊन जातो तेव्हां कन्यापिता शोकाकुल होतो इतकेंच नव्हे तर वधुपक्षांतील लोकसुद्धां तिच्यासाठी रडतात. म्हणून हे कन्ये, तुला जन्म देणारा मातृपक्ष आणि तुझ्या पतीला जन्म देणारी सासू आणि तिचा परिसर यांचें तूं मीलन कर. या पृथ्वीवरील आसनावर तू बस. सविता तुझें आयुष्य वृद्धिगत करो. या अग्नीनें आपल्या उजव्या हातानें पृथ्वीला धरले आहे त्याप्रमाणें मी तुझा उजवा हात उजव्या हातानें धरीत आहे. तूं दुःखी न होतां प्रजा आणि धन यांच्यासह माझ्यावरोवर दीर्घकालपर्यन्त निवास कर. सविता तुझा हात हातांत घेवो, सोम राजा तुला प्रजावती करो. जातवेद नामक अग्नि ऐश्वर्यवती करो आणि वृद्धावस्थेपर्यंत तुझें कल्याण करो. हे वधू, वृद्धावस्थेपर्यंत तूं माझ्या समवेत राहावेंस म्हणून आणि आपल्याला ऐश्वर्यवान होतां यावें म्हणून मी पत्नी म्हणून तुझा हात धरीत आहे. भग, अर्यमा, सविता व दुर्गा, या देवतांनीं तुला गृहस्थधर्माच्या पालनासाठीं मला अर्पण केली आहे.

तुझा एक हात भग देवतेनें आणि एक हात सविता देवतेनें धरला आहे. तूं धर्मानें माझी पत्नी असून मी तुझा पती आहे. बृहस्पतीनें तुला मला अर्पण केली आहे. मी तुझें पालनपोषण करीन. तू प्रजावती होऊन शंभर वर्षे माझ्या समवेत निवास कर. त्वष्टा देवतेनें बृहस्पतीच्या आज्ञेवरून हें वस्त्र निर्माण केलें. तें अत्यंत कल्याणकारी आहे, भग आणि सविता या स्त्रीला या वस्त्राच्या योगें, पुत्रवती आणि संपन्न करोत. इंद्र, अग्नि, द्यौ, पृथ्वी, वायु, अश्विनीकुमार, मित्र, वरुण, भग आणि सोम या वधूचें संतान समृद्ध करोत. हे अश्विनीकुमारांनो, बृहस्पतीनें सर्वप्रथम सूर्यादेवीच्या केसांची शोभिवंत रचना केली. या वस्त्राच्या योगानें ही स्त्री पतीला साजेशी शोभिवंत झाली आहे. स्त्रिया जें रूप धारण करतात त्यावरून त्यांच्या मनाचें दर्शन होतें. अशा स्त्रियांचे पाश सूर्य बाजूला करतो. हे स्त्रिये, तुझ्यावरोबर राहून मी हा मार्ग आक्रमण करीन. सूर्य आम्हाला जल प्रदान करो, राक्षसांना दूर करो आणि या

स्त्रीला पुण्यभूमीमध्यें प्रतिष्ठित करो. ब्रह्मदेवानें या स्त्रीला पती दिला आहे. प्रज्ञावंत भग हिच्यासमोर आहे. तो आम्हाला कल्याणमय होवो. हे वधू, तूं वरणीय, तेजस्वी, सालंकृत आणि सर्वांना कल्याणकारक वाटणारी हो. हे बृहस्पते, इंद्रा आणि सविता या स्त्रीला, बंधु, पति, पशु वगैरेचा क्षय करणारी बनवू नकोस. तिला पुत्र, धन वगैरे साधनांनीं संपन्न कर. या वधूला घेऊन जाणाऱ्या रथाला धोका निर्माण करूं नकोस. या वधूचा मार्ग कल्याणमय होवो. तिच्या चारही बाजूला ब्राह्मण राहोत. तिला देवतांचा निवास असलेला, रोगरहित निवास प्राप्त होवो आणि ती आपल्या पतीसह प्रसन्न राहूं दे.

## २ विवाहप्रकरणम्

हे अग्ने, सूर्यादेवी सासरीं येतांना तिला दिलेल्या परितोष वस्तु घेऊन ती आली त्यावेळीं तूं देखील तिच्याबरोबर आलास. तुझ्या अस्तित्वामुळें, पुत्रांना जन्म देणारी, तेजोनिधी, दीर्घायुषी अशी पत्नी अश्विनीकुमारांना प्राप्त झाली. सोमानें प्रथम तिचा सांभाळ केला. नंतर गंधर्वांनीं, नंतर अग्नीनें सांभाळ करून ती मला अर्पण केली आहे. या सर्वांनी या वधूला संपन्न केली. उषा उदयाच्या वेळीं ऐश्वर्यसंपन्न अश्विनीकुमारांच्या अंतःकरणांत जी मंगलता भरून राहाते त्या मंगलमय कृपादृष्टीचा लाभ आम्हाला मिळों आणि आमची बुद्धी प्रगल्भ होवो. तुम्ही आम्हाला प्रिय आहांत. तुम्हीच आमचें रक्षण करतां. सूर्याच्या कृपेनें आम्ही उपभोग-समर्थ होऊं. तुम्ही अन्यांचें कल्याण करणारे, वीर-वेष्टित आणि धनरक्षक आहांत. हे अश्विनीकुमारांनों, या वधूच्या मार्गांत येणाऱ्या सर्व अडचणी तुम्ही दूर करून तिचा प्रवास सुखमय करा. हे वधू, तूं ज्या मार्गानें आपल्या पतीच्या घरी जाणार आहेस त्या मार्गातील औषधी वनस्पती, नद्या, भूतल, अरणें तुला प्रजावती करून तुझ्या पतीच्या शत्रूपासून तुझें संरक्षण करोत. सुखद वाहनानें या मार्गावरून जातांना आमच्या वीरांना त्रास होत नाहीं. अन्यांना धनप्राप्ति होते. मनुष्यांनों, हे लक्षांत ठेवा की या वनस्पतीमध्यें गंधर्व आणि अप्सरादेखील आहेत. त्या या वधूला सुख प्रदान करतील. या वधूला

देण्यांत आलेल्या परितोष वस्तूंचा नाश करणार नाहींत. त्यांच्या आशीर्वादानें ही दोघें उत्तम आणि सुखमय पदार्थांचा उपभोग घेवोत. चंद्राप्रमाणें प्रकाशमान आणि प्रसन्नता प्रदान करणाऱ्या ह्या परितोष वस्तूंचा नाश करणारी साधनें, ज्या ठिकाणाहून येतात त्याच ठिकाणीं त्यांना यज्ञीय देवतांकडे पाठवून द्या.

या दांपत्याच्या बरोबर येण्याची जे सेवक इच्छा करतात त्यांना या मार्गामध्यें दांपत्याबरोबर सुगमता लाभो. ते सर्व आनंदानें मार्गक्रमण करोत. या मार्गांत जे शत्रू असतील त्यांना दुर्गती प्राप्त होवो. या दांपत्याच्याबरोबर ज्या परितोष वस्तू आहेत त्या वस्तू दीप्तिमान करून सविता त्यांच्या पासून सुख निर्माण करो. या सुखाचा लाभ उभयतांना होवो. ब्रह्मदेवाने या वधूला घररूपी एक लोक अर्पण केला आहे. तिला हे घर कल्याणकारक होवो. अश्विनीकुमार, अर्यमा, भग, आणि प्रजापती या वधूला प्रजावती करोत. हे पुरुषा तूं तुझ्या या वधूमध्यें आपल्या बीजाची पेरणी कर. वृषभाप्रमाणें तुझें वीर्य आहे. या वधूला दुग्धवती करून त्यासाठीं संतान निर्माण कर. हे सरस्वती, भगवान विष्णूंप्रमाणें तूं विशाल आहेस. ती विशालता तूं या वधूला प्रदान कर. हे सिनीवाली, तूं उत्तम व बुद्धिवान प्रजा निर्माण करण्याचें सामर्थ्य या वधूला प्रदान कर. पाण्यावर उसळणाऱ्या लाटा शांत कर. वाहनाला जोडलेल्या घोड्यांचे लगाम ढिले कर. हे वधू, तूं आपल्या प्रेमळ नजरेनें पतीला कधींही क्षीण करणार नाहींस. त्याच्यामुळें तूं उत्तम पुत्रांना जन्म देणारी, नेहमी प्रसन्नता निर्माण करणारी, सर्वांना सुख देणारी, आणि या घराची स्वामिनी हो, म्हणजे तुझ्या बरोबर अन्यही सुखी होतील. हे वधू, तूं आपला पती व दीर यांना कोणतीही हानी पोहोचणार नाहीं असें आचरण कर. सर्व पशूंना सुख प्रदान कर. मनाने देखील तूं कोणाचें अहित चिंतू नकोस. तूं अग्नीचे पूजन कर. हे निर्ऋति, तूं कोणत्या वस्तूच्या इच्छेनें या ठिकाणीं आलीस. तूं शत्रुरूपिणी आहेस. या घरांतून तूं तात्रडतोब निघून जा. या ठिकाणीं जराही थांबू नकोस. तूं या घरामध्यें प्रवेश केल्यापासून ही वधू अग्नीची उपासना करीत आहे. हे, वधू निर्ऋति-पापदेवता निघून गेलेल्या घरांत तूं राहा. तूं सरस्वती

आणि पूर्वज यांना वंदन कर.

या वधूसाठीं मृगचर्माचें मंगल आसन आणि संरक्षण देऊन भग-देवता प्रसन्न होते. हे सिनीवाली, ही स्त्री प्रजा उत्पन्न करण्यास समर्थ आहे. लव्हाळ्याचें गवत खालीं घालून त्यावर मृगचर्म असलेल्या आसनावर पुत्रकामा व पतिकामा वधू बसते. ही प्रजावती स्त्री या आसनावर बसून अग्नीची पूजा करते. त्या निमित्ताने अग्नीच्या जवळ बसते. कारण अग्नी दुष्कृत्य करणाऱ्या सर्व राक्षसांचा संहार करण्यास समर्थ आहे. तूं या घरामध्यें पुत्राला जन्म दिलास म्हणजे तुला प्रजावती आणि पुत्राला ज्येष्ठ-पुत्र असें संबोधण्यांत येईल. त्या प्रजावतीला अनेक पुत्र होतील आणि ते तिच्या अंगावर खेळतील. हे स्त्रिये अग्नीच्या जवळ बसून तूं या ऐश्वर्यानें शोभायमान हो. कल्याणमयी, पतीला सुख देणारी, घरांतील सर्व कामें अकांक्षपणें करणारी, सासू आणि सासरा यांना सुखांत ठेवणारी ही स्त्री आपल्या पुत्रांचें पोषण करते. ह्या कल्याणमयी वधूचें दर्शन दुर्भाग्याला बाजूला सारून सौभाग्याचा वर्षाव करणारें आहे. वृद्ध स्त्रिया या वधूला आपलें तेज प्रदान करून निघून जातात. उत्तमरीतीनें सजविलेल्या बिछान्यावर ज्याप्रमाणें सूर्यादेवी आरूढ झाली त्याप्रमाणें या सुंदर पलंगावर ही वधू आरूढ होवो. हे स्त्रिये, या पर्यंकावर आरूढ होऊन आपल्या पतिसमवेत तूं प्रजावती हो. तूं प्रसन्न मनानें रात्र व्यतीत करून उष:कालात जागी हो. सूर्यादेवीप्रमाणें पतिसंगमानें तूं पुत्रवती हो. हे विश्ववसो, आम्ही तुम्हाला नमस्कार करतो आणि स्तुतीही करतो. पतिगृहीं जाण्याची इच्छा करणारी स्त्री प्राण्यांना प्रसन्न करते. असे प्रसन्न प्राणी ज्या ठिकाणीं राहतात त्या ठिकाणीं केलेल्या यज्ञाच्या आणि सूर्याच्या दर्शनानें अप्सरा देखील प्रसन्न होतात. हे अप्सरांनो, गंधर्वांबरोबर गमन करणाऱ्या तुम्हाला आमचें वन्दन असो. गंधर्वांच्या क्रोधदृष्टीला आमचा नमस्कार असो. हे विश्वावसो, आमच्या नमस्काराचा तूं स्वीकार कर आणि या स्त्रीला अप्सरांपासून दूर ठेव. गंधर्व ऊर्ध्वगामी आहेत. देवता त्या स्थानापर्यंत जातात. त्या ठिकाणी जाणाऱ्यांचें आयुष्य विस्तृत होतें. तुमच्या प्रसन्नतेनें आम्ही देखील त्या स्थानीं पोहोचलों आहोत. हे पति-पत्नी माता-पिता होण्यासाठीं ऋतुकाल साधून एकत्र येवोत. पतीच्या वीर्यानें तुम्हा

दोघांना माता-पित्याचा लाभ होईल. हे पूषन्, ज्या स्त्रीच्या ठिकाणीं पुरुष बीज स्थापित करतां येईल अशा स्त्रीला आपलें अंग मुक्त करून प्रजोत्पादन कर्मासाठीं प्रेरणा दे. सविता या दोघांना प्रजोत्पादन सामर्थ्य आणि दीर्घायुष्य प्रदान करील. त्यामुळें स्त्रीला जाया होतां येईल. (जायते पुनरपि पति यस्मिन् सा जाया– पती पुत्राच्या रूपानें जिच्या ठिकाणीं जन्म घेतो तिला जाया म्हणतात) अर्यमा तुम्हाला रात्रंदिवस एकत्र आणून प्रसन्न ठेवील. हे स्त्रिये, तूं अमंगलापासून बाजूला राहून या गृहामध्यें प्रवेश कर आणि मानव, पशु आणि पक्षी या सर्वांना सुख प्रदान करणारी हो.

देवतांनीं मनूच्या मध्यस्थीनें या वधूला वस्त्र दिलें. ते वस्त्र राक्षसांचा नाश करण्यास समर्थ आहे. हे बृहस्पते, इंद्र आणि ब्रह्मा यांनीं तुझ्या सम्मतीनें हे वरणीय वस्त्र मला प्रदान केलें. आम्ही दोघे त्यामुळें प्रसन्न आणि सुखपूर्ण झालों. आम्हाला उत्तम गती प्राप्त होईल. आमची प्रजा संपन्न राहील. आम्ही उषा समयास जागृत होतो. त्या वेळीं मी शोभिवंत अलंकार धारण करून उषेचें स्वागत करीन. पक्ष्यांची पिलें ज्याप्रमाणें अंड्यातून बाहेर पडतात त्याप्रमाणें आम्ही पापाच्या बंधनांतून मुक्त होऊ. आकाश आणि पृथ्वी यांच्यामध्यें चेतन आणि अचेतन असे अनेक जीवमात्र वास करतात. या भागांत प्रवाहित होणाऱ्या सात प्रकारच्या जलप्रवाहांमुळें हे सर्व जीव पापापासून मुक्त होवोत. सूर्यादेवी, अन्य देवतागण, मित्र वरुणादि देव सर्व भूतमात्रांना जाणणारे आहेत. त्यांना आमचा नमस्कार असो. सर्व इंद्रियांना जोडणारा इंद्र महान गुणसंपन्न असून तो प्राण्यांचे अवयव एकमेकांला जोडून सुशोभित करतो. आमची अंध:कारापासून मुक्तता होवो. अंध:कार आमच्यापासून दूर जावो. त्याचप्रमाणे निळा, पिवळा, तांबडा, धूसर रंगयुक्त, भस्म करणारी शक्ति या खांबाला बद्ध करण्यांत आली आहे. उपासनेच्या सर्व क्रियांमध्यें, वरुणाचे सर्व पाश, वर्धितक्रोध आणि अकिंचनता यांना मी खांबाला बांधून ठेवतो. हे वनस्पते, माझें हे प्रिय शरीर या वस्त्रानें सुशोभित झालें आहे. त्या शरीराची तूं हिंसा करूं नको.

धागा, किनार आणि आंचळ्या यांच्यासहित माझ्या पत्नीनें

तयार केलेलें हें वस्त्र आम्हाला सुखद स्पर्श करणारें आहे. पितृगृहातून पतीगृहाकडे गमन करणारी, इच्छुक वधू आपल्या पितृगृहींच्या सर्व दीक्षा (पितृ परंपरेनें करावयाचे विधी) त्याग करते. वृहस्पतीच्या ह्या औषधी वनस्पतींना विश्वेदेवानें समृद्ध केलें. गाईंना प्रसन्नता लाभावी म्हणून आम्ही ती वनस्पती गाईंना प्रदान करतो. त्यायोगें गाईचें तेज वाढतें, गाई पुष्ट होतात आणि त्यामुळें आमचें भाग्य उजळतें. यश प्राप्त होतें. ही वनस्पती जेव्हां गाईच्या दुधांत मिसळली जाते त्या वेळीं ती आम्हां उभयतांना सुख देणारी होते. कन्या ज्या घरांतून आपल्या पती-कडे जाते त्या वेळीं त्या घरातले पाप सविता नष्ट करतो आणि घरातील अन्य सर्वांना अग्नि पापमुक्त करतो.

कन्या घरांतून गेल्यावर तिच्या वहिणी आणि अन्य स्त्रिया दुःखित मनानें घरांत वावरतात. यांना सविता देव आणि अग्नि मुक्त करो. त्याचप्रमाणें घरांतील पुत्रपौत्रादि संतान आणि पशु-पक्षी यांना दुःख देणाऱ्या शक्तीपासून अग्नि आणि सविता मुक्त करोत. सर्वांचा त्याग करणारी वधू आपल्या पतीला शतवर्षांचें दीर्घायुष्य लाभण्याची इच्छा करते. हे इंद्रा, चक्रवाक पक्ष्याप्रमाणें या दांपत्यामध्यें प्रीति नांदो. यांचे घर सुन्दर वस्तूंनीं आणि संततीनें भरून जावो. त्यांना जन्मभर विविध भोग भोगण्यास मिळोत. विवाहामध्यें ज्यांनीं अडथळे निर्माण केले आणि अशुभ इच्छा मनांत धारण केल्या त्या सर्व पापांना वंदिस्त करण्यांत येवो. विवाहसमयीं कन्येला आणि वराला ज्या परितोष वस्तू दिल्या त्यामध्यें जो दोष असेल तो या कांवळ्यामध्यें वद्ध केला आहे. त्यामुळें यज्ञकर्ता यजमान शुद्ध झाला. देव आतां त्याला दीर्घायुषी करतील. शरीराच्या प्रत्येक अंगाअंगामध्यें असलेला दोष दूर करील. पृथ्वी, आकाश, अंतरीक्ष, देवगण आणि सर्व जलप्रवाह विविध दोषां-पासून मुक्त होतील. हे अग्ने, आमचे पितर आणि त्यांच्या देवता यांना देखील या दोषापासून मुक्तता लाभावी. हे प्रिय-जाये, दुधाप्रमाणें सर्व सारतत्त्व आणि औषधींच्या रसतत्त्वानें तूं प्रजा आणि धनानें संपन्न होऊन धनप्रदायिनी होशील.

हे जाये, मी साम असून तूं ऋक् आहेस. मी आकाश आणि तूं

पृथ्वी आहेस. मी विष्णू व तूं लक्ष्मी असून आपण दोघें एकमेकांच्या सहवासांत राहूं आणि प्रजासंपन्न होऊं. आम्हां दोघांना नद्या साथ करोत. आम्हाला मंगलमय आणि दान करणारा पुत्र लाभो. आम्हां दोघांना उत्तम व विपुल अन्नाची प्राप्ती व्हावी. आमची कोणीं हिंसा करूं नये. म्हणून आम्ही एकत्र राहतो. वधूला दिलेल्या वस्तूंच्या जवळ आलेले पितर या वधूला शीलवती, प्रजावती आणि कल्याणवती करोत. या वधूचें ऐश्वर्य सतत वाढो. हे वधू तूं जागीं हो आणि दीर्घायुष्यासाठीं सतत जागी राहा. गृहपत्नी होऊन तूं घराचा आश्रय कर. सविता देव तुला दीर्घायुषी जीवन प्रदान करो. (वधूला दिलेला हा एक मंगल आशीर्वाद आहे)

प्र बुध्यस्व सुबुधा बुध्यमाना ।
दीर्घायुत्वाय शतशारदाय ।
गृहान् गच्छ गृहपत्नी यथासो ।
दीर्घं त आयुः सविता कृणोतु ।।



# पंचदश काण्ड

## १. अध्यात्मम्

व्रतधारी समूहपतीनें प्रजापतीला प्रेरणा दिली. प्रजापतीला स्वतःच्या आत्म्याचें दर्शन झालें. त्यामुळें त्याला प्राप्त झालेल्या सामर्थ्यानें त्यानें सर्वांना निर्माण केलें. त्यामुळें प्रजापती सर्वांत श्रेष्ठ, महान, सर्वांना आवडणारा, ब्रह्मवर्चस्वी, तपोधन आणि सत्यकर्मा झाला. त्याच्यामुळेंच हे सर्व उत्पन्न झालें. तो सर्व देवतांचा स्वामी आणि ईशान म्हणून प्रतिष्ठित झाला. या उत्पन्न वस्तूंच्या समूहपतीनें जें धनुष्य उचललें त्याला इंद्रधनु म्हणून मान मिळाला. या इंद्रधनूचें पोट निळें आणि पाठ लाल वर्णाची आहे. इंद्र शत्रूला या निळ्या रंगाच्या बाजूनें घेरतो आणि लाल बाजूनें त्याला विदीर्ण करतो असा ब्रह्मवादी प्रज्ञावंतांचा अनुभव आहे.

## २. अध्यात्मम्

हा व्रतधारी पूर्व दिशेकडे जाऊं लागला. बृहत् व रथंतर साम, सूर्य आणि अन्य देवतादेखील त्याच्या पाठीमागून जाऊं लागल्या. अशा प्रज्ञावंतांची निंदा करणारा, बृहत् रथंतर साम, सूर्य आणि विश्वेदेव यांची हिंसा करतो. कारण या सर्वांनी पूर्व दिशेला आपली निवासस्थानें स्थिर केली. श्रद्धा, पुंश्चली, मंत्र, विज्ञान, दिन, रात्र, केश, मागध व

कल्मणी ही त्यांचीं भूषणें आहेत. मातरिश्वा, पवमान, विपथवाह, रेष्मा, क्रीडा आणि वायु सारथी झाले. कीर्ती आणि यश पुरोहित झालें. याचें ज्ञान असणारे विद्वान कीर्ति आणि यशाचे स्वामी होतात.

हा व्रतधारी समूहप्रमुख दक्षिणेच्या वाजूस जाऊं लागला. त्याच्या मागून यज्ञीय, यज्ञ, साम, यजमान, पशु वामदेव्य चालू लागले. या व्रतधारी प्रज्ञावंताचे निंदक यज्ञीय, यज्ञ, साम, यजमान, पशु व वामदेव्य यांची हिंसा करणारे असतात. कारण या सर्वांनीं दक्षिणेस स्वतःला प्रिय वाटणारी निवासस्थानें निर्माण केली. विज्ञान, वस्त्र, दिन, रात्र, उषा, पुंश्चली, मंत्र, मागध आणि हरितप्रवर्त कल्मणी ही यांची भूषणें आहेत. अमावास्या, पौर्णिमा परिष्कन्द, मन, मातरिश्व, पवमान, विपथ-वाह यांचे सारथी झाले. रेष्मा प्रतोद झाली. कीर्ति, यश यांच्या पुढें जाणारे झाले. याचें ज्ञानी पुरुष कीर्ती आणि यश यांचे स्वामी झाले.

हा व्रतधारी पश्चिम दिशेला चालू लागला त्या वेळीं, जल, वरुण, वैरूप आणि वैराज त्याच्या पाठोपाठ जाऊं लागले. यांचे निंदक, जल, वरुण, वैराज आणि वैरूप यांचे अपराधी आहेत. या सर्वांनीं स्वतःला प्रिय असणारी निवासस्थानें पश्चिम दिशेला स्थिर केली. पृथ्वी, पुंश्चली, वस्त्र, विज्ञान, दिन, रात्र हास्य, मागध, हरित्प्रवर्त, कल्मणी ही आभूषणें आहेत. मातरिश्वा, पवमान, विपथवाह, हे सारथी झाले आणि रेष्मा प्रतोद (चाबूक) झाली. कीर्ती आणि यश यांच्या पुढें जाणारी आहेत. हे जो जाणतो तो कीर्ती आणि यश यांचा स्वामी होतो.

हा व्रतधारी समूहस्वामी उठला आणि उत्तर दिशेला जाऊं लागला. सप्त ऋषी, सोम, श्यैत आणि नौधस त्याच्या मागोमाग चालू लागले. यांचा निंदक हा अपराधी आहे. उत्तर दिशेकडे या सर्वांना आपल्याला प्रिय वाटणारी निवासस्थानें तयार केली. विद्युत, पुंश्चली, विज्ञान, वस्त्र, दिवस, रात्र, स्तनायित्नु, मागध, हरितप्रवर्त आणि कल्मणी ही यांची भूषणें आहेत. श्रुत व विश्रुत देखील यांची भूषणें होत. वात हा यांचा सारथी असून रेष्मा चाबूक आहे. मातरिश्वा, पवमान, विपथवाह होतात. कीर्ती आणि यश यांच्या पुढें चालत असतात. हे ज्ञान ज्याला आहे तो यश आणि कीर्ति यांचा स्वामी होतो.

३. व्रतधारी समूहस्वामी एक वर्षभर उभा राहून तप करीत होता तेव्हां देवतांनी त्याला विचारलें कीं तूं तप कां करीत आहेस. तेव्हां तो म्हणाला माझ्यासाठीं एक आसन (सिंहासन) तयार करा. तेव्हा देवांनीं त्याच्यासाठी आसन तयार केलें. त्याला चार पाय होते. वसन्त आणि ग्रीष्म हे त्या आसनाचे पुढचे पाय बनले आणि शरद व वर्षा ऋतु त्याचे पाठीमागील पाय बनले आहेत. बृहत् आणि रथंतर साम पुढचा दर्शनीय भाग झाला. वामदेव्य आणि यज्ञायज्ञीय साम पाठीमागचे भाग झाले. ऋचा आणि प्रांच लंब भाग आणि यजुर्वेदमंत्र तिरके भाग बनले. वेद हे सिंहासनावरील मऊ बैठक (गादी) आणि ब्रह्म आच्छादन बनलें. साम आसन आणि उद्गीथ त्याचा आश्रय झाले. अशा सजविलेल्या सिंहासनावर हा व्रतधारी आरूढ झाला. देवता त्याच्या सेवक बनल्या. सत्य, संकल्प दूत आणि सर्व प्राणिमात्र परिवार झाला. या सर्वांचें ज्ञान ज्याला आहे तो सर्व भूतांचा आश्रय होय.

४. वसन्त ऋतूचे मधु, माधव (चैत्र, वैशाख) या दोन महिन्यांना देवतांनीं पूर्व दिशेचे रक्षक म्हणून नियुक्त केले. बृहत् आणि रथंतर साम अनुष्ठान करणारे, म्हणून नियुक्त केले. या सर्वांचें ज्याला ज्ञान आहे त्याला पूर्व दिशेकडून संरक्षण प्राप्त होतें आणि वसन्त ऋतूचे दोन्ही महिने आणि दोन्ही साम त्याला अनुकूल होतात.

ग्रीष्म ऋतूचे शुक्र, शुचि (ज्येष्ठ,आषाढ) या दोन महिन्यांना देवतांनीं दक्षिण दिशेचे रक्षक म्हणून नियुक्त केले. यज्ञायज्ञीय आणि वामदेव्य हे अनुष्ठाते झाले. हे जो जाणतो त्याला दक्षिण दिशेकडून संरक्षण मिळते आणि ग्रीष्म ऋतूचे दोन्ही महिने आणि यज्ञायज्ञीय व वामदेव्य साम याला अनुकूल होतात.

वर्षा ऋतूचे नभ आणि नभस्य (श्रावण, भाद्रपद) ह्या दोन महिन्यांना पश्चिम दिशेचे रक्षक केले. वैरूप आणि वैराज हे अनुष्ठाते झाले. याचें ज्याला ज्ञान आहे त्याला पश्चिम दिशेकडून संरक्षण मिळतें. वर्षा ऋतूचे दोन महिने, वैरूप व वैराज हे साम त्याला अनुकूल होतात.

शरद् ऋतूचे इष, ऊर्ज (आश्विन, कार्तिक) या दोन महिन्यांना देवतांनी उत्तर दिशेचे रक्षक म्हणून नियुक्त केले. नौधस आणि श्यैत–

साम हे अनुष्ठान कर्तें झालें. हें ज्ञान ज्या पुरुषाला आहे त्याचे उत्तर दिशेकडून संरक्षण होतें. दोन्ही साम आणि शरदाचे दोन्ही महिनें त्याला अनुकूल होतात.

हेमन्त ऋतूचे सह व सहस्य (मार्गशीर्ष, पौष) या दोन महिन्यांना अधर दिशेचे रक्षक म्हणून देवतांनी नियुक्त केले. पृथ्वी आणि अग्नि यांना अनुष्ठाते म्हणून नियुक्त केले. हें ज्ञान ज्याला आहे त्याला अधर दिशा आणि हेमंत ऋतूचे दोन महिने संरक्षण देतात. पृथ्वी आणि अग्नि त्याला अनुकूल होतात.

शिशिर ऋतूचे तप व तपस्य (माघ, फाल्गुन) या दोन महिन्यांना देवतांनीं ऊर्ध्व दिशेचे रक्षक म्हणून नियुक्त केले. आकाश आणि सूर्य अनुष्ठाते झाले. या गोष्टीचें ज्ञान ज्याला आहे त्याचें शिशिर ऋतूचे दोन्ही महिने ऊर्ध्व दिशेकडून संरक्षण देतात. सूर्य आणि आकाश त्याला अनुकूल होतात.

५. पूर्व दिशेच्या कोंपऱ्यांतून (आग्नेय) बाण सोडणाऱ्या भवाला देवतांनीं त्याचें अनुष्ठान करायला लावलें. त्यामुळे भव पूर्व दिशेच्या लोकांना अनुकूल होतो. इतकेच नव्हे तर भव, शर्व, आणि ईशान देखील त्याला अनुकूल होतात. याचें ज्ञान ज्याला आहे असा पुरुष सामान्य पुरुषांना आणि पशूंना बाण संधान करून, मारूं शकत नाहीं.

दक्षिण दिशेच्या कोपऱ्यांतून (नैर्ऋत्य) बाण संधान करणाऱ्या शर्व नामक देवतेला, अन्य देवतांनीं अनुष्टक बनविलें, हे जाणणाऱ्या पुरुषाला शर्व, आग्नेय दिशेमध्यें अनुकूल होतो आणि तो अन्य पुरुष आणि पशूनां ठार मारीत नाहीं.

पश्चिम दिशेच्या कोपऱ्यांतून (वायव्य) बाण सोडणाऱ्या पशुपतीला देवतांनी अनुष्ठाता म्हणून नियुक्त केलें. हे ज्ञान असणाऱ्या माणसाला आग्नेय दिशा अनुकूल होते. त्याच्यासारखे पुरुष आणि पशु यांची तो हिंसा करीत नाही,

उत्तर दिशेच्या कोंपऱ्यांतून (ईशान्य) बाण प्रक्षेपण करणाऱ्या उग्रदेवाला देवतांनी अनुष्ठक केलें. हे जाणणाऱ्या पुरुषाला उग्रदेव आणि ईशान्य दिशा अनुकूल होते. अशा पुरुषांची आणि पशूंची तो हिंसा

करींत नाहीं.

पृथ्वीरूपी अधर दिशेच्या अंतरांतून बाण प्रक्षेपण करणाऱ्या रुद्र देवतेला देवतांनी अनुष्ठाता म्हणून नियुक्त केले. हे जाणणाऱ्या पुरुषाला रुद्र देवता आणि अधर दिशा अनुकूल होतात. अशा पुरुषाची आणि पशूंची तो हिंसा करीत नाहीं.

ऊर्ध्व दिशेला बाण क्षेपण करणाऱ्या महादेवाची देवतांनी अनुष्ठाता म्हणून नियुक्ति केली. हा महादेव अशा प्रकारें आहे याचें ज्ञान असलेल्या पुरुषाला महादेव आणि ऊर्ध्व दिशा अनुकूल होतात. अशा पुरुषाची आणि पशूंची तो हिंसा करीत नाहीं.

सर्व दिशांना बाण क्षेपण करणाऱ्या ईशान देवतेची देवांनी अनुष्ठाता म्हणून नियुक्ती केली. ह्या सर्व दिशा आणि ईशान यांना जाणणाऱ्या पुरुषाला सर्व दिशा आणि ईशान अनुकूल होतात. वृद्ध पुरुषाची आणि पशूंची हिंसा तो करीत नाहीं इतकेंच नव्हे तर भव आणि शर्व या देवतासुद्धां ह्याला नष्ट करूं शकत नाहींत.

६. व्रतधारी अधर दिशेच्या रोखाने जाऊ लागला तेव्हां, पृथ्वी, अग्नि, औषधी वनस्पती, आणि औषधीय वनस्पती त्याला अनुसरुन जाऊं लागल्या. तो ऊर्ध्व दिशेला जाऊं लागला तेव्हां सूर्य, चंद्र, नक्षत्र, ऋत आणि सत्य त्याच्या मागून जाऊं लागले. तो उत्तम दिशेला जात असतां साम, यजुस् वेदांच्या ऋचा आणि ब्रह्मा त्याच्या मागून जाऊं लागले. तो बृहती दिशेला जाऊं लागला तेव्हा पुराण, इतिहास आणि मनुष्यांच्या आचार गाथा त्याच्या मागून जाऊं लागल्या. त्याने परम दिशेला प्रस्थान ठेविलें त्यावेळीं आहवनीय, गार्हपत्य, आणि दक्षिणाग्नि त्याच्याबरोबर चालू लागले आणि यज्ञ यजमान, पशु त्याच्या मागून जाऊं लागले. तो अनादिष्ट दिशेकडे जाऊं लागला. तेव्हां सर्व ऋतु, मास, पक्ष, दिवस, रात्र आणि विविध पदार्थ त्याच्या मागून जाऊं लागले. त्यानें अनावृत्त दिशेला गमन केलें परंतु त्या ठिकाणीं जाणें त्याला रुचलें नाहीं. त्याच्या मागून इडा, इंद्राणी, दिती आणि अदिती यांनींही गमन केलें. त्यानें पुन्हा सर्व दिशांना जाण्यास प्रारंभ केला तेव्हां विराटादि देवता अनुगामी झाल्या. त्यानें अंतर्दिशेकडे गमन केलें

त्या वेळीं प्रजापती, परमेष्ठी, पिता आणि पितामह त्याच्या मागून गेले. ह्या सर्व गोष्टीचें ज्ञान ज्या पुरुषाला आहे त्याला त्या त्या देवता, ते ते पदार्थ आणि त्या त्या अवस्था आपल्या स्वतःच्या घराप्रमाणें साथ देतात. तो त्या देवतांचा होतो.

७. हा व्रतधारी पृथ्वीच्या अंतापर्यंत गेला आणि स्वतःच समुद्र झाला. प्रजापती, परमेष्ठी, पिता, पितामह, जल आणि श्रद्धा वर्षारूपानें त्याला अनुसरू लागले. याचे ज्ञान असणारा पुरुष या सर्वांचा आवडता होतो. तेव्हां लोक, यज्ञ, अन्न, अन्नादि पदार्थ आणि श्रद्धा मूर्त रूप धारण करून त्याच्या चारही बाजूला उपस्थित होतात. हे सर्व ज्ञात असलेल्या मनुष्याला, यज्ञ, अन्न आणि लोक यांची प्राप्ती होते.

८. हा व्रतधारी प्रजेचें रंजन करूं लागल्यानें तो राजा झाला. तो प्रजेचा सखा म्हणून वागूं लागला. अन्न आणि अन्य पदार्थ यांना तो अनुकूल झाला. हे ज्ञात असणारा मनुष्य या सर्वांचा आवडता होतो आणि त्याला ते आपले घरच वाटतें.

९. त्यानें प्रजेशीं अनुकूल असा व्यवहार केला. सभा, समिती, सेना आणि सुरा ही त्याला अनुकूल झालीं. हे माहीत झाल्यानें मनुष्याला त्या सर्वांचे प्रियत्व लाभतें.

१०. हा व्रतधारी ज्या राजाकडे जातो त्या राजांचा तो अतिथी होतो. राजा त्याचें आदरातिथ्य करतो. त्यामुळें राष्ट्र आणि क्षात्रशक्ती नष्ट होत नाहींत. ब्राह्मतेज आणि क्षात्रतेज यांनीं विचारलें कीं आम्ही कोणाचा आश्रय करावा. त्याला त्यांनी सांगितलें कीं ब्राह्मतेज बृहस्पतीमध्यें आणि क्षात्रतेज इंद्रामध्यें समाविष्ट होऊं दे. त्याप्रमाणें ब्राह्मतेज बृहस्पतीमध्यें आणि क्षात्रशक्ती इंद्रामध्यें प्रवेश करून स्थिरावली. आकाश इंद्र असून पृथ्वी बृहस्पती आहे. आदित्य क्षात्रतेज आहे आणि अग्नि ब्राह्मतेज आहे. जो कोणी पृथ्वीला ब्रह्मतेज म्हणून आणि अग्नीला ब्रह्म म्हणून जाणतो त्याला ब्रह्मबल आणि ब्रह्मवर्चस्व प्राप्त होतें. त्याचप्रमाणें जो आदित्याला क्षत्र आणि द्यौ–इंद्र आहे असें जाणतो त्याला सुदृढ इंद्रियें प्राप्त होतात.

११. हा व्रतधारी ज्या घरामध्यें जाईल त्या ठिकाणीं तो अतिथी

म्हणून गौरविला जातो. त्याला आसन प्रदान करून पृच्छा करावी. हे व्रात्य, तूं कोठें राहतोस. आमच्या घरांतील हे पाणी तुला संतुष्ट करील. तुला ज्याप्रमाणें आवडेल, त्याप्रमाणें तूं या ठिकाणीं स्वस्थचित्तानें राहा. तुला देवयान मार्ग सुलभ झाला आहे. हे पाणी तूं स्वतःसाठीं घे. आमच्या घरांतील सर्व व्यक्ती तुला प्रसन्न करतील. आणि आपले प्राण ते तुझ्यावरून ओवाळून टाकतील. तुला जें प्रिय वाटेल त्या प्रिय कार्यांत तुला अडथळा न होवो. तुला सर्व कांहीं वश आहे. हे ज्ञान असलेल्या माणसाचें अभीष्ट त्याला प्राप्त होतें.

१२. अग्निहोत्राच्या वेळीं (सकाळी व संध्याकाळीं) अग्नि प्रज्वलित केला असतां विद्वान व्रतधारी घरीं आल्यास यजमानानें स्वतः आसनावरून उठून त्याचा आदर करावा आणि विनवावें की हे व्रतधारी पुरुषा, मला यज्ञ करण्याची आज्ञा दे. त्या अतिथीनें आज्ञा दिल्यास प्रज्वलित अग्नीत आहुती देऊन यज्ञ करावा. परंतु त्यानें आज्ञा दिली नाहीं तर यज्ञ करूं नये. अशा विद्वान व्रतपालक पुरुषानें आज्ञा दिल्यानंतर जो आहुती देऊन यज्ञ करतो त्याला पितृयान आणि देवयान मार्गांचें ज्ञान प्राप्त होते. त्यानें प्रदान केलेली आहुती देवतांना प्राप्त होते. अशा प्रज्ञावंत व्रतधारी पुरुषाच्या आज्ञेनें जो आहुती देतो तो सर्व लोकांमध्ये सन्मान पावतो. परंतु व्रतधारी पुरुषानें आज्ञा दिली नसतां जो 'आहुती प्रदान करून यज्ञ करतो त्याला देवयान अगर पितृयान मार्गाचें ज्ञान होत नाहीं. त्यानें दिलेली आहुती व्यर्थ होते आणि देवता ती आहुती नष्ट करतात. त्यामुळें यज्ञकर्ता देखील नाश पावतो.

१३. असा विद्वान व्रतपालक पुरुष ज्याच्या घरीं रात्रीच्या वेळीं अतिथी म्हणून येतो, तो यजमान पृथ्वीवरील सर्व पुण्यकारक आणि पुण्यशील वस्तूंचा स्वामी होतो. ज्याच्या घरी असा विद्वान संयमी पुरुष दुसऱ्या दिवशीदेखील अतिथी म्हणून वास करतो या यजमानाला अंतरीक्षांतील सर्व पुण्यवंत वस्तूंचा लाभ होतो व तो त्यांचा स्वामी होतो. तृतीय रात्रींसुद्धां असा विद्वान व्रतधारी पुरुष ज्या यजमानाकडे

(टीप– ज्ञानेश्वरी अध्याय ८, ओव्या २२० ते २३७ पाहाव्यात, अर्चिरा व धूम्र मार्ग म्हणजेच देवयान व पितृयना मार्ग असें समजावें)

अतिथी म्हणून वसती करील तो त्याच्या पुण्याईमुळें आकाशांतील सर्व पुण्यवंतांना जिंकतो आणि आपलेसें करतो. चौथ्या दिवशीं जर तो विद्वान अतिथी यजमानाकडे राहिला तर त्या यजमानाला सर्व पुण्य-लोकाची द्वारे मुक्त होतात. ज्याच्या घरीं असा विद्वान पुरुष अनेक रात्री अतिथी म्हणून वास करतो त्याला पुण्यवंत लोकांची द्वारें मुक्त होतात. ज्याच्या घरीं व्रतधारी नसलेला पुरुष व्रतधारी होण्यासाठीं प्राप्त झाला तर त्याला घालवून देणें उचित होणार नाहीं. त्या पुरुषाला अतिथी समजून आसन, अर्घ्य, पाद्य आणि आहार प्रदान करून त्याची सेवा करावी आणि त्याला आपल्या घरांत वसती करण्यासाठीं जागा द्यावी. (परंतु अज्ञानी किंवा न शिकलेला अतिथी जरी प्राप्त झाला तरी उपरोक्त परंपरेप्रमाणें त्याचा सन्मान करावा.) हें अतिथी सन्मानाचें ज्ञान ज्याला आहे त्यानें यज्ञ करतांना प्रदान केलेल्या आहुती त्या त्या देवतांना प्राप्त होतात.

१४. हा व्रतवान पुरुष पूर्व दिशेला निघाला तेव्हां स्वतः सामर्थ्य-संपन्न होऊन, आपले आयुष्य आपल्याला अनुकूल व्हावें म्हणून स्वतःच्या मनाला जीवनरक्षक केलें. याचें ज्ञान ज्याला आहे केवळ जीवनासाठीं अन्न भक्षण करतो. ज्या वेळीं दक्षिण दिशेला जाऊं लागला त्यानें बलाला जीवनरक्षक बनवून आणि स्वतः इंद्ररूपानें त्यानें गमन केलें. याचें ज्ञान असलेला मनुष्य बलासाठीं अन्न सेवन करतो. जेव्हां तो पश्चिम दिशेला जाऊं लागला त्या वेळीं पाण्याला त्यानें जीवनरक्षक केलें आणि स्वतः वरुणरूपानें त्यानें गमन केलें. या गोष्टीचें ज्ञान असणारा मनुष्य जीवन-रक्षणार्थ पाणी आणि अन्न यांचा आश्रय करतो. ज्या वेळीं तो उत्तर दिशेला निघाला त्या वेळीं त्या ठिकाणीं वास करणाऱ्या सहा ऋषींनीं प्रदान केलेल्या आहुतीला जीवनरक्षक बनवून स्वतः सोम होऊन तो चालूं लागला. या गोष्टींचा ज्ञाता पुरुष या आहुतींच्या सामर्थ्यामुळे अन्न सेवन करतो. ज्या वेळीं तो अधर दिशेच्या रोखानें जाऊं लागला. तेव्हां तेव्हां तो विराटाला जीवरक्षक बनवून स्वतः विष्णू झाला आणि मग त्यानें गमन केलें. या गोष्टीचा ज्ञाता पुरुष विराटसामर्थ्यानें अन्नाचा आस्वाद घेतो.

जेव्हां हा व्रतवान पुरुष पशूंकडे जावूं लागला त्या वेळीं सर्व औषधी वनस्पती त्याच्या जीवनरक्षक झाल्या. तो स्वतः रुद्र होऊन चालूं लागला. या गोष्टीचें ज्याला ज्ञान आहे त्याला सर्व औषधीमय (निरोगी) अन्न प्राप्त होतें. पितरांकडे जातांना स्वधा त्याची रक्षणकर्ती झाली आणि तो स्वतः यम झाला. याचें ज्ञान असणाऱ्या मनुष्यास स्वधापूर्ण अन्नाची प्राप्ती होते. मनुष्यांकडे ज्या वेळीं तो गेला तेव्हां स्वाहा रक्षणकर्ती झाली आणि तो स्वतः अग्निरूपानें चालूं लागला. हे जाणणाऱ्या मनुष्यास यज्ञीय अन्नाचा लाभ होतो. ऊर्ध्व दिशेला जातांना तो स्वतः बृहस्पती झाला आणि यज्ञीय वषट्कार त्याचा रक्षक बनला. हे जाणणारा मनुष्य यज्ञीय अन्नाचा स्वामी होतो. देवतांकडे ज्या वेळीं त्यानें गमन केलें तेव्हां यज्ञ हा त्याचा जीवनरक्षक झाला आणि तो स्वतः ईशान होऊन चालू लागला. हे ज्ञात असणाऱ्या मानवाला यज्ञद्वारा संपन्न अन्नाचा लाभ होतो. तो प्रजेकडे गेला तेव्हां प्राणाने त्याचें रक्षण केलें. तो स्वतः प्रजापती झाला. हें ज्ञात असलेल्या पुरुषाला प्राणमय अन्नाचा लाभ होतो. ज्या वेळीं तो अंतर्देशाच्या रोखानें जावूं लागला तेव्हांही तो प्रजापती होऊन चालूं लागला. ब्रह्म त्याचा जीवरक्षक बनला. अशा प्रकारचें ज्ञान असणाऱ्या मनुष्यास ब्रह्माच्या प्रसन्नतेनें अन्नाची प्राप्ती होते आणि तो तेंच अन्न सेवन करतो.

१५. या व्रतधारी पुरुषाचे सात प्राण, सात अपान आणि सात व्यान आहेत.

त्याच्या पहिल्या प्राणाला ऊर्ध्व असें म्हणतात तो प्राण अग्नि आहे. दुसरा प्राण प्रौढ असून त्याला आदित्य म्हणतात. तृतीय प्राण अभ्यूढ नांवाचा असून तो चंद्र आहे. चतुर्थ प्राण विभू असून तो पवमान आहे. पांचवा प्राण योनी असून तें उदक आहे, सहावा प्राण प्रिय नामक असून तो पशु आहे. सातवा प्राण अपरिमित या नांवानें ओळखला जातो आणि त्यास प्रजा अशी संज्ञा आहे.

१६. या व्रतधारी पुरुषाच्या प्रथम अपानाला पौर्णिमा असें म्हणतात. द्वितीय अपानाला अष्टका व तृतीय अपानाला अमावस्या असें म्हणतात. त्याचा चतुर्थ अपान म्हणजे श्रद्धा, पंचम अपान ही दीक्षा, सहावा अपान

हा यज्ञ आणि सातवा अपान ही त्या यज्ञांतील दक्षिणा होय.

१७. या व्रतधारी पुरुषाचा प्रथम व्यान म्हणजे ही भूमी, द्वितीय व्यान म्हणजे अंतरीक्ष, तृतीय व्यान म्हणजे द्यु-लोक, चतुर्थ व्यान म्हणजे नक्षत्रें, पंचम व्यान म्हणजे ऋतु, सहावा व्यान म्हणजे स्त्रियांची पुष्पितावस्था आणि सातवा व्यान हे संवत्सर आहे. देवगण या प्रकारच्या लाभाचे स्वामी होतात. त्या वेळी ऋतु आणि संवत्सर त्यांचें अनुकरण करतात. अमावास्या आणि पौर्णिमा आदित्यामध्यें प्रवेश करतात. त्या समयीं प्रदान केलेली एक आहुतीसुद्धां अविनाशी होते.

१८. या व्रतधारी पुरुषाच्या शरीरातील अवयव देवतारूप आहेत. त्याचा उजवा नेत्र म्हणजे सूर्य असून डावा नेत्र हा चंद्र होय. त्याचा उजवा कान म्हणजे अग्नि असून डावा कान हा पवमान आहे. त्याच्या नासिकेची दोन छिद्रे म्हणजे दिवस आणि रात्र आहेत. मस्तक दिती असून कपाळ अदिती आहे. शिर हे संवत्सर आहे. हा व्रतधारी पुरुष सर्वांकडून कोणत्याही काळीं पूजनीय आहे. त्याला नमस्कार असो.



# षोडश काण्ड

**१. दुःखमोचनम्** (दुःखापासून मुक्तता)

वृषभासमान धारांनी वर्षाव केल्यानें मुबलक पाणी झालें आणि त्याबरोबर अग्नि देखील अतीव प्रदीप्त झाला. कामना भंग करणारें, नाश करणारें आणि धांव घेणारे मन थोपवून धरणारें, दाह उत्पन्न करणारें, उत्तेजित झाल्यानें अनुभवास येणारें, आत्मा आणि देह यांना दूषित करणारें हे पाणी आहे. या पाण्याच्या साहाय्यानें शत्रूला वेढून टाकलें. मी त्या पाण्याचें सृजन करतो परंतु मी त्याला स्पर्श मात्र करीत नाहीं. पाण्याचा फार मोठा भाग समुद्राकडे जातो. शरीरांतील वल पाण्यांत उतरविणाऱ्या अग्नीला मी निर्माण करतो. हे उदका, अग्नि तुझ्यामध्यें प्रविष्ट झाला असून तो तुझा महत्तम अंश आहे. तुझा जो ऐश्वर्ययुक्त अंश आहे तो या इंद्रियांना प्राप्त होवो. पाणी आमचें पाप धुऊन नाहीसे करो. आम्ही त्यामुळें पापमुक्त होऊं. पाणी आमच्या पापाबरोबर आमच्या दुष्ट स्वप्नांना वाहून नेवो. हे उदका, आमच्यावर तुझी कृपादृष्टी असूं दे. तुझ्यामध्यें प्राणिमात्रांचें कल्याण करणारा जो अंश आहे त्यानें माझी त्वचा पवित्र होवो. जलामध्यें राहून प्राणिमात्रांचें मंगल करणाऱ्या अग्नीला आम्ही आवाहन करतो. हें पाणी आणि हा अग्नी आम्हाला क्षात्रबल प्रदान करो.

२. ही एक चांगली प्रार्थना आहे. यज्ञाच्या अखेरीस, किंवा श्रेष्ठ

माणसाच्या दर्शनानंतर त्याचा निरोप घेतांना ह्या प्रार्थनेचा अवलंब केला जात असे.

(२) निर्दुरर्मण्य ऊर्जा मधुमती वाक्
मधुमती स्थ मधुमतीं वाचमुदेयम्
उपहूतो मे गोपा उपहूतो गोपीथः
सुश्रुतौ कर्णौ भद्रश्रुतौ कर्णौ भद्रं श्लोकं श्रूयासम्
सुश्रुतिश्च मोपश्रुतिश्च मा हासिष्टां सौपर्णं चक्षुरजस्रं ज्योतिः
ऋषीणां प्रस्तरोऽसि नमोऽस्तु दैवाय प्रस्तराय

मी रोगमुक्त असावें. माझी वाणी सामर्थ्यसंपन्न आणि मधुर असावी. मधुर रसांनीं पूर्ण असलेली वाणी मधुरतेनें पूर्ण होऊन बाहेर पडो. इंद्रियांच्या गुप्त-सामर्थ्याचें मी आवाहन करतो. माझे कान चांगलें तेंच ऐकणारे होऊन मंगलमय गोष्टीच ते श्रवण करोत. माझ्या नेत्रांचें पाहाण्याचें सामर्थ्य गरुडाच्या नेत्राप्रमाणें सूक्ष्म आणि दूरचे पाहाणारे होवो. त्यामुळें मला नित्य सूक्ष्म आणि मंगलमय पाहतां येईल. (हे यज्ञा) तूं ऋषी आणि देवतांचें अधिष्ठान आहेस. तुला वन्दन असो.

३. धनवानांमध्यें मी सर्वश्रेष्ठ व्हावें. माझ्या बरोबरच्या व्यक्तीमध्ये मी मोठा असल्याचें जाणवावें. धन, यज्ञ आणि मोठेपण माझा त्याग न करोत. शत्रुनाशक गुण, भोजनपात्र दृढता, अन्यांना दुःखमुक्त करण्याचा गुण, दुसऱ्याबद्दल प्रेम, मातरिश्व-ऐश्वर्य वर्धक गुण मला सोडून अन्यत्र न जावोत. विद्वत्ता, एकाग्रता आणि धारणाशक्ती माझ्यापासून अलग न होवो. माझे हृदय कोणत्याही दुःख आणि त्रासापासून दूर राहो. त्यामुळें मी सागराप्रमाणें गंभीर आणि सामर्थ्यवान होईन.

४. सर्व सुखी जनांनी परिवेष्टित आणि सामान्यांमध्यें मी श्रेष्ठ व्हावें. मरणधर्मी पुरुषांमध्यें सुन्दर आणि अमृतमय गुणयुक्त उषा प्रतिष्ठित होते. प्राण अपान मला सोडून न जावोत. दिवसां सूर्य माझें रक्षण करो. अग्नि पृथ्वीवर, वायु अंतरीक्षांत, प्राणिमात्रामध्यें यम

आणि दृश्य पदार्थापासून सरस्वती माझें रक्षण करो. उषेच्या उदय-कालापासून रात्रीपर्यंत माझें मंगल होवो. मला सर्व वस्तू आणि पाणी यांचा उपभोग घेतां येवो. हे पशूंनों, तुम्ही अवयवयुक्त आहांत. माझ्या सान्निध्यांत राहा. वरुण माझ्या प्राण आणि अपान वायूंचें पोषण करो आणि अग्नि मला सामर्थ्यसंपन्न करो.

५. हे स्वप्न, तुझें रोगजन्य जन्मस्थान मला माहीत असून यमाकडे जाण्यासाठीं मृत्यूला कारण होणारें आहे. तूं स्वतःच अंतक किंवा मृत्यू आहेस. हे स्वप्ना, तूं जसा आहेस त्याप्रमाणें आम्ही तुला जाणतो. हे स्वप्ना, आमच्या निद्रेला होणाऱ्या अडथळ्यापासून तूं आमचें संरक्षण कर. हे स्वप्नाच्या अधिष्ठात्री देवते, तूं निर्ऋती नामक पापदेवतेचा पुत्र असून आमचा जन्म ज्ञात असणारी आणि आम्हाला यमाकडे घेऊन जाणारी आहेस. आम्हाला तुझा जन्मही चांगला ज्ञात आहे. तूं दारिद्र्याचा पुत्र असून यमाकडे घेऊन जाण्यास कारणीभूत आहेस. तूं पराभूतीचा पुत्र आहेस. देवजामीचाही पुत्र आहेस. तूं स्वतः यमाकडे नेण्यास कारणीभूत असल्यानें तूंच आमचा अंतक आहेस हे आम्हाला माहीत आहे. दुःस्वप्नापासून आमचें तूं रक्षण कर.

६. आम्ही विजय आणि भूमी प्राप्त करून पापरहित होऊं. दुःस्वप्नामुळें आम्ही भयभीत झालों ती भीती आतां नाहीशी होईल. हे मंत्रदेवते, आमचा जे द्वेष करतात त्यांच्याकडे या भीतीला घेऊन जा. आम्हाला दुःख देणाऱ्यांकडे या भयाला पाठवून दे. आम्हीदेखील या भयाला आमच्या शत्रूकडे जाण्यासाठीं प्रेरणा देत आहोंत. उषा आणि उत्तम वाणी एकत्र होते तर वाणी उषा देवतेशीं एकरूप होते. उषादेवीचा पती ज्याप्रमाणें वाणीशी एकरूप होतो त्याप्रमाणें वाचस्पती उषादेवीशीं एकरूप होवो. (उषःकालाबरोबर उठून वाणीनें अभ्यास करणें वैभववान होय.) कुंभी आणि पूय नामक शत्रूकडे ही दुःस्वप्ने जावोत. झोंपण्याच्या वेळीं दुष्ट-स्वप्नांचा होणारा परिणाम आणि जागृतीमध्यें होणारा परिणाम नष्ट होवोत. देवतागण या सर्व शत्रूंना आपल्याकडे घेऊन जावोत. भीतिग्रस्त मनुष्याचें पुंसत्व नष्ट होतें ते न होवो.

७. अभिचार कर्मांच्या साहाय्यानें दारिद्र्य, निर्भूती, पराभूती यांनीं मृत्यूरूपी अंधःकाराला मी विदीर्ण करतो. या सर्व भयकारी देवतांच्या साक्षीनें मी या ठिकाणीं उपस्थित झालों. या भयकारी देवतांना मी वैश्वानराकडे पाठवून देतो. आमच्या शत्रूचा आमचा आत्मा द्वेष करतो आणि आमच्या आत्म्याचा आमचे शत्रू द्वेष करतात. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ति या अवस्थेमध्यें रात्र आणि दिवस या काळांत ज्या योगें पाप प्राप्त होतें, त्याच योगें मी त्या पापाचा नाश करतो. अशा पापमय शत्रूचा नाश होवो. तो प्राणहीन होवो. जिवंत राहूं नये.

८. शत्रूला मारल्यावर आणलेल्या पदार्थांचे स्वामी आम्ही आहोत. सर्व प्रकारचें तेज, ब्रह्म, स्वर्ग, पशु, प्रजा व वीर हे सर्व आमचे आहेत. असे मानणारा हा अमूक पुरुषाचा पुत्र किंवा अमूक स्त्रीचा पुत्र आहे, किंवा अमूक गोत्रांत उत्पन्न झालेला म्हणून त्याच्यावर दया न करतां त्याला या ठिकाणाहून दूर घालवून देत आहोंत. तो कोणत्याही पाशा-तून मुक्त न होवो. मी अशा पुरुषाचें तेज, सत्ता, प्राण आणि आयुष्य यांना अधोगतीला नेतो.

शत्रूला विदीर्ण केल्यावर जिंकलेले सर्व पदार्थ, सत्य, तेज, ब्रह्म, स्वर्ग, पशु, प्रजा हें सर्व मी आहे असें समजणाऱ्या पुरुषाला, तो अमक्याचा पुत्र, अमूक गोत्रांत उत्पन्न झाला असें न मानतां येथून त्याला घालवून देतो. निर्ऋतीच्या पाशापासून तो मुक्त होत नाहीं. मी त्याचें तेज, प्राण आणि आयुष्य यांना एकत्र बांधून अधोगतीला नेतो.

शत्रूला पराजित करून आणलेले सर्व पदार्थ माझेच आहेत. असें मानणाऱ्या पुरुषाला मी दूर करतो. दारिद्र्याच्या पाशातून तो कधीच मुक्त होत नाहीं. त्याचे सर्व तेज, पराक्रम, सत्ता आणि जीवन लयाला जाते.

असा मनुष्य अमक्या कुलांतील, अमूक माता-पित्यांचा पुत्र म्हणून त्याला जवळ न करतां दूर करतो.

९. शत्रूच्या सैन्यावर विजय मिळवून आणलेले पदार्थ आमचे आहेत. या शत्रुसेनेवर मी नियंत्रण करीन. अग्नि आणि सोम यांनी मला

ही गोष्ट कथन केली आहे. हे पूषन्, पुण्य लोकामध्यें मला प्रतिष्ठा प्राप्त होवो. आम्हांला स्वर्गाचा लाभ होवो. सूर्याच्या दीप्तिमान तेजानें मला स्वर्गाची प्राप्ती होईल. मी धनवंत झाल्यानें लोकांच्या सत्कारास पात्र होईन. सर्व धनावर माझा अधिकार प्रस्थापित होईल. हे देवतांनों, माझ्या सर्व प्रकारच्या धनाला पुष्टी लाभो.



# सप्तदश काण्ड

१. अन्यांना नियंत्रणांत आणणारा, तेजोवान, शत्रूचें तेज निःसत्त्व करणारा, स्वर्गाचा लाभ घेणारा, गाई वगैरे पशूंनां आपल्या कक्षेंत ठेवणारा, बलवानाला जिंकणारा, धन जिंकून आणणारा, आणि पाण्यावर नियंत्रण करणारा इंद्र आहे. त्याला उचित कृतीनें मी आवाहन करतो. त्यायोगें मला प्रदीर्घ आयुष्य लाभो.

२. सर्वांना आपल्या धाकांत ठेवणाऱ्या, तेजसमृद्ध, शत्रूला पराक्रमहीन करणाऱ्या, स्वर्गाचा अधिपती, गाई वगैरे पशूंवर सत्ता असणाऱ्या, बलवंताला जिंकणाऱ्या, धनसमृद्ध आणि जलनियंत्रक सूर्याला मी आवाहन करीत आहे. त्याच्या कृपेनें मी माझ्या प्रजेचा आवडता होईन.

३. सर्व नियंत्रक, तेजार्णव, शत्रुसंहारक, स्वर्गगामी आणि पशु-पक्ष्यांना प्रिय असणाऱ्या इंद्रात्मक सूर्याला मी आवाहन करीत आहे. त्याच्या कृपेनें मी पशूंचा आवडता होईन.

४. सर्व नियंत्रक, तेजपूर्ण, शत्रुनिर्दालक, सर्वाधिपति, पशु आणि जल यांवर संपूर्ण सत्ता असणाऱ्या इंद्रात्मक सूर्यास मी आवाहन करीत आहे. त्याच्या कृपेनें मी सर्वसामान्य जनतेला आवडणारा व त्यांच्यावर प्रेम करणारा होईन.

५. ज्याचा उदय होताच प्राणिमात्र आपापल्या कार्याला प्रारंभ करतात अशा तेजोवान सूर्या, तूं उदयाला ये. तूं सर्वांना नियंत्रणांत

ठेवतोस. तुझ्या उदयामुळें माझ्या सत्तेचाही उदय होतो. तुझ्या कृपेनें माझा द्वेष करणारे माझ्या आधीन होवोत. मी तुझा उपासक असल्यानें मी शत्रूला कधीही शरण जाणार नाही.

६. हे विष्णूरूप सूर्या, तूं आपल्या तेजशलाकांनीं सगळें विश्व व्यापून टाकतोस. तूं आम्हाला अनेक प्रकारच्या पशु-धनानें समृद्ध कर. माझ्या अंतकालापर्यंत परमाकाशामध्ये प्रस्थापित कर.

७. हे सूर्या, तूं उदयाला ये. सर्वांवर देखरेख करणाऱ्या तुझ्या तेजानें मला समृद्ध कर. जे प्राणिमात्र मी पाहतो आणि ज्यांना मी माझ्या चर्मचक्षूंनीं पाहात नाही त्या सर्वांपेक्षां मला अधिक ज्ञानवान कर. हे विष्णूरूप सूर्या, फक्त तुझाच असा प्रभाव आहे. इतरांचा नाही. मला अनेक प्रकारच्या पशु-धनांनीं समृद्ध करून परमव्योमामध्यें अमृताच्या सान्निध्यांत प्रस्थापित कर.

८. हे सूर्या, पाण्यांत असलेले पाशधारक राक्षस, अंतरीक्षांतील जलामध्यें तुला अडथळा करूं शकत नाहींत. कारण आपल्या पराक्रमानें तूं अंतरीक्ष पादाक्रांत केले आहेस. तूं आम्हाला सुख प्रदान कर. तुझ्या कृपेनें मला बुद्धी प्राप्त होईल. हे विष्णूरूप सूर्या, तूं अत्यंत पराक्रमी आहेस. मला अनेक प्रकारच्या धनानें समृद्ध देहांतापर्यंत परमव्योमा-मध्यें सुधेच्या सान्निध्यांत प्रस्थापित कर.

९. हे अत्यंत ऐश्वर्यवान सूर्या, ऐश्वर्याच्या सिद्धीसाठीं तूं सर्पा-दिकांची हिंसा न करतां रात्रीं आणि दिवसादेखील आमचें रक्षण कर. तूं अत्यंत पराक्रमी आहेस. सर्व धनांनी युक्त करून मला तूं अमृतमय अवस्थेपर्यंत घेऊन जा.

१०. हे ऐश्वर्यवान सूर्या, तूं आम्हाला सुख प्रदान कर. तुझ्या कल्याणमय आणि रक्षणकर्त्या साधनांनीं आम्हाला समृद्ध कर. तूं ज्याचें रक्षण करतोस त्या मनुष्याला जन्म-मरणाच्या फेऱ्या कराव्या लागत नाहींत. तूं आपल्या स्थानीं राहून आम्ही केलेली स्तुती स्वीकार आणि सोमपान करून आमचें रक्षण कर. हे सूर्या, तुझा पराक्रम असीम आहे. अनेक प्रकारच्या पशुधनांनीं मला तूं संपन्न कर. इतकेंच नव्हे तर

दीर्घायुष्यानंतर देहपाताच्या वेळीं परमव्योमामध्यें अमृतमय अवस्थेंत मला प्रस्थापित कर.

११. हे ऐश्वर्यवान, इंद्रात्मक सूर्या, तूं जन्म-मरणाचा प्रवास संपविणारा आहेस. सर्वांच्या अगोदर लोक तुला आवाहन करतात. हे आवाहन केलेल्या सूर्या आम्ही केलेल्या स्तुतीचा स्वीकार करून तूं आम्हाला सुख प्रदान कर. तुझ्या कृपेमुळें आमची बुद्धी तेजस्वी राहील. तुझा पराक्रम अनन्यसाधारण आहे. तूं आम्हाला सर्व प्रकारचें सुख प्रदान करून देहपातानंतर परमेष्ठ पदीं अमृतावस्था प्रदान कर.

१२. हे इंद्रात्मक सूर्या, तूं आकाश, अंतरीक्ष आणि पृथ्वी यामध्यें राहणाऱ्या कोणाकडूनही जिंकला जात नाहीस. कारण असीम शक्तिशाली गायत्री मंत्राच्या प्रभावानें तुला महान बुद्धी प्राप्त झाली आहे. तूं आपल्या अपरिमित पराक्रमांनीं मला धनादिकांनीं समृद्ध करून परमेष्ठ अशा अमृतमय अवस्थेंत प्रस्थापित कर.

१३. हे इंद्रात्मक सूर्या, पाण्यांत तुझें जें तेज आहे त्या तेजाचें सुख तूं आम्हाला प्रदान कर. जलामध्ये औषधी वनस्पतींचे सार आहे. ते साररूप आम्हाला सुख देवो. पृथ्वीमध्यें ज्या रूपानें तूं राहातोस त्या अन्नादिकांनी तूं आम्हाला सुखी कर. अंतरीक्षामध्यें ज्या रूपानें तूं राहतोस त्या वृष्टीरूपाने तूं आम्हाला सुखी कर. अनेक प्रकारची सुखें आम्हाला प्रदान करून देहपातानंतर तूं आम्हाला परमेष्ठ अशा अमृतमय अवस्थेंत प्रस्थापित कर.

१४. हे इंद्रात्मक सूर्या, कल्याणमय फलाची इच्छा करणारे, पुरातन कालांतील ऋषी, तुझी स्तोत्रें गाऊन तुला स्फूर्तिवान करतात. अपरिमित पराक्रम करणारा तूं आम्हाला अनंत सुखें प्रदान कर आणि देहपातानंतर अमृतमय अवस्थेंत ठेव.

१५. हे इंद्रात्मक सूर्या, तूं अंतरीक्षांत असलेल्या अगणित मेघांमध्यें जातोस. हे मेघ अनेक धारांनीं वृष्टी करणारे असतात. त्यांच्या जलधारा औषधी वनस्पतींना वृद्धिंगत करणाऱ्या आणि यज्ञसाधक आहेत. साक्षात यज्ञफल म्हणून त्यांना गौरवितात. तुझ्या असीम पराक्रमानें आम्हाला सुखसंपन्न करून, देहपातानंतर परमश्रेष्ठ अशा अमृतमय

अवस्थेंत प्रस्थापित कर.

१६. हे सूर्या, चारही दिशांचा तूं रक्षक आहेस. तूं आपल्या तेजानें आकाश आणि पृथ्वी व्यापून टाकतोस. तूं पाण्याचा मार्ग जाणतोस. तो तुझ्यामुळें समृद्ध होतो. तुझ्या अपरिमित प्रभावानें आम्हाला अनेक प्रकारच्या सुखाचा लाभ होवो. आमच्या देहपातानंतर तूं आम्हाला उत्तम स्थानीं प्रस्थापित कर.

१७. हे सूर्या, तुझे पाच प्रकारचे किरण उर्ध्व-दिशा सुखमय करून अधरदिशा प्रकाशमय करतात. तूं केवळ एकाच प्रकारच्या किरणांनीं पृथ्वीला प्रकाशित करतोस त्यामुळें लोक हा तुझा दोष मानतात. अपरिमित प्रभावानें आम्हाला अनेक प्रकारची सुखें प्रदान करून मृत्यू-नंतर उत्तम अवस्था प्रदान कर.

१८. हे इंद्रात्मक सूर्या, पुण्यात्म्यांना जो उत्तमलोक प्राप्त होतो तो लोक म्हणजे तूंच होय. तूं प्राणिमात्रांचा निर्माता असल्यानें लोक तुझ्यासाठीं ज्योतिष्टोम नामक यज्ञ संपन्न करतात. तूं तुझ्या अपरिमित प्रभावानें आम्हाला सुखें प्रदान करून देहांतानंतर आम्हाला अमृतमय लोकांत प्रतिष्ठित कर.

१९. असत्यामध्यें सत् प्रस्थापित असतें. ब्रह्मामध्यें भूत प्रस्थापित आहे. तूं आम्हाला असीम सुखे प्रदान कर आणि देहपातानंतर सर्वोत्तम अवस्थेमध्यें प्रस्थापित कर.

२०. हे सूर्या, तूं शुक्र आहेस. सर्व लोकांना प्रकाश प्रदान करणाऱ्या तेजानें तूं नेहमी दीप्तिमान राहतोस. तुझ्या अशा महान रूपाची मी उपासना करतो. त्यामुळें मी देखील तुझ्या कृपेनें तुझ्या-प्रमाणें तेजोवान होऊं शकेन.

२१. हे सूर्या, तूं स्वतः दीप्तिमान असून इतरांना दीप्तिमान करणारा आहेस.तुझ्या प्रकाशानें पशूपासून ब्रह्मापर्यंत सर्व वस्तू प्रकाश-मय होतात.

२२. उदयाचलावर प्राप्त होणाऱ्या, अर्धोदित आणि पूर्णोदित सूर्याला नमस्कार असो. विराज रूपानें समोर येणाऱ्या, सम्राज रूपानें अधिकार प्रस्थापित करणाऱ्या आणि सम्राज रूपानें विश्व व्यापणाऱ्या

त्या दिव्य सूर्याला नमस्कार असो.

२३. सर्व लोकांना तृप्तता प्रदान करून अस्ताचलाकडे जाणाऱ्या, अर्धवट अस्तास गेलेल्या, आणि पूर्णपणे अस्तास गेलेल्या आदित्याला आमचा नमस्कार असो. आपल्या तेजाने विराजणाऱ्या, स्वतःच्या किरणांनीं पुनीत करणाऱ्या आणि आपल्या प्रकाशाने विश्व व्यापून टाकणाऱ्या सूर्याला आमचा नमस्कार असो.

२४. उदयाला येणारा हा आदित्य, तपाच्या साह्यानें, व्योमरूपी सागर तरून जाण्यासाठीं, रथरूपी नौकेवर आरूढ झाला आहे. तो कल्याण करणारा आहे. माझी त्रितापासून मुक्तता करून तो अस्तास जात आहे. हे सूर्या, मला रात्रींच्या पलीकडे घेऊन जा.

२५. सर्व लोकांना तृप्तता प्रदान करणारा आणि सर्व प्राणिमात्रांना सुख देणारा सूर्य उदयास आला आहे. हे सूर्या, तुझ्या कृपेनें मी माझा द्वेष करणाऱ्यांच्या स्वाधीन होऊं शकणार नाहीं. तुझ्या अपरिमित प्रभावानें मी सर्व प्रकारें संपन्न होईन आणि देहपातानंतर सुद्धां अमृतत्वाला प्राप्त होईन.

२६. हे सूर्या, आकाशरूपी सागर पार करण्यासाठीं, वायूच्या बरोबर, संसारी लोकांच्या कल्याणासाठीं रथरूपी नौकेमध्यें तूं आरूढ होतोस. तूं मला रात्रीच्या अंधारांतून पार केलें आहेस. त्याचप्रमाणें दिवसाच्या कालातूनही पार कर.

२७. प्रजापतिरूप सूर्याच्या तेजरूपी कवचानें मी आच्छादित झालो आहे. मी वृद्ध झालो तरी माझी सर्व गात्रें उत्तम असून मी रोगरहित होऊन उत्तम प्रकारचे भोग अनुभवीत आहे. मला दीर्घ आयुष्य प्राप्त झाले आहे. लौकिक आणि वैदिक कर्मांचा आचार करून मी सूर्याची कृपा संपादन करीत आहे.

२८. मी कश्यपरूपी सूर्याच्या मंत्रमय तेज कवचानें आच्छादित झालों आहे. मी हे तेज आणि रक्षणात्मक सूर्यकिरणांच्या योगें संरक्षित झालो आहे त्यामुळें देवता अगर मनुष्यें यांची हिंसक आयुधें माझ्यापर्यंत येणार नाहींत.

२९. सत्य, सूर्यात्मक ब्रह्म, सर्व ऋतु आणि सर्व प्राचीन वस्तूं-

कडून मी संरक्षित झालो आहे. नरकाला नेणारें पाप आंता माझ्याजवळ येणार नाहीं. मंत्राच्या योगानें सिद्ध केलेल्या मंत्रजलाच्या प्रभावानें, पाण्यामध्यें सुप्तपणें राहणाऱ्या प्राण्यांप्रमाणें मी अदृश्य रूपानें राहीन. पापादिकांपासून रक्षण व्हावें म्हणून मंत्रमय जलानें मी सुरक्षित झालो आहे.

३०. माझ्या सान्निध्यांत असणारा अग्नि माझा संरक्षक आहे. भयापासून तो माझें रक्षण करतो. उदित होणारा सूर्य, मृत्युपाशापासून माझें रक्षण करतो. उषा या मृत्युपाशांना दूर करो. दीर्घायुष्याची इच्छा असणाऱ्या मला, हा वायू प्रदीर्घ कालपर्यंत सचेतन ठेवो. माझी सर्व इंद्रियें सचेतन राहोत.



# अष्टादश काण्ड

या कांडातील प्रथम प्रपाठकांत यम आणि यमी यांचा संवाद आहे. यम आणि यमी सहोदर भावंडे आहेत. यमी यमापासून पुत्रप्राप्तीची इच्छा करते. सर्व यमनियमांचा नियंता आणि अत्यंत न्याय्य बुद्धीनें वागणारा यम तिला नकार देतो. हाच संवाद ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील दहाव्या सूक्तामध्यें १४ ऋचांमध्यें समाविष्ट करण्यात आलेला आहे. हा संवाद म्हणजे वेदकालीन समाजजीवन, गृहस्थाश्रम, आणि न्याय्य आचार याचें सर्वोत्तम दर्शन आहे.

यमी – महान कीर्तिवंत आणि सख्यभावानुकूल यमा, या समुद्र तीरावरील द्वीपामध्यें मी आले आहे. मला पुत्राची तीव्र इच्छा आहे. सर्व देवांमध्यें तुझी ख्याती आहे. तुझें तेजही असामान्य आहे. ते प्रदीप्त तेज माझ्या ठिकाणीं प्रस्थापित करून तूं मला पुत्रवती कर.

यम – हे यमी, आपण एकाच मातेच्या उदरीं जन्म घेणारी भावंडें आहोत. बहीण आणि भाऊ यांच्या समागमासाठीं सख्यत्वाची भावना माझ्या मनात नाहीं. एकाच मातेच्या उदरातून जन्म घेणारी बहीण मी पत्नीरूपानें स्वीकारीत नाहीं. असल्या मित्रभावाची मला इच्छा नाहीं. शत्रूला सतत पराभूत करणारा, महाबलशाली रुद्राचा पुत्र मरुत देखील असल्या सख्यत्वाची निंदाच करील.

यमी – मरुत्‌गण मी निवेदन केलेल्या मार्गानें जाणारा आहे. तेव्हां तूं आपलें मन माझ्याकडे केंद्रित कर. संतती उत्पन्न करणाऱ्या

पत्नीप्रमाणें माझ्या ठिकाणीं संतान उत्पन्न करण्यासाठीं वंधुत्वभावाचा त्याग करून माझ्याशीं तूं समागम कर.

यम – हे यमी, असत्य गोष्टीला, सत्यवाचक सत्य म्हणून कसा मान मिळेल. जलधारक सूर्य आपल्या पत्नीसह आकाशात स्थिर झालेला आहे. एकाच माता-पित्यांच्या उदरी जन्म घेतलेल्या आपण दोघांनीं तुझी इच्छा पूर्ण करण्याच्या निमित्तानें असमर्थ आहोंत.

यमी – संतान उत्पन्न करणाऱ्या देवांनींच, मातेच्या उदरांत आपल्या दोघांना दांपत्य वंधनानें बांधलेलें आहे. त्या देवांच्या कृती निष्फल कोण करील? त्वष्टा देवतेनें आपण गर्भात असतानाच आपलें दंपत्तीकरण करून त्या प्रमाणें कर्मबंधन केलें आहे हें या आकाश आणि पृथ्वीला सुद्धां ज्ञात आहे. त्यामुळें तूं म्हणतोस त्याप्रमाणें यामध्यें असत्यता नाहीं.

यम – सत्याचा भार वहन करण्यासाठीं आपल्या वाणीरूप वृषभाची नियुक्ती कोण करतो? कर्मवान, तेजोवान, क्रोध आणि लज्जा-हीन शब्दांनीं श्रोत्यांच्या हृदयामध्यें आपलें स्थान स्थिर करणारा पुरुष आपल्या सत्य वचनाचीच नेहमी वाढ करतो. त्यामुळें तर त्याला दीर्घकाल जिवंत ठेवणारें आयुष्य प्राप्त होतें.

यमी – हे यमा, आपण समागम केला हे कोणाला माहीत होणार आहे ? कोण पाहणार आहे ? आणि कोणता पुरुष असा समागम केला म्हणून दुसऱ्याला सांगणार आहे ? दिवस हा सूर्य देवतेचा आहे. दिवस आणि सूर्य दोन्ही विशाल आहेत. म्हणून माझ्या इच्छेच्या प्रतिकूल वागून मला तूं दुःख मात्र देत आहेस. अनेक प्रकारचे लोक अनेक प्रकारची कर्में आचरत असतात. त्यांना तूं कसें सांगतोस. माझी इच्छा आहे कीं पतीला आपलें शरीर अर्पण करणाऱ्या पत्नीप्रमाणें मी माझा देह तुला अर्पण करावा. दोन मार्ग ज्याप्रमाणें एकमेकांला मिळतात त्या-प्रमाणें आपण शरीरानें एकमेकांला एकत्र मिळू. मी याप्रमाणें करण्यास अत्यंत उत्सुक आहे.

यम – हे यमी, देवदूत सर्वत्र संचार करीत असतात. ते नेहमी केवळ तर्कानें सर्व गोष्टी सत्यस्वरूपांत जाणतात. म्हणून तूं माझी

धर्म्यबुद्धी नष्ट करण्याची इच्छा करू नकोस. तूं माझा विचार सोडून दे. अन्य कोणाची तरी पत्नी होऊन त्याला तूं आपला देह अर्पण करून एकमेक एकरूप व्हा. यमासाठीं यजमान रात्रंदिवस यज्ञांमध्यें आहुती अर्पण करतात. सूर्य आपल्या अत्यंत दीप्तिमान तेजाने माझ्यासाठीं उदयाला येतो. आकाश आणि पृथ्वी ज्याप्रमाणें एकमेकांला विलगलेली दिसतात (असत नाहीत) त्यांप्रमाणें भ्रातृत्व भावाने अलग राहूनसुद्धां आपण एक होऊ. पुढें असेही दिवस येतील की ज्यावेळीं बहीण आपल्या बंधूपासून भार्यात्वाची अपेक्षा करील. पण असे होणार नाहीं. म्हणून हे यमी, ज्या पुरुषाजवळ संतती उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे, त्याच्या-कडे तूं जा. मला याच ठिकाणीं सोडून दे आणि त्या वीर्यवान पुरुषाला आपला पती करून त्याच्याजवळ आपली पुत्रप्राप्तीची इच्छा प्रकट कर.

यमी – वहिणीच्या इच्छेला मान न देणारा हा कसला भाऊ ? वहीण एका इच्छेनें जवळ आली तर तोच तिच्यापासून वाजूला जातो. वहिणीवर संतप्त होणारा भाऊ नसतो. म्हणून हे यमा, तूं माझ्या इच्छे-प्रमाणे आचरण कर.

यम – हे यमी, मी तुझी ही इच्छा कधीही पुरी करूं शकणार नाहीं. तुझ्या देहाला सुद्धां मी स्पर्श करूं शकणार नाहीं. म्हणून तू मला सोडून अन्य पुरुषावरोवर असा संवंध प्रस्थापित कर. भार्या म्हणून मी तुझा कधीही स्वीकार करू शकणार नाहीं. तुझा स्पर्श मला कदापि सहन होणार नाहीं. धर्माचें ज्ञान असणारे पुरुष वहीण आणि वंधू यांच्या ह्या असल्या संवंधाला पाप म्हणून संबोधतात. मी तुझ्या इच्छे-प्रमाणें वागलो तर ते पापकर्म माझें हृदय, मन व प्राण या सर्वांचा नाश करील.

यमी – यमा, तुझ्या या दुर्वलतेचें मला दुःख होतें. तुझें मन माझ्यात नाहीं. तुझें मन मी समजूं शकलें नाहीं. तुझें मन अन्य कोण्या स्त्रीमध्यें गुंतलें आहे.

यम – हे यमी, दोरी ज्याप्रमाणें अश्वावरोवर असते किंवा वेल ज्याप्रमाणें वृक्षाला बिलगते त्याप्रमाणें माझ्याशिवाय अन्य पुरुषाला तूं आलिंगन दे. तुम्ही दोघे एकमेकांवर अनुरक्त व्हा. तूं त्यामुळे अंतिम

कल्याणमय सुखाची स्वामिनी होशील.

जन्म-मरणाधीन असलेल्या या पृथ्वीवर, मोहक वाटणारें जलतत्त्व वायुतत्त्व आणि औषधी यांची विश्वदृष्टा देवतांनीं समृद्धी केली. यजमान यज्ञ करून अग्नीला आहुतीनीं तृप्त करतात त्यामुळें तो महान अग्नि पृथ्वीवर जलवृष्टी करतो. वरुण ज्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांचा ज्ञाता आहे त्याप्रमाणें अग्निदेखील सर्व वस्तुमात्रांचा ज्ञाता आहे. हा अग्नि पूजनीय आहे. जलधारक सूर्य अंतरीक्षांत संचार करतो. वाणीची देवता सरस्वती अंतरीक्षांत भ्रमण करते. दोघांच्यामुळें अग्नि समृद्ध होतो आणि मानवांनीं केलेल्या स्तुतीचा स्वीकार करून त्यांच्या मनाचें रक्षण करतो. अदिति देवमाता आहे. ती अशा मानवाला फलसंपन्न करते. बांधवाप्रमाणें संरक्षण करणारा अग्नि मला यजमान करो. अध्वर्यू निरनिराळ्या देवतांना आवाहन करतील आणि त्यांच्यासाठी अग्नीला आहुती प्रदान करतील. अध्वर्यूनीं याकरितांच अग्नि प्रज्वलित केला आहे. या बरोबरच ऋषींची मंत्ररूप वाणी आणि उषेसहित सूर्य या यज्ञाच्या सिद्धीसाठीं प्रकट होत आहेत.

सोम आणल्यावर, यज्ञासाठीं अग्नीची उत्पत्ती केली जाते आणि त्या अग्नीचे सर्व स्वागत करतात. सोम आणि अग्नीच्या उपस्थितीनें अग्निष्टोम नांवाच्या यज्ञाची प्राथमिक सिद्धता होते. हिरवा चारा खाणारा पशु आपल्या मालकाला ज्याप्रमाणें पुष्ट दिसतो त्याप्रमाणें घृतादिकांच्या साह्यानें समृद्ध झालेला अग्नि यजमानाला पुष्ट झाल्या-प्रमाणें दिसतो. असा पुष्ट अग्नि यज्ञाची प्रसन्नता वाढवितो. हे अग्ने, तुझ्या पुष्टतेमुळें तूं स्तुत्य होतोस. यजमान तुझी प्रशंसा करतात आणि देवतांसाठी मंत्रयुक्त हवि तुला अर्पण करतात. तो हवि तूं त्या देवांना नेऊन देतोस. हे अग्ने, आकाशरूपी पिता आणि पृथ्वीरूपी मातेला या यज्ञासाठीं प्रेरणा दे. यजमान ज्या देवतांची इच्छा करतात त्या त्या देवतांना अग्नि प्रेरित करून यज्ञस्थानीं आणतो. त्या देवांना त्याच्या मनाप्रमाणें आहुती दिल्याने त्या संतुष्ट होतात. हे अग्ने तुझ्या कृपा-प्रसादानें जो यजमान अन्यांचें गौरवगान करतो तो यजमान सर्वत्र प्रसिद्ध होतो. इतकेंच नव्हे तर तो गाई, अश्व, वगैरे पशुधनासह

दीर्घायुषी होऊन पुष्कळ काळपर्यंत ऐश्वर्याचा उपभोग घेतो आणि लोकांमध्यें प्रतिष्ठा पावतो. हे अग्ने या यज्ञस्थानीं आम्ही करीत असलेले तुझें आवाहन तूं ऐक. सर्व देवांना व देवतांना बरोबर घेऊन तूं ये. देवतांचे पालकरूपी आकाश आणि पृथ्वी यांनाही तूं या ठिकाणीं घेऊन ये. कोणतीही देवता या ठिकाणी आली नाही असें करूं नकोस. हे अग्ने, तूं पूजनीय आहेस. यज्ञामध्यें देवता आणि हवी यांची मंत्राच्या साहाय्यानें सांगड घातली जाते तेव्हा तूं यजमानाला पुष्कळ मौल्यवान पदार्थ आणि धन प्रदान करतोस. उषःकालाबरोबर अग्नि प्रज्वलित केला जातो. तो दिवसभर असाच प्रज्वलित राहातो. सूर्यात्मक अग्नि आकाश पृथ्वी आणि सर्व दिशा यांना प्रकाशित करतो. आपल्या तेजोमय किरणांनीं अन्य पदार्थांनादेखील तो प्रकाशित करतो. पृथ्वी आणि आकाश यांना आपल्या प्रकाशाने व्यापून टाकतो. आकाश आणि पृथ्वी सत्य-वाणीचा आश्रय करतात. अग्नि ज्यावेळीं यज्ञ संपन्न करण्याच्या निमित्तानें यजमानाच्या सान्निध्यांत राहून यजमानानें केलेली स्तुती श्रवण करतो तेव्हां तो महान ज्वालांनीं संपन्न होतो. यज्ञार्थ आलेल्या देवतांना आपल्याशा करतो. त्यांना इच्छित हवी पोहोचवितो. त्या वेळीं समिधांनी प्रदीप्त होणारा, देवांना आवाहन करणारा पूजनीय अग्नि आपल्या धूम्रध्वजासहित समृद्ध होतो.

आकाश आणि पृथ्वीच्या अधिष्ठात्री देवतांनों, जल प्राप्त करण्या-साठीं कराव्या लागणाऱ्या कार्याची समृद्धी व्हावी म्हणून मी तुमची स्तुती करतो. आकाश आणि पृथ्वी देवतांनों, आमची स्तुती श्रवण करा. ऋत्विज ज्या वेळीं आपल्या सबळ साहाय्यासाठीं यज्ञाच्या निमित्तानें आवाहन करतील तेव्हां तुम्ही जल प्रदान करून आम्हाला समृद्ध करा. अमृताप्रमाणें लोकांवर उपकार करणारें पाणी ज्यावेळीं प्रकाशातून—(सूर्यामुळें) निर्माण होतें, पृथ्वी आणि आकाश औषधींमुळें भरून जातात आणि अग्नीच्या प्रदीप्त ज्वाला अंतरीक्षांत जातात तेव्हां हे अग्ने, तुझ्यामुळे निर्माण होणारें पाणी सर्वांच्या उपयोगासाठी पृथ्वीवर येतें. देवतांमध्यें क्षात्रबलसमृद्ध यम आमच्या यज्ञांतील हवींचा काही भाग स्वीकारो. यमाला प्रसन्न करण्यांत आमच्याकडून काहीं चूक झाली तर,

देवतांना आवाहन करणारा अग्नि या ठिकाणीं उपस्थित असल्यानें तो आमचे अपराध दूर करील. यमाला प्रसन्न करण्यासाठीं हवि बरोबर आमच्याजवळ त्याच्या स्तुतीचें साधनही आहे. या दोन्ही गोष्टींनी अग्नीला प्रसन्न करून यमही प्रसन्न होईल आणि आमचे अपराध देखील नाहीसे होतील. या ठिकाणीं यमाची स्तुती केली तर यमाला आपलें भार्यात्व अर्पण करणारी त्याची भगिनी स्तोत्यांची निंदा करील. हे अग्ने यां निंदकापासून स्तोत्यांचें तूं रक्षण कर. यज्ञांमध्यें प्रतिष्ठित केलेल्या ज्या अग्नीमुळें देवता प्रसन्न होतात, ज्या योगें मनुष्यांना सूर्यलोकांत निवास करण्याची पात्रता येते, ज्या योगें देवतांनी अग्नीच्या प्रकाशमान तेजानें लोकत्रय प्रतिष्ठित केलें, अंधःकाराला घालविण्यासाठी ज्याच्या प्रकाशानें चंद्र प्रकाशतो, त्या तेजोमय अग्नीची चंद्र आणि सूर्य नित्य पूजा करतात. वरुणाच्या ज्या परिसरांत देवता भ्रमण करतात ते स्थान आम्हाला माहीत नाहीं. देवता या ठिकाणाहून आम्ही निर्दोष कसें होऊ यासाठीं सहायक होतात. सविता, अदिती, आकाश आणि मित्र, अग्नीच्या कृपेनें आमचे सर्व प्रकारचे दोष दूर करोत.

इंद्राची ही एक चांगली प्रार्थना आहे. इंद्राच्या सख्यत्वासाठीं ह्या प्रार्थनेचा उपयोग केला जातो.

सखाय आशिषामहे ब्रह्मेंद्राय वज्रिणे ।
स्तुष ऊ पु नृतमाय धृष्णवे ।
शवसा ह्यसि श्रुतो वृत्रहत्येन वृत्रहा ।
मघैमघोनो अति दूर दाशसि ॥

वज्रधारण केल्यामुळें ज्याला वज्रिण असें नांव प्राप्त झालें, जो महान पराक्रमी आहे, साहस हा ज्याचा गुण आहे शूर आणि सामर्थ्यानें ख्यात झालेला, वृत्रहत्येमुळें ज्याला वृत्रहन आणि मेधांना धारक करणारा म्हणून मघवन् हे नांव प्राप्त झाले त्या दानशूर इंद्राची स्तुती करण्यास आम्हास प्रोत्साहन लाभो.

पावसाळ्यांत बेडूक ज्याप्रमाणें पृथ्वीवर इकडून तिकडे उड्या मारीत आपला आनंद प्रकट करतो, त्याप्रमाणें तूं देखील आपला आनंद व्यक्त कर. अग्नीच्या कृपेनें हा वायू आम्हाला सुख देणारा होवो. अग्नि

ज्याप्रमाणे गवताला जाळून टाकतो त्याप्रमाणें मित्र आणि वरुण आमचा शोक आणि दुःख नाहीसे करोत. स्मशान हे ज्याचें वसतिस्थान आहे, जो पिशाच्यादिकांचा स्वामी आहे, जो आपल्या महान पराक्रमानें सर्वांना भय उत्पन्न करतो आणि जवळ येऊन हिंसा करतो अशा रुद्राची आम्ही स्तुती करतो. आमच्या दुःखाचा नाश करणारा इंद्र आमची स्तोत्रें श्रवण करून आम्हाला सुख प्रदान करो. आमचें सैन्य आमच्याशी द्वेष आणि वैर करणाऱ्यावर आक्रमण करो.

सुसंस्कृत अग्नीची इच्छा असणारे लोक सरस्वतीला आवाहन करतात. ज्योतिष्ठोमासारख्या यज्ञांत सुद्धां सरस्वतीला आवाहन करण्यांत येतें. कारण ती हविर्दात्या यजमानाला त्याच्या इच्छेप्रमाणें पदार्थ दान करते. यज्ञवेदीच्या दक्षिण दिशेला प्रतिष्ठित झालेले पितर सुद्धां सरस्वतीला आवाहन करतात. हे पितरांनों, या यज्ञामध्यें पदार्पण करून तुम्ही प्रसन्न व्हा. हवि प्राप्त करून संतुष्ट व्हा आणि सरस्वतीला देखील हवींनीं संतुष्ट करा. हे देवी सरस्वती, पितरांनी तुला आवाहन केलें आहे. आम्हाला उचित असणारें रोगरहित अन्न तूं आम्हाला प्रदान कर. हे देवी पितरांनी आवाहित केल्यामुळें तूं पितरांसहित एकाच स्थानीं येऊन तृप्त होतेस. अनेक प्रकारच्या लोकांना तृप्त करणारें अन्न, धन आणि वल या यज्ञीय यजमानाला प्रदान कर. मध्यम अवस्थेमध्यें असलेले निकृष्ट आणि मध्यम पितर सोम-भक्षक आहेत. ते प्राणानें सोडून दिलेल्या शरीराचा आश्रय करणारे, अहिंसक आणि ज्ञानी आहेत. आवाहन काळांत हे सर्व पितर आमचे रक्षक होवोत. कल्याण करणाऱ्या पितरांच्या समोर मी उपस्थित आहे. माझ्या समोर यज्ञरक्षक अग्नि आहे. वर्हिषी नामक सोमपान करणाऱ्या पितरांना हे अग्ने, तूं माझ्या जवळ घेऊन ये. जे पितृलोकांत प्रथम प्राप्त झाले आणि जे निघून गेले ते पृथ्वीवरील विविध दिशांमध्यें प्रतिष्ठित झाले. त्या सर्व पितरांना माझा नमस्कार असो. मालती नामक पितृदेवता यजमानानें कव्य म्हणून प्रदान केलेल्या हवींच्या योगें वृद्धिंगत होते. यम पितृनेता आहे. यजमानानें दिलेल्या हवींच्या योगें अंगिरानामक पितृदेवतेबरोबर तो वृद्धिंगत होतो आणि वृहस्पति नामक पितृनेता ऋक्व नामक पितरांसहित

वृद्धिगत होतो. मालतीनामक देवता ज्या पितरांना यज्ञामध्यें प्रवृद्ध करतात, ज्या देवता कव्यादिकांनीं प्रवृद्ध होतात त्या देवता आवाहन कालांत आमचें रक्षण करोत. हा सोम स्वादयुक्त आहे. हा अति प्राशन केला तर मनुष्य मदांध होतो. सोम रसपूर्ण आहे. त्यामुळें सोम प्राशन केलेल्या इंद्रावरोवर कोणीही असुर संग्रामासाठीं तयार होत नाहीं. पृथ्वीचें उल्लंघन करून दूर प्रदेशांत गमन करणारे, अनेक मार्गांनीं जाणारे, विविश्वनाचे पुत्र कीर्तिवान यमाचें पूजन करतात.

आमचे पितर ज्या मार्गानें गमन करतात तो मार्ग यमाला चांगल्या प्रकारें ज्ञात आहे. मनुष्य आणि देवतांनासुद्धां या मार्गाचें ज्ञान आवश्यक आहे. आत्मसाक्षात्कारशून्य पुरुषांना कर्मरूप पितृलोक प्राप्त होतो. ज्या मार्गानें आमचे पूर्वज गेले किंवा आपल्या कर्मांनीं जे पृथ्वीवर येतात त्या सर्वांना यम उत्तम प्रकारे जाणतो.

यज्ञाच्या निमित्तानें आलेल्या वर्हिषद नामक पितरांनों, आमच्या समोर येऊन आमचें रक्षण करा. आम्ही प्रदान केलेल्या या आहुती तुमच्यासाठी आहेत. त्यांचा स्वीकार करा. रक्षण करण्याच्या साधनां-सहित तुम्ही या ठिकाणीं येऊन रोग आणि पाप यांचा नाश करणारें सामर्थ्य आम्हाला प्रदान करा. हे पितरांनों, यज्ञवेदीच्या दक्षिण दिशेला गुडघे टेकून वसलेल्या पितरांनों, आमच्या हवींची तुम्ही प्रशंसा केली आहे. आमच्या लहान अगर मोठ्या अपराधांवद्दल आम्हाला तुम्ही मृत्युदंड देऊं नका. कारण मनुष्यस्वभावाला अनुसरून आमच्या हातून अपराध होणें शक्य आहे. वीर्याला निश्चित स्वरूपाचा आकार देणाऱ्या त्वष्टयानें आपल्या सरण्यु नामक कन्येचा विवाह केला तेव्हां तो उत्सव पाहाण्यासाठीं सर्व विश्व एकत्रित आलें. यमाची माता सरण्यु आणि सूर्य यांचा विवाह झाला तेव्हा सूर्याची प्रथम पत्नी त्याच्यापासून दूर केली (प्रकाशवंत सूर्यानें उषा रूपी कन्येला गमन करण्यास सांगितलें तेव्हां सर्व विश्व जागृत होऊन तिच्याकडे पाहात कर्म करू लागलें. परंतु यम-माता रात्र प्रकाशमान सूर्यापासून दूर जाऊन अदृश्य झाली.) हे मनुष्या, नगराला जाणाऱ्या मार्गानें तूं पुढें जा. कारण याच मार्गानें तुझे पितर पूर्वी गेले आहेत. आपल्या सामर्थ्यानें तृप्त मनानें तूं आणि पितर

दोघेही गमन कराल तेव्हां न्याय्य मार्गज्ञ यम आणि वरुण उभे असलेले दिसतील. म्हणून हे विद्वानांनों या ठिकाणाहून निघा आणि जीवाचें कल्याण करणाऱ्या मार्गानें जा. हा मार्ग पितृलोकाला जातो. लोककल्याण करणारा यम अशा लोकांना विश्रांती प्रदान करतो. सर्व प्रकारच्या कामना करणाऱ्या आम्हाला तुम्ही तेज प्रदान करा. पितरांना आस्वाद घेतां येईल असें अन्न घेऊन तुम्ही या महान गतीनें जाणारे पितर तुला तेजोवान करतील. व्यवहार-कुशल पितर आणि तूं आवडीचें भोजन करण्यासाठीं या. अंगिरस हा आमचा पितर असून तो स्तुतियोग्य आहे. सुविधा प्राप्त करण्यासाठीं निश्चल बुद्धियुक्त, परिपक्व ज्ञानयुक्त ऐश्वर्ययुक्त आणि पूजनीय पुरुषांच्या परमकल्याण करणाऱ्या सुबुद्धीनें आम्हाला तृप्तता लाभो. हे यमा, अंगिरस पितरांच्या सह तूं या ठिकाणीं ये. विविध पदार्थांचें यथार्थ ज्ञान प्रदान करून आम्हाला तृप्त कर. हे बर्हिषद पितरांनों, या आसनावर विराजमान होऊन मी प्रकाशमान परमात्म्याचें आवाहन करीत आहे. ते देव तुमचें रक्षक आहेत. हे यमा अंगिरसाकडून प्राप्त झालेला या आसनावर तूं विराजमान हो. मंत्रज्ञ विद्वान पुरुष तुला आवाहन करीत आहेत. या आमच्या भक्तीनें तूं प्रसन्न हो. हे पितर, उत्तम दशा प्राप्त झाल्यानें महान झाले. व्यवहारांतील मार्गदर्शक झाले आणि ज्ञानमय प्रकाशानें उत्तम लोकाला प्राप्त झाले.

## २) पितृमेध (पितृयज्ञ)

प्रदीर्घ जीवन प्राप्त होण्यासाठी, ज्योतिष्ठोम नावांच्या यज्ञामध्यें यमाला प्रार्थना करून आहुती दिल्या जातात. ही एक चांगली प्रार्थना आहे.

यमाय सोमः पवते यमाय क्रियते हविः ॥
यमं ह यज्ञो गच्छति अग्निदूतो अरंकृतः ॥
यमाय मधुमत्तमं जुहोता प्र च तिष्ठत ।
इदं नम ऋषिभ्यः पूर्वजेभ्यः पूर्वेभ्यः पथिकृत्भ्यः ॥
यमाय घृतवत् पयो राज्ञे हविर्जुहोतन ।
स नो जीवेष्वा यमेद् दीर्घमायुः प्र जीवसे ॥

यमासाठी सोम शुद्ध-संस्कारित केला आहे. यमासाठी हवि-आहुती प्रदान करण्यात येत आहेत. दूत म्हणून यज्ञांतील या आहुती अग्नि यमाकडे नेत आहे. त्या आहुती यमाला प्राप्त होतात. हे यजमानांनों यमाला मधुरतम आहुती प्रदान करा. ज्यांनीं पूर्वी भला मार्ग निर्माण केला त्या आमच्या पूर्वज ऋषींना आमचा नमस्कार असो. घृत आणि क्षीर यांनीं संपन्न असलेला हवि यमाला अर्पण करा. ह्या हवीच्या दानानें प्रसन्न झालेला यम आम्हाला प्रदीर्घ कालपर्यंत जिवंत ठेवील.

हे अग्ने, या मनुष्याला दूषित भावानें तूं जाळूं नकोस. त्याला शोक उत्पन्न करू नकोस. त्याचें मन आणि शरीर नष्ट करूं नकोस. हे जातवेद, ज्या वेळी या माणसाला तूं ज्ञानी करशील त्या वेळी तूं पितरांचें संरक्षण याला प्रदान कर. हा आपल्या बुद्धीनें सद्गती प्राप्त करील. त्या वेळीं दिव्य पदार्थ त्याच्या अंकित होतील. तीन यज्ञांच्या संपन्नतेमुळें, त्रिष्टुप, गायत्री आणि अन्य छंद यांच्या साहाय्याने यम याच्यावर कृपावंत होईल. हे मनुष्या, नेत्रांच्या योगें सूर्य, वायूच्या योगें प्राण, धर्म्य कर्मांनीं आकाश आणि पृथ्वी तुला प्राप्त होवोत. तुला जल, औषधी, निरोगी अवयवांसहित शरीर आणि सर्वहितकारी प्रतिष्ठा प्राप्त होवो. आत्मा तपाच्या साहाय्यानें प्राप्त होतो. म्हणून तूं तपाचा आचार कर. तुझे पवित्र आचार, आदरणीय व्यवहार तुला ऐश्वर्यवंत करतील. तुझी कल्याणकारी शक्ती तुला पुण्यात्म्यांच्या लोकाला घेऊन जाईल. हे जातवेद, जो मनुष्य, तुझ्यासाठीं पवित्र क्रिया वेगानें आणि कुशलपणें करतो त्याला तुझ्या तप्त ज्वालांनीं व्याप्त झालेलें अंतरीक्ष, सुख प्रदान करणारे होवो. हे अग्ने, या प्रेताला तूं आपल्या पवित्र ज्वालांनीं जाळून टाक. हे प्रेत तुला हविरूपानें प्रदान केलें आहे. त्यानें तूं तृप्त होऊन या प्रेताच्या स्वामीला पितृलोकाला घेऊन जा आणि याच्या पुत्राला आयुष्यसंपन्न करून घरीं पाठव. कारण हा प्रेतात्मा पितृलोकांत निवास करण्यास योग्य आहे.

हे मृतपुरुषा, तूं पितृलोकी जाण्यास योग्य आहेस. सरमा नामक कुत्रीच्या श्याम व शबल नामक पुत्रांच्या सहित, अत्यंत तृप्त मनानें त्यांच्या बरोबर तूं पितृलोकास जा. पितृमार्गामध्यें उभ्या असलेल्या या

श्वानाला तुझ्या रक्षणासाठीं नियुक्त केलें आहे. या मृतपुरुषाला मी तुझ्या स्वाधीन करतो. पितृलोकांत आलेल्या याला तूं सांभाळ. महान नाक असलेले, प्राणिमात्रांचा प्राण घेणारे, महापराक्रमी यमदूत सर्वत्र संचार करीत असतात. ते दोन दूत सूर्य दर्शनाच्या निमित्तानें हरण केलेले प्राण या शरीरात प्रस्थापित करोत. एका पितरांसाठीं सोमाची नदी निर्माण करोत. दुसऱ्या पितरांना घृताची आवड आहे. ब्रह्मयज्ञामध्यें अथर्वमंत्रांचे पाठ करणाऱ्यांसाठीं मधाची नदी वाहत आहे. हे मृतपुरुषा, तूं या सर्वांना प्राप्त हो. सत्यपूर्ण पुरुष, सत्यापासून उत्पन्न होतात आणि ते सत्याची वृद्धी करतात. अशा तपोधन ऋषींचा, यमाच्या नियंत्रणा-प्रमाणें जाणाऱ्या पुरुषाचा सहवास घडो. तप, यज्ञ, यज्ञादी अन्य साधनें यांच्या योगें अत्यंत कठीण कर्म आणि उपासना करणारे पुरुष महान तपस्वी असतात. ते पुण्यलोकाला प्राप्त होतात. हे मृतपुरुषा, तूं त्यांचा सहवास प्राप्त कर. जो वीर शत्रूवर शस्त्रानें प्रहार करतो. किंवा रणामध्यें देहत्याग करतो, यज्ञामध्यें सहस्त्रावधी दक्षणा आणि अन्न प्रदान करून जो यज्ञ संपन्न करतो त्यांना जे फल प्राप्त होते ते फळ हे मृत-पुरुषा, तुलाही प्राप्त होवो. जो सूर्याला आपल्या दीप्तीनें झाकून टाकतो, त्या तपस्वी पुरुषाला प्राप्त होणारे फल तुला यम देवो. पृथ्वीरूपी वेदी या मृतपुरुषासाठी संकटहीन होते आणि या मृतपुरुषाला सर्व प्रकारची सुखें प्रदान करते.

हे मर्त्य पुरुषा, यज्ञवेदीसारख्या विस्तृत स्थानीं तूं प्रतिष्ठित हो. पूर्वी हवि प्रदान करून तूं ज्या सत्कर्मांचें फळ प्राप्त केलें होतेंस ते तुला सर्वमधुर होवो.

मी माझ्या मनानें, तुझ्या मनाला या लोकी पदार्पण करण्यासाठीं आवाहन करीत आहे. ज्या घरांमध्यें तुझ्यासाठी और्ध्वदेहिक क्रिया केल्या जातात त्या घरामध्यें तूं प्रवेश कर. त्या ठिकाणीं करण्यांत येणाऱ्या क्रिया, पिता, पितामह, प्रपितामह यांच्यासह स्वीकार कर. त्यामुळें तुला यमाच्या जवळ जातां येईल. तेथून पितृलोकाला तूं जाशील तेव्हां आकाशांत मरुद्गण आणि ऊर्ध्व लोकांत वायु तुझें सहवासी होतील. तुझें श्रम नाहीसे होतील. जलधारक आणि जलवर्षक मेघ

तुझ्यावर वृष्टी करून तुला संतुष्ट करतील. तुझे मन, इंद्रिय आणि प्राण तुला सोडून न जावोत. तुझ्या अवयवांना विकृती न येवो. रक्त आणि अन्य पोषक रस तुझ्या शरीरांत राहोत. हे मृतपुरुषा, ज्या वृक्षाच्या खाली तूं वसलास तो वृक्ष तुला बाधकारक न होवो. ज्या पृथ्वीवर तूं आहेस ती पृथ्वी तुला पीडाकारक न होवो. तूं यमाची प्रजा म्हणून पितृलोकांत वास्तव्य करून मोठा हो. तुझ्या शरीरातून सप्त प्राण निघून गेले त्या सर्वांना एकत्रित करून पितृलोकाला गेल्यावर तुला एका शरीरातून दुसऱ्या शरीरांत प्रवेश करतां येईल. हे मृतपुरुषाच्या बांधवानों, या मृतपुरुषाच्या शरीराला, या घरांतून गावाच्या बाहेर घेऊन जा. कारण यमदूतांनीं, याच्या प्राणांना पितृरूपांत प्रविष्ठ करण्यासाठीं हरण केलें आहे.. जे राक्षसांप्रमाणें पिता, पितामह वगैरे पितरांमध्यें मिसळून फसवून हवि भक्षण करतात किंवा पितरांना पिंडदान करणाऱ्या पुत्राला ठार मारतात अशा या मायावी राक्षसांचा, या पितृयागाच्या निमित्तानें अग्नि घालवून देवो. आमच्या गोत्रांत उत्पन्न झालेला आमचा पिता, आजोबा, पणजोबा वगैरे पितर या यज्ञामध्यें येऊन आमचें आयुष्य वृद्धिंगत करून आम्हाला सुखी करोत. आम्हाला आयुष्य आणि सुख प्राप्त झालें म्हणजें आम्ही आमच्या पितरांचें पुष्कळ वर्षे पूजन करूं. हे मृतपुरुषा तुझ्यासाठीं मी गोदान देत आहे. या गाईच्या दुधांत शिजविलेला भात मी तुला अर्पण करीत आहे. त्यामुळें यमलोकीं तुला पुष्ट होऊन राहता येईल.

हे मृतपुरुषा, या नव्या वनमार्गांमध्यें असलेल्या अस्वलादि प्राण्यांपासून मी सुरक्षित झालों आहे. तूं मला अश्वावती नदीच्या पैल तीराला ने. ही नदी आम्हाला सुखदायिनी होवो. ज्याने तुला ठार मारलें तो वध्य आहे. त्याला उपभोग्य पदार्थांचा लाभ न होवो. सूर्यपुत्र यम आपल्या पित्यापेक्षांसुद्धां तेजस्वी आहे. त्याच्याइतका तेजस्वी प्राणी मी पाहिला नाहीं. माझा यज्ञ केवळ त्या यमामुळेंच संपन्न होतो. या यज्ञासाठीं सूर्यानें ही पृथ्वी विस्तृत केली आहे. मरणाधीन मनुष्यांपासून देवांनी आपलें अविनाशी रूप अदृश्य ठेविलें. सूर्याप्रमाणें तेजोवान स्त्री

निर्माण केली. सरण्यूनें अश्विनीचें रूप धारण करून अश्विनीकुमारांचें पालन केलें. सरण्यू ही त्वष्टयाची कन्या. तिनें यम, यमी, यांना सूर्याचा त्याग करताना सोडून दिलें. जे पितर भूमींत पुरले जातात किंवा लाकडाप्रमाणें ज्यांचा त्याग करण्यांत येतो आणि अग्निसंस्कारानंतर जे पितृलोकाला प्राप्त होतात अशा पितरांनो, या पितृयज्ञांतील हवि भक्षण करण्यासाठीं तुम्ही या ठिकाणी आगमन करा. जे पितर अग्निसंस्कारानें निर्दोष झाले किंवा जमिनींत पुरण्यापूर्वी ज्यांच्यावर पवित्र संस्कार करण्यांत आले किंवा पितृयागामध्यें दिलेल्या पिंडादिकांनीं जे पितृलोकीं स्थिर झाले त्यांना हे अग्नें तूं उत्तम प्रकारें जाणतोस. आपल्या पुत्रादिकांनीं केलेल्या पितृयज्ञांतील हवि ते सेवन करोत. हे अग्ने, या मृतपुरुषाला सुख लाभेल असें कर. तुझ्या शोषक ज्वाला अरण्यांत जावोत. तुझें रसहारक तेज पृथ्वीमध्यें जावो. तूं आमच्या शरीराला जाळून टाकूं नकोस. यम म्हणाला हा पुरुष संस्कारित असल्यानें मी त्याला माझ्या प्रजेमध्यें स्थान देईन. तो माझें स्तवन करीत माझ्याकडे आला आहे. तो या ठिकाणीं राहूं शकेल. त्याला स्मशानांत स्थान नाहीं कारण ब्रह्मदेवानें त्याला शंभर वर्षांचे आयुष्य प्रदान केलें आहे, त्यामुळें स्मशान कर्मास हा अपात्र आहे.

या वेदमर्यादा मी जाणतो. त्या मर्यादांचें मापन कोणीही करूं शकत नाही. मला सतत शंभर वर्षांचें आयुष्य प्राप्त होवो. त्यामध्यें काहीं कमी न होवो.

या वेदमर्यादा मी आनंदानें जाणतो. त्यांचे ज्ञान अन्य कोणाला नाहीं. मला पूर्ण शंभर वर्षांचें आयुष्य लाभो.

या वेदांनी निर्माण केलेली बंधनें मी निश्चयपूर्वक जाणतो. तें अन्य कोणालाही माहीत नाहीं. मला पूर्ण शतवर्षांचें आयुष्य प्राप्त होवो.

या वेदमर्यादा मी उत्तम प्रकारें जाणतो. कारण अन्य प्रकारें याचें ज्ञान कोणाला नाहीं. माझ्या शतवर्षाच्या आयुष्यामध्यें कांहींही कमी न होवो.

या वेदमर्यादांचें मला संपूर्ण ज्ञान आहे. तें अन्यांना नाहीं. मला

शत वर्षांचें आयुष्य लाभो.

या वेदवंधनांना मी सुखपूर्ण जाणतो. त्यामुळें मला उत्तम जीवन प्राप्त झालें. मला ते शतवर्षपर्यंत लाभो.

हे मानवा, प्राण, अपान, व्यान, जीवन, दृष्टी, सूर्यप्रेरक सूर्याच्या दर्शनासाठीं आणि सर्वत्र संचार करणाऱ्या यमाकडे आणि पितरांकडे जावो.

जे पितर संतानरहित होऊन, पापशून्यपणें पारलोकीं जातात. ते अंतरीक्ष ओलांडून स्वर्गाच्या ऊर्ध्वभागीं जातात आणि आपल्या पुण्याचें फल उपभोगतात. अंतरीक्षाच्या खालच्या बाजूस द्युलोक उदन्वती, पिलुमती, प्रद्यो हे भाग असून तिसऱ्या भागात पितर निवास करतात. आमच्या वडिलांचे वडील व अन्य पितर विशाल अंतरीक्षांत राहतात. जे पितर स्वर्ग अगर पृथ्वीवर राहतात, त्या सर्वांना आम्ही नमस्कार करतो आणि पूजन करतो. हे मृतपुरुषा, श्राद्धाच्या योगें आम्हीं जें कांहीं तुम्हाला प्रदान करतो त्यावर तुम्ही आपलें उदरभरण करतां. या शिवाय तुमच्या जीवनाचें अन्य साधन नाही. तूं या स्मशानांत प्राप्त होऊन सूर्यदर्शन करतोस. हे पृथ्वी, माता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राला आपल्या पदरानें झांकून टाकते त्याप्रमाणें तूं या मृत माणसाला झांकून टाक.

जीर्ण झाल्यावर यांनीं जें भोजन केलें त्या शिवाय अन्य कशाचाही भोग याला घेतां येत नाहीं. त्याचप्रमाणें याला स्मशानाशिवाय अन्य कोणते स्थानही नाहीं. हे भूमें या स्मशानांत आलेल्या या मृतपुरुषाला, पत्नी आपल्या पतीला ज्याप्रमाणें झांकून टाकते त्याप्रमाणें झाकून टाक. सर्वांना मंगलता प्रदान करणारी पृथ्वीमाता तुला झांकून टाकते. जीवंत असताना, दुसऱ्याला प्रदान करण्यासाठीं याच्या जवळ जी वस्तू होती, ती तुझ्यावर संस्कार करणाऱ्या मला आणि पितरांना प्राप्त होवो. हे अग्ने आणि सोमा, पुण्यमय मार्गाची रचना तुम्ही करता. जो सूर्याचें पूजन करतो, त्याच्या घरांतील मृतपुरुष सरळ मार्गानें पुण्यवंत मार्गाला जातो. पशूंना ठार न मारणारे पशुपालक पूषन् या मृतपुरुषाला त्या मार्गानें घेऊन जाईल आणि प्राणिमात्रांचें रक्षण करणाऱ्या पितरांच्या

स्वाधीन करील. जीवनाचें रक्षण करणारी देवता आयु आहे. पूषा पूर्वेकडील मार्गावर तुझें रक्षण करील. हे मृतपुरुषा, ज्या ठिकाणीं पुण्यात्मे निवास करतात त्या स्वर्गामध्यें सवितृदेवता तुला प्रतिष्ठित करो. हे मृतपुरुषा, तूं सोडलेले प्राण वाहून नेण्यासाठीं मी या बैलांची योजना करीत आहे. या बैलांनी वाहून नेणाऱ्या गाडीनें तूं यम लोकाला प्राप्त हो. हे मृतपुरुषा, तूं परिधान केलेल्या वस्त्राचा तूं त्याग कर. ज्या अभिलाषेने तूं तुझ्या बांधवांना धन प्रदान केले होतेंस त्यातून विहीर, तळीं अशा निर्माण केलेल्या जलाशयापर्यंत तूं जा. हे मृतपुरुषा, इंद्रियें आणि अन्य अवयव यांचें दाहकतेपासून निवारण करणारें कवच तूं आता धारण कर. तूं स्थूलदेही हो. तुझें पूर्णपणें भस्म करणारा हा अग्नि इकडे तिकडे गमन करणार नाहीं. ब्राह्मणाच्या हातांनीं वेळूची काठी धारण करून सर्व प्रकारच्या तेजानें आणि बळानें तूं संपन्न होशील. तूं या चितेमध्यें राहून आणि या पृथ्वीवर सुखपूर्ण होऊन, आपल्या शत्रूला आणि त्याच्यापासून होणाऱ्या त्रासाला कायमचें नाहीसें कर. क्षत्रियाच्या हातून धनुष्याचे ग्रहण करून क्षात्रतेजानें संपन्न होऊन, आम्हाला पुष्कळ धन प्रदान करण्यासाठीं या लोकीं आमच्या परिवारांत आगमन कर.

### ३. पितृमेध – (पितृयज्ञ)

हे यमा, धर्मपालन करण्याच्या निमित्तानें आणि दानादि फलांच्या प्राप्तीसाठीं तुझ्या समीप आली आहे. पुढील जन्मांत तूं हिला प्रजावती कर. हे स्त्रिये, तूं या प्राणहीन पतीच्या जवळ बसली आहेस. तूं तेथून आतां बाजूला हो. तुझ्या पतीपासून तुला पुत्र आणि नातवंडे यांचा लाभ झाला आहे.

तरुण आणि जीवनसंपन्न गाईला मृतपुरुषाच्या जवळ नेले जात आहे. ह्या गाईला मात्र त्याचें ज्ञान नाहीं. मी या गाईला या शवापासून बाजूला करीत आहे. हे गाई, पृथ्वीलोकाचें ज्ञान तुला आहे. यज्ञमार्ग तुझ्या ओळखीचे आहेत. दूध, दहीं इत्यादि पदार्थांनी संपन्न करण्यासाठीं तूं इकडे ये आणि या मृतपुरुषाला स्वर्गाचा मार्ग मोकळा कर.

हे नदीच्या परिसरांत निर्माण होणारे वेत जलगर्भ आणि जल-रक्षक आहेत. जल पितररूप असून वेताची काडी, नदीच्या पाण्याचा फेस, श्वेतदुर्गा इत्यादि औषधांनीं त्यांचें शमन होतें. या स्मशानभूमींत क्यांवू नामक औषधी आणि बृहतदुर्वा उगवून येवोत.

हे मृतपुरुषा, हा गार्हपत्य अग्नि आपल्या पहिल्या ज्योतीनें तुला स्वर्गाला घेऊन जाईल. अन्वाहार्य ही दुसरी आणि आहवनीय ही त्या अग्नीची तिसरी ज्योती आहे. या सर्व ज्योती एकमेकांत मिसळून तयार केलेला संस्कारित अग्नि तुला देवशरीराची प्राप्ती करून देईल. त्यामुळें इंद्रादि देवतांचा तूं आवडता होशील.

हे मृतपुरुषा, तूं या ठिकाणाहून नीघ आणि जातांना अंतरीक्षांत आपलें निवासस्थान तयार कर आणि पितरांच्यासहित सोमाचा आस्वाद घेऊन आनंदित हो. तूं आपल्या सर्व अवयवांना एकत्र कर. कोणतेहीं अंग वाजूला राहणार नाहीं असें कर. तुझें मन ज्या स्वर्गामध्यें रममाण होण्याची इच्छा करतें त्या स्वर्गांत तूं प्रवेश कर. ज्या स्थानावद्दल तुला प्रेम आहे त्या स्थानीं तूं जा. सोमपान करण्यास योग्य असलेले पितर तुला तेजस्वी वनवोत. विश्वेदेव मला मधुर घृत दीर्घकालपर्यंत प्रदान करोत आणि रोगशून्य अवस्थेमध्यें मला पुष्कळ काळपर्यंत ठेवोत.

अग्नि मला तेज प्रदान करो. विष्णु मला बुद्धिमान करो विश्वेदेव मला सुखमय धनराशीचा स्वामी करो आणि पाणी वायूच्या साहाय्यानें मला पवित्र करो. दिवसाचा मित्र सूर्य आणि रात्रीचा मित्र वरुण मला वस्त्रयुक्त करोत. आदित्य आमचें जीवन विकसित करून आमच्या शत्रूंचा नाश करो. इंद्र मला वाहुवल आणि सविता दीर्घायु प्रदान करोत मर्त्यधर्म प्राणिमात्रांमध्ये उत्पन्न झालेला राजा प्रथम मृत्यूप्रत गेला आणि यमाच्या स्पर्शानें अन्य लोकांत प्राप्त झाला. त्या सूर्यपुत्र यमाकडे मर्त्यधर्म सर्व प्राणी प्रयाण करतात. हे ऋत्विजांनों, पाप आणि पुण्याचा न्यायानुसार फल प्रदान करणाऱ्या यमाचें पूजन करा. हे पितरानों, आमच्या पितृयज्ञानें संतुष्ट होऊन तुम्ही स्वस्थानीं प्रयाण करा. आम्ही ज्या वेळीं तुमचें पुन्हा आवाहन करूं तेव्हां तुम्हीं पुन्हा आगमन करा. या पितृयज्ञाच्या निमित्तानें आम्ही तुम्हाला मध आणि

घृतयुक्त अन्न प्रदान केलें आहे. त्याचा स्वीकार करा आणि आमचें घर मंगलमय ऐश्वर्य, पुत्र, पौत्र, पशु इत्यादिकांनीं समृद्ध करा. कण्व, कक्षीवान्, पुरुमीढ, अगस्त्य, शयावाश्व, सौभरी, विश्वामित्र, जमदग्नि, अत्रि, कश्यप, वामदेव, वगैरे ऋषी आमचें रक्षण करोत. त्याचप्रमाणें विश्वामित्र, जमदग्नि, वसिष्ठ, भरद्वाज, गौतम, वामदेव, वगैरे ऋषी आम्हाला सुख प्रदान करोत. आमच्या आप्ताला त्याच्या मृत्यूनंतर स्मशानांत सोडतो. त्याबरोबर आमचें दुःखही आम्ही तेथेंच त्याग करून प्रेताच्या स्पर्शानें निर्माण झालेली अपवित्रता यांच्यापासून मुक्त होऊन घरीं परत येतो. यामुळें आमची दुःखापासून सुटका झाल्यानें, पुत्र-पौत्र, पशू वगैरे धन, सुवर्ण, गंध आणि दीर्घ आयुष्य यांनीं आम्ही संपन्न झालों. सोमयागाच्या प्रारंभीं यजमानांना ऋत्विज अंजन प्रदान करतात. आपल्या प्रकाशानें सागराला भरती आणणारा चंद्र उदयाला येतो. हे पितरांनों, सोमासहित तुम्ही आमच्याकडे या. तुम्ही सदैव यशस्वी व्हा आणि आम्हाला अभीष्ट प्रदान करा. आमच्या यज्ञांत तुम्हाला आम्ही आवाहन केल्यावर तुम्ही त्याला साद द्या. तुम्ही अत्रि आणि अंगिरा गोत्रांतील आहांत. सतत नऊ महिने सोमयाग केल्यावर तुला स्वर्गारोहणाची पात्रता लाभेल. दहा मासिक यागांच्या संपन्नते-मुळें दक्षिणा प्रदान करणारे पुण्यवान व्हाल. म्हणून या दर्भासनावर बसून आम्ही प्रदान केलेल्या आहुतींच्या योगें प्रसन्न व्हा.

हे अग्ने, ज्याप्रमाणें आमचे श्रेष्ठ पितर स्वर्गाला प्राप्त होतात, सामगायक पितर रात्रीच्या अंधाराला आपल्या तेजानें दूर करतात आणि उषेला प्रकाशित करतात. कल्याणमय कर्म करणारे, तेजोवान देव आपल्या इच्छेनुरूप तपाच्या साहाय्यानें श्रेष्ठत्वाला प्राप्त झाले. गार्हपत्य अग्नीला प्रदीप्त करून, स्तुतीच्या सहाय्यानें इंद्राला प्रसन्न करीत आमचे पितर, आमचे गोठे गाईंचे निवास करोत. हे अग्ने, तूं या मृत जयमान पुरुषाला भस्म केलेंस. तुझ्या कृपेनें मर्त्यधर्मी मनुष्यांना ऊर्वशी वगैरे-सारख्या अप्सरांचा भोग मिळतो. तुझ्याच कृपेनें तो मनुष्यगर्भ धारण करून वृद्धिंगत होतो. हे अग्ने, आम्ही तुझे सेवक असून तूं आमचा पालक आहेस. तू कल्याणकारण कर्म करणारा आहेस. उषाकालांत

आम्ही जी कर्मे करतो त्यांना तूं सत्याप्रत ने. ती कर्मे आमचें कल्याण करणारी होवोत. आम्हाला आमच्या पुत्र-पौत्रादिकांच्या सहित यज्ञ करण्याची आणि सुन्दर स्तोत्रें म्हणण्याची वृद्धि प्राप्त होवो. संसार करणाऱ्या मला मरुत्गण आणि इंद्र पूर्वेच्या बाजूकडून संरक्षित करोत. पृथ्वी ज्या प्रमाणें दात्याच्या उपभोगासाठीं स्वर्गाचें रक्षण करते त्या प्रमाणें ती आमचेही रक्षण करो. पुण्यमार्गानें प्राप्त होणाऱ्या स्वर्गाचा मार्ग दर्शविणाऱ्याची आम्ही पूजा करून त्याला हवी प्रदान करतो. हे देवगणांनों, या यज्ञामध्यें तुम्ही तुमचा हविर्भाग घेण्यासाठीं या. पापदेवता निर्ऋतीपासून दक्षिण दिशेचें रक्षण धाता करो. ज्या स्वर्गाच्या प्राप्ती-साठीं आम्ही हवि प्रदान केले आहेत त्या स्वर्गाचें पालन पृथ्वी करते. स्वर्गादि लोकांचा उपभोग प्रदान करणाऱ्या देवतांचें आम्ही पूजन करतो. देवमाता अदिति पश्चिमेकडून आम्हाला संरक्षित करो. उत्तर दिशेकडून सोम आमचे रक्षण करो. या सर्व देवतांचें आम्ही पूजन करतो. वरुण देवता ऊर्ध्व दिशेकडे गमन करणाऱ्यांचें रक्षण करो. हे मृतपुरुषा, दहनस्थानीं नेण्यापूर्वी तुला मी लोकरीच्या वस्त्रांत गुंडाळून पितरांच्या तृप्तीसाठी स्वधा नामक स्थितीमध्यें प्रतिष्ठित करतो. स्वर्गाची प्राप्ती करून देणाऱ्या सर्व देवगणांची आम्ही पूजा करतो.

हे मृतपुरुषा, दहनस्थानीं नेण्यापूर्वी आम्ही तुला सर्व दिशांकडून लोकरीच्या वस्त्रानें गुंडाळून पितरांना तृप्त करणाऱ्या स्वधा नामक अवस्थेंत तुला प्रतिष्ठित करीत आहोत. पृथ्वी ज्याप्रमाणें स्वर्गाचें रक्षण करतें त्याप्रमाणें ती तुझें रक्षण करील. स्वर्गाची प्राप्ती करून देणाऱ्या देवतांची आम्ही पूजा करतो आणि त्यांना हविर्भाग अर्पण करतो.

हे अग्ने, सर्वांना धारण करणारा वरुण देवता तूंच आहेस. द्यौ, पृथ्वी, भूलोक, स्वर्गलोक यांतील भयापासून तूंच रक्षण करतोस. तूं संसाराचें पोषण करणारा आहेस. देवतांची कृपा इच्छिणारे पुरुष देवतांना हवि प्रदान करतात म्हणून यज्ञीय देवता आपापल्या स्थानीं स्थिर होतात. धर्मानें चालणारा पुरुष आपल्या सर्व कामना पूर्ण करतो. सोम आणि अन्य अविनाशी देवता आमची स्तोत्रें ऐकोत. मृत पुरुष

मोहमय द्युलोकास प्राप्त होतो परंतु मरण प्राप्त होतांच मोहशून्य मृतपुरुषाला पुण्यफलदायी स्वर्गाची प्राप्ती होते.

सृष्टीच्या प्रारंभींच विधात्यानें देवांसह मृत्यूच्या मर्यादा निश्चित केल्या. त्या प्रमाणें सूर्यतनय यमानें, बृहस्पतीच्या प्रेमांतील मनुष्यांचा देह त्यांतील प्राण काढून घेऊन अचेतन केला. हे अग्ने, सर्वप्रकारें उत्पन्न झालेल्या प्राणिमात्रांचा तूं ज्ञाता आहेस. तूं आम्ही केलेली स्तुती श्रवण कर आणि आम्ही दिलेला हवी देवतांकडे घेऊन जा. पितरांना आम्ही जें कव्य प्रदान केलें तें तूं स्वधेसहित पितरांना दिलेंस. आतां तुला दिलेले सर्व तूं भक्षण कर.

हे पितरांनों, तुम्ही अरुणवर्णा उषा मातेचा आश्रय करून राहातां. पुन्नाम नरकांतून तुमची सुटका करणाऱ्या तुमच्या पुत्राला तुम्ही संपत्ती व बलदायक अन्न प्रदान करा. या यज्ञामध्यें तुम्ही या आणि आपापल्या आसनावर विराजमान व्हा. आम्ही प्रदान केलेले हवि भक्षण करून संतुष्ट व्हा आणि आपल्या पुत्रांना संपत्ती प्रदान करा. आम्ही आमच्या जवळ असलेल्या सोमासाठीं पितरांना आवाहन करीत आहोत. आमचे हवि स्वीकारून आम्हाला इहलौकिक आणि पारलौकिक फल ते प्रदान करोत. आमचे ज्ञानवान पितर यमाच्या सान्निध्यांत राहून सोमपान करोत आणि आमचें रक्षण करोत. आमच्या आहुती ते स्वेच्छेनें भक्षण करोत. तृपित झालेले पितर, देवतांची स्तुती करणारें आणि सत्य-फल प्रदान करणारे आहेत. सोमयागामध्यें वसणाऱ्या पितरांच्यासहित, हे धनद अग्ने तूं आमच्याकडे ये. सत्यवादी, सत्यभाषी, हव्यादिकांचे सेवन करणारे, देवतांच्या सान्निध्यांत राहाणारे आणि बुद्धिवान असे आमचे पितर आहेत. त्यांच्यासह हे अग्ने, तूं आमच्याकडे ये.

हे मृतपुरुषा, मातेप्रमाणें सुख प्रदान करणाऱ्या पृथ्वीवर तुला स्थिर करण्यांत आलें आहे. कारण यज्ञादि कार्यांमध्यें दक्षिणा प्रदानाचें पुण्य तुझ्या पदरीं आहे. त्यामुळें पृथ्वी तुझें रक्षण करील. हे पृथ्वी, तूं कठोर होऊं नकोस. या मृतपुरुषाला तूं त्रास देऊं नकोस. सर्व सुखानें तो तुझ्याजवळच राहो. माता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राला पदराखालीं घेते त्याप्रमाणें तूं याला आपल्या पदराखालीं घे.

या स्थिर आणि सुखपूर्ण पृथ्वीवरील औषधी, या मृतपुरुषाला स्मशानामध्यें संरक्षित करतील. तुला ही भूमी चारही दिशांनीं संरक्षित करील. या कर्मामुळें आम्ही हिंसक होणार नाहीं. तुझ्यावर आच्छादन केलेल्या या भूमीमुळें भूगर्भ तुझें घर झालें आहे. हे अग्ने, देवतांना सोमादिकांचे सेवन तूं घडवून आणतोस त्यावरोवरच पितरांचाही तूं प्रिय आहेस. अथर्वानें जो हवि इंद्रासाठी अर्पण केला त्यातून उरलेलें हविरन्न ऋत्विजांनी सेवन केलें. अशा हवीमध्यें नित्य अमृत असतें. हे मृतपुरुषा, तुझ्या ज्या अवयवांना कावळ्यासारख्या काळ्या पक्ष्यांनीं किंवा काळ्या मुंग्यांनी दंश केला आहे त्यांना हा अग्नि निरोगी करील. विविध रसयुक्त औषधी आणि जलस्वामी वरुण या पुरुषाला शुद्ध करोत. या पुरुषाच्या भावांच्या स्त्रिया विधवा न होवोत. त्या सदैव पतियुक्त होऊन, सुन्दर आभूषणें धारण करणाऱ्या, रोगमुक्त, दुःखरहित आणि संतानवती होऊन राहोत. तुला श्राद्धीय अन्न प्रदान करीपर्यंत तूं पितृलोकीं पितरांच्या समवेत राहा आणि आपल्या श्रेष्ठ कर्मांच्या पुण्याईनें स्वर्गांत पदार्पण कर. आमच्या कुळांतील ज्या पितरांनीं अंतरीक्षांत वास केला, त्यांच्या शरीराचें रक्षण असुनीति नामक देवतेनें केलें. हे मृतपुरुषा, नीहा नामक देवता सुख प्रदान करील. पाणी तुझ्यावर सुखपूर्ण वर्षाव करील. हे पृथ्वी, तूं या दग्ध पुरुषाला मण्डूकपर्णी औषधीद्वारा सुख प्रदान कर. याला जाळणाऱ्या अग्नीला शांत कर.

आमच्यापासून निर्माण झालेल्या अनेक वीरपुरुषांचें आणि त्यावरोवर गाई वगैरे पशूंना सूर्य, सुमात्रा, सुदानु आणि जरिदानु देवता निर्भय करोत. सूर्य त्यांना अमृतत्व देवो. मृत्युदेवता दूर निघून जावो. वृद्धावस्थेपर्यंत आम्हाला अमृतत्वाचा लाभ घडो. हे प्रज्ञावंत ब्राह्मणांनो तुम्ही सर्व प्राणिमात्रांचे मित्र आहांत. हव्यादिकांनी तुम्ही यमाची पूजा करा. तो यम आम्हांला जीवनपुष्ट करो. हे ऋषींनो, तुम्ही मंत्रद्रष्टे आहांत. आपल्या श्रेष्ठ कर्मांच्या फलांनीं तुम्ही स्वर्गारोहण करतां. तुम्ही सोमयाग करणारे आणि सोमप आहांत. तुम्हाला स्वर्गलाभ व्हावा म्हणून तुम्ही या यज्ञांत हवि अर्पण करतां. तुमच्या आशीर्वादानें आम्हालादेखील चिरायुत्व प्राप्त होवो. हा अग्नि आपली धूमरूपी ध्वजा फडकावीत

उपासकांच्या सर्व कामनांचा वर्षाव करतो. पृथ्वीवर स्थिर होतांच तो आकाशाकडे पाहात शब्दवान होतो. अंतरीक्षांत देखील या अग्नीची कीर्ति महान आहे.

हे मृतपुरुषा, आम्ही तुला स्वर्गास जातांना पाहातो. सुवर्णपंख-युक्त वरुणाचे दूत तुला यमाच्या घरी घेऊन जातात. हे इंद्रा, पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राला इच्छित वस्तु प्रदान करतो त्याप्रमाणें आम्हाला यज्ञादि कर्मांचें फल प्रदान कर. संसार दुःखशून्य कर आणि आम्हाला दीर्घजीवी कर. हे मृतपुरुषा, देवतांनीं घृत, मधु वगैरे पदार्थां-सहित जे कुंभ ठेवले आहेत ते तुला घृतयुक्त अन्न प्रदान करणारे आहेत. तिलयुक्त जल तुला प्रदान करीत आहेत. त्यामुळें तुला वैभव प्राप्त होईल. यमराज तुझ्यावर संतुष्ट होईल. हे वनस्पतींनों, या पुरुषामध्यें अस्थिरूपानें तुमचा वास आहे. यमगृहीं तो तसाच राहो. हे अग्ने, तुझी दहनशीलता महान आहे. या मृतपुरुषाला तूं भस्मरूप कर आणि याच्या आत्म्याला पुण्यमय स्वर्गांत प्रतिष्ठित कर. तुझ्या अस्तित्वामुळें निर्माण झालेल्या सर्व पितरांना घृतयुक्त अन्न लाभो. हे मृतपुरुषा, या शरीराचा त्याग करून तूं पवित्र व्योममार्गानें जा. आकाशस्थ पितरांना त्रास देऊं नकोस.

### ४. पितृमेध (पितृयज्ञ)

गार्हपत्यादि अग्नि सर्व प्राणिमात्रांचे ज्ञाते आहेत. हे सर्व अग्नि हव्यवाहक असून ते देवतांना हव्य नेऊन देतात. हे अग्ने, यज्ञादि कर्मांनीं तुझी सेवा करणाऱ्या आणि परदेशीं मृत्यु पावलेल्या यजमानाला तूं पुण्यलोकांमध्यें प्रतिष्ठित कर. इंद्रादि देवता ऋतु-यज्ञाची इच्छा करतात. हवनीय सामग्रीदेखील यज्ञाची इच्छा करतात. ज्या मार्गानें पुण्यशील लोक जातात, त्या देवयान मार्गानें हे अग्ने, तूं प्रयाण कर. हे मृतपुरुषा, अंगिरसादि ऋषी ज्या मार्गानें गेले त्या पुण्यमार्गानें तूं गमन कर. कारण अदितिपुत्र या मार्गावर अमृत सेवन करून दुःखमुक्त होतात. त्या मार्गानें तूं तृतीय स्वर्गाला जाशील. अग्नि, वायु आणि सूर्य या मार्गा-वरून जातात. जलानें भरलेले मेघ वायु याच मार्गावरून वाहून नेतो.

स्वर्गाच्या वर असलेल्या विष्टप नामक लोकांत यांचा नित्य निवास असतो. या सर्वांनीं आपल्या कर्मांनीं हा लोक संपादन केला आहे. जुहू नामक होम-पात्रानें आकाश, उपभृतानें अंतरीक्ष आणि ध्रुवानें पृथ्वी धारण केली आहे. हे ध्रुवा नामक स्रुवे, तूं यजमानासह पृथ्वीवर प्रतिष्ठित हो. उपभृत अंतरीक्ष आणि जुहू द्युलोक समृद्ध करील. हे यजमाना, यांच्यावरोवर तूं राहा म्हणजे तुलाही समृद्धि लाभेल. त्रिविध आपत्तीं-पासून तूं दूर होशील. यज्ञ करणारे पुरुष ज्या मार्गानें स्वर्गाला जातात त्या मार्गाचा शोध घेत यजमान स्वर्गांत पदार्पण करील. आहवनीय गार्हपत्य, दक्षिणाग्नि वगैरे प्रकारचे अनेक अग्नि ह्या मृतपुरुषाचे भस्म करण्यास समर्थ आहेत. हे मृतपुरुषा, हा दक्षिणाग्नि तुझें भस्म करील. सर्व दिशांना असणाऱ्या हिंसकांपासून तुझे रक्षण होईल. हे अग्ने, निर-निराळ्या स्थानीं तूं उत्पन्न होतोस. तुझी यज्ञरूपानें आराधना करणाऱ्या यजमानाला तूं महान आणि कल्याणप्रद फल प्रदान करोत. तुझी आराधना करणाऱ्या यजमानाला तूं स्वर्गाला घेऊन जा. त्याच्या गोत्रांत उत्पन्न झालेले आम्ही त्याच्यावरोवरच अन्य देवतांच्या सान्निध्याचा फायदा घेऊं.

हे अग्ने, पूर्व, दक्षिण, उत्तर आणि पश्चिम या चारही दिशांकडून तूं या मृतपुरुषाला भस्म कर. तूं एक असूनही यजमान तुला तीन रूपांनीं जाणतात आणि तीनही रूपांची प्रतिष्ठा करतात. हा मृतपुरुष यज्ञीय कर्मे करणारा यजमान आहे. हे अग्ने, तूं या यजमानाला पुण्य-लोकीं प्रतिष्ठित कर. त्याच्या देहाचे भस्म करतांना त्याचे अवयव इकडे तिकडे फेकूं नकोस. हा पितृयज्ञ याला स्वर्गांतील सर्व सुखाचा धनी करो. हा यज्ञीय पुरुष, विषम शलाका आणि विटा यांच्या साह्यानें तयार केलेल्या चितेवर चढत आहे. देवयान मार्गानें जाणाऱ्या या पुरुषाला प्रकाश प्राप्त होवो. या पितृयज्ञामध्यें अग्नि हा होता झाला, बृहस्पति अध्वर्यु झाला आणि इंद्र ब्रह्मा झाला. या प्रकारें पितृयज्ञ संपन्न झाला. गव्हाचें पीठ आणि गोदुग्ध यांच्यापासून तयार केलेलें पक्वान्न या यज्ञातील चरू होय. तो या मृतपुरुषाच्या पश्चिमेस ठेवला जातो. त्यामुळें स्वर्ग-स्वामी इंद्र प्रसन्न होतो.

हे मृतपुरुषा, तुला आच्छादित करण्यासाठी सविता तुला वस्त्र देतो. या वस्त्राच्या साहाय्यानें तुला यमाच्या राज्यामध्यें स्वच्छंदपणे फिरतां येईल. तांवडे, पांढरे तीळ आणि पांढऱ्या रंगाच्या लाह्या तुला गाईप्रमाणें सोबत करतील. वैश्वानर अग्नीला आम्ही या आहुती देत आहोत. त्या पितरांना तृप्त करतील. आमचे पितर पाणी ठिबकणाऱ्या कुंभाची कामना करतात. समान कुलांत उत्पन्न झालेल्या पुरुषांनों या मृतपुरुषाच्या अस्थीचें तुम्ही दर्शन घ्या. हा मृतपुरुष आता अमरत्वाकडे जात आहे. त्याच्यासाठी घर निर्माण करा. हे उल्मुक धूलिपूर्ण प्रदेशांत वास्तव्य करणारा तूं धनदायक आहेस. तुझ्यामुळें आमची यज्ञादि कर्में पार पडतात. आचमनास योग्य असें पाणी आणि पिंड यांच्या दानानें पितर तृप्त होतात. या पाण्यानें आचमन केलें असतां मातृकुलांतील पितर तृप्त होतात. दक्षिणाग्नि यज्ञात प्रदान केलेले पिंड अग्नि पितरांना पोहोचवितो. या पिंडाचा आस्वाद माझे पितर घेवोत. या यज्ञांत पितरांसाठी ठेवलेले पिंड सेवन करण्यासाठीं आलेले पितर तृप्त होऊन आम्हाला पुत्र-पौत्र आणि धन प्रदान करतात.

यज्ञ करणारे पुरुष अविनाशी अग्नीला प्रज्वलित करतात. भूमिगत धन ज्याप्रमाणें कोणाला दिसत नाही त्याप्रमाणें पितरही कोणाला दिसत नाहींत परंतु या अग्नीला मात्र सर्व पितर दिसतात. तो त्यांना चांगल्या प्रकारें जाणतो. म्हणूनच अग्नीला प्रज्वलित केलें जातें. हे पितरांनों, आम्ही तुम्हाला जे अन्न, उडीदाचा पदार्थ आणि मन्थ प्रदान करतो ते पदार्थ तुम्हाला सुख देणारे आहेत. ते पदार्थ भक्षण करण्याची यम तुम्हाला अनुज्ञा देवो. या मार्गानें जाणाऱ्या गाडीला जे दोन वृषभ जोडले आहेत ते पुण्यलोकाला जाणारे आहेत. मृताचा अग्निसंस्कार करणारे अग्नीच्या साहाय्याची अपेक्षा करतात आणि देवी सरस्वतीला आवाहन करतात. ज्योतिष्टोम वगैरे यज्ञामध्यें देखील या देवी सरस्वतीला आवाहन केलें जातें. ती आवाहनकर्त्या पुरुषाला इष्ट पदार्थ प्रदान करते. वेदीच्या दक्षिण दिशेला असलेले पितर या सरस्वती देवीला आवाहन करतात. हे पितरांनों, या यज्ञानें तुम्ही प्रसन्न व्हा. देवी सरस्वतीला प्रसन्न करतांना, आमच्या हवींनी तुम्ही तृप्त व्हा.

हे देवी सरस्वती, या पितरांनीं तुला आवाहन केलें आहे. तूं या ठिकाणीं येऊन स्थानापन्न हो. तूं उक्थ, शस्त्र आणि स्वधारूप अन्नानें तृप्त होतेस. या पितरांच्या समवेत तू या रथाने गमन कर आणि यजमानाला अन्नादिकांनीं तृप्त कर. हे पृथ्वी, कुंभ हा तुझाच विकार आहे. हे पितरांनों, या कुंभांतील अन्न आणि उदक तुम्हाला प्राप्त होवों. मृतपुरुषाला वाहून नेणाऱ्या वृषभांनों, तुम्ही आमच्या समक्ष बाजूला व्हा. या प्रेताची निंदा तुम्ही ऐकूं नका. प्रेतावर संस्कार करणाऱ्यांना दक्षिणा, फल, दूध आणि अन्न प्रदान करून ते सर्व पितरांपर्यंत नेऊन पोहोचवा.

जीवनांतील सर्व कामना पूर्ण व्हाव्यात म्हणून संस्कारी पितर आणि देवतांसाठीं पसरलेल्या या दर्भासनांवर पितृमेधयोग्य असलेला हा पुरुष विराजमान होवो. हे मृतपुरुषा, त्या कुशासनावर विराजमान झाल्यावर पितर तुझे सर्व अवयव आणि अस्थि सुरक्षित करतील. पळसाच्या अधिष्ठित झालेलें अन्न, रस आम्हाला बल आणि दीर्घायुष्य प्रदान करतात. या मृतपुरुषासाठीं ज्या यजमानाने अन्न तयार केलें, ते अन्न यम पाषाणानीं आच्छादित करतो. त्या यमाला हविर्दानानें संतुष्ट करा. म्हणजे तो आमचे पोषण करील. हे मृतपुरुषा, घृतपूर्ण सुवर्णमुद्रा तूं धारण कर. जीवित प्रभावी होण्यासाठीं घृताचा शिडकावा असतो. सोमाची स्तुती करणारे सोम प्राप्त करतात. सोम रात्र आणि दिवस निर्माण करतो. उषा आणि आकाश यांना वृद्धिगत करतो. तो जलाचा प्राण आहे. असा गुणकारी सोम कलशांत प्रवेश करतांना मधुर शब्द करतो. तीनही वेळीं केल्या जाणाऱ्या यज्ञामध्यें तो इंद्राच्या उदरांत स्थिरावतो. हे मृत्तपुरुषा, तुझ्या अग्नीचा धूर अंतरीक्षांत मेघरूपानें पसरतो. तूं सूर्याप्रमाणें प्रकाशमान होतोस. स्त्री ज्या प्रमाणें पुरुषाकडे जाते त्याप्रमाणें हा सोम कलशाकडे जातो.

पिण्ड प्रदान केल्यामुळें संतुष्ट झालेले पितर आम्हाला अभीष्ट फल देतात. हे पितरांनो पितृयान पंथानें तुम्ही गमन करा. तुम्हाला पिंड आणि तीळ अर्पण करणाऱ्या आम्हाला संतान आणि आयुष्य प्रदान करा. अमावास्येच्या दिवशीं आमच्या निवासस्थानीं येऊन तुम्ही आम्ही प्रदान केलेले पिंड स्वीकारा. सकाळीं आणि संध्याकाळीं ज्या अग्नीला वन्दन

करतात तो अग्नि दूत होऊन आमचे प्रदत्त हवि पितरांना नेऊन देतो. हे पितरांनों, हे हवि सेवन करा. वरुण आपल्या पाशांना तुमच्यापासून लांब ठेवो. पाशमुक्त मनुष्य पितरांची उत्तम प्रकारें सेवा करतो.

कव्यवाहक अग्नीला स्वधायुक्त हवि प्राप्त होवोत. मी त्याला वन्दन करतो. पितृदान सोम, पितरांचा अधिपति यम, प्रपितामह यांना आमचा नमस्कार असो. पृथ्वीवर राहणाऱ्या, अंतरीक्षांत वास करणाऱ्या आणि स्वर्गांत वास करणाऱ्या पितरांना या आहुती प्राप्त होवोत.

हे पितरानों, तुमचें अन्न, रस, क्रोध, मानस, भयकारी रूप, हिंसक रूप, मंगलकारी रूप, आणि सुख प्रदान करणारें रूप आम्हाला परिचित आहे. त्याला आमचा नमस्कार असो. हे हवि तुम्हाला मिळोत. या पिंडामध्यें तुम्हीं देवरूपानें अधिष्ठित झालां आहात. तुम्ही सर्वश्रेष्ठ आहात. तुम्हाला हा पिंड प्राप्त होवो. तुम्हाला हा पिंड प्राप्त झाला की तुमच्या प्रसन्नतेमुळें आम्ही सुखी होऊं. हे अग्ने, समिधा अर्पण करून आम्ही तुला प्रवृद्ध करीत आहोत. तुझ्या दीप्तीनें आकाश प्रकाशित होतें. तूं तुझी स्तुती करणाऱ्यांना सर्वोत्तम अन्न प्रदान कर. हे चन्द्र किरणांनों, तुमच्या किरणांचें वैभव मी जाणू शकत नाहीं. द्यौ आणि पृथ्वी मात्र तुमचें गौरवपद जाणतात. तुम्ही सर्वांवर दया करा.



# काण्ड एकोणिस

## १. यज्ञः (यज्ञ)

पाण्यानें भरलेल्या नद्या सतत प्रवाहित होवोत. वायू आम्हाला अनुकूल होवो. पक्षी पशु वगैरे सर्वजण आम्हाला अनुकूल होऊन आम्हाला उत्तम फल देणारे होवोत. हे देवतांनों, ज्या यजमानासाठीं हा शांतियज्ञ संपन्न करण्यांत येत आहे त्याचें संतान आणि पशु यांची वृद्धि करा. घृतासहित हा हवि आम्ही तुम्हाला अर्पण करतो. हे आहुतींनों हा यज्ञ तुम्ही सफल करा. हे घृत, क्षीर वगैरे यज्ञाचें पालन करोत. स्तुती करण्यास योग्य असलेल्या देवतांनों या यज्ञाच्या योगें तुम्ही यजमानाला संपन्न करा.

## २. आपः (पाणी)

हे यज्ञ करणाऱ्या पुरुषा, हिमवान पर्वतातून आणलेलें, झऱ्यांतून प्रवाहित झालेलें, पर्जन्यवृष्टीमुळें प्राप्त झालेलें, वाळवंटी प्रदेशात प्राप्त झालेलें, जलमय प्रदेशातील पाणी, विहीर, डवकें अगर तळे यांतील पाणी, मृत्तिका कुंभातून आणलेलें आहे. ते तुझें कल्याण करणारें ठरो. जे पाणी दोन्ही किनाऱ्यांना स्पर्श करण्यास समर्थ आहे. अत्यंत गुप्त स्थानातून जें प्रवाहित झालें आहे असें पाणी औषधापेक्षां सुद्धां गुणकारी असल्यानें अशा जलास मी नमस्कार करतो. हे ऋत्विजांनों, आकाशांतून वेगानें येणाऱ्या पाण्याप्रमाणें किंवा मुक्त केलेल्या अश्वा-प्रमाणें शांत्योदक-कर्म त्वरेनें पार पाडा. हे यज्ञकर्त्यांनों क्षयादि रोगांचें

शमन करणारें, औषधीरसगर्भ आणि सर्वांचें कल्याण करणारें पाणी, सुखवृद्धीसाठीं या ठिकाणीं घेऊन या.

३. **जातवेद:** (अग्नि– ज्ञानवान अग्नि)

हे अग्ने, तूं ज्या ठिकाणीं असशील त्या ठिकाणाहून तूं या ठिकाणीं ये आणि आमची स्तोत्रें ऐक. येताना तूं आकाश, पृथ्वी, अंतरीक्ष आणि औषधी वनस्पती यांच्यातील गुणासहित ये. हे अग्नें पाण्यामध्यें तुझा जो अंश आहे, जंगलातील वृक्षामध्यें तुझें जें अस्तित्व आहे, औषधी आणि फळें यांमध्यें जो तुझा रसरूप अंश आहे, प्राणिमात्रांच्या उदरांत वैश्वानर रूपानें तूं राहातोस, अंतरीक्षांत विद्युत रूपानें प्रकाशतोस त्या तुझ्या सर्व रूपांसहित येऊन तूं आमचें कल्याण कर. हे अग्ने स्वर्गांत पदार्पण करण्यासाठीं देवसुद्धां तुझा महिमा गातात. तूं पितरांमध्यें प्रवेश करतोस. प्राणिमात्रांचें पोषण करतोस. या सर्व गुणांसह आमच्या कल्याणासाठीं तूं ये. हे अग्ने, आमची स्तोत्रें ऐकण्यास तूं समर्थ आहेस. तूं इष्ट फलांचे दान करणारा, सर्व वस्तूंचा ज्ञाता आणि सर्वसाक्षी, आहेस. मंत्ररूप वाणीनें मी तुझी स्तुती करतो. या योगें आम्हाला अभय प्राप्त होवो. तूं आमच्यावर रागावू नकोस. त्याप्रमाणें देवतांचा आमच्यावरील क्रोध तूं शांत कर.

४. **आकूति:** (संकल्प किंवा इच्छा)

हे अग्ने, सृष्टीच्या प्रारंभी, अथर्वानें अग्नीला दिलेली आहुती अग्नीनें देवतांना पोहचविण्याची इच्छा केली. ती आहुती आम्ही तुला अर्पण करतो. तिचा तूं स्वीकार कर. संपन्नता प्रदान करणाऱ्या वाणी-देवीची मी पूजा करतो. वाईट कर्म करण्यापासून परावृत्त करून ती माणसांना सत्कर्माला प्रवृत्त करते. मातेप्रमाणें माणसाला आपल्या जवळ करून देवी सरस्वती सर्वांचें इष्ट करते. मला त्या देवीची प्रसन्नता प्राप्त होवो. हे वृहस्पते, तूं सर्व देवतांचा पालनकर्ता आहेस. आमच्या मुखांतून सुखद वाणी निर्माण करण्यासाठीं तूं ये आणि आम्हाला भाग्यवान कर. हे अंगिरसादि ऋषींनों, माझी वाणी समृद्ध करण्यासाठीं

तुम्ही देवी सरस्वती व बृहस्पती यांची प्रार्थना करा. बृहस्पती तुम्हाला अनुकूल असून उत्तम फल देणारा आहे. तो आम्हालाही फल प्रदान करील.

५. जगतो राजा (जगाचा राजा – स्वामी)

इंद्र हा जगताचा राजा– (स्वामी) आहे. तो तीनही लोकांत वास करणारा, हविर्दात्याला महान धन प्रदान करणारा, वनस्पति, आणि स्तुतीनें प्रसन्न होणारा आहे. आमच्या स्तुतीनें तो प्रसन्न होऊन पृथ्वीवरील धन आम्हास प्रदान करो.

सहस्रबाहुः पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।
स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद् दशाङ्गुलम् १
त्रिभिः पद्भिर्द्यामरोहत् पादस्येहाभवत् पुनः ।
तथा व्यक्रामद् विष्वङ्ङशनानशने अनु २
तावन्तो अस्य महिमानस्ततो ज्यायांश्च पूरुषः ।
पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ३
पुरुष एवेदं सर्वं यद् भूतं यच्च भाव्यम् ।
उतामृतत्वस्येश्वरो यदन्येनाभवत् सह ४
यत् पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन् ।
मुखं किमस्य किं बाहू किमूरू पादा उच्येते ५ (११)
ब्राह्मणोऽस्य मुखमासीद् बाहू राजन्योऽभवत्। मध्यं तदस्य यद् वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ६
चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत । मुखादिन्द्रश्चाग्निश्च प्राणाद् वायुरजायत ७
नाभ्या आसीदन्तरिक्षं शीर्ष्णो द्यौः समवर्तत ।
पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात् तथा लोकाँ अकल्पयन् ८
विराडग्रे समभवद् विराजो अधि पूरुषः । स जातो अत्यरिच्यत पश्चाद् भूमिमथो पुरः ९
यत् पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत । वसन्तो अस्यासीदाज्यं ग्रीष्म इध्मः शरद्धविः १०
तं यज्ञं प्रावृषा प्रौक्षन् पुरुषं जातमग्रशः । तेन देवा अयजन्त साध्या वसवश्च ये ११
तस्मादश्वा अजायन्त ये च के चोभयादतः ।
गावो ह जज्ञिरे तस्मात् तस्माज्जाता अजावयः १२
तस्माद् यज्ञात् सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे ।
छन्दो ह जज्ञिरे तस्माद् यजुस्तस्मादजायत १३
तस्माद् यज्ञात् सर्वहुतः संभृतं पृषदाज्यम् ।
पशूँस्तांश्चक्रे वायव्यानारण्या ग्राम्याश्च ये १४
सप्तास्यासन् परिधयस्त्रिः सप्त समिधः कृताः ।
देवा यद् यज्ञं तन्वाना अबध्नन् पुरुषं पशुम् १५
मूर्धो देवस्य बृहतो अंशवः सप्त सप्ततीः । राज्ञः सोमस्याजायन्त जातस्य पुरुषादधि १६ (३३)

## ६. जगत्बीज पुरुषः (अद्वितीय पुरुष)

वरील सूक्त म्हणजे अथर्व वेदांतील पुरुषसूक्त आहे. हे सोळा ऋचांचें असून ऋग्वेदांतील ऋचांचा क्रम बदलला आहे. कांहीं पदेंही निराळीं आहेत. त्यामुळें अर्थभिन्नता आहे. या सूक्ताचा उपयोग भगवान विष्णूंवर अभिषेक करण्यासाठीं होतो.

सहस्रावधी भुजा, सहस्रावधी नेत्र आणि सहस्रावधी पाय असणारा हा विराट् पुरुष, सर्व भूमीला आपल्या महनीयतेनें व्यापून दहा बोटें शिल्लक उरला आहे. ह्या पुरुषानें आपल्या तीन पदांनीं द्यौ लोकाला पादाक्रांत केलें. तो अंशरूपानें स्थिरावला आहे. याप्रमाणें अन्न खाणाऱ्या आणि न खाणाऱ्या विश्वाला चारही बाजूनीं व्याप्त करून राहिला आहे. या पुरुषाचा महिमा फार मोठा आहे. सृष्टीव्यापक या ईश्वरीय महात्म्याचें दृश्य जगत्‌ही महान आहे. या पुरुषाचे तीन पाय आहेत. यानें एका पायानें ब्रह्मलोक, एका पायानें स्वर्ग आणि एका पायानें पृथ्वी व्यापिली आहे. हा अमृतत्वाचा स्वामी आहे. भूत आणि भविष्य हे याच पुरुषाचे अंश आहेत. हा पुरुष सर्व भूतमात्रांचा स्वामी आहे. जें अन्नाच्या योगें उत्पन्न होतें तें अमृतमय असून त्याचा स्वामी हा विराट् पुरुष आहे. हा विराट पुरुष निर्माण झाला तेव्हां त्याचें मुख कोणतें होतें ? त्याचे बाहू कसे होते ? त्यांच्या मांड्यांचें स्वरूप काय ? त्याचे पाय कोठें आहेत आणि त्या ठिकाणीं कोण आहे ? ब्राह्मण हे या विराटपुरुषाचें मुख असून क्षत्रिय हे बाहू आहेत. वैश्य मांड्या असून शूद्र हे त्या विराट् पुरुषाचे पाय आहेत. त्या पुरुषाच्या मनापासून चंद्र निर्माण झाला. डोळ्यांपासून सूर्य निर्माण झाला. नाकापासून वायू आणि प्राण निर्माण झाले. मुखातून अग्नि आणि इंद्र निर्माण झाले. त्याच्या नाभी-कमलापासून अंतरीक्ष, मस्तकापासून द्यु-लोक, पायापासून पृथ्वी आणि कानापासून दिशा निर्माण झाल्या. त्या विराट पुरुषापासून ब्रह्माण्ड

उत्पन्न झाले. त्या ब्रह्माण्डाचा स्वामी असा एक पुरुष निर्माण झाला. ह्या पुरुषानेच नंतर देव, पशु आणि पक्षी यांची वृद्धी केली. भूमी आणि प्राणिमात्रांच्या शरीरांचे आकार निर्माण केले. देवांनी जेव्हा हवीच्या सहाय्याने यज्ञ संपन्न केला तेव्हा वसंत ऋतु हा घृत झाला. ग्रीष्म ऋतु समिधा झाला आणि शरद् ऋतु हवि झाला. प्रजापती, देव आणि ऋषी यांनी या यज्ञांतून अग्रक्रमाने निर्माण झालेल्या पुरुषावर वृष्टीरूपाने अभिषेक करून त्याला संस्कारित केले. ज्यांना खाली आणि वर दात आहेत असे अश्वादि पशु या यज्ञांतून निर्माण झाले. त्यानंतर गाई, वकऱ्या, मेंढ्या वगैरे पशु निर्माण झाले. या यज्ञामध्ये सर्व प्रकारच्या आहुती प्रदान केल्या. ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद त्यांच्या छंदासहित निर्माण झाले. या विराट पुरुषाने नंतर यज्ञ संपन्न केले. त्या यज्ञांतून यज्ञीय घृत त्याने निर्माण केले. त्याबरोबरच वायु, पशु, अरण्यें, ग्राम्य-पशु, रानटी पशु आणि अश्वादि प्राणी त्याने निर्माण केले. यज्ञकर्त्या देवांनी या विराट पुरुषाला सप्त समुद्ररूपी तटामध्ये वेढून टाकले आणि गायत्र्यादि छंद एकवीस प्रकारच्या समिधारूपाने प्रकट झाले. यज्ञ पुरुषाने संपादित केलेल्या सोमाच्या चारशे नव्वद दीप्तिशलाका या पुरुषाच्या मस्तकापासून निर्माण झाल्या.

## ७ नक्षत्राणि (नक्षत्रें-तारका वगैरे)

अनेक रूपांनी आकाशात प्रकाशमान होणारी ही नक्षत्रे प्रत्येक क्षणाला गतिवान होऊन पुढे सरकतात. या असंख्य नक्षत्रांची मी मंत्र-रूपाने स्तुती करीत आहे. ही सर्व नक्षत्रें विघ्नविनाशिनी आणि आत्म-कल्याणमयी बुद्धीची खाण असल्याने त्या बुद्धीची आम्ही इच्छा करतो. हे अग्ने, हे कृत्तिका नक्षत्र आमच्या आवाहनाला उत्तम साथ देवो. हे प्रजापते, रोहिणी नक्षत्र अत्यंत सुंदर असल्याने आवाहन करण्यास योग्य आहे. हे सोमा, मृगशीर्ष नक्षत्र आमच्यासाठी मंगलमय होवो. हे रुद्रा,

आर्द्रा नक्षत्र आम्हाला सुखकारक हो. पुनर्वसु नक्षत्र सत्यवाणी-प्रदायक आहे. बृहस्पतीचे पुष्य नक्षत्र कल्याणकारक आहे. आश्लेषा नक्षत्र सर्पांचे आहे. ते नक्षत्र तेजोवान होवो. मघा नक्षत्र पितृदेवतेचे आहे. ते आमचे अभीष्ट पूर्ण करणारें आहे. पूर्वा फाल्गुनी हे नक्षत्र अर्यमा देवतेचें असून उत्तरा-फाल्गुनी यम देवतेचें आहे. हस्त हे सवितृदेवतेचें व चित्रा नक्षत्र शिवांचें आहे. ही सर्व नक्षत्रें आम्हाला पुण्य प्रदान करोत. स्वाती हे वायूचे, अनुराधा हे इंद्राचें आणि विशाखा मित्राचें असून पुण्यमय सुखासाठी आम्ही त्यांचें आवाहन करीत आहोत. ज्येष्ठा आणि मूळ नक्षत्र आमच्या पितरांना शांत करोत आणि आम्हाला अभीष्ट प्रदान करोत. पूर्वाषाढा हे जलदेवतेचें नक्षत्र आम्हाला रुचिर अन्न प्रदान करो. उत्तराषाढा नक्षत्र विश्वेदेवांचे असून अन्नांतील बलयुक्त रस ते आम्हाला देतें. अभिजित नक्षत्र पुण्यप्रद असून त्याचा इंद्र हा स्वामी आहे. विष्णूचें श्रवण, वसूंचे धनिष्ठा, शतभिषा (शततारका) पूर्वाभाद्रपदा, सवित्याचें उत्तराभाद्रपद आम्हाला समृद्ध करोत. आम्हाला सुसज्ज घर प्रदान करोत. पूषा देवता रेवती नक्षत्राची स्वामिनी आहे. अश्विनीकुमार अश्विनी नक्षत्राचे स्वामी आहेत. ते आम्हाला ऐश्वर्यवान आरोग्य प्रदान करोत. भरणी नक्षत्राचा स्वामी यम आहे. यम मला ऐश्वर्य प्रदान करो

## ८ नक्षत्राणि (नक्षत्रें)

आकाश, अंतरीक्ष, पृथ्वी, जल, पर्वत आणि सर्व दिशा यांमध्यें असणाऱ्या नक्षत्रांना प्रदीप्त करणारा चंद्र आमचें मंगल करो. सुखाचा वर्षाव करणारी जी अठ्ठावीस (अभिजित हे अठ्ठाविसावें नक्षत्र आहे) नक्षत्रें आहेत, ती समान बुद्धीनें मला फल प्रदान करोत. या नक्षत्रांच्या एकमेकांशीं होणाऱ्या मैत्रीच्या योगानें मला दुर्मिळ वस्तूचा लाभ होईल. मला प्राप्त झालेल्या वस्तूचें रक्षण आणि विनियोग करण्यास मी समर्थ होईन. दिवस आणि रात्र यांना माझा नमस्कार असो. सुंदर

प्रात:काल आणि संध्याकाळ, तसेच दिवस आणि रात्र मला सुखद होवोत. ज्या नक्षत्र योगावर मी प्रस्थान करीन त्यामध्यें मृगादि शुभ नक्षत्रें आपल्या गतीनें सुखानें माझ्याकडे आगमन करोत. हे सवितृ देवा, सर्व नक्षत्रांच्यासहित तू आमच्या कठोर बोलण्याने, वादविवादानें, ज्या ठिकाणीं जाऊ नये त्या ठिकाणीं गेल्यानें, रिक्त कुंभदानानें शिक किंवा अन्य वर्तनानें निर्माण झालेले दोष आमच्यापासून दूर कर. धनप्राप्तीला अपशकुन करणारें कोल्हे आणि नपुंसकांचें दर्शन आम्हाला न होवो. ज्या दिशा धुळीच्या वादळानें अंधारतात त्या दिशा आम्हाला अनुकूल होवोत. आमचें भय दूर करोत. आमच्यासाठी त्या मंगलप्रद होवोत. अहोरात्रीस आमचें वन्दन असो.

## ९ शांतिः (शांतीचे मंत्र)

या आणि यापुढील सूक्तांत शांति मंत्रांचा समावेश आहे. या मंत्रांचा उद्देश मनाला शांति प्राप्त व्हावी असा असला तरी ज्यायोगें मन प्रसन्न राहतें. त्या मनाच्या परिसरांत येणाऱ्या अन्य गोष्टीदेखील सतत प्रसन्न राहतील आणि शांतता प्रदान करतील असा महान उद्देश या मंत्रांच्या मागें आहे. यांत अनेक देवतांना प्रार्थना केली असून या शांततेच्या प्रार्थनेंत त्या त्या देवतांजवळ जे जे प्रदान करण्याजोगें आहे ते ते आम्हाला मंगलमय होवो अशी यजमानाची याचना आहे.

शं नो भूमिर्वेप्यमाना शमुल्का निर्हतं च यत् ।
शं गावो लोहितक्षीराः शं भूमिरव तीर्यतीः ८
नक्षत्रमुल्काभिहतं शमस्तु नः शं नोऽभिचाराः शमु सन्तु कृत्याः ।
शं नो निखाता वल्गाः शमुल्का देशोपसर्गाः शमु नो भवन्तु ९
शं नो ग्रहाश्चान्द्रमसाः शमादित्यश्च राहुणा ।
शं नो मृत्युर्धूमकेतुः शं रुद्रास्तिग्मतेजसः १०
शं रुद्राः शं वसवः शमादित्याः शमग्नयः ।
शं नो महर्षयो देवाः शं देवाः शं बृहस्पतिः ११
ब्रह्म प्रजापतिर्धाता लोका वेदाः सप्तऋषयोऽग्नयः ।
तैर्मे कृतं स्वस्त्ययनमिन्द्रो मे शर्म यच्छतु ब्रह्मा मे शर्म यच्छतु ।
विश्वे मे देवाः शर्म यच्छन्तु सर्वे मे देवाः शर्म यच्छन्तु १२
यानि कानि चिच्छान्तानि लोके सप्तऋषयो विदुः ।
सर्वाणि शं भवन्तु मे शं मे अस्त्वभयं मे अस्तु १३
पृथिवी शान्तिरन्तरिक्षं शान्तिर्द्यौः शान्तिरापः शान्तिरोषधयः शान्तिर्वनस्पतयः
शान्तिर्विश्वे मे देवाः शान्तिः सर्वे मे देवाः शान्तिः शान्तिः शान्तिः शान्तिभिः ।
ताभिः शान्तिभिः सर्वशान्तिभिः शमयामोऽहं यदिह घोरं यदिह क्रूरं
यदिह पापं तच्छान्तं तच्छिवं सर्वमेव शमस्तु नः १४ (५९)
शान्ता द्यौः शान्ता पृथिवी शान्तमिदमुर्वन्तरिक्षम् ।
शान्ता उदन्वतीरापः शान्ता नः सन्त्वोषधीः
शान्तानि पूर्वरूपाणि शान्तं नो अस्तु कृताकृतम् ।
शान्तं भूतं च भव्यं च सर्वमेव शमस्तु नः
इयं या परमेष्ठिनी वाग् देवी ब्रह्मसंशिता । ययैव ससृजे घोरं तयैव शान्तिरस्तु नः
इदं यत् परमेष्ठिनं मनो वां ब्रह्मसंशितम् । येनैव ससृजे घोरं तेनैव शान्तिरस्तु नः
इमानि यानि पञ्चेन्द्रियाणि मनःषष्ठानि मे हृदि ब्रह्मणा संशितानि ।
यैरेव ससृजे घोरं तैरेव शान्तिरस्तु नः
शं नो मित्रः शं वरुणः शं विष्णुः शं प्रजापतिः ।
शं न इन्द्रो बृहस्पतिः शं नो भवत्वर्यमा
शं नो मित्रः शं वरुणः शं विवस्वांछमन्तकः ।
उत्पाताः पार्थिवान्तरिक्षाः शं नो दिविचरा ग्रहाः

द्यु-लोक, पृथ्वी, अंतरीक्ष आम्हाला शांतता प्रदान करोत. सिंचन करण्यायोग्य पाणी आणि औषधी आम्हाला शांतता प्रदान करोत. करण्यास योग्य म्हणून केलेली आणि न करण्याजोगी कार्ये मला शांती देवोत. माझी भूत काळांतील आणि पुढें हातून घडणारी सर्व कर्मे शांतिप्रद होवोत. ब्रह्मादिकांनी प्रशंसा केलेली परमश्रेष्ठ वाग्देवी, आमच्यासाठी मंगलप्रद होवो. आमच्यासाठी शापवाणी न उच्चारो. ब्रह्मदेवानें निर्माण केलेलें, ज्याचा ओढा घोर कर्मे करण्याकडे आहे परंतु सुसंस्कारित बनविलेले आमचें मन, घोर कर्माकडे न जातां शांत होवो. घोर कर्म करण्यास प्रवृत्त होणारी पंचेंद्रियें, ब्रह्मदेवाकडून प्रशंसित झाल्यामुळें आमच्यासाठीं शांतता प्रदान करोत. आमच्या घोर कर्मांची शांती करोत. मित्र, वरुण, विष्णु, प्रजापती, इंद्र, बृहस्पती, अर्यमा, विवस्वान्, सूर्य, अन्तक (यम), उत्पात करणारे आणि अंतरिक्षांत भ्रमण करणारे सर्व ग्रह आमच्यावर शांतीचा वर्षाव करोत. कंपायमान होणारी पृथ्वी कंपनशून्य होऊन आम्हाला शांती देणारी होवो. ज्वालारूपानें पडणारी वीज शांत होवो. दुधाच्या ऐवजी रक्त देणारी गाय आणि विदीर्ण होणारी पृथ्वी आमचें कल्याण करो. शत्रूनें केलेली अभिचार कर्मे, पृथ्वीच्या पोटांत पुरलेली अभिचार कर्माला साथ देणारी बाहुली, आणि उल्कांच्या आघातानें व्याप्त झालेली नक्षत्रें आमचें मंगल करोत. राष्ट्रांवर येणारें संकट शांत होवो. सर्व ग्रह, चंद्र, सूर्य, राहू, मृत्यु, धूमकेतु, अकरा रुद्र, आठ वसु, बारा आदित्य, इंद्रादी देवता, बृहस्पती आणि सर्व प्रकारचे अग्नि आम्हाला मंगलप्रद होवोत. ब्रह्मा, प्रजापति, धाता, चार वेद, सप्तर्षी, विश्वेदेव आणि सर्व लोक आमचें कल्याण करोत. ऋषींना ज्या वस्तूंचें ज्ञान आहे त्या सर्व वस्तु मला सुख आणि अभय देणाऱ्या होवोत. पृथ्वी द्यौ, जल, औषधी, वनस्पती विश्वेदेव व अन्य सर्व देवता आम्हाला सर्वोत्तम शांती प्रदान करोत. विपरीत, क्रूर आणि पापमय फळें आम्हाला न प्राप्त होतां आमचें कल्याण होवो.

## १०. शान्ति (शान्ति प्रार्थना)

शं नो द्यावापृथिवी पूर्वहूतौ शमन्तरिक्षं दृशये नो अस्तु ।
शं न ओषधीर्वनिनो भवन्तु शं नो रजसस्पतिरस्तु जिष्णुः
शं न इन्द्रो वसुभिर्देवो अस्तु शमादित्येभिर्वरुणः सुशंसः ।
शं नो रुद्रो रुद्रेभिर्जलाषः शं नस्त्वष्टा ग्नाभिरिह शृणोतु
शं नः सोमो भवतु ब्रह्म शं नः शं नो ग्रावाणः शमु सन्तु यज्ञाः ।
शं नः स्वरूणां मितयो भवन्तु शं नः प्रस्वः शम्वस्तु वेदिः
शं नः सूर्य उरुचक्षा उदेतु शं नो भवन्तु प्रदिशश्चतस्रः ।
शं नः पर्वता ध्रुवयो भवन्तु शं नः सिन्धवः शमु सन्त्वापः
शं नो अदितिर्भवतु व्रतेभिः शं नो भवन्तु मरुतः स्वर्काः ।
शं नो विष्णुः शमु पूषा नो अस्तु शं नो भवित्रं शम्वस्तु वायुः
शं नो देवः सविता त्रायमाणः शं नो भवन्तूषसो विभातीः ।
शं नः पर्जन्यो भवतु प्रजाभ्यः शं नः क्षेत्रस्य पतिरस्तु शंभुः
[२] शं न इन्द्राग्नी भवतामवोभिः शं न इन्द्रावरुणा रातहव्या ।
शमिन्द्रासोमा सुविताय शं योः शं न इन्द्रापूषणा वाजसातौ
शं नो भगः शमु नः शंसो अस्तु शं नः पुरंधिः शमु सन्तु रायः ।
शं नः सत्यस्य सुयमस्य शंसः शं नो अर्यमा पुरुजातो अस्तु
शं नो धाता शमु धर्ता नो अस्तु शं न उरूची भवतु स्वधाभिः ।
शं रोदसी बृहती शं नो अद्रिः शं नो देवानां सुहवानि सन्तु
शं नो अग्निर्ज्योतिरनीको अस्तु शं नो मित्रावरुणावश्विना शम् ।
शं नः सुकृतां सुकृतानि सन्तु शं न इषिरो अभि वातु वातः

हे इंद्राग्ने, तुम्ही आपण होऊन आमचें रक्षण करा. यजमानांनी प्रदान केलेल्या हवीनीं तृप्त होऊन इंद्र आणि वरुण आमचें मंगल करोत. सोम आणि इंद्र आम्हाला सुख देण्यासाठी नेहमीच तत्पर असतात. इंद्र आणि पूषा युद्धासारखें भयकारी संकट नष्ट करून आमचें मंगल करोत. भग, नराशंस अर्यमा आमचे कल्याण करोत. वुद्धी, धन, वाणी, आम्हाला सुखमय होवोत. आम्ही देवतांची स्तुती करतो. त्या देवता आम्हाला मंगलत्व प्रदान करण्यास समर्थ आहेत. धाता, वरुण, पृथ्वी, द्यौ, स्वधा, रोदसी, पर्वत, वगैरे आमच्या स्तुतीनें प्रसन्न होऊन आमचें कल्याण करोत. ज्योतिपूर्ण अग्नि, मित्र, वरुण, आणि अश्विनीकुमार आम्हाला अभीष्ट देवोत. पूर्वीची चांगली कर्मे चांगली फळें देणारी होवोत. आम्हाला सुखद वाटेल असा वायु वाहात राहो. ज्यांना यापूर्वी आम्ही आवाहन केले ते द्यौ, पृथ्वी, अंतरीक्ष, औषधी, अन्य वन्य पदार्थ आणि इंद्र आमचें कल्याण करो. प्रकाशवान इंद्र, आपल्या किरणांनीं, गुणवान आणि स्तुती करण्यास योग्य असा वरुण, प्राणिमात्रांची इच्छा पूर्ण करणारा रुद्र व त्वष्टा आम्ही वाणीनें केलेली स्तुती आणि प्रार्थना श्रवण करून आमचें मंगल करोत. सोम, ब्रह्मा, ग्रावन, यज्ञ, यूप, वेदी आम्हाला मंगलप्रद होवो. अत्यंत दूरचें न्याहाळणारा सूर्य आम्हाला मंगलत्व प्रदान करण्यासाठीं उदयास येवो. चारही दिशा; पर्वत, समुद्र, पाणी, आम्हाला शांतता प्रदान करो. अदिति देवता विविध व्रतांच्या आणि बंधनांच्या द्वारें आम्हाला कल्याणकारक होवो. प्रतापवान मरुत्, विष्णू, पूषा, वायु व निवासस्थान आम्हाला शांतिदायक होवोत. प्राणिमात्रांचें रक्षण करणारा सवितृ देव, स्वतःच्या प्रकाशानें सर्वांना सुखावह होणारी उषा, पृथ्वीला सिंचन करून प्राणिमात्रांना तृप्त करणारा पर्जन्य आणि धान्यादिकांची समृद्धी करणाऱ्या शेताचा स्वामी (शेतकरी) आम्हाला सुख देणारा आणि मंगलता प्रदान करणारा होवो.

## ११. शान्ति : (शान्ती)

शं नः सत्यस्य पतयो भवन्तु शं नो अर्वन्तः शमु सन्तु गावः ।
शं न ऋभवः सुकृतः सुहस्ताः शं नो भवन्तु पितरो हवेषु
शं नो देवा विश्वदेवा भवन्तु शं सरस्वती सह धीभिरस्तु ।
शमभिषाचः शमु रातिषाचः शं नो दिव्याः पार्थिवाः शं नो अप्याः
शं नो अज एकपाद् देवो अस्तु शमहिर्बुध्न्यः शं समुद्रः ।
शं नो अपां नपात् पेरुरस्तु शं नः पृश्निर्भवतु देवगोपा
आदित्या रुद्रा वसवो जुषन्तामिदं ब्रह्म क्रियमाणं नवीयः ।
शृण्वन्तु नो दिव्याः पार्थिवासो गोजाता उत ये यज्ञियासः
ये देवानामृत्विजो यज्ञियासो मनोर्यजत्रा अमृता ऋतज्ञाः ।
ते नो रासन्तामुरुगायमद्य यूयं पात स्वस्तिभिः सदा नः
तदस्तु मित्रावरुणा तदग्ने शं योरस्मभ्यमिदमस्तु शस्तम् ।
अशीमहि गाधमुत प्रतिष्ठां नमो दिवे बृहते सादनाय

सत्याचे पालनकर्ते पुरुष, अश्व, गाई, बुद्धिमान, सत्कृती करणारे पुरुष, कलावंत हात असलेले पुरुष आणि आवाहन केलेले आमचें पितर आम्हाला सुखदायी होवोत. विश्वेदेव, वाग्देवता सरस्वती, सर्वत्र सम दृष्टीनें पाहाणारे लोक, आकाशादि दिव्य लोक, पृथ्वीवरील पदार्थ, पाणी आणि पाण्याशीं संबंधित असणारे पदार्थ अगर वस्तू आम्हाला सुखदायक होवोत. एका पदानें विश्व व्यापून टाकणारा, अजन्मा व प्रकाशमान देवता, अहिबुध्न्य, अपान्नपात, समुद्र व मरुत्माता पृश्नि, आमचें मंगल करोत. आदित्य, वसु, रुद्र आमची स्तोत्रें स्वीकारोत. ही स्तोत्रें पृश्नीपासून निर्माण होणारी यज्ञदेवता, द्यु आणि पृथ्वीच्या देवता देखील आमची ही स्तोत्रें श्रवण करोत. विविध देवता, ऋत्विज, मनुपुत्र, सत्यनिष्ठ देवता, अमृतत्वाची देवता आम्हाला विस्तृत यश प्रदान करोत. हे देवतांनो तुमची रक्षण साधनें आमचें रक्षण करण्यास

समर्थ आहेत त्यामुळें ती आमचें कल्याण करतात. दिवसाचा स्वामी सूर्य राज्याभिमानी वरुण आणि रोगनाशक अग्नि आम्हाला मंगलकारक होवोत. धान्य उत्पन्न करणारें क्षेत्र प्रतिष्ठा आणि सर्वांना आश्रयभूत असणारी पृथ्वी यांना आमचा नमस्कार असो.

## १२. उषा (उषा देवता)

आपल्या रात्ररूपी भगिनीच्या अस्तित्वामुळें निर्माण झालेला अंधःकार बाजूला करीत, दिशा प्रकाशमान करीत आणि पारलौकिक मार्ग (साधकांसाठीं) मोकळा करीत उदयास येणारी उषा आम्हाला हवनयोग्य अन्न, सुन्दर अपत्य आणि, शंभर हेमंत ऋतूंपर्यंत जीवन प्रदान करो.

## १३. एकवीरः (पराक्रम करणारा वीर)

देवांशीं वैर करणाऱ्या राक्षसांवर विजय प्राप्त व्हावा म्हणून आयुधांचा आणि कल्याणमयतेचा वर्षाव करणाऱ्या इंद्रांच्या बाहूंचें मी पूजन करतो. अत्यंत द्रुत गतीनें जाणारा, बुद्धी प्रगल्भ करणारा, शत्रूला भयंकर वाटणारा, विजेला प्रेरणा देणारा, शत्रुनाशक, समर्थ आणि स्वयंपूर्ण इंद्र शत्रूच्या सैन्यावर विजय प्राप्त करतो म्हणून आमच्या इच्छापूर्तीसाठीं आम्हीं इंद्राचा आश्रय करतो. सदा विजय प्राप्त करणारा, रणक्षेत्राकडे आकर्षित होणारा, शत्रूला युद्धांत लोळविणारा, धनुर्धारी, आणि मंगल गोष्टींचा वर्षाव करणारा इंद्र आम्हाला विजय प्राप्त करून देवो. हे वीरांनों, इंद्राच्या अनुग्रहानें तुम्हाला शत्रूवर विजय मिळविता येईल. धनुष्यादि शस्त्र धारण करणाऱ्या आपल्या अनुचरांना शत्रूवर हल्ला करण्यासाठीं इंद्र पाठवितो तेव्हां ते शत्रूवर विजय प्राप्त करतात. सोमपान करणारा आणि प्रचंड धनुष्य धारण करणारा इंद्र शत्रूचा संहारक आहे. हे वीरांनों, या इंद्राच्या सहाय्यानें शत्रूवर विजय प्राप्त करा. हा इंद्र महाबलवान, अन्नस्वामी, धनस्वामी शत्रूला वश करण्यांत अग्रेसर, वीरश्रेष्ठ आणि शत्रूला युद्धांत जिंकणारा, असून गोधनादि धन तो आपल्या ताब्यात ठेवतो. हे इंद्रा तूं या रथावर आरूढ हो. सर्वांशी

समानतेनें वागणाऱ्या वीरांनों, या इंद्राच्या आदर्शानें तुमची वीरश्री वृद्धिंगत होवो. इंद्राप्रमाणें तुम्ही देखील शत्रूचा नाश करा. हा इंद्र शत्रूची गांवें, गोधन आणि भूमी जिंकून घेतो कारण त्याचे बाहू वज्रा-प्रमाणें बलवान आहेत. इंद्र आपल्या सेनेचा रक्षक आहे. देवतांचा पालनकर्ता आहे. हे इंद्रा, या रथाच्या सहाय्यानें शत्रूवर विजय संपादन करून आमचें रक्षण कर. इंद्र सेनेचा नेता आहे. पूर्व भागांत बृहस्पति, दक्षिणेस सोम आणि यज्ञ, आणि यांच्यामध्यें मरुत्‌गण आहेत. शस्त्रवर्षक इंद्र, शत्रूला पळवून लावणारा वरुण, मरुद्‌गण व आदित्य या ठिकाणीं येवोत. युद्धाच्या वेळीं इंद्र आमचें रक्षण करों. आमची युद्धायुधें शत्रूवर विजय प्राप्त करण्यास समर्थ होवोत. विजयानें आमचे वीर-सैनिक उल्हासित होवोत. हे सर्व देवतांनों, तुम्ही युद्धाच्या वेळी आम्हाला सहाय्य करून आमचें रक्षणही करा.

### १४ अभयम् (निर्भय स्थिती)

ज्या ठिकाणीं सर्वोत्तम फळाची प्राप्ती होईल अशा ठिकाणीं मी आलो आहे. आकाश आणि पृथ्वी माझ्यावर मंगलाचा वर्षाव करोत. चारही दिशा मला उपद्रव न देवोत. हे प्रतिस्पर्ध्यांनों, आम्ही तुमचा द्वेष करीत नाहीं. आम्हाला तुमच्यापासून अभय प्राप्त होवो.

### १५ अभयम् (निर्भय अवस्था)

हे इंद्रा, आम्हाला उपद्रव देणारी कारणें दूर करून आमचें रक्षण कर. कारण तूं सर्वांना अभय प्रदान करणारा आहेस. ज्या साधनांनीं तूं आमचें रक्षण करतोस ती सर्व साधनें आमच्याकडे प्रेरित कर. आमच्या सर्व कामना पूर्ण व्हाव्यात म्हणून इंद्राला आम्ही आवाहन करतो. पशु, पक्षी आणि सेवक यांची आमच्याकडे समृद्धी होवो आणि शत्रूचा संहार होवो. वृत्रासुराला ताडण करणारा इंद्र आमचे चारही बाजूंनी संरक्षण करो. हे इंद्रा, तुला सर्व कांही ज्ञात आहे. आम्हाला ह्या लोकीं आणि परलोकीं देखील सुख प्राप्त व्हावे. स्वर्गांमध्यें सूर्य आम्हाला मंगलत्व प्रदान करों. हे इंद्रा, तुझे हात शत्रूला पराजित करण्यास समर्थ आहेत. आम्हाला सर्वत्र संरक्षण प्राप्त होवो. आकाश,

पृथ्वी आणि चारही दिशा, आम्हाला भयशून्य होवोत. आमचे स्पर्धक, प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष शत्रू, दिवस, रात्र आम्हाला मित्राप्रमाणे अभयप्रद होवोत.

## १६ अभयम् (निर्भय अवस्था)

हे एक उत्तम रक्षा स्तोत्र आहे. मुलांना लागणारी दृष्ट, अकाली वाटणारी भीती, भूतबाधा आणि उष्णतेपासून होणारे विकार होऊं नयेत म्हणून खालील मंत्राचा उपयोग करण्यांत येतो. ज्याला भय वाटत असेल त्याचा हात हातीं घेऊन ह्या ऋचा म्हणाव्यात. त्या त्या दिशेने त्या व्यक्तीच्या अंगावरून हात फिरवावा आणि अखेर त्या हातावर एक फुंकर घालावा. हे मंत्र फक्त दिवसाच म्हणावेत.

असपत्नं पुरस्तात् पश्चान्नो अभयं कृतम् ।
सविता मा दक्षिणत उत्तरान्मा शचीपतिः ।।
दिवो मादित्या रक्षन्तु भूम्या रक्षन्त्वग्नयः ।
इंद्राग्नी रक्षतां मा पुरस्तादश्विनावभितः शर्म यच्छताम् ।
तिरश्चीनघ्न्या रक्षतु जातवेदा भूतकृतो मे सर्वतः सन्तु वर्म ।।

हे सवितृदेवा, आमच्या समोरील आणि मागील दिशेकडून आम्हाला शत्रूकडून सुद्धां अभय प्राप्त होवो. माझ्या (दक्षिणेकडील) उजव्या बाजूचें सविता रक्षण करो. उत्तर बाजूचे इंद्र रक्षण करो. दिवसा आदित्य माझें रक्षण करो. विविध प्रकारचे अग्नि भूमीवर माझें रक्षण करोत. पूर्वेच्या बाजूनें इंद्र आणि अग्नि माझें रक्षण करोत. सर्व बाजूंनीं अश्विनीकुमार माझें रक्षण करोत आणि सुख प्रदान करोत. भूतपिशाच्च आणि निरनिराळ्या लोकांनीं केलेल्या द्वेषकृतीपासून रक्षण करणारा सर्वज्ञ अग्नि माझ्या भोवतीं कवच तयार करून माझें रक्षण करो.

## १७ सुरक्षा (संरक्षक मंत्र)

या एकूण दहा ऋचा आहेत. या मंत्राच्या साहाय्यानें विविध देवतांपासून संरक्षण प्रार्थिलेलें आहे. त्याबरोबरच त्या त्या देवतांना प्रसन्न करण्यासाठीं यज्ञ करून आहुतीही देण्यांत येतात. या सर्व आहुती

(तूप, भात, समिधा, सातू यांच्या आहेत.) चार श्रेष्ठांनीं अग्नीच्या सन्निध बसून त्या अग्नीला अर्पण कराव्यात.

पृथ्वीवर ज्या ठिकाणीं मी पाय ठेंवतो किंवा ज्या पूर्व दिशेला मी जातो त्या ठिकाणीं अग्नि माझें रक्षण करो. मला आपल्या आश्रया-खालीं ठेवो. त्या अग्नीला आमची ही आहुती समर्पित होवो.

अंतरीक्षांत ज्या ठिकाणी पाऊल ठेवण्याची अगर जाण्याची इच्छा करतो त्या ठिकाणीं वायु माझें रक्षण करून माझें पालन करो. त्या वायूला आमची ही आहुती समर्पित होवो.

दक्षिण दिशेकडे मी ज्या ठिकाणीं पाऊल ठेवतो अगर जाण्याची इच्छा करतो त्या दिशेकडे सोम आणि रुद्र माझें रक्षण करून माझें पालन करोत. त्यांना आमची ही आहुती समर्पित होवो.

दक्षिणेकडे ज्या ठिकाणीं मी पाऊल ठेवतो अगर जाण्याची इच्छा करतो त्या ठिकाणीं वरुण आणि आदित्य माझें रक्षण करून माझें पालन करोत. त्यांना आमची ही आहुती समर्पित होवो.

द्युलोक आणि पृथ्वीच्या पश्चिम दिशेला ज्याठिकाणीं मी पाऊल टाकतो किंवा जातो त्या ठिकाणीं सूर्य आमचें रक्षण करून आमचे पोषण करो. आमची ही आहुती त्याला समर्पित होवो.

पश्चिम दिशेला मी ज्या ठिकाणीं जाण्याची इच्छा करतो त्या दिशेकडे पाणी औषधींच्या आश्रयानें आमचे रक्षण आणि पालन करो. आमची ही आहुती त्याला समर्पित होवो.

उत्तरेच्या बाजूला ज्या ठिकाणीं मी पाऊल ठेवतों किंवा जाण्याची इच्छा करतो त्या ठिकाणीं विश्वकर्मा सप्तऋषींच्या साह्यानें रात्रीं आमचें पालन, पोषण आणि रक्षण करो. त्यांना आमची ही आहुती समर्पित होवो.

उत्तर दिशेकडे ज्या ठिकाणीं मी पाऊल ठेवतों किंवा जाण्याची इच्छा करतो त्या ठिकाणीं आणि शय्यारूपी ज्या ठिकाणीं प्रयाण करतों त्या ठिकाणीं इंद्रासहित्त मरुद्‌गण रक्षक होऊन माझे पालन करोत. आमची ही आहुती त्यांना समर्पित होवो.

विश्वाच्या उत्पत्तीला कारण असलेला प्रजापति ध्रुव दिशेमध्यें

मी ज्या ठिकाणीं पाऊल ठेवतो किंवा जाण्याची इच्छा करतो त्या ठिकाणीं माझे रक्षक होऊन माझें पालन करो. आमची ही आहुती त्याला समर्पित होवो.

ऊर्ध्वं दिशेकडे जाण्यासाठीं तिकडे पाऊल ठेवण्याची अगर जाण्याची इच्छा करणारा व देवतांचें हित करणारा बृहस्पति माझें रक्षण आणि पालन करो. आमची ही आहुती त्याला समर्पित होवो.

## १८ सुरक्षा (उत्तम संरक्षण)

पूर्व दिशेकडून हिंसक इच्छेनें त्रास देणारे लोक वैभववान अग्नीकडे जाऊन नष्ट होवोत. अंतरीक्षांत त्रास देणारे लोक वायूकडे जाऊन नष्ट होवोत. दक्षिण दिशेकडून त्रास देणारे लोक रुद्रवत सोमाकडे जाऊन नष्ट होवोत. दुसऱ्याची हिंसा करणारा दक्षिणेकडील पुरुष आदित्यवान वरुणाच्या पाशांत अडकून नष्ट होवो. पश्चिम दिशेकडून हिंसक हल्ला करणारा पुरुष, द्यौ आणि पृथ्वीला प्रकाशमान करणाऱ्या सूर्याच्या जवळ जाऊन नष्ट होवो. पश्चिमेकडील अशा पुरुषांना औषधीयुक्त पाणी नष्ट करो. उत्तरेच्या बाजूकडून हिंसक कृती करण्याची इच्छा करणारे पुरुष, सप्तर्षींसह विश्वकर्म्याकडे जाऊन नष्ट होवोत. अशा पुरुषांना मरुत्वान इंद्र नष्ट करो. ध्रुव दिशेकडून येऊन हिंसा करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला प्रजापति नष्ट करो. ऊर्ध्वं दिशेकडून त्रास देणाऱ्या हिंसक लोकांना सर्व देवतांच्या साहाय्यानें प्रजापति नष्ट करो.

## १९ शर्म (सुख)

पृथ्वीवरील ज्या नगरांत पाऊल ठेवण्यासाठीं आम्ही जातो. त्या नगरांत मित्रदेव मला आणोत आणि त्या ठिकाणची सर्व सुखें तो आम्हाला देवो. अंतरीक्षांत जातांना ज्या ठिकाणीं मी जाण्याची इच्छा करतो त्या ठिकाणीं वायु मला नेवो आणि सर्व प्रकारची सुखें आम्हाला प्रदान करो. त्याचप्रमाणें स्वर्गातील सुखें, सर्व रक्षक सूर्य, नक्षत्रमंडळांतील उदित होणारा चंद्र, सोम व औषधी दक्षिणा युक्त संपन्न झालेला यज्ञ नद्या ज्या सागराला मिळतात तो सागर आणि त्या नद्या आपलें

स्वास्थ्य, ब्रह्मा आपलें सुखमय स्थान, वीर्यवंत इंद्र आपलें वीर्यसौख्य, सर्व देवतांसहित अमृत व प्रजापती आपलें सुख, आम्ही त्या त्या ठिकाणीं प्रवेश करतांच आम्हाला प्रदान करोत.

## २०. सुरक्षा (उत्तम संरक्षण)

ज्याच्यासाठी मृत्युकर्मांचा आश्रय शत्रूनें केला आहे अशा कवच-धारी राजाचें, इंद्र, अग्नि, धाता, सविता, वृहस्पति, सोम, वरुण, अश्विनीकुमार, यम आणि पूषा रक्षण करोत. प्रजेच्या रक्षणासाठीं प्रजापतीनें जें आच्छादन तयार केलें आणि जें आच्छादन, मातरिश्वा, प्रजापति, दिशा, महादिशा आणि अवांतर दिशा धारण करतात ते विस्तृत होवो. असुरांबरोवर युद्ध करतांना जें कवच देवतांनी धारण केलें होतें ते कवच आम्हा सर्वांचे रक्षण करो. द्यौ, पृथ्वी, अग्नि आणि सूर्य आम्हाला युद्ध-रक्षक कवच प्रदान करो. आमच्या सन्निध शत्रुसेना गुप्तपणेंसुद्धां न येवो.

## २१. छंदांसि (छंद)

वेदामध्यें ज्या प्रमुख सात छंदांचा विनियोग केला आहे ते या ऋचेंत स्पष्ट केले आहेत.

गायत्री, उष्णिक, अनुष्टुप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप आणि जगती.

## २२. ब्रह्मा (ब्रह्मदेव)

अंगिरसांच्या प्राथमिक पांच अनुवाकांना आमच्या आहुती समर्पित होवोत. सहा आणि आठ या दोन अंकांनी गणना करण्यांत येणाऱ्या देवतांना आणि कृतीला आमच्या आहुती समर्पित होवोत. नीलवर्ण नखें, हिरवावर्ण, क्षुद्र, पर्यायिका, प्रथम-शंख, द्वितीय शंख, तृतीय शंख, उपोत्तम, उत्तम, उत्तर, ऋषी, शिखि (मोरादि पक्षी) गण, महागण, सर्व अंगिराकुलोद्भव ऋषी, विद्वान, सहस्राधि वस्तू, ब्रह्मा, ब्रह्मज्येष्ठ, अम्भृत, वीर्य, ब्रह्माग्र, ज्येष्ठ, वेदकर्मसंपन्न, पर्वकाल, ज्यांनीं आकाशाचा विस्तार केला, सर्वांच्या पूर्वी जो जन्माला आला त्या ब्रह्मदेवाची तुलना

कोणाही बरोबर होऊ शकत नाही. त्या सर्वांना आमच्या या आहुती सर्मपित होवोत.

## २३. अथर्वाण:

अथर्वांच्या चार, पांच, सहा, सात, आठ, नऊ, दहा, अकरा, बारा, तेरा, चवदा, पंधरा, सोळा, सतरा, अठरा, एकोणीस, वीस ऋचांच्या समुदायाला महान काण्डें, तृचा, एक ऋचा एकानुच, रोहित-वर्ण, सूर्य व्रतधारी, प्रजापति, विषासह असणाऱ्या वस्तु, मांगलिक वस्तु आणि ब्रह्मा यांना आमच्या आहुती सर्मपित होवोत. वेदकर्म हे श्रेष्ठ कर्म आहे. सृष्टीच्या प्रारंभीं उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवानें आकाशाचा विस्तार केला त्यामुळें मनुष्य अगर देवता त्याची बरोबरी करू शकत नाही. त्या ब्रह्मदेवाला आमची ही आहुती सर्मपित होवो.

## २४. राष्ट्रम् (राष्ट्र-देश)

देवांनीं ज्या सवितृदेवाला आधारभूत मानले आहे त्यानें राष्ट्राच्या रक्षणासाठीं ब्रह्मणस्पतीला प्रतिष्ठित केलें. हे पराक्रमी इंद्रा, तूं या साधकांवर परोपकार करण्याच्या निमित्तानें आणि आयुष्य वर्धनासाठीं क्षात्रतेजानें संपन्न कर. त्यायोगें शांतिकर्म करणारा यजमान पुष्कळ वर्षे-पर्यंत कर्म करीत राहील आणि स्वतःच्या बलानें शत्रूला नष्ट करून वृद्धावस्थेपर्यंत जिवंत राहील असें कर. वस्त्राभिमानी सोमा, या यजमानाला दीर्घायुष्य इंद्रियांची समर्थता आणि यशःप्राप्तीसाठीं तयार कर आणि त्याला वृद्धावस्थेपर्यंत बलसंपन्न ठेव. हे देवतानों बृहस्पतीनें दिलेल्या वस्त्रांनीं या बालकाला तुम्ही आपल्या तेजानें झांकून टाका. हे बालक वृद्धत्वानंतर मृत्यूकडे जावो. त्याला शतवर्षांचें आयुष्य प्रदान करा. हे यजमाना दीर्घायुष्य जगण्यासाठीं पुत्रपौत्रादिकांच्या परिवारा-साठीं, धनसमृद्धीसाठी व कल्याणासाठी तूं हे वस्त्र परिधान कर. आम्ही केलेली स्तुती श्रवण करून संतुष्ट झालेला परमेश्वर अकाल मृत्यूपासून माझें रक्षण करील. त्यामुळें मी प्रजावंत होऊन स्वतःच्या निवासांत

प्रवेश करीन.

२५. अश्वः (घोडा)

पूर्णपणें विश्रांती घेतलेल्या घोडयाला मी प्रथमच मनान रथाला जोडतो. तूं शत्रूला जिंकण्यासाठीं अत्यंत वेगानें युद्धस्थानाकडे गमन कर.

२६. हिरण्यधारणम् (सोने किंवा सोन्याचे अलंकार परिधान करणें)

अग्नीपासून निर्माण झालेलें, अमृताचे गुण असणारे सुवर्ण मरणाधीन मनुष्यानें धारण करावें. जो मनुष्य असें सुवर्ण धारण करतो तो दीर्घायुषी होतो. सूर्यामुळें उत्पन्न झालेलें सुवर्ण मनूनें धारण केलें होतें त्यामुळें त्याला कान्तिमान शरीराची प्राप्ती झाली. असे सुवर्ण धारण करणारा मनुष्य प्रजावंत आणि दीर्घायुषी होतो. वरुण, बृहस्पति आणि इंद्र ज्या सुवर्णाचा अवलंब करतात त्यानें मृत्युनाश व आरोग्यसंपन्नता प्राप्त होते. हे सुवर्णधारी पुरुषा, हे सुवर्ण तुला सर्व प्रकारच्या सुविधा प्राप्त करून देईल आणि तुला चंद्राप्रमाणें कान्ती लाभेल.

२७. सुरक्षा (संरक्षण)

हे पुरुषा, तूं त्रिवृत् नामक रत्न धारण करतोस. वृषभ, प्रजजन सामर्थ्यं असलेला वेगवान अश्व, वायुसहित इंद्र आणि ब्रह्मा, औषधी वनस्पतींसह सोम, नक्षत्रांसहित सूर्य, मास-पक्षासहित चंद्र, प्राणवायूसहित वायू, तीन स्वर्ग, तीन अंतरीक्ष, तीन प्रकारची पृथ्वी, चार समुद्र, त्रिवृत् सोम, त्रिवृत् उदक, सुवर्ण, रजत्, लोह, त्रिगुणात्मक वायु आणि तेजाचे किरण, तुझें संरक्षण करोत. हे अग्ने, घृताहुती अर्पण करून मी तुला प्रवृद्ध करतो. चंद्रामुळें पुष्ट झालेल्या औषधीयुक्त समिधा तुला पुष्ट करतात. सूर्याच्या कृपेमुळें मायावी राक्षस तुझा नाश करू शकणार नाहींत. तुझें तेज आणि पराक्रम नष्ट करू शकणार नाहींत. तुझ्या रक्षणासाठीं समस्त देवगण रथावर आरूढ होऊन येतील. सूर्यमणि धारण करणाऱ्या पुरुषा, महान ऋषींच्या प्रसादानें तुला प्राणवायूची प्राप्ती झाल्यानें तूं दीर्घायुषी होशील. इंद्रानें ज्याप्रमाणें पाण्याचें रक्षण केलें त्याप्रमाणें तो तुझें रक्षण करील. तेहतीस देवतांनी प्रस्थापित केलेल्या तीन प्रकारच्या वीर्यासहित विविध शक्तींचें रक्षण केलें. त्या शक्ती

आणि ते वीर्य तुझ्यामध्यें प्रस्थापित होवो.

आकाश व्याप्त करणारे बारा आदित्य, अकरा रुद्र आणि पृथ्वीच्या अकरा देवता आम्ही प्रदान केलेल्या आहुतींनीं प्रसन्न होवोत. सविता, शचिपती इंद्र आणि अग्नि आमचें चारही बाजूंच्या भयापासून रक्षण करोत. पंचभूतांचा स्वामी अग्नि आमचें रक्षण करो.

## २८. दर्भमणिः (दर्भाचा अलंकार)

हे पुरुषा, तूं विजय आणि सामर्थ्याची इच्छा करतोस. हे दर्भ शत्रुक्षय करणारे, शत्रूला त्रास देणारे आणि धारणकर्त्याला दीर्घायुष्य प्रदान करणारे आहेत. हे दर्भांनों, मलीन आणि दूषित हृदयाचे शत्रू, त्यांचें पशुधन, प्रजा, शेतें यांचा नाश करा. सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणांनीं ताप उत्पन्न करतो त्याप्रमाणें तुम्ही शत्रूला ताप द्या. शत्रूच्या हृदयांतील बल नाहीसे करा. घर बांधण्यापूर्वी त्या जागेवरील तृण आणि झुडपें ज्याप्रमाणें उखडली जातात त्याप्रमाणें हे दर्भांनों, शत्रूला तुम्ही उखडून फेकून द्या. माझी हिंसा करण्याच्या निमित्तानें जो शत्रू सैन्य जमवतो, माझा द्वेष करतो त्या शत्रूची मस्तकें तुम्ही छिन्न करा.

## २९. दर्भमणिः (दर्भाची श्रेष्ठता)

हे दर्भांनों, माझी हिंसा करण्याच्या निमित्तानें सेना एकत्र करणाऱ्या आणि द्वेषपूर्ण हृदयाच्या शत्रूचा तुम्ही नाश करा. त्यांना आमच्यापासून लांब ठेवा. त्यांना बंधन करा. त्यांचें चूर्ण करा. त्यांचें भस्म करा. सर्वांना दूर घेऊन जा.

## ३०. दर्भमणिः (दर्भग्रंथी)

हे दर्भग्रंथी, तूं जरा, मृत्यू यांच्यापासून संरक्षण करणारें कवच आहेस. त्यामुळें शत्रूचा सर्व उपद्रव नष्ट होतो. तूं शत्रूला नेहमी पीडा करतेस. वृद्धावस्था नाहीशी करतेस. तूं ज्या राज्यांत असतेस त्या राज्याचें रक्षण करतेस. ज्या मेघांतून जल प्रवाहित होतें, त्यामध्यें विजेचा स्वर्णप्रकाश मिसळतो आणि त्या पाण्याच्या थेंबापासून दर्भ निर्माण होतात. त्या दर्भांच्या ग्रंथी सर्वरक्षक होतात.

## ३१. औदुम्बरमणिः (औदुंबर वृक्ष-ग्रंथी)

औदुंबर वृक्षाच्या ग्रंथीच्या साहाय्यानें, सर्वश्रेष्ठ सवितृ– देवानें समृद्धीची इच्छा करणाऱ्या आमच्या गोठ्यांतील पशूंची वृद्धि केली. गार्हपत्य अग्नि आमच्या घरांतील पशूंचा पालनकर्ता आहे. औदुंबर वृक्षामुळें या पशूंची वृद्धि होवो. या वृक्षामध्यें जे तेज आहे त्या तेजाच्या योगानें ब्रह्मदेव आमचें घर समृद्ध करो. औदुंबर वृक्षाची ग्रंथी धारण करणाऱ्या मनुष्यास, पशु, अन्न, वस्त्र, दहीं, दूध, गूळ, मध आणि सर्व प्रकारचे रस समृद्धपणें प्राप्त होतात. सविता आणि बृहस्पति या औदुंबर वृक्षाचें सार आणि तेज पशूंचें दूध आणि अन्न यामध्यें प्रतिष्ठित करतात. अशा पशूंचा मला लाभ होवो. इंद्राच्या प्रेरणेनें या औदुंबर ग्रंथींपासून मला पुत्र, पौत्र, पशु, धन, सुवर्ण आणि जल यांचा लाभ होतो. पशूंची वृद्धि होते. हे औदुंबर वृक्षा, औषधी गुणांसहित तुझा जन्म झाला. तुझ्या-मुळें देवी सरस्वती मला सद्बुद्धी प्रदान करो. देवी सरस्वती, सिनीवाली आणि औदुंबर मला सुवर्णमय ऐश्वर्य सर्व प्रकारच्या औषधी उपलब्ध करतात. औदुंबर वृक्ष इच्छित फलाचा वर्षाव करणारा आहे. कारण प्रजापतीनें ह्या वृक्षामध्यें सर्व ऐश्वर्याची स्थापना केली आहे. हा वृक्ष श्रेष्ठवृक्ष म्हणून मानण्यांत येतो. हे वृक्षा, तूं साक्षात पुष्टी, ऐश्वर्य, अग्रणीत्व, वर्चस्व, तेज आणि धन आहेस. ज्याला धनाची इच्छा आहे त्यानें या वृक्षाची ग्रंथी धारण करावी. या ग्रंथीच्या धारणेनें शत्रूचा नाश होतो आणि शत्रूचें धन क्षीण होतें. हे वृक्षा, तूं आम्हाला मधुर फळें प्रदान कर.

## ३२. दर्भः (दर्भ)

सहस्रावधि पर्णांनीं युक्त, औषधी गुणयुक्त दर्भ आयुष्यवृद्धीसाठी धारण केले जातात. जो मरणभीत मनुष्य या दर्भांना धारण करतो त्याला यम कधीही त्रास देत नाहीं, त्याला सुख प्रदान करतो. हे दर्भा, तुला ज्याप्रमाणें शतकाण्डें आहेत त्याप्रमाणें तूं शतवर्षांचें आयुष्य तुला धारण करणाऱ्या माणसाला देतोस. हे औषधयुक्त दर्भा, त्रिवृत्त आकाश आणि पृथ्वी तूं व्यापतोस. ज्याचें हृदय क्षीण झालें आहे किंवा

दुसऱ्याला त्रास देणारी वाणी जो बोलतो त्यांना तुम्ही अडथळा करतां. दर्भामुळें शत्रु वश होतात. नष्ट होतात. मित्रांची वृद्धी होते. आकाशाचा स्तंभ म्हणून देवतांसाठीं निर्माण झालेला दर्भ दीर्घायु पुत्राची प्राप्ती करून देतो. दर्भ धारण करणारे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र एक-मेकांचे मित्र बनतात आणि प्रिय करतात. दर्भ धारण करणाऱ्याला पाप स्पर्श करीत नाहीं. पाण्याच्या सान्निध्यानें जन्म पावणारे दर्भ प्रकाशवान असतात. औषधी वनस्पती म्हणूनही दर्भ श्रेष्ठ आहेत. ते सर्वांना सारखेंच सुख-दुःख देतात. चारही दिशांमध्ये तें आमचें रक्षण करोत. त्याच्या प्रभावानें सेनायुक्त शत्रू वश होतो.

### ३३. दर्भः (दर्भ)

जलसान्निध्यानें निर्माण होणारे, शतकाण्डयुक्त दर्भ, बलसंपन्न, जीवनरक्षक व आयुर्दायक आहेत. हे दर्भ आमचें रक्षण करोत. यज्ञाच्या रूपानें राजाचें रक्षण करोत. पृथ्वीला धरून ठेवणारे, मधुर, नाशरहित आणि उंच वाढणारे दर्भ शत्रूला पराभूत करतात. बलरहित करून वश करतात. दर्भाच्या सान्निध्यांत वाढणाऱ्या वनस्पतींचा औषधी गुण वृद्धिंगत होतो. हे दर्भांनों, मी तुम्हाला धारण करतो. तू अहिंसक यज्ञ-वेदीवर प्रतिष्ठित होणारा आणि सर्वांना शुद्ध करणारा आहेस. ऋषिजन आपल्या शुद्धीसाठीं तुझाच उपयोग करतात. तुझी शक्ती महान आहे. तूं असुरनाशक, सर्व द्रष्टा आणि तुला धारण करणाऱ्यांचा रक्षक आहेस. स्वतःचें रक्षण व्हावें म्हणून लोक दर्भग्रंथी हातांत बांधतात. दर्भयुक्त पुरुषा, तूं शत्रूला जिंकण्याची इच्छा कर. सूर्य ज्याप्रमाणें जगाला प्रकाशित करतो त्याप्रमाणें तूं आपल्या बलानें सर्व दिशा प्रकाशमान कर.

### ३४. जाङ्गिडमणिः (जंगिड– एक औषधी वनस्पती– कंदरूप)

जंगिड नामक औषधी सर्वांचें भय दूर करणारी, मनुष्यें आणि पशु यांचें रक्षण करणारी, कृत्या नामक स्त्रीचें निर्दालन करणारी, कानांत वसणारे दडे, किंवा आवाजाला येणारा घोगरेपणा, शिरवेदना, नाकातील दुःख, नेत्रवेदना किंवा कर्णवेदना ती नष्ट करते. ही वनस्पती

बाण सोडून ज्याप्रमाणें शत्रू नष्ट केला जातो त्याप्रमाणें शरीरवेदना नष्ट करणारी आहे. ह्रिच्या प्रभावानें नष्ट होणारा रोग पुन्हा उद्‌भवत नाहीं. हे औषधी, तुला देवतांनीं तीन वेळा उत्पन्न केलें आणि तीन वेळा जवळ केले. अंगिरादि प्राचीन ऋषींना या वनस्पतीची चांगली माहिती होती. सृष्टीच्या प्रारंभांत तुला देवांनीं उत्पन्न केलें. अन्य औषधी तुझी बरोबरी करूं शकत नाहींत. इंद्रानें तुझ्यामध्यें बलाची स्थापना केली आहे. तूं सर्व रोगांचा परिहार करतेस.

## ३५. जङ्गिड (जंगिड नामक औषधी कंद)

अंगिरादि ऋषींनीं इंद्राचें गौरवगान करीत आणि ज्यांना बल वृद्धीची इच्छा होती त्यांना बललाभासाठी जंगिड नावाची वनस्पती प्रदान केली. शरीरामध्यें विषाचे जे स्तर निर्माण होतात ते या औषधीनें नाहीसे करण्याचें सामर्थ्य इंद्रानें प्रदान केलें. धनपाल--कुबेर ज्याप्रमाणें धनाचें रक्षण करतो त्याप्रमाणें ही औषधी-वनस्पती आमचें रक्षण करो. देवता आणि ब्राह्मण यांनीं शत्रूसाठीं ह्या वनस्पतीचा स्वीकार केला. हृदयामध्यें दुष्ट भाव असणारा आणि क्रूर नेत्र असणारा शत्रू या वनस्पतीच्या दर्शनानें वश होतो. आकाश, अंतरीक्ष, पृथ्वी, वृक्ष, विष निरनिराळे प्राणी व दिशा या ठिकाणांहून निर्माण होणारें भय नाहीसें होतें. देवतांनी बनवलेली हिंसक आणि मनुष्यांनीं निर्माण केलेली बाधक कृत्यें जंगिड वनस्पती निर्वीर्य करते.

## ३६. शतवारो मणिः (शतवार औषधी)

शतवार नामक औषधी वनस्पती अनेक रोगांचा परिहार करणारी आहे. आपल्या तेजानें ती दुष्टवृत्ती राक्षसांचें भस्म करतें. दुर्नाम रोगाचा ती नाश करते. (हा एक त्वचा रोग आहे) अंतरीक्षांत राहणाऱ्या राक्षसांचा ती आपल्या काट्यांनीं नाश करतें. पिशाच्चांपासून निर्माण होणारी दुर्बलता, असाध्य रोग क्षय यांचा ही औषधी नाश करते. त्याचप्रमाणें अंगाची कंड, कुष्ठ, भेगा आणि ज्वलन शमविते. या शतवार औषधीचा अग्रभाग सुवर्णाप्रमाणें प्रकाशमान आहे. त्यामुळें अंतरीक्षांत भ्रमण करणाऱ्या अप्सरा, गंधर्व भय निर्माण करणारे अन्य जीव आणि

अपस्मारादि व्याधी यांचे ती निर्दालन करते.

३७. **बलप्राप्तिः** (बलाचा लाभ)

अग्नीच्या प्रभावानें निर्माण होणारें तेज, कीर्ती, बल आणि युवावस्था, मला प्राप्त होवो. अग्नीपासून निर्माण होणारें तेहतीस प्रकारचें बल, शत्रूला पराभूत करणारे बल, इंद्रियांना दृढता निर्माण करणारें बल आणि यज्ञाच्या सिद्धीसाठीं आवश्यक कर्म करण्यासाठीं लागणारें बल अग्नीपासून प्राप्त होतें. शतायुष्य, सुवर्णप्राप्ती आणि शत्रूंवर विजय प्राप्त करण्यासाठीं अग्नीचें सान्निध्य लागतें. अन्नप्राप्ति, शरीरतेज, शत्रुवशता व राज्यपुष्टी, अग्नीच्या कृपेनें लाभते. प्रत्येक ऋतूची देवता प्रसन्न व्हावी. संवत्सर आनंद प्रदान करणारें व्हावें. धाता, विधातादी देव प्रसन्न व्हावेत. सर्व उत्पन्न पदार्थांचें स्वामित्व लाभावें म्हणून अग्नीच्या सान्निध्याची मी इच्छा करतो.

३८. **यक्ष्मनाशनम्** (क्षयरोगाचा नाश)

द्रुतगामी अश्व आणि हरिण ज्याप्रमाणें दूर पळून जातात त्याप्रमाणें माणसाच्या शरीरांतील व्याधी, गुग्गुल नाम सुगंधी औषधी रसाच्या प्रभावानें दूर पळून जातात. समुद्र तीरावर निर्माण होणारी ही औषधी दोन प्रकारानें प्रगट होते. एक रोग दूर करते तर एकीच्या वासाने शत्रू दूरवर जातात.

३९. **कुष्ठनाशनम्** (कुष्ठ रोगाचा नाश)

हिमालयाच्या परिसरांत प्राप्त होणारी आणि देवांकडून रक्षण करण्यास योग्य अशी औषधी कुष्ठ रोग नाहीसा करण्यासाठीं येवो. कुष्ठामुळें होणारा संताप आणि राक्षसीवृत्ति यांचा ती नाश करो. नद्य, नद्यमार आणि नद्यारिष अशी या कुष्ठाची तीन नांवें आहेत. यांचा विचार केला नाहीं तर, मरणात्मक व्याधी प्राप्त होते. म्हणून सकाळीं, दुपारीं आणि संध्याकाळीं कुष्ठरोगी पुरुषाचें दुःख दूर व्हावें म्हणून यांचा नामोच्चार करावा. हे कुष्ठ रोगा, जीवला तुझी माता असून जीवन्त हा तुझा पिता आहे. नदीच्या पाण्यांतून निर्माण होणाऱ्या कुष्ठ-

रोगापासून या पुरुषाची मुक्तता व्हावी म्हणून तीनही काळीं मी प्रार्थना करतो. शम्बू आणि अंगिरस ऋषींनीं तीनही लोकांच्या कल्याणासाठीं ह्या औषधी प्रकट केल्या. आदित्य आणि विश्वेदेव यांनींही ती प्रशंसिली. सोमानें ती आपल्याजवळ घेतली. हे औषधी, तूं विविध प्रकारचे कुष्ठ-रोग आणि राक्षस यांचा नाश कर. स्वर्गातील देवतांचें अश्वत्त्थ हे तृतीय निवासस्थान आहे. त्या वृक्षामध्यें अमृतत्वाचा अंश असल्यानें त्या वृक्षाच्या सान्निध्यांत कुष्ठरोग कसा निर्माण होईल ? हिरण्यबंधनानें बांधलेली सुवर्णनौका स्वर्गांत भ्रमण करते. त्या सुवर्णामध्यें असलेल्या अमृतगुणा-मुळें कुष्ठरोग कसा निर्माण होईल. ज्या ठिकाणी पुण्यात्मे वावरतात आणि ज्या ठिकाणीं हिमालयाचें शिखर स्पर्श करतें अशा अमृतगुणयुक्त आकाशांत कुष्ठरोग कसा राहील? हे कुष्ठरोगा, पूर्वी इक्ष्वाकु, कामपुत्र आणि यम यांना तुझें चांगलें ज्ञान झालें होतें. तुझ्यापासून निवारण करण्याचा उपायहीं त्यांना ज्ञात आहे. ते हा रोग दूर करतात. तृतीय स्वर्ग ज्याचें मस्तक आहे असे शक्तिसंपन्न पुरुषांचा— जीवन संतप्त करणारा हा रोग त्वरित दूर होवो.

### ४०. मेधा (बुद्धी)

माझ्या मनाचे व्यापार आणि मंत्रमयी वाणी यांमध्यें जी न्यूनता असेल ती देवी सरस्वती आणि बृहस्पति नाहीशी करोत. हे उदकानों, ईश्वराला जाणण्याची आमची बुद्धी तुम्ही नष्ट करूं नका. मी जी कर्मे करतो ती श्रद्धाहीन असतील तर श्रद्धेनें पूर्ण करा. मला ब्रह्मवर्चसी कर. हे द्यौ आणि पृथ्वी, तुम्ही आमचें तप, दीक्षा आणि बुद्धी नष्ट करूं नका. जल आमची आयुर्वृद्धि करो. संसार निर्माण करणारें पाणी आम्हाला मंगलमय होवो. हे अश्विनीकुमारांनों, आम्हाला त्रास देणारा अंधःकार नाहीसा करून अंधःकाराचा तिरस्कार करणारी प्रकाशवती रात्र आम्हाला प्राप्त करून द्या.

### ४१. राष्ट्रं बलमोजश्च (देश बल आणि तेज यांची एकरूपता)

कल्याणाची इच्छा करणारे, स्वर्गाचें संपूर्ण ज्ञान असलेले, दीक्षा आणि तपसंपन्न, दंडधारण करणारे ऋषी राष्ट्राचें बल आणि तेज संपन्न

करून त्यांचें देवगणांशीं सख्य निर्माण केलें.

४२. **ब्रह्मयज्ञः** (ब्रह्मरूप यज्ञ)

होता, यज्ञ अध्वर्यु, स्वर, यज्ञीयमंत्र, हवि, घृत, घृत अर्पण करणारी पळी, वेदी व ऋत्विज हे सर्व ब्रह्ममय आहेत. इंद्रदेवता कल्याण करणारी आणि पापापासून मुक्तता देणारी आहे. उत्तम स्तोत्रांनीं आम्ही त्याची स्तुती करतो. यज्ञामध्यें भाग घेणाऱ्या देवतांमध्यें इंद्र सर्वश्रेष्ठ आहे. म्हणून आम्ही त्याचें आवाहन करतो. जलोत्पादक अग्नि, निरोगीपण प्रदान करणारे अश्विनीकुमार यांनाही आम्ही आवाहन करतो. ते आमच्या इंद्रियांना बलसंपन्न करोत. यजमानाला दीर्घायुषी करून सत्यव्रती करोत.

४३. **ब्रह्मा** (ब्रह्मविद्)

या सूत्रामध्यें आठ ऋचा असून ब्रह्मविद म्हणून प्रतिष्ठा प्राप्त होण्यासाठीं यज्ञ संपन्न करून त्यांत घृत आणि समिधा यांच्या आहुती अर्पण करतात.

दीक्षा आणि तप यांच्या साहाय्यानें समृद्ध झालेले, ब्रह्माला जाणणारे ऋषी ज्या ठिकाणीं पदार्पण करतात त्या ठिकाणी अग्नि आम्हाला नेवो आणि आम्हाला बुद्धि प्रदान करो. आमची ही आहुती अग्नीला समर्पित होवो. (देवत्वाचा अनुभव घेणारी बुद्धी). वायु आम्हाला त्या ठिकाणीं नेवो आणि आम्हाला प्राणवायु प्रदान करो. या वायूला आमची ही आहुती समर्पित होवो. (प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे पंचप्राण नाग, कूर्म, कृकल, वृषल आणि धनंजय हे उपप्राण या शरीरांत दीर्घकाल कार्यान्वित होण्यासाठीं) सूर्य आम्हाला त्याठिकाणीं नेवो आणि नेत्र प्रदान करो. त्या सूर्याला आमची ही आहुती समर्पित होवो. (चर्मचक्षू– संसारी वैभव अनुभवणारे आणि प्रज्ञाचक्षू देवत्व अनुभविणारे) चंद्र आम्हाला त्या ठिकाणीं नेवो आणि मनरूपी चंद्र आम्हाला प्रदान करो. त्या चंद्राला आमची ही आहुती समर्पित होवो. (विचार समृद्ध आणि स्थिर आणि ईश्वराशीं नातें सांगणारें मन). सोम मला त्या ठिकाणीं घेऊन जावो आणि आम्हाला दुग्धादि

पदार्थ आणि सोम यांसारखे पदार्थ प्रदान करो. त्या सोमाला आमची ही आहुती समर्पित होवो. (दुग्धादि जीवनोपयोगी पदार्थ– पुष्टता आणि औषधी) इंद्र आम्हाला त्या ठिकाणीं नेवो आणि आमच्या इंद्रियांना वल प्रदान करो. त्या इंद्राला आमची ही आहुती समर्पित होवो. (इंद्रियांची सांसारिक आणि पारमार्थिक उपभोगक्षमता वृद्धिगत करणें) उदक आम्हाला त्या ठिकाणीं नेवो आणि अमृतत्व प्रदान करो. त्या पाण्याला आमची ही आहुती समर्पित होवो. (शरीरांत आर्द्रता अखेरपणें राहावी). ब्रह्मदेव मला त्या ठिकाणीं नेवो आणि आम्हाला ब्रह्मत्व प्रदान करो. त्या ब्रह्मदेवाला आमची हीं आहुती समर्पित होवो. (ब्रह्मत्वाचा अनुभव प्राप्त होणें).

## ४४. **भैषज्यम्** (औषधी– निरोगिता प्राप्त करणें)

हें अंजन, तूं पूर्णायुषी करणारें, ब्राह्मणाप्रमाणें शुद्ध आणि मंगलमय आहेस. जलदेवतेच्या समवेत तूं आम्हाला सुख प्रदान कर. शरीराला पांढरेपण आणणारा पंडुरोग, विषादी रोग, व्रण आणि अन्य रोग नष्ट कर. मृत्यूपासून संरक्षण प्रदान कर आणि रथाच्या वेगानें धावून येणारें पाप नाहीसें कर. माझ्या प्राणांचे रक्षण कर आणि मला अकाली मृत्यू देऊं नकोस. पापदेवता निर्ऋतीच्या बंधनातून मुक्त कर. तूंच सागरगर्भ, विद्युत्पुष्प, वातरूप प्राण व सूर्यरूप नेत्र आहेस. अंजन त्रिक्कुद् पर्वतामध्यें उत्पन्न होतें. हे देवांजन, पर्वतातून निर्माण झालेल्या औषधी, अन्य औषधीची वरोबरी करूं शकत नाहीं. हे वरुणा, सकाळपासून संध्याकाळपर्यंत मी जें मिथ्या भाषण केलें असेल त्याबद्दल मला क्षमा कर. हे उदकांनों आणि गाईनों, माझ्या बोलण्यास वरुण साक्ष आहे. मित्रावरुण स्वर्गातून पृथ्वीवर आले आणि परत गेले. हे अंजना, तुलाही त्यांनीं परत येण्याची अनुज्ञा दिली आहे.

## ४५. **आञ्जनम्** (नेत्रशुद्धी करणारें औषध)

ऋणको ज्याप्रमाणें घेतलेलें ऋण धनकोलाच परत करतो त्याप्रमाणें पीडा देणाऱ्या कृत्येकडे ती पीडा मी सूर्याच्या प्रभावानें परत पाठवितो. आम्हाला वाटणारें दुष्ट स्वप्नांचें भय, गाईंमध्यें प्रवेश

करणारी दुष्ट प्रवृत्ति आणि माहीत नसलेले आमचे वैरी परत जावोत. त्रिक्कुद पर्वतावर निर्माण झालेलें हें तेजस्वीं अंजन, तेज वाढविणारें, चारही दिशांना संचार करणारें, जलामध्यें रसरूपानें राहाणारें, अग्नीच्या सान्निध्यांत राहणारें, पुत्र प्रदान करणारें आणि सर्व बाजूंनीं सुख प्रदान करणारें आहे. रक्षणाची इच्छा करणाऱ्या पुरुषा, हे अंजन, पापदेवता निर्ऋतीचा पाश तोडणारें व औषधीचें रक्षण करणारें आहे. त्यायोगें आयुष्य, आरोग्य, तेज आणि रक्षण यांचा लाभ होतो. संसारांत तृप्ती, ऐश्वर्य, गुणसंपदा यांचा लाभ होतो. मरुद्गण, प्राण, सत्ता, तेज आणि मांगल्य प्राप्त करण्याची माझी इच्छा पूर्णत्वास नेवोत.

४६. **अस्तृतमणि:** (एक वनस्पती)

अन्य कोणालाही नाश न करतां येणारी, शत्रूला वश करणारी, सृष्टीच्या प्रारंभांत विधात्यानें धारण केलेली अस्तृत नामक वनस्पती तूं धारण करतोस. ह्या योगें आयुष्य, सत्ता, ओज आणि बलाची प्राप्ती होऊन त्याचें रक्षण केलें जातें. राक्षस या औषधीला नष्ट न करोत. इंद्र ज्याप्रमाणें असुरांना जमीनदोस्त करतो त्याप्रमाणें ही वनस्पती शत्रूला जमीनदोस्त करते. या वनस्पतीमध्यें इंद्रानें नेत्रांना आवश्यक असणारी शक्ती प्रतिष्ठित केली आहे. स्वर्गांतील देवतांचा स्वामी इंद्र आम्हाला कवचानें आच्छादित करतो तेव्हां अन्य देवदेखील सर्व प्रकारची कवचें आम्हाला अर्पण करतात. ही वनस्पती शेंकडों बलानीं व्याप्त आहे. तिच्यामुळें शत्रू निर्वीर्य होतो. जो मनुष्य ही वनस्पती धारण करतो त्याला शरीरापासून जसें सुख लाभतें त्याप्रमाणें अन्न, पुत्र, पौत्र, पशु वगैरेंपासूनही सुख प्राप्त होतें. ती वनस्पती धारणकर्ता पुरुष सर्वांमध्यें श्रेष्ठ, शत्रूचें बल क्षीण करण्यास समर्थ, विद्या, धन आणि विविध कर्मांनीं कीर्तिवंत होतो. सवितृ– देव तुला या औषधीमुळें सर्वसमृद्ध करो.

४७. **रात्रि:** (रात्र)

हे रात्री, तुझा अंधःकार, अंतरीक्ष. आणि पृथ्वीच्या सर्व ठिकाणीं भरून राहिला आहे. त्या अंधाराचा काळा रंग सर्वत्र पसरला आहे. या रात्रीपासून हे विश्व विभक्त होत नाहीं. एकच एक असतें. सर्व प्राणी,

रात्रीच्या वेळीं संचार करण्यास असमर्थ होतात आणि ते ज्या ठिकाणी असतील त्याच ठिकाणीं ते स्थिर होतात. हे तमोमय रात्री, आमची हिंसा न होतां आम्हाला सुरक्षित कर. मनुष्याला त्याच्या कर्माची सर्व फळें तूं प्रदान कर. मला मारणारा कोणताही शत्रू तुझ्या राज्यांत मला ठार मारणार नाहीं असें कर. चोर चोरी करणार नाहीं, कोल्हे आमच्या बकऱ्यांना मारणार नाहींत, चोर आमचें अश्व चोरून नेणार नाहींत, पिशाच्च मनुष्यांना त्रास देणार नाहींत, दांतवाले सर्प दंश करणार नाहींत आणि पापवृत्ति मनुष्य हिंसेकडे वळणार नाहीं असें कर.हे रात्री तुझ्या रक्षणामुळें आमचें पशुधन आणि संतान आम्हाला सुख प्रदान करणारें होवो.

**४८. रात्रिः (रात्र)**

घरांत आणि घराबाहेर असलेल्या सर्व प्रकारच्या वस्तू आम्ही रात्रीच्या स्वाधीन करतो. कारण रात्र मातेप्रमाणें रक्षण करणारी आहे. उषःकालाचा स्पर्श होतांच रात्र विश्रांती पावते. उषःकालानंतर येणारा दिवस आम्हाला सुखद होवो. हा दिवस आम्हाला रात्रीच्या स्वाधीन करतो आणि आपण विश्रांती घेतो. आकाशांत झेंप घेणारे पक्षी, पृथ्वीवर सरपटत जाणारे सर्पादि प्राणी, जंगलात मुक्तपणे हिंडणारे व्याघ्र सिंहादी पशू यांच्यापासून हे रात्री, आमचें रक्षण कर. आमचें शयनस्थान आणि सर्व दिशा आमच्यासाठीं संरक्षित कर. आम्ही रात्रीची स्तोत्रें गात आहोत. अनुष्ठानादि क्रियांनीं जो मनुष्य रात्रीं जागरण करतो किंवा चोरी करण्याच्या निमित्तानें येणाऱ्या पुरुषापासून जो सावध राहातो त्याचें रात्र रक्षण करते. हे रात्री तुला घृताची असें म्हणतात. तुझें ज्ञान भारद्वाज ऋषींना चांगलें आहे. हे रात्री, आमच्या रक्षणासाठीं तूं सावध रहा.

**४९. रात्रिः (रात्र)**

सर्वांना प्रिय वाटणारी, डोळ्यांना तिरस्कृत वाटणारी, द्यौ आणि पृथ्वीवर आपलें राज्य पसरणारी रात्र महान आहे. आम्ही तिचा महिमा वर्णन करतो. ही रात्र, वन, पर्वत, पाणी, समुद्र, यांना आच्छादून टाकते.

सूर्य ज्याप्रमाणें हळूहळू पृथ्वीवर आपलें साम्राज्य पसरवितो त्याप्रमाणें रात्रही हळूहळू आपलें साम्राज्य पृथ्वीवर पसरविते. सौभाग्यवान रात्र, मंगलमयी आहे. रात्रीमधून बाहेर पडणारा सूर्य जगाला प्रकाश देतो म्हणून आम्ही रात्रीचा गौरव करतो. तिला वन्दन करतो. हे रात्री, तुझ्यामुळें आम्हाला उषःकाल लाभतो. हे रात्री तूं आमचें धन अपहरण करणाऱ्यांना नष्ट कर. तूं सर्वव्यापी असल्यानें आम्हाला मंगलमयी वाटतेस. तूं आमच्या शत्रूंचे निर्दालन कर आणि आम्हाला सुखमय निवास प्रदान कर.

## ५०. **रात्रिः** (रात्र)

हे रात्री, फूत्कार करणारे सर्प आणि कपटी कोल्हे यांना तूं शीर्षहीन कर. हा तीक्ष्ण शिंगाचा वृषभ वेगवान आहे. त्यायोगें तूं जिंकण्यास दुर्लभ आहेस. आम्ही ही रात्र ओलांडून जाऊं परंतु शत्रूला मात्र ही रात्र ओलांडतां येणार नाहीं. ज्याला पोहतां येत नाहीं तो नदीमध्यें गेला तर बुडतो, त्याप्रमाणें रात्रीनें रक्षण न केलेला मनुष्य अंधारांत बुडून जातो. आमच्याकडे पापी नजरेनें पाहाणारा आमचा शत्रू येत आहे त्याला तूं पृथ्वीवर पाड. वस्त्र, गाई आणि अश्वादिकांचे अपहरण करणारा मनुष्य तुझ्या अंधःकारांत नाश पावो. हे रात्री, आमचें सुवर्णादि धन हरण करण्याची इच्छा करणारा दूर जावो आणि त्या धनाचा आम्हाला उपभोग घेतां येवो. हे रात्री, उषःकालापर्यंत तूं आमचें संरक्षण कर. उषा सूर्योदयापर्यंत आमचें रक्षण करील आणि सूर्य संपूर्ण दिवस रक्षण करून आम्हा तुझ्या स्वाधीन करील तेव्हां तूं आमचें सर्वप्रकारें रक्षण कर.

## ५१. **आत्मा** (आत्मा)

कर्मानुष्ठान करणाऱ्या माझी नेत्रादि इंद्रियें सर्वसमर्थ आहेत, प्राणादि सर्व प्राण मला साथ देणारी आहेत. सविता देव आम्हाला कर्माची प्रेरणा प्रदान करो. आश्विनीकुमार माझे बाहू आणि पूषन् माझ्या हातांना उत्तम सामर्थ्य प्रदान करोत.

## ५२. **कामः** (इच्छा)

सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी परमेश्वराच्या अंतःकरणांत कामाचा जन्म

झाला. म्हणून त्याला सयोनी असें म्हणतात. हा काम, यज्ञकाली यजमानाच्या धनाची वृद्धि करतो, ऐश्वर्य वाढवितो आणि मित्रत्वाचे संबंध निर्माण करतो. पूर्वादि दिशांकडून फलाची कामना करणाऱ्या यजमानाला काम सहाय्य करतो. त्याला अक्षय्य फल देतो. कामदेव ज्यायोगें लोकांना फल प्रदान करतो तो हवि त्याला अर्पण होवो.

५३. **काल:** (काल, वेळ)

सर्व वस्तूला मर्यादा घालणारा काल सप्त किरणांनीं युक्त, सहस्रनेत्र, नित्ययुवा आणि वीर्यवान आहे. केवळ बुद्धिमान लोकच या कालावर नियंत्रण करतात. कालात्मक संवत्सर सात चक्रांच्या रथानें वाहून नेलें जातें. हें चक्र अमृतमय असून तें कालाची नाभी आहे काल हाच ब्रह्म असून तो चराचराची उत्पत्ती करतो, स्थिर करतो आणि नाशही करतो. या विश्वाला कालानें व्यापून टाकलें आहे. परंतु साधु आणि ज्ञानवान पुरुष त्याची अनेक रूपें आपल्या दिव्य दृष्टीनें पाहातात. कालरूपी परमात्मा सर्व प्राणिमात्रांना उत्पन्न करतो. तो वस्तुमात्रांचा पिता होतो. कालापेक्षां श्रेष्ठ कोणी नाहीं. द्युलोक आणि प्राणिमात्रांना आश्रय देणाऱ्या पृथ्वीला कालानेंच प्रकट केलें. भूत, भविष्य आणि वर्तमान ही या कालाचीच रूपें आहेत. सूर्य या कालाच्या बरोबर मित्रत्वानें राहून ही रूपें प्रगट करतो. इंद्रियांचें चलनवलन व मनाचे सर्व व्यापार कालाच्या प्रेरणेनें होतात. काल हा तप, ईश्वर, पिता, सर्व कांहीं आहे. कालानेंच प्रजापतीला जन्म दिला. प्रजापतीनें कालाच्या साहाय्यानें कश्यपादि ऋषींना जन्म दिला. काल स्वयंभू आहे.

५४. **काल:** (काल-वेळ)

कालापासून पाणी निर्माण झालें. कालापासूनच ब्रह्मदेव, तप, दिशा आणि सूर्य निर्माण झाले. कालच सूर्याला अस्तंगत करतो. कालामुळें वायु वाहातो. पृथ्वीचा महिमा कालामुळेंच वाढतो. द्युलोकदेखील कालाचा आश्रय करून राहतो. कालानेंच भूत, भविष्य, वर्तमान, पुत्र, नगर, ऋचा, वेद, यज्ञ, गंधर्व, अप्सरा, वगैरे एका पाठोपाठ उत्पन्न केलें. हे सर्व कालाचा आश्रय करूनच राहातात. कालाच्या ओघांतच

अंगिरा, अथव, वगैरे उत्पन्न झालें. ह्या कालानेंच स्वर्गादि विविध लोक निर्माण केले व त्यांना स्थिर केलें.

**५५. रायस्पोषप्राप्तिः** (सुखलाभ)

गार्हपत्यादि अग्नीच्या रूपानें प्रगट होणाऱ्या आणि पूजनीय कालरूपी अग्नीला आम्ही, उत्तम फळाची अपेक्षा ठेवून हवि अर्पण करीत आहोत. त्यामुळे आम्ही अन्न आणि धन यानीं समृद्ध होऊं आणि कालाचें सामीप्य प्राप्त करूं. हे अग्ने, अन्न प्रदान करणारी तुझी कृपामयी दृष्टी आणि बुद्धी आम्हाला अनुकूल होवो. आम्ही तुला हवि प्रदान करून प्रदीप्त करतो. हा गार्हपत्य अग्नि आम्हाला सकाळीं आणि संध्याकाळीं सुखद फल देवो. दीप्तिमान अग्नि आम्हाला ऐश्वर्य प्रदान करो. करपलेलें अन्न मला न मिळो. अन्न प्रदान करणाऱ्या रुद्रात्मक अग्नीला आम्ही नमस्कार करतो. प्रज्ञावंतांच्या सभेमध्यें प्रतिष्ठा प्राप्त झालेल्या अग्ने, तूं आमचे पुत्र आणि मित्र यांचा संरक्षक हो. तूं स्वतः ऐश्वर्यवान आहेस. आम्हाला तूं जीवनभर अन्न प्रदान कर. हे इंद्रा आणि अग्ने, अश्वाला ज्याप्रकारे नित्य चारा देतात त्याप्रमाणें आम्ही तुला नित्य हवि अर्पण करतो. तूं आम्हाला अन्नसमृद्ध कर.

**५६. दुःस्वप्ननाशनम्** (दुःखद स्वप्नांचा नाश)

हे पिशाच्चा, तूं यमलोकांतून पृथ्वीवर येवून, निर्भयपणें स्त्री-पुरुषांच्या जवळ जाऊन त्याना त्रास देतोस. हे दुष्टस्वप्ना, प्रजापतीनें तुला पाहिलें होतें. जे लोक चिकित्सा करतात, त्यांच्यापासून दूर राहून तूं त्यांना त्रास देतोस. हे दुःस्वप्न असुरांकडे जावो. तेहतीस देवता या दुःखद स्वप्नांचे फल जाणतात. पितरांना हे जाणतां येत नाहीं. पापाचें निर्दालन करणाऱ्या वरुणानें आदेश दिल्याप्रमाणें आदित्यांनीं महर्षी त्रितामध्यें या स्वप्नशक्तीला प्रस्थापित केलें. पापाचरण करणाऱ्या माणसाला दुष्ट स्वप्नांचें फल प्राप्त होतें तर पुण्याचरणी पुरुष दुःस्वप्नांच्या अभावामुळें दीर्घायुषी होतो. हे स्वप्न विधात्याच्या सहित आनंदानें निवास करतें आणि पापी मनुष्याला मृत्यूची सूचना देते. हे स्वप्ना, तुला जाणणाऱ्यांचें रक्षण कर. आमचा जो द्वेष करतो त्याला

घेऊन तूं दूर निघून जा.

### ५७. दुःस्वप्ननाशनम् (दुःखद स्वप्नांचा नाश)

कर्जाचा भार ज्याप्रमाणें कमी केला जातो त्याप्रमाणें दुष्ट स्वप्नांमुळें निर्माण झालेल्या अनिष्ट फलांचा भार त्रित ऋषी कमी करतात. न फेडलेलें ऋण ज्याप्रमाणें एकत्रित होतें त्याप्रमाणें दुःष्टस्वप्न सर्व रोगांना एकत्र करतें. हे दुःखस्वप्न आपल्या शत्रूकडें जावो. देवपत्नीचें गर्भ, यमाचे हातरूपी दुष्ठ स्वप्न आमच्यासाठी मंगलमय होवोत आणि त्यांतील क्रूर भाग आमच्या शत्रूकडे जावो. स्वप्नांत कावळा दिसल्यास वाधकारक होतो. पण ती बाधा आमच्याकडे न येवो. हे स्वप्ना, तुझा जन्म आणि संचार आम्हाला ज्ञात आहे. धुळीनें मळलेलें आपलें शरीर अश्व ज्याप्रमाणें झाडून टाकतो आणि स्वच्छ करतो त्याप्रमाणें हे दुःष्टस्वप्ना, तूं यज्ञाला विरोध करणाऱ्यांना झटकून टाक. आमच्या घरांतून तूं निघून जा. हे देवतांनो, आमचें अनिष्ट आमचा शत्रू अलंकाराप्रमाणें धारण करो आणि यामुळें त्याचा नाश होवो.

### ५८. यज्ञः (यज्ञ)

परमात्माविषयक बुद्धी, संवत्सररूपी ईश्वराला शब्दरूपी हवि पुष्ट करतात. साधक आपल्या इंद्रियांवर संयम ठेवून त्यांचा विनियोग करतो. आमच्या शरीरांतील प्राण आम्हाला दीर्घायुषी करील. या भागाला मिळालेल्या आहुतीमुळें तो नेहमी ताजा राहील. पृथ्वी, अंतरीक्ष, सोम, बृहस्पति आणि सूर्यानें आम्हाला शरीरापुरती सत्ता प्रदान केली आहे. त्यामुळें आम्ही अन्नवान होऊं. शरीराचें स्वामी होऊं. हे इंद्रियांनों, तुम्ही साधकाच्या शरीराला धरून रहा कारण शरीर तुमचें रक्षक आहे. तुम्ही आपापले सर्व व्यापार उत्तम प्रकारें करा. तुम्ही त्याप्रमाणें आचरण केलेंत की हें शरीर लवकर नाश पावणार नाहीं. अग्नि हा यज्ञाचा नेत्र आहे. यज्ञमुख म्हणून ऋत्विज त्याची सर्व प्रथम पूजा करतात. या अग्नीसाठीं कान आणि मन यांच्या एकीपणानें हवि अर्पण करतात. विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या या यज्ञामध्यें इंद्रादि देवता आगमन करोत. हे देवतांनों ऋत्विज तुमच्यासाठीं हवि

अर्पण करतात. तुम्ही आपल्या स्त्रियांसह या यज्ञामध्यें येऊन आपापलें हवि स्वीकारा.

५९. **यज्ञः** (यज्ञ)

हे अग्ने, तूं व्रतपालक, मर्त्य मनुष्यांच्या कर्माचा रक्षक, आणि यज्ञामध्यें स्तुती करण्यास योग्य आहेस. आपण अल्पज्ञानी लोक प्रज्ञावंतांना जाणत नाहीं, त्यांच्या कर्माची ओळख नसते, परंतु त्यांनी केलेल्या यज्ञकर्मांनीं अग्नि संतुष्ट होऊन त्यांना संपन्न करतो. सोमाची पूजा करणारे ब्राह्मण अग्नीमुळें प्रतिष्ठा पावतात. आम्ही ज्या अनुष्ठानाची इच्छा करतो आणि त्यामुळें आम्हाला जें स्थान प्राप्त होतें त्या देवयान मार्गाची ओळख असणारे लोक अग्नीची पूजा करतात. अहिंसक यज्ञाचा आचार ते ठराविक वेळीं करतात.

६०. **अङ्गानि** (अंगे)

माझ्या मुखामध्यें वाणी, नाकामध्यें प्राण, नेत्रांत पाहण्याची शक्ति, दातांमध्यें चावण्याची शक्ती आणि बाहू संरक्षक बलानें संपन्न आहेत. मांडयामध्यें तेज, पायांत वेग आणि उभे राहाण्याची शक्ति आहे परंतु या कशाचाही स्पर्श आत्म्याला होत नाही.

६१. **पूर्णायुः** (पूर्ण आयुष्य)

आम्ही संपूर्ण जीवनभर, दातांनी खाणें, शत्रूचें शरीर जर्जर करणें ही कामें करूं शकू. हे अग्ने, यासाठीं तूं आमच्या घरांत सुखाची प्रतिष्ठा कर आणि स्वर्गामध्येंही सुखसंपन्न कर.

६२. **सर्वप्रियत्वम्** (सर्वांचा आवडतें होणें)

मला सर्व देवतांचा, राजाचा, मी ज्याच्याकडे पाहातो अगर माझ्याकडे जें पाहतात त्यांचा, शूद्र आणि श्रेष्ठ यांचा स्नेहांकित–प्रिय कर.

६३. **आयुर्वर्धनम्** (आयुष्यवृद्धि)

हे ब्रह्मणस्पते, तूं ऊठ. देवतांना यज्ञाच्या रूपानें जागृत कर. या

यजमानाचें आयुष्य, प्राण, प्रजा, पशु आणि कीर्ती वृद्धिंगत कर.

**६४. दीर्घायुत्वम्** (प्रदीर्घ आयुष्य लाभ)

जातवेद नामक अग्नीसाठीं मी समिधा प्राप्त केल्या असून त्या समिधांच्या साहाय्यानें मी अग्नीला प्रदीप्त करीत आहे. माझ्यासाठीं प्रदीप्त झालेल्या अग्ने, तूं मला श्रद्धा आणि देवताबुद्धी, धन आणि प्रजा प्रदान कर. ह्या समिधा (यज्ञीय काष्ठ) आणि इंधन (अयज्ञीय काष्ठ) केंवळ तुझ्यासाठीं एकत्रित केलें आहे. त्यांतून मला मंगलत्व प्राप्त होवो. ही दोन्ही प्रकारची काष्ठे तूं भक्षण कर. समिधांनीं तुला प्रदीप्त करणाऱ्या यजमानाला आणि आचार्यांना अमृतत्व प्रदान कर.

**६५. अवनम्** (रक्षण)

हे सूर्या, तूं अंधाराचा नाश करणारा आहेस. तूं आपल्या तेजानें दीप्तिमान होत आकाशांत आरोहण करतोस. जो शत्रू तुला त्रास देण्याची इच्छा करतो त्या शत्रूचें तूं भस्म कर. या तेजानें तूं स्वर्गामध्यें प्रतिष्ठित हो.

**६६. असुरक्षयणम्** (राक्षसांचा नाश)

देवतांचे शत्रू राक्षस, हातामध्यें लोखंडाचे पाश घेऊन, पुण्यात्म्यांना मारण्यासाठीं सर्वत्र संचार करीत असतात. हे सूर्या, तुझ्या तेजाच्या प्रभावामुळें मी त्या राक्षसांना माझ्या नियंत्रणांत आणलें आहे. तूं सहस्र किरणांनीं युक्त असून, सर्वज्ञ, आणि वज्राप्रमाणें कठीण शस्त्र धारण करणारा आहेस. तूं शत्रूला ठार कर आणि तुझ्याशीं मैत्री करणाऱ्याचें रक्षण कर.

६७. शत वर्षांचें आयुष्य लाभावें, तोपर्यंत बुद्धी, इंद्रिये आणि कार्यक्षमता कायम राहावी म्हणून सूर्याजवळ केलेली ही एक मनोरम प्रार्थना आहे. हीं आठ वाक्यें अत्यंत मौलिक असून अस्तास जाणाऱ्या सूर्याचें दर्शन घेत ती उच्चारावींत.

पश्येम शरदः शतम्
बुध्येम शरदः शतम्
पूषेम शरदः शतम्
भूयेम शरदः शतम्
जीवेम शरदः शतम्
रोहेम शरदः शतम्
भवेम शरदः शतम्
भूयसीः शरदः शतात्

हे सूर्या,

१) आम्ही तुझें शंभर वर्षेंपर्यंत सतत दर्शन घ्यावें.

२) आम्ही शंभर वर्षें जिवंत राहावें.

३) आमची बुद्धी शंभर वर्षेंपर्यंत कार्यक्षम राहो.

४) आम्ही शंभर वर्षें सतत वृद्धिगत होत राहो.

५) आम्ही शंभर वर्षेंपर्यंत पुष्ट राहो.

६) आम्ही शंभर वर्षेंपर्यंत पुत्रादिकांनीं संपन्न राहो.

७) शंभर वर्षें आम्ही सर्व प्रकारच्या वस्तूंनी संपन्न राहो.

८) आम्ही शंभर वर्षेंपर्यंत अखंड कीर्तीनें महान होत राहो.

(या सर्व वचनांचा गोषवारा असा आहे कीं हे सूर्या, तूं आम्हाला नुसतें शंभर वर्षांचें आयुष्य प्रदान करूं नकोस. त्याचा उपयोग नाहीं. पण त्याचबरोबर माझी सर्व इंद्रियें, बुद्धी, आरोग्य, कीर्ति, पुत्रपौत्रादि वंश आणि पश्वादि परिवार सतत वृद्धिगत होत राहील असें कर. तरच त्या शंभर वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्याचा उपयोग आहे.)

**६८. वेदोक्त कर्म** (वेदांनी प्रतिपादन केल्याप्रमाणें कार्य करणें)

मी, प्राणादि वायू, मूलाधारादि षट्चक्रें याचें उत्तम ज्ञान करून

घेत आहे. त्याचप्रमाणें अक्षरात्मक वेद वैखरी वाणीनें उच्चारून कर्म करीत आहे. (वेदोक्त मंत्र आणि क्रिया यांचा संगम करीत आहे.)

६९. **आपः** (पाणी)

हे देवगणानों, तुम्ही महान आयुष्यवान आहांत. तुमच्या कृपेनें मलादेखील तसेंच आयुष्य लाभेल. मला पूर्ण आयुष्य लाभेल. माझें सर्व जीवन सत्कार्यात व्यतीत होईल असें तुम्ही करा.

७०. **वेदमाता** (वेदमात्रा– गायत्री)

मी सर्वश्रेष्ठ वेदमातेची स्तुती करीत आहे. स्तुती करणाऱ्या मला ती, सतत प्रगत राहाण्याची आणि पवित्र कार्य करण्याची प्रेरणा देवो. त्याचप्रमाणें आयुष्य, प्राण, प्रजा, पशु, कीर्ति, धन व ब्रह्मचर्य, यांचे मला दान करून ती ब्रह्मलोकाला– तिच्या निवासस्थानीं गमन करो.

७१. **पूर्णायुः** (पूर्ण आयुष्य– शतायुष्य)

हे इंद्रा आणि सूर्या, तुम्ही प्रदीर्घ कालपर्यंत आमच्यावर अनुग्रह करा आणि आम्हाला चिरकाल जिवंत ठेवा.

७२. **परमात्मा** (परमेश्वर– सर्वसत्ताधीश)

ज्या ठिकाणाहून वेदांची उत्पत्ती झाली, ज्या स्थानांतून कर्माची प्रेरणा प्राप्त होते त्या स्थानाची व परमात्म्याची मी पुन्हा प्रतिष्ठा करीत आहे. ब्रह्मकर्मांचे प्रतिपादन करणारे वीर्यरूप वेद, अभीष्ट कर्मांच्या आचाराने आमचें आणि देवगणांचें पालन करो.



# विसावे काण्ड

१. हे इंद्रा, तूं ऐश्वर्यवान आणि मंगलाचा वर्षाव करणारा आहेस. सोमयागाच्या वेळीं आम्ही तुला आवाहन करतो. तूं या यज्ञस्थळीं ये आणि हा मधुर सोमरस प्राशन कर. हे मरुद्‌गणांनों, तुम्ही सर्व देवतां-मध्यें पराक्रमी आहांत. ज्या यज्ञामध्यें येऊन तुम्ही सोमपान करतां तो यज्ञकर्ता यजमान आपल्या परिवाराचें रक्षण करण्यास समर्थ असतो. ज्याच्यामुळें वृषभ, गाय आणि सोम प्रतिष्ठित होतात त्या अग्नीची आम्ही स्तोत्रांनीं स्तुती करतो.

२. मरुद्‌गण, सुन्दर देवता, स्तोत्रें आणि मंत्राच्या साहाय्यानें संपन्न होणाऱ्या यज्ञामध्यें उत्तम प्रकारें तयार केलेल्या सोमाचें पान करतात. समिधांनी प्रदीप्त होणाऱ्या अग्नीनें सोम प्राशन केला. इंद्र हाच ब्रह्मा आहे कारण तो महान आहे. हे ब्रह्मात्मक इंद्रा, ऋत्विजांची स्तुती ऐक आणि हा सोम प्राशन कर. द्रविणोदा, या यज्ञांत सोम प्राशन करून आम्हास धन प्रदान करो.

३. हे इंद्रा, या ठिकाणीं ये, तुझ्यासाठीं तयार केलेला हा सोम तूं प्राशन कर आणि तुझ्यासाठीं पसरलेल्या या कुशासनावर बस. तुझ्या रथाचे अश्व हरित् वर्णाचे आहेत. तुला ते सर्वोत्तम स्थळीं घेऊन जातात. आम्ही या ठिकाणी सोमयाग संपन्न करीत आहोत. तुझ्या अश्वांच्या साहाय्यानें नेल्या जाणाऱ्या रथानें तूं या यज्ञस्थळीं ये. तुझ्या-साठीं सर्वोत्तम सोम ठेवला असून चांगल्या स्तोत्रांनीं स्तुती करून तो

प्राशन करण्यासाठीं आम्ही तुला आवाहन करीत आहोत.

४. हे सुन्दर हनुवटी असलेल्या इंद्रा, आमची उत्तम स्तोत्रें तूं ऐक आणि आमच्याजवळ असलेला हा सोम तूं प्राशन कर. हा सोम तुझ्या सर्व इंद्रियांना प्रेरणा देईल. हा मधुर सोम तूं आपल्या जिभेने चव घेऊन प्राशन कर. आम्ही तुला दिलेला सोम सुखद आहे. तो तुला प्रसन्न करील.

५. संतानवती स्त्रीला ज्याप्रमाणें तिची मुलें गराडा घालतात त्याप्रमाणें ह्या ऋत्विजांनी या सोमाला गराडा घातला आहे. परंतु हे इंद्रा, हा सोम केवळ तुझ्यासाठीं आहे. या सोमप्राशनानें निर्माण होणाऱ्या शक्तीमुळें तुझे खांदे बैलाच्या खांद्याप्रमाणें शक्तिसंपन्न झाले आहेत. पोट विशाल होऊन हात बलवान झाले आहेत. आक्रमण वृत्ति निर्माण झाली आहे. हे इंद्रा, तूं या जगाचा अधिपति आहेस. वृत्रासुराचा तूं वध केल्यानें शत्रूला तुझें भय वाटतें. तुझा पुढें झुकलेला हात अंकुशाप्रमाणें आहे. परंतु तो दान देण्यासाठीं मात्र लांब होतो. हे इंद्रा, त्वरेनें तूं या ठिकाणीं आगमन कर आणि हा सोम प्राशन कर. पणीनीं पळवून नेलेल्या गायी तूं शोधून आणल्यास. रश्मिवान सूर्याला तूं वर्चस्व दिलेस. कुण्डपाय्य नामक कालांत केलेल्या यज्ञांत तूं आपलें चित्त प्रसन्न कर.

६. अनेक यज्ञकर्ते यजमान इंद्राची स्तुती करतात. हे इंद्रा, या स्तुतीने तृप्त होऊन अन्य देवतांसहित तूं या यज्ञस्थळी ये आणि तुझ्यासाठीं उत्तमप्रकारे तयार केलेला सोम पी आणि संतुष्ट हो. हा यज्ञातील हवि स्वीकार आणि यजमानांची समृद्धी कर. तूं यजमानांचें रक्षण करणारा आहेस. स्तोत्रांनीं पूजन करण्यास योग्य आहेस. तूं हा सोम प्राशन कर. तुझ्यासाठीं आम्ही या सोमाच्या आहुती प्रदान करीत आहोत. या योगे इंद्रा, तूं प्रवृद्ध होशील. हे इंद्रा, तूं जवळ अगर लांब अंतरावर असलास तरी तेथून शीघ्रतेनें ये. तुझी आम्ही केलेली स्तुति श्रवण कर.

७. हे सूर्या, यज्ञकर्त्या यजमानाला किंवा स्तुती करणाऱ्याला इंद्र धन प्रदान करतो हे प्रसिद्ध आहे. तो मंगलाचा वर्षाव करतो, आपल्या भक्तांचें अनिष्ट नाहीसे करतो आणि शत्रूला पराभूत करतो.

या इंद्राचें स्मरण ठेवून तूं उदयाला ये. या इंद्रानें शम्बरानें निर्माण केलेली नव्व्याण्णव गावें उद्ध्वस्त केली. वृत्राला ठार केलें आणि पणींनीं नेलेल्या गाई परत मिळविल्या. असा हा इंद्र आम्हाला सुख, धन, गाई आणि अश्व प्रदान करो. हे इंद्रा, तुझ्यामुळेंच मोठे यज्ञ संपन्न होतात. या यज्ञांत तुझी स्तुती केली जाते. तुला सोम प्रदान केला जातो. तूं तो प्राशन करून संतुष्ट हो.

८. हे इंद्रा, पूर्वीच्या ऋषींनीं संपन्न केलेल्या यज्ञामध्यें तूं सोम प्राशन केला होतास त्याप्रमाणें आमच्याही यज्ञांत तूं सोम प्राशन कर आणि आनंदित हो. तुझ्यामुळें सूर्य प्रकाशवंत होतो. पणींनीं चोरून नेलेल्या गाई तूं आम्हाला परत आणून दे, आमच्या शत्रूचा नाश कर आणि उपभोग्य अन्नाची समृद्धि कर– विद्वान लोक तुला सोमप म्हणतात. पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राची प्रार्थना ऐकतो त्याप्रमाणें तूं आमची प्रार्थना ऐक आणि द्रोणकलशांत भरून ठेवलेला हा सोमरस तूं प्राशन कर. हे अध्वर्यु, तो सोम तुला अर्पण करीत आहेत.

९. हे यजमानांनों, दर्शनीय, दुःखनाशक सोम प्राशनाने संतुष्ट होणाऱ्या, सूर्याच्या उदय-अस्ताच्या वेळीं आपल्या वासराला पाहून गाई ज्याप्रमाणें प्रेमानें हंबरतात त्याप्रमाणें प्रेममय स्तोत्रांनी आम्ही इंद्राची स्तुती करीत आहोत. धनद, प्रजापोषक, स्तुत्य, इंद्राची धनासाठीं आम्ही प्रार्थना करतो. दुर्भिक्ष्यानें पीडलेले प्राणी, कन्द-मूलादिकांनीं संपन्न असलेल्या पर्वताची ज्याप्रमाणें प्रार्थना करतात त्याप्रमाणें मी इंद्राची प्रार्थना करून शक्तिसंपन्न अन्नाची इच्छा करीत आहे. ज्या दानाच्या योगानें भृगु ऋषींना शांति मिळाली व कण्वपुत्र प्रस्कण्वाचे पोषण झालें तें धन हे इंद्रा, तूं आम्हाला प्रदान कर. सृष्टीच्या प्रारंभी पाण्यानें समुद्र भरण्याची कल्पना ज्या सामर्थ्यानें तुला लाभली ते अभीष्ट फल तूं आम्हाला प्रदान कर. हे बल शत्रूला प्राप्त होत नाहीं. लोक त्यामुळें तुला महान समजतात.

१०. साम आणि अन्य मंत्रांनीं केलेली इंद्राची स्तुती, अन्न प्रदान करून आमचें रक्षण करण्यास समर्थ होते. रथी ज्याप्रमाणें सांगेल त्याप्रमाणें सारथी जातो त्याप्रमाणें ही स्तुती इंद्राला संतुष्ट करण्यासाठीं

गमन करीत आहे. कण्वकुलोत्पन्न ऋषी, तीन लोकांचा स्वामी म्हणून इंद्राची स्तुती करून अभीष्ट फलाची कामना करतात किंवा भृगुकुलोत्पन्न ऋषी स्तुतीनें ज्याप्रमाणें इंद्राच्या जवळ जातात त्याप्रमाणें मनुष्यें विविध स्तोत्राच्या साहाय्यानें इंद्राप्रत जातात.

११. आपल्या बलानें शत्रूचा नाश करणारा, शत्रूची निवासस्थानें उद्ध्वस्त करणारा, शत्रूचें धन स्वाधीन करणारा इंद्र मंत्राच्या साहाय्यानें समृद्ध होतो. शत्रूचा नाश करणारी अनेक आयुधें त्याच्याजवळ आहेत. त्या शस्त्रांच्या साहाय्यानें त्यानें वृत्रासुराचा वध केला तेव्हां पृथ्वी आणि आकाश त्याच्या कीर्तीनें व्याप्त झालें. इंद्र सर्वांत श्रेष्ठ आहे म्हणून सर्व लोक त्याची स्तुती करतात. वृत्राप्रमाणें या इंद्राने अनेक मायावी राक्षसांचा नाश केला. वृत्राला ठार करतांना त्याने त्याचे दोन्ही बाहू उपटून टाकले. पणीनीं हरण केलेल्या गायी परत मिळविल्या. इंद्र स्वर्गाची प्राप्ति करून देणारा आहे. संग्रामाची इच्छा करणाऱ्या राक्षसांना आणि त्यांच्या सेनेला इंद्रानें जिंकलें. लौकिक कर्माची प्रेरणा देणाऱ्या सूर्याला प्रकाशित केलें. युद्धांमध्यें विजयाची इच्छा करणारा वीर ज्याप्रमाणें शत्रूच्या सेनेमध्यें प्रवेश करतो त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठीं इंद्र धावून जातो. इंद्र श्वेतवर्णा उषेला उदित करतो. इंद्रानें आपल्या पराक्रमानें पापी शत्रूला वश केलें. यजमानाचें त्यानें रक्षण केलें. कोणाच्याही साहाय्याशिवाय इंद्र आपल्या वलानें युद्धांत जय प्राप्त करतो आणि त्याची स्तुती करणाऱ्यांना धन प्रदान करतो. यज्ञादि कर्मामध्यें ज्या इंद्राला आवाहन केलें जाते, जो इंद्र वल प्रदान करतो, शत्रूवर विजय प्राप्त करतो, जो आकाशातील जलसंपत्तीचा स्वामी आहे, द्यौ आणि पृथ्वी मनुष्यांना प्रदान करतो, लोक यज्ञामध्यें हवीच्या साहाय्यानें ज्याला नेहमी प्रसन्न करतात, ज्यानें अश्व, हत्ती, उंट, वगैरे पशु मनुष्यांच्या उपयोगासाठीं त्यांना प्रदान केले, सूर्याला ज्यानें प्रकाशित केला, राक्षसांचा संहार करून हरित वर्ण सर्वत्र पसरला, विविध औषधी निर्माण करून मनुष्यांना निरोगीपण प्रदान केलें आणि त्यांचे पालन केलें, विविध वनस्पती निर्माण केल्या, सर्वांना उपयुक्त ठरणाऱ्या अंतरीक्षाचें रक्षण केलें, बल नामक राक्षसाचा

वध केला, विरुद्ध क्रिया करणाऱ्याचा ज्यानें नाश केला, अशा ऐश्वर्य-वान आणि सतत सुख प्रदान करणाऱ्या इंद्राला आम्ही युद्धाच्या वेळीं आवाहन करतो. त्या युद्धांत जय प्राप्त होतो आणि अन्नाचीही प्राप्ती होते. धनदायक आणि विजयी इंद्राची आम्ही स्तुती करून त्याला प्रसन्न करतो.

१२. ज्या इंद्रानें प्राणिमात्रांची वृद्धि केली त्या इंद्राची, हे ऋत्विजांनों, तुम्ही अन्नाच्या इच्छेनें स्तुती करा. यजमान इंद्राची पूजा करोत. आम्हाला अत्यंत प्रिय असणाऱ्या इंद्राला आमची प्रार्थना आहे की यजमानाला स्वर्गभोग आणि सोम यांची प्राप्ती होऊ दे. यजमानाला आपलें आयुष्य किती आहे याचें ज्ञान नाहीं म्हणून हे इंद्रा, तूं त्याला यज्ञोपयोगी दीर्घायुष्य प्रदान कर. आयुष्याचा नाश करणारें पाप नाहीसें कर. हरिदाश्व जोडलेला इंद्राचा रथ गाईंना शोधून काढण्यास उपयोगी झाला. द्यौ आणि पृथ्वी इंद्राच्या आधिपत्याखालीं आहेत. आम्ही त्या इंद्राची स्तोत्रांच्या साहाय्यानें सेवा करतो. त्याच्यासाठीं संस्कारित सोम तयार करण्यांत आला आहे. हे इंद्रा, तूं बलवान आहेस. तुझी स्तुती करणाऱ्यांना तूं अपार धन प्रदान करतोस. इंद्रियांवर नियंत्रण ठेवण्याची इच्छा असणारे साधक इंद्राची उपासना करतात. इंद्र त्यांना समृद्ध करतो. हे देवगणांनों, तुम्हीदेखील इंद्राच्या प्रेरणेनें सर्व आचार करा. हे इंद्रा माध्यंदिन यज्ञाच्या वेळीं आपल्या द्रुतगती अश्वांच्या साहाय्यानें तूं ये आणि आम्ही तुझ्यासाठीं तयार केलेला हा सोम प्राशन कर.

१३. हे बृहस्पते, इंद्राच्याबरोबर तूं देखील सोम प्राशन कर. कारण सोमानें तूं प्रसन्न होतोस आणि आम्हाला पुत्र-पौत्रादि धन प्रदान करतोस. हे मरुद्गणांनों, तुमच्या शीघ्रवेगी अश्वांच्या साहाय्यानें, या यज्ञांत तूं ये. तुझ्यासाठीं ही विशाल वेदी निर्माण केली आहे. या ठिकाणीं अंथरलेल्या कुशासनावर तूं विराजमान होऊन सोम प्राशन कर. हे जातवेदा, तुझी स्तोत्रें आमची बुद्धी प्रकाशमान करो. तुझ्या प्रियत्वानें आम्हाला हिंसा करण्याची बुद्धी देऊं नकोस. तेहतीस देवतांसहित तूं रथांत बसून ये. ज्या ज्या देवतांना या यज्ञांत आहुती दिली जाते त्या त्या देवतांना तूं ती प्रदान करून प्रसन्न कर.

१४. सदा तरुण असणाऱ्या इंद्रा, तूं पूज्य व पोषणकर्ता, असल्यानें रक्षणाची कामना करणारा मनुष्य ज्याप्रमाणें राजाला आवाहन करतो त्याप्रमाणें आम्हीं तुला आवाहन करीत आहोत. युद्धांमध्यें आम्ही तुझ्याच आश्रयानें राहातो. हे इंद्रा आम्ही तुला आमचा सखा मानतो. तूं आमच्या साहाय्यार्थ ये. हे यज्ञकर्त्या यजमानांनों, गवादि धन प्रदान करणाऱ्या इंद्राची तुम्ही स्तुती करा. मनुष्यांचे रक्षण करणाऱ्या, हरित्वर्णाच्या अश्वांनीं सुशोभित झालेल्या रथानें येणाऱ्या, प्राणिमात्रांवर नियंत्रण ठेवणाऱ्या आणि स्तुतीनें प्रसन्न होणाऱ्या इंद्राची आम्ही प्रार्थना करतो.

१५. जो इंद्र मनुष्यांचें पालन करण्यास समर्थ आहे, उताराकडे धांवणारें पाणी जसें महान वेगानें धावतें त्याप्रमाणें संग्रामामध्यें महान वेगानें जाणारा, पाणी ज्याप्रमाणें सखल भागाचा आश्रय करतें त्याप्रमाणें मनुष्यें ज्याचा आश्रय करतात, ज्याचें वज्र पर्वताच्या अडथळयानें थांबत नाहीं, शत्रू ज्याच्या नामोच्चारानें भयभीत होतात, ज्याच्यासाठीं यजमान आणि ऋत्विज यज्ञ करतात, त्या इंद्राला या यज्ञस्थानीं बोलावून आणा. हे इंद्रा, तूं महान आहेस परंतु आमची स्तोत्रें मात्र लहान आहेत. ती स्तोत्रें तूं श्रवण कर आणि स्तोते व यजमान यांच्या कामना पूर्ण कर. तूं वज्र धारण करणारा आहेस. तूं पर्वताचें तुकडे केलेस आणि मेघांतील पाणी नदीच्या रूपानें प्रवाहित केलेस.

१६. मेघ ज्याप्रमाणें शब्द करीत जल प्रसृत करतात, पक्षी शब्द करीत आकाशांत गमन करतात, मेघांतील पाणी धारांच्या रूपानें शब्द करीत पृथ्वीवर पडतें त्याप्रमाणें बृहस्पतीची स्तुती मंत्राच्या रूपानें सर्वांच्या कानीं पडते. महर्षी अंगिरस ज्याप्रमाणें घृतादि साहित्यानें विवाहकालीं पतिपत्नींना अर्यमा देवतेच्या जवळ नेतात, त्याप्रमाणें आम्ही या दम्पतीला अर्यमा देवतेजवळ नेतो. सूर्य ज्याप्रमाणें प्रकाशासाठीं आपले किरण एकत्र करतो त्याप्रमाणें या स्त्री-पुरुषांना दम्पतीच्या नात्यानें आम्हीं एकत्र करतो. युद्धाला तयार झालेले वीर ज्याप्रमाणें अश्वाशीं संयुक्त होतात त्याप्रमाणें हा वर वधूशीं संयुक्त होवो. कोठारांतून ज्याप्रमाणें अन्न बाहेर काढलें जातें त्याप्रमाणें बृहस्पती, अतिथीला तृप्त करण्यासाठीं पर्वताच्या गुहेंत नेऊन ठेवलेल्या गाई,यजमानाला आणून देतो.

आदित्य उल्केला ज्याप्रमाणें खालीं फेकून देतो त्याप्रमाणें बृहस्पती मेघांना पाण्याच्या रूपानें पृथ्वीवर फेकून देतो. वायू ज्याप्रमाणें मेघांना छिन्न-विच्छिन्न करतो त्याप्रमाणें बृहस्पती गाईंना रानांत पसरवितो. बल नामक राक्षसाची हिंसात्मक आयुधें, अग्नीप्रमाणें ताप देणाऱ्या मंत्रांनीं बृहस्पतीनें नष्ट केली आणि पयस्विनी गाईंना मुक्त केलें. अंड्याचा छेद करून पक्षी बाहेर पडतात, तळ्यांतील पाणी कमी झालें म्हणजे त्यांतील मासे दिसू लागतात त्याप्रमाणें बृहस्पतीनें पर्वताच्या गुंफेचा छेद करतांच त्यांत लपवून ठेवलेल्या गाई दिसूं लागल्या. त्यांना त्यानें बाहेर काढलें. अंधारांत लपलेल्या गाई दिसाव्यात म्हणून बृहस्पतीनें उषेला उदित केलें. प्रकाशासाठीं सूर्य आणि अग्नीला प्राप्त केलें. बृहस्पतीमुळें सूर्य, चंद्र, दिवस आणि रात्र प्रकट झाली. बृहस्पतीनें पर्वतांत ठेवलेल्या गाईंना, पर्वताचा छेद करून मुक्त केलें त्यावेळीं द्युलोकाचें पालन करणाऱ्या देवांनीं, अश्वाला ज्याप्रमाणें अलंकृत करतात, त्याप्रमाणें द्युलोक नक्षत्रांनीं अलंकृत केला. दिवसा प्रकाश आणि रात्री अंधःकार निर्माण करून शोभा वाढविली. मेघांना विदीर्ण करून जलवर्षाव करणाऱ्या बृहस्पतीला आम्ही हवि प्रदान करतो. त्यानें तो प्रसन्न होवो आणि आम्हाला अन्न, अश्व, पुत्र, पौत्र आणि सेवकांनीं युक्त करो.

१७. पित्याला पाहून पुत्र किंवा कामवती स्त्रिया आपल्या पतीला विलगतात त्याप्रमाणें सुंदर वाणीनें केलेली स्तोत्ररूपी स्तुती ह्या इंद्राला आलिंगन देवो. माझें मन इंद्रापासून कधीही अलग होत नाहीं. तूं शत्रूचा नाश करणारा, राजाप्रमाणें सिंहासनावर विराजमान होणारा आणि यज्ञांत कुशासनावर बसणारा इंद्र सोमयागाच्या वेळीं सोमपान करो. हे इंद्रा आमची तहान व दरिद्रता दूर कर. इंद्रानें प्रवाहित केलेल्या सात नद्या अन्नाची वृद्धि करतात. पक्षी ज्याप्रमाणें वृक्षाचा आश्रय करतात त्याप्रमाणें सोम इंद्राचा आश्रय करतो. जुगारी ज्याप्रमाणें फांसे धारण करतो त्याप्रमाणें इंद्र आमच्या स्तुतीला धारण करतो. हे इंद्रा, बलाच्या बाबतींत इंद्राची बरोबरी कोणीही करीत नाहीं. तुझ्याप्रमाणें काम करणारा पूर्वी कोणी झाला नाही आणि वर्तमान कालीही कोणी नाहीं. सर्व साधकांच्या कामना इंद्र एकाच वेळीं पूर्ण करतो. ज्या यजमानाच्या

तीनही वेळच्या यज्ञांत प्रतिष्ठित होतो तो यजमान सर्व शत्रूंना वश करतो. पाणी ज्याप्रमाणें नदीच्या रूपाने सागराकडे जाते त्याप्रमाणें सोम आणि ऋत्विजांची स्तोत्रें इंद्राकडे गमन करतात. सूर्यानें संरक्षित केलेलें पाणी ज्या मेघांमध्यें असते ते मेघ छिन्न करून पृथ्वीवर जल-वर्षाव करून अन्नसमृद्धी करतो त्याप्रमाणें इंद्र हवि प्रदान करणाऱ्या यजमानाला तेजसंपन्न करतो. हे इंद्रा तुझी कृपा ज्या यजमानाला प्राप्त होते त्याचें दारिद्र्य दूर निघून जातें. मनुष्यांची क्षुधा आणि तृष्णा शांत होते. तो पुरुषामध्यें श्रेष्ठ होतो आणि शत्रूवर विजय प्राप्त करतो. उत्तर आणि ऊर्ध्व दिशेकडून येणारा बृहस्पति, समोरून आणि आकाशमध्यांतून येणारा इंद्र, हिंसक आणि पापकर्मी लोकांपासून आमचें रक्षण करो. हे इंद्रा आणि बृहस्पति, तुम्ही आकाश आणि पृथ्वीचें स्वामी आहांत. तुमची स्तुती करणाऱ्या मला धन प्रदान करून, तुमच्या रक्षणसाधनांनीं माझें रक्षण करा.

१८. हे इंद्रा, आम्ही कण्वकुलोत्पन्न ऋषी तुझ्या प्रियत्वाची कामना करतो. आम्ही तुझी स्तोत्रें गातो. जो यजमान सोम संस्कारित करतो त्याची इंद्र इच्छा करतो. हे अभीष्टवर्षक इंद्रा, आम्ही तुझ्या प्रेमासाठीं तुझी स्तुती करीत आहोत. अत्यंत क्रूर शब्द बोलणारे, निंदा करणारे, दान न करणारे जे लोक असतील त्यांना हे इंद्रा, तूं शत्रूच्या स्वाधीन कर. आमच्या या स्तुतीचा तूं स्वीकार कर. युद्धांत तूं अग्रेसर होऊन युद्ध करतोस. माझ्यासाठीं तूं संरक्षक कवच निर्माण कर.

१९. वृत्रासुराचा वध करणाऱ्या इंद्रा, बल प्रदर्शन आणि शत्रू-सेनेचा पाडाव करण्यासाठीं आम्ही तुला पाचारण करीत आहोत. तूं अनेक कर्मे करतोस. यज्ञकर्ते ऋत्विज तुझ्या समोर येवोत. तुला शतक्रतु, सहस्त्राक्ष, पुरंदर इत्यादि नांवानीं हाकारतात. अनेक साधक तुझें पूजन करतात. तूं त्यांचा रक्षक आणि तेज-प्रदायक आहेस. रणक्षेत्रांत विजया-साठीं अनेक योद्धे तुला आवाहन करतात. त्याप्रमाणें यज्ञाच्या वेळीं अनेक यजमान तुला आवाहन करतात. पापनिवारण आणि बलप्राप्ती-साठीं मी इंद्राचें पूजन करतो. युद्धामध्यें विजय आणि अन्न प्राप्तीसाठीं, पाप आणि शत्रूच्या नाशासाठीं तूं आम्हाला साहाय्य कर.

२०. हे इंद्रा, अत्यंत वलवान, दुःस्वप्ननाशक आहेस. तूं आमचें रक्षण कर. तुझें दर्शन घेण्यायोगे जे सामर्थ्य देवता, पितर आणि मनुष्यांना लागतें ते मी प्राप्त करतो. शत्रूला पार करून तूं आम्हाला त्यांचे धन प्रदान कर. हा सोम आणि आमची स्तोत्रें तुझें वल वृद्धिगत करतात. तूं जवळ अगर लांव कोठेंही असलास तरी त्वरेनें आमच्याकडे ये. आपल्या सर्वोत्तम निवासस्थानातून तूं सोमपानासाठीं या ठिकाणीं ये. भीषण भय आमच्यापासून दूर कर, आणि आम्हाला सुख प्रदान कर. सर्व दिशांचा तूं स्वामी आहेस म्हणून सर्व दिशांकडून येणारी संकटें आणि भय यांना तूं दूर कर.

२१. यज्ञामध्यें आम्ही इंद्राची सुन्दर स्तोत्रें गात आहोत. झोंपलेल्या पुरुषाचें धन चोर ज्याप्रमाणें त्वरेनें घेऊन जातो त्याप्रमाणें इंद्र असुरांचे धन हरण करतो. हे इंद्रा, तूं गाई, अश्व, गज, अन्न, हिरण्य आणि रत्नादी वस्तु देणारा आहेस. तूं ऋत्विजांचा मित्र आहेस. तूं अत्यंत वुद्धिमान, वलवान, अनेक कर्मं करणारा, सर्वव्याप्त धनाचा स्वामी, आमच्या हवींनीं प्रसन्न होणारा, सोमपानानें तृप्त होणारा, दारिद्र्य नष्ट करणारा आणि प्रेमळ आहेस. हे इंद्रा तूं साधुजनांचा रक्षक असल्याने त्यांच्या शत्रूचा नाश करतोस. तुझ्या कृपेनें आम्ही धनवंत आणि आनंदमय होऊं. तूं आपल्या शस्त्रांनीं शत्रूवर प्रहार करतोस. शत्रूच्या नगरांत राहिलेल्या लोकांचा मरुद्गणांच्या साहाय्यानें नाश करतोस. नमूचि नामक मायावी राक्षसाचा तूं संहार केल्यानें आम्ही तुझें स्तवन करतो. आपल्या अत्यंत तेजोवान वर्तनी नामक शक्तीनें तूं अतिथिगु नांवाच्या राजाच्या शत्रूचा संहार केलास. पर्णयासुर नामक असुराचा पण वध केलास. ऋजिश्वम् नांवाच्या राजाच्या वङ्गदासुर नामक शत्रूची शंभर नगरें तूं उद्ध्वस्त केलीस. असाहाय्य वनलेल्या सुश्रुषा नांवाच्या राजाला वेढा घालणाऱ्या सात हजार नव्व्याण्णव सेनाधिपांना आपल्या चक्रानें नष्ट केलेंस. या राजांनीं तुझ्या आश्रयाची कामना केली होती. हे इंद्रा, या यज्ञाच्या संपन्नतेसाठीं तुझे संरक्षण हवें. आम्ही तुझे मित्र आहोत. आमचें तूं मंगल कर. यज्ञ परिपूर्ण झाल्यावर सुद्धां पुत्र-पौत्र आणि प्रदीर्घ जीवन प्राप्त व्हावें म्हणून आम्ही तुझी स्तुती

करीत राहूं.

२२. हे इंद्रा, सुसंस्कारित केलेला सोम उदरांत स्थिर करून तूं आनंदतोस. तुझ्या साहाय्याशिवाय स्वतःच्या रक्षणाचा गर्व करणारा मूर्ख होय. ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्यांची सेवा तूं स्वीकारू नकोस. तुला कमी लेखणाऱ्यांचा तूं समाचार घे. गाईचे दूध मिसळलेला सोम ऋत्विज तुला प्रदान करतात. तहानलेला मृग ज्याप्रमाणें तळ्यावर जाऊन पाणी पितो त्याप्रमाणें तूं हा सोमरस प्राशन कर. इंद्राला आवडेल त्याप्रमाणें तुम्ही त्याचें पूजन करा. तो सत्यफलाचा स्वामी आहे. साधूंचा रक्षण-कर्ता आहे. इंद्राचे सुंदर अश्व, इंद्राला आमच्या यज्ञस्थानीं शीघ्रतेनें घेऊन येवोत. आम्ही पसरलेल्या दर्भासनावर इंद्र विराजमान होवो. इंद्र मधुर सोमाचें पान करतो तेव्हा त्या वज्रधारी इंद्राला दूध देण्यासाठीं गाई पान्हवतात.

२३. हे इंद्रा, आमच्या यज्ञामध्यें यजमान आणि होता आहेत. तुझ्यासाठीं यज्ञवेदीवर कुशासन पसरलें आहे. सोमरस तयार करणारे पाषाण जवळच तयार ठेविले आहेत. होता तुला आवाहन करीत आहे. तूं आपल्या हरिदाश्व जोडलेल्या रथानें त्वरेनें येऊन या आसनावर विराजमान हो आणि आम्ही दिलेले हवि स्वीकार. तीनही वेळीं यज्ञ करतांना आम्ही तुझी स्तुती करतो. गाय ज्याप्रमाणें आपल्या वत्साला प्रेमानें चाटते त्याप्रमाणें आमची स्तोत्रें इंद्राला स्पर्श करोत. हे इंद्रा, सोम प्राशन करून तूं बलवान हो. धनदानाने आनंदी हो. सोमाची आहुती प्रदान करून आम्ही तुझ्या कृपेची कामना करीत आहोत. तूं आम्हाला इष्टफल प्रदान कर. हे इंद्रा, तूं आपल्या अश्वांवर आणि रथावर प्रेम करतोस. ते अश्व तुला सुखी करतात त्याप्रमाणें तूं आम्हा-लाही सुखी कर.

२४. हे इंद्रा, या कुशासनावर तूं विराजमान हो आणि तेथें ठेवलेला दुग्धमिश्रित सोम प्राशन कर. आमची स्तुतिरूप वाणी तुला यज्ञस्थानीं येण्याची प्रेरणा देवो. आम्ही तुला जाणतो. युद्धाच्या वेळीं तूं शत्रूवर नियंत्रण करून त्याला वश करतोस. हे इंद्रा, कौशिक गोत्रांत उत्पन्न झालेले आम्ही, तुझ्याकडून संरक्षणाची अपेक्षा करीत आहोत.

तूं सोम प्राशनासाठीं येऊन आमच्या सर्व कामना पूर्ण कर.

२५. हे इंद्रा, तूं ज्या पुरुषांचें संरक्षण करतोस ते पुरुष अश्वावर आरूढ होऊन श्रेष्ठ होतात. गाई ज्यांच्याजवळ आहेत, त्या पुरुषांचें संरक्षण केल्याने ते पुरुषसुद्धां श्रेष्ठत्वाला प्राप्त होतात. समुद्र ज्याप्रमाणे चारही दिशांनीं पाण्यांनीं पूर्ण भरलेला असतो त्याप्रमाणें चारही बाजूनें आलेल्या धनानें इंद्र समृद्ध होतो. पाणी सखल भागाकडे वाहात जाऊन सागराला मिळतें त्याप्रमाणें आम्ही केलेली स्तुती इंद्राला जाऊन मिळते. सूर्याच्या दीप्तीमुळें मनुष्य पृथ्वीकडे पाहातो त्याप्रमाणें इंद्राच्या तेजानें आमची नजर खालीं झुकते. ऋत्विज इंद्राची सेवा करतात. यज्ञाच्या वेळीं त्याची पूजा करतात आणि यज्ञही त्याच्यासाठींच संपन्न केला जातो. त्या यज्ञामुळें यज्ञकर्ते संतान आणि पशुधनानें समृद्ध होतात आणि त्यांचें कल्याण होतें. पणीनीं गाई चोरून नेल्या तेव्हां अंगिरस ऋषीनीं तुझ्यासाठीं हविरन्न संपादन केलें. हे अंगिरसकुलोत्पन्न ऋषी, आमच्यासाठीं भीषण भय इंद्राच्या साहाय्यानें दूर करो. ते यज्ञीय अग्नि सदैव प्रज्वलित ठेवतात आणि कल्याणकारी कर्मासाठी त्याला आवाहन करतात. महर्षी अथर्वानें इंद्रासाठीं यज्ञ केला. तेव्हा चरावयास गेलेल्या गाईसाठीं मार्ग शोधून काढला. तोच मार्ग नंतर सूर्यानें स्पष्ट केला. सूर्य ज्या वेळीं उगवला तेव्हां उशना- ऋषींनीं इंद्राच्या सहाय्यानें या गाई प्राप्त केल्या. उत्तम संतान प्राप्त व्हावें म्हणून देवतांसाठीं कुशासनें सज्ज केली जातात आणि वाणीनें स्तोत्रें गायिली जातात. ग्रावन नामक पाषाणांची सोमरसासाठीं स्थापना केली जाते. अशा ठिकाणीं इंद्र पदार्पण करतो. इंद्र अभीष्टवर्षक, हरिदश्वांचा रथानें शीघ्र गमन करणारा आणि स्तुतीनीं प्रसन्न होणारा आहे. हे इंद्रा, आम्ही तुला सोम प्राशनासाठीं प्रार्थना करतो.

२६. यज्ञाच्या वेळीं, युद्धाच्या वेळीं किंवा अन्नप्राप्तीसाठीं आम्ही इंद्राला आवाहन करतो. आमचें आवाहन ऐकून सर्व प्रकारची रक्षण-साधनें आणि अन्नासहित इंद्र या ठिकाणीं येवो. हे इंद्रा, तूं स्वर्गाचा स्वामी आणि अगणित वीरांचा प्रमुख आहेस. माझ्या पित्यानें ज्याप्रमाणें सर्वप्रथम तुलाच आवाहन केलें होते, त्याप्रमाणे मी देखील इंद्रालाच

आवाहन करीत आहे. हरिदश्व जोडलेल्या रथांच्या साहाय्यानें इंद्राचा सारथी, सर्व कामपूरक इंद्राला या ठिकाणीं घेऊन येवो. अंधःकारांत लपलेले पदार्थ सूर्य ज्याप्रमाणें प्रकाशांत आणतो त्याप्रमाणें अज्ञानी जनांना ज्ञान प्रदान करतो. अशा प्रकाशवान सूर्याचे उदित होतांच दर्शन घ्या.

२७. हे इंद्रा, तूं ऐश्वर्यवान, सर्व देवतांमध्यें श्रेष्ठ आणि सर्व प्रकारच्या धनांचा स्वामी आहेस. तुझ्या कृपेने मलाही धनाचा स्वामी कर. तुझी स्तुती करणारा ज्याप्रमाणें गाईंचा आवडता होतो त्याप्रमाणें मी गोधनाचा स्वामी होवो. तुझ्या कृपेनें ज्या वेळीं मी गोधनानें संपन्न होईन तेव्हा प्रज्ञावंतांना मी धन देईन. आमची सत्यरूप वाणी तुला गाईप्रमाणें प्रिय होवो. हा संस्कारित सोम ज्याप्रमाणें तुला प्रिय आहे त्याप्रमाणें यजमान प्रिय होवो. हे इंद्रा, तुझ्या धनदानाला कोणीही अडथळा करू शकत नाहीं. देवगण अगर मनुष्य यांना धनाबद्दल प्रियत्व आहे. तूं प्रदान केलेलें धन कोणीही नष्ट करूं शकत नाहीं. हे इंद्रा अंतरीक्षामध्यें मेघ विस्तृत करून तूं पृथ्वीवर जलवर्षाव करतोस. त्या पाण्यानें ही पृथ्वी धान्यांना पोषणयुक्त करते. हे इंद्रा आमच्या स्तुतीनें तूं प्रसन्न हो.

२८. सोमपानानें निर्माण झालेल्या सामर्थ्यामुळें इंद्रानें अंतरिक्षांतील मेघांना जलवर्षावाला प्रवृत्त केलें. अंगिरसासाठी गुहेंत लपवलेल्या गाई इंद्रानें मुक्त केल्या आणि राक्षसांचा पराभव केला. नक्षत्रें आणि ग्रह यांना इंद्रानें आकाशांत स्थिर केलें. आता त्यांना कोणी हलवूं शकणार नाहीं. जलवर्षावानें इंद्र समुद्राला हर्षित करतो.

२९. हे इंद्रा, स्तोत्रें आणि मंत्र यांनीं तुझें सामर्थ्य वृद्धिंगत होतें आणि स्तुती करणाऱ्यांचें त्या बरोबर कल्याण होतें. इंद्राचे हरिदश्व सुद्धां उत्तम आणि इच्छित फल प्रदान करणारे आहेत. हे अश्व इंद्राला सोमपानासाठीं आमच्या यज्ञांत त्वरेनें घेऊन येवोत. हे इंद्रा समुद्राच्या पाण्यापासून निर्माण झालेल्या फेनाचें शस्त्र तयार करून तूं नमूचि राक्षसाचे तुकडे केलेस आणि त्याच्या सेनेवर विजय प्राप्त केलास. आपल्या मायावी बलानें आकाशांत संचार करणाऱ्या आणि संचार करण्याची इच्छा करणाऱ्या राक्षसांना तूं त्यांचें तोंड पृथ्वीकडे करून

पराभूत केलेंस. हे इंद्रा, तूं सोम प्राशन केलास म्हणजे तुझें बल वृद्धिंगत होतें. ज्या ठिकाणीं सोम काढला जात नाहीं त्या ठिकाणच्या लोकांचा तूं नाश करतोस.

३०. हे इंद्रा, तुझे अश्व वेगवान आहेत. यज्ञामध्यें शत्रुनाशक इंद्र आणि त्याचे अश्व यांची आम्ही प्रशंसा करतो. अग्नीला ज्या प्रमाणें घृताच्या आहुतीनें तृप्त केलें जातें त्याप्रमाणें इंद्राला स्तुतीनें तृप्त केलें जातें. इंद्रानें यज्ञांत त्वरेनें यावें म्हणून त्याच्या रथाच्या घोड्यांना आम्ही प्रेरणा देतो. नवप्रसूता गाय आपल्या दुधानें आपल्या स्वामीला तृप्त करते त्याप्रमाणें यजमान इंद्राला सोम प्रदान करून आम्ही तृप्त करतो. हे ऋत्विजांनों, तुम्ही इंद्राचें पूजन करा. इंद्राच्या देहाचा वर्ण हरित आहे. त्यानें धारण केलेलें वज्र आणि त्याचा निवास हरित्-वर्णयुक्त आहेत. इंद्राचे वज्र सूर्याच्या दीप्तीप्रमाणें अंतरीक्षांत स्थित आहे. आपल्या वज्रासहित, हरिदश्वांच्या साहाय्यानें तो इच्छेप्रमाणें सर्वत्र संचार करतो. याच हरित वज्रानें इंद्रानें वृत्रासुराचा वध करून त्याच्या सहस्रावधि अनुयायांना शोकसागरांत बुडवून टाकलें. हे इंद्रा, हा सोम आणि हे अन्न तुझेंच आहे.

३१. सोमापासून इंद्राला प्रेरणा मिळावी म्हणून इंद्राचे अश्व सोमपानासाठीं त्याला यज्ञाच्या ठिकाणीं घेऊन येतात. तीनही वेळच्या यज्ञांत सोमासाठीं इंद्र उपस्थित होतो. इंद्राचे केस, मिशा, दाढी हरित-वर्णाचे आहेत. हा इंद्र या यज्ञस्थानीं येऊन आमची सर्व पापें नाहीशी करो. अग्नि ज्याप्रमाणें यज्ञांत दिलेली आहुती आपल्या सात जिभांनीं चाटून घेतो त्याप्रमाणें इंद्राला प्रदान केलेला सोम इंद्र ओठांनीं प्राशन करतो. इंद्राचा निवास द्यौ आणि पृथ्वीमध्यें आहे. अश्वारूढ सैनिक ज्याप्रमाणें युद्धांत अग्रभागीं गमन करतो त्याप्रमाणें यज्ञामध्यें इंद्र नेहमी अग्रेसर असतो. हे इंद्रा, आम्ही तुझ्या कृपेची इच्छा करतो त्याप्रमाणें तूं यजमानाची इच्छा करतोस. तूं ये आणि यजमानाला समृद्ध कर.

३२. चिरतरुण असणाऱ्या इंद्रा, तूं पृथ्वी आणि आकाश आपल्या कीर्तीनें व्यापून टाकतोस. पणींनीं हरण केलेल्या गाईंचें स्थान तूं सूर्याला

अ...२५

दाखविलेस. सूर्याची स्तुती करणाऱ्यांना सूर्य गाईंच्या गोठ्यांची प्राप्ती करून देतो. हे इंद्रा, तूं सोमरस पिण्याची सदा इच्छा करतोस आणि आपल्या वेगवान अश्वांच्या साहाय्यानें ज्या ठिकाणीं सोम असेल त्या ठिकाणीं जातोस. तीन वेळां यज्ञ केला जातो. त्या तीनही यज्ञांत येऊन तूं सोमपान कर.

३३. ग्रावन पाषाणांच्या साहाय्यानें अध्वर्यूनीं तयार केलेला हा सोम प्राशन करून तूं आनंदित हो. या सोमाच्या योगानें तुला महान बल प्रदान प्राप्त होईल. यज्ञकर्मामध्यें तुला हवि देतांना स्तुतींनी प्रसन्न केलें जातें. त्यामुळें तूं आमचें संतान आणि अन्न संरक्षित करतोस. तूं इच्छित फलवर्षक असल्यानें यजमान आणि यज्ञीय ऋत्विज तुझी सतत स्तुती करतात.

३४. ज्यानें आकाश आणि पृथ्वी संरक्षित करून आपल्या नियंत्रणाखालीं ठेविली, कंपायमान होणाऱ्या भूमीला स्थिरता प्राप्त करून दिली, पर्वतांचे पंख छेदून त्यांना अचल केलें, अंतरीक्ष आणि आकाश यांना स्तंभित केलें, अंतरीक्षांत भ्रमण करणाऱ्या मेघांना निदारित करून पाण्यानें नद्या भरल्या, पाषाणांच्या सहाय्यानें अग्नीची उत्पत्ती केली, ज्यानें लोकांना स्थिर केलें, असुरांना गुहेंत बंदिस्त केलें, शत्रूवर विजय संपादन केला व शत्रुरक्षक सैन्याचा संहार केला त्या इंद्रावर हे मनुष्यांनों, तुम्ही श्रद्धा ठेवा. जो निर्धनाला सधन करतो, अबलाला साहाय्य करतो, त्याची स्तुती करणाऱ्या ब्राह्मणांना तो इच्छित वस्तू प्रदान करतो. सोम तयार करणाऱ्यांचें जो रक्षण करतो. ज्याच्या-जवळ पुष्कळ अश्व, गाई, उंट, हत्ती, गांवें, रथ वगैरे आहेत, ज्यानें जगाला प्रकाश देण्यासाठीं सूर्याचा उदय केला, उषेला प्रकट केली, जलवर्षावाचा जो प्रेरक आहे, आकाश आणि पृथ्वी यांचें नातें ज्यानें निर्माण केलें, हवि-प्राप्तीसाठीं द्युलोक आणि वृष्टीसाठीं पृथ्वी ज्याला आवाहन करते, ज्याच्या मदतीशिवाय शत्रूवर विजय प्राप्त करण्याची इच्छा सफल होत नाहीं म्हणून युद्धाच्या वेळीं ज्याचें आवाहन केलें जातें, प्राणिमात्रांच्या पाप-पुण्याचा जो साक्षी आहे, इंद्राला न मानणाऱ्या प्राण्याची जो हिंसा करतो, आपल्या कर्मामध्यें साहाय्याची अपेक्षा न

केल्यामुळें ज्याचा पराभव करतो त्या इंद्रामध्यें हे मानवांनों तुम्ही विश्वास ठेवा. सतत चाळीस वर्षें गुप्तपणें पर्वतांत संचार करणाऱ्या शम्बराचा ज्यानें वध केला, ज्यानें बलिपुत्राचा संहार केला, ज्याची हिंसा व्हावी म्हणून असुरांनी यज्ञकर्त्या अध्वर्यूंना वेढा घातला, अध्वर्यूंनीं निर्माण केलेला सोम ज्यानें प्राशन केला जो जल, कामना, फल, धन आणि अन्य ऐश्वर्याचा वर्षाव करतो, जो सूर्यामध्यें स्थिर आहे, ज्यानें आकाशावर स्वारी करणाऱ्या रोहिणासुराचा आपल्या वज्रानें वध केला, ज्याने सप्त नद्यांना जन्म दिला, ज्याच्यासमोर, आकाश, पृथ्वी, पर्वत बलवान व नम्र होतात, जो आकाश आणि पृथ्वी यांना व्यापून टाकतो, जो आमची स्तुतिस्तोत्रें श्रवण करतो, ज्यास सर्व प्राणी शरण जातात, त्या इंद्रावर हे मानवांनों विश्वास ठेवा. त्याचा स्नेह संपादन करा आणि सर्व ऐश्वर्यानें समृद्ध व्हा.

३५. इंद्रानें सोम प्राशनासाठीं शीघ्रतेनें यावें म्हणून मी हे स्तोत्र मुद्दाम पठण करीत आहे. त्याला प्राचीन ऋषींप्रमाणें हवि अर्पण करीत आहे. इंद्र हा धन प्रेरक, शत्रूला ताप देणारा आणि बलसमृद्ध आहे. एखादा कारागीर ज्याप्रमाणें रथ तयार करतो त्याप्रमाणें मी इंद्राची स्तोत्रें तयार करून पठण करतो. अश्व ज्याप्रमाणें रथाला जोडले जातात त्याप्रमाणें मी ही स्तोत्रें इंद्राशीं जोडतो. असुरपुरांचा विध्वंस करणाऱ्या यशवान इंद्राची स्तुती करून मी त्याला पाचारण करीत आहे. ब्रह्मदेवानें केवळ इंद्रासाठीं वज्र नामक आयुधाची निर्मिती केली. ते आयुध शत्रूचा पराभव करण्यास समर्थ आहे. याच आयुधानें इंद्रानें वृत्रासुराच्या वक्षावर प्रहार केला. त्यामुळें तो गतप्राण झाला. आमच्या नित्याच्या तीनही वेळच्या या प्रक्रियांमध्यें इंद्रानें सोमपान केलें व पुरोडाश भक्षण केला. त्यामुळें निर्माण झालेल्या सामर्थ्यानें त्याने शत्रूला पराभूत करून त्याचें धन हिरावून घेतलें. पाण्यानें पृथ्वीला तृप्त करण्यासाठीं त्यानें मेघांना विदीर्ण केलें. वृत्राचा वध करण्यापूर्वीं देवस्त्रियांनीं इंद्राला आपल्या स्तुतीनीं स्फूर्ति प्रदान केली. आकाश आणि पृथ्वी तेजानें भरून टाकली. इंद्राचा महिमा कमी करण्यास कोणीही समर्थ नाहीं. पृथ्वीवर जलवर्षाव व्हावा म्हणून इंद्र मेघांना एकत्र आणतो. पणीनीं चोरून नेलेल्या

गायी इंद्रानें सोडवून आणल्या. यजमानाला भरपूर ऐश्वर्य प्रदान केले.
इंद्राच्या वज्रामुळें नद्या नियमित वाहूं लागल्या. यजमानाला इच्छित फल प्रदान करून पाण्यांत बुडणाऱ्या तुर्वीताला वांचविलें. हे इंद्रा, शत्रूच्या नाशासाठीं तूं आपल्या वज्राचा उपयोग करतोस. मांस भक्षण करण्याची इच्छा असणारा मनुष्य ज्याप्रमाणें मांसाचे बारीक बारीक तुकडे करतो त्याप्रमाणे इंद्रानें आपल्या वज्राच्या प्रहारानें वृत्राच्या शरीराचे तुकडे केले. हे ऋत्विजांनों, इंद्राच्या पराक्रमाचें गायन करा. इंद्रानें पर्वताचें पंख तोडल्यानें ते स्थिर झाले. त्यामुळें आकाश आणि पृथ्वीदेखील इंद्राला घाबरतात. नोधानामक ऋषींनीं इंद्राची अनेक स्तोत्रे रचली. या स्तोत्रांमुळें इंद्र वीर्यशाली झाला. इंद्र हवींचा स्वामी आहे. सोमरूपी हवि त्याला अर्पण करण्यांत येतात. गौतम गोत्रोत्पन्न ऋषींनीं मंत्रमय स्तोत्रें निर्माण केली. या स्तोत्रांमुळें इंद्र तृप्त झाला आणि त्यानें एतश राजाचें रक्षण केलें, यजमान आणि स्तोत्रगायक यांना धन दिलें आणि यज्ञकर्माची प्रतिष्ठा वाढविली. हे इंद्रा, आमच्या रक्षणासाठीं तूं ये आणि अन्य दिवशीं आमचा यज्ञ सफल कर.

३६. काम्यवर्षक, सत्यफलदाता, कर्मप्रेरक आणि सर्व प्राणिमात्रांवर सत्ता चालविणाऱ्या इंद्राची आम्ही स्तोत्रें गाऊन पूजा करतो. आमच्या पूर्वीच्या सात पिढ्यांतील पुरुषांनीं हविरूप अन्न प्रदान करून एक महिन्याच्या काळांत इच्छित फळाची प्राप्ती केली, त्या इंद्राची स्तुती करून आम्ही पितृलोक संपादन केला. इंद्राची आज्ञा कोणीही उल्लंघीत नाहीं. इंद्राजवळ आम्ही, सेवक आणि धन यांची याचना करतो. इंद्र आम्हाला अविनाशी सुख प्रदान करो. पूर्वीच्या काळीं इंद्राची स्तुती करून ज्या सुखाचा लाभ ऋषींनीं करून घेतला तोच लाभ त्याची स्तुती करणाऱ्या आम्हाला मिळो. या सुखासाठीं निश्चित असलेला यज्ञाचा मार्ग कोणता ? त्या यज्ञामध्यें कोणत्या आहुती अर्पण केल्या जातात ? याचे ज्ञान हे इंद्रा, तूं आम्हाला दे. रथांतून गमन करणाऱ्या, आणि वज्र धारण करणाऱ्या इंद्रापर्यंत ज्यांचीं स्तोत्रें पोहोचतात त्या यजमानाला सर्व शत्रु वश होतात. मनाप्रमाणें वेगवान असणाऱ्या वज्रानें मत्त झालेल्या वृत्राचा तूं वध केलास व शत्रूची नगरे उद्ध्वस्त केलीस.

हे इंद्रा, पृथ्वी, द्युलोक आणि अंतरीक्ष यांमध्यें असलेल्या तापदायक राक्षसांना तूं जाळून टाक. ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्या राक्षसांच्या नाशासाठीं पृथ्वीचें तेज वाढव आणि आपल्या उजव्या हातांत वज्र धारण करून या मायावी राक्षसांचा तूं वध कर. संपत्तीचे दान करून तूं मनुष्यांना श्रेष्ठ करतोस म्हणून तूं अत्यंत पूजनीय, यज्ञांत पाचारण करण्यास योग्य आणि बलवंत आहेस. तुझ्या रथाला देव अगर असुर कोणीही रोखूं शकणार नाहीं. तूं त्वरेने या ठिकाणीं ये.

३७. वांकड्या आणि टोंकदार शिंगाच्या बैलांप्रमाणें भीतिप्रद शत्रूला बलप्रेरक करण्यास समर्थ आणि हवि प्रदान न करणाऱ्याचें धन हवि प्रदान करणाऱ्याला देण्यास समर्थ असलेल्या इंद्रा, तूं कुत्साला वांचविण्यासाठीं शुण्डाला शिक्षा केलीस आणि कुवयाचे धन आपल्याकडे खेचून आणलेंस, वीतहव्य आणि सुदास याचे रक्षण केलेस,पुरुकुत्साचा पुत्र त्रयदस्यु आणि पुरु यांचें युद्धाच्या वेळीं रक्षण केलेस आणि मरुद्‌गणांच्या साहाय्यानें दस्यूंचा संहार केलास, दधिती राजाच्या कल्याणासाठीं चुमुरी आणि धुनि नामक दस्यूंचा नाशकेलास, आपल्या बलानें शत्रूंची नगरें छिन्नविच्छिन्न केलीस, वृत्र आणि नमूचीचा संहार केलास आणि तुला हवि प्रदान करणाऱ्या सुदास राजाला चिरकाल टिकणारें धन प्रदान केलेस. हे इंद्रा आम्ही तुझे मित्र आहोत. तुला प्रिय असणाऱ्या यजमानाला तूं प्रसन्न ठेव. जे ऋत्विज तुझ्या कृपेमुळें यज्ञ न करणाऱ्यांचा नाश करतात. तेमंत्रच म्हणतात. त्यानाही तूं फल प्रदान कर. आमची काही पापें असतील तर तूं ती दूर कर. यजमानाचें रक्षण कर. आम्ही प्रदान केलेल्या हवींनी प्रवृद्ध हो आणि आम्हाला पौत्रादिकांच्या संपत्तीसह ऐश्वर्यवान करून आमचें कल्याण कर.

३८. हे इंद्रा, तुझ्या रथाचे घोडे केवळ शब्दांच्या इशाऱ्याबरोबर रथाला जोडले जातात. तुझ्या इच्छेप्रमाणें तें त्वरेने योग्य स्थळीं जातात. या अश्वांच्या साहाय्याने तूं या ठिकाणीं ये. तुझ्यासाठीं पसरून ठेवलेल्या या दर्भासनावर बस आणि केवळ तुझ्यासाठीं संस्कारित केलेला हा सोम प्राशन कर. आम्ही तुला आवाहन करीत आहोंत. मंत्राच्या योगानें इंद्राची पूजा केली जाते. सामगायनानें इंद्राची स्तुती केली जाते आणि

आमची वाणीही त्याची स्तुती करण्यास पुढे सरसावते. वज्रधारी आणि उपासकांचे हित करणाऱ्या इंद्रा, तूं प्रदीर्घ दर्शनासाठीं सूर्याची द्युलोकांत स्थापना केलीस आणि मेघांनाही आपल्या प्रभावानें विदीर्ण केलेंस.

३९. विश्वांतील सर्व प्राणिमात्र इंद्राला आवाहन करतात. सोमपानानें प्रसन्न झालेल्या इंद्रानें मेघांना छिन्न करून पृथ्वीवर जलवर्षाव केला. अंगिरस ऋषींच्या प्रेमासाठीं गुहेत लपवून ठेवलेल्या गायी इंद्राने मुक्त केल्या आणि गायींचे अपहरण करणाऱ्या वलाचा संहार केला. आकाशांत नक्षत्रें चमकतात. समुद्र पाण्यानें भरून जातो. त्याप्रमाणेंच आमच्या स्तोत्रांच्या प्रभावानें इंद्र सोमपानानंतर आनंदित होतो.

४०. विश्वाला अभय प्रदान करणारा इंद्र मरुद्‌गणांच्यासह आनंदानें राहातो. त्या उभयतांचें तेज सारखें आहे. इंद्राच्या इच्छेनें हा यज्ञ संपन्न होतो. इंद्र पापशून्य आणि तेजस्वी आहे. त्याला हवि प्रदान केल्यावर तो यजमानाला पुत्रसंतती प्रदान करतो.

४१. युद्धामध्यें माघार न घेणाऱ्या वृत्रासुराची नव्याण्णव नगरें दधीची ऋषींच्या अस्थीच्या शस्त्रानें इंद्राने उद्‌ध्वस्त केली. पर्वतामध्यें आश्रय घेणाऱ्या अश्वांच्या साहाय्यानें शर्यणावताला विदीर्ण केलें. चंद्र मंडलांत सूर्य रूपानें इंद्र प्रकाशतो.

४२. इंद्राच्या प्रसादानें सत्याला स्पर्श करणारी, अष्टपदान्वित आणि नित्य नवी वाणी मी शरीरांत धारण केली. हे इंद्रा, तू ज्या वेळीं असुरांना नष्ट केलेस त्या वेळी द्यौ आणि पृथ्वी तुझ्यावर संतुष्ट झाली. हे इंद्रा, हा संस्कारित सोम प्राशन करून तूं अन्यत्र जा.

४३. हे इंद्रा, आमच्या शत्रूचा संहार कर. युद्धाचें भय नाहीसें कर आणि आम्हास विनियोगक्षम धन प्रदान कर. ह्याच धनाची अपेक्षा सर्व उपासक करीत असतात. तूं प्रसन्नपणें त्यांना अन्नादि पदार्थ आणि धन दे.

४४. अत्यंत सहनशील, अग्रगण्य, नित्य नूतन आणि पूजनयोग्य अशा मनुष्यस्वामी इंद्राची आम्ही स्तुती करतो. उताराकडे वाहाणारें पाणीं ज्याप्रमाणें समुद्राला मिळतें त्याप्रमाणें कामनेनें केलेलें मंत्रमय यज्ञ इंद्राला प्राप्त होतात. पराक्रमी शत्रूचा नाश करणाऱ्या, स्तुती

करणाऱ्याला धन प्रदान करणाऱ्या आणि सदैव यशवान असणाऱ्या इंद्राला, आम्हाला धन आणि अन्नाची प्राप्ति व्हावी म्हणून, हवि प्रदान करून आम्ही प्रसन्न करीत आहोंत.

४५. गर्भ धारण करण्याची इच्छा असलेल्या कपोतीजवळ ज्याप्रमाणें कपोत जातो त्याप्रमाणें, सहस्रावधि कर्म करणाऱ्या, सत्य-विभूति इंद्राकडे आम्ही केलेली स्तुती जावो. तूं आमचें रक्षण करतोस. अन्य कोणीही आमचें रक्षण करीत नाही म्हणून आम्ही तुझें स्तवन करतो.

४६. रणनेता आणि शत्रूला वश करणारा इंद्र यज्ञ-ज्योतीचा कर्ता आहे. आपल्या कृपारूपी नावेनें आम्हाला पैलपार करून इंद्र आम्हाला आमच्या शत्रूपेक्षांसुद्धां महान करतो आणि आपल्या दहा बोटांनीं आम्हाला अन्नादि ऐश्वर्य प्रदान करतो.

४७. इंद्रानें वृत्राचा संहार केला. त्यामुळें तो प्रशंसनीय सौम्य आणि तेजस्वी झाला. हा इंद्र मनुष्यांना अन्नादि धन देऊन संतुष्ट करतो. वज्राप्रमाणें तो वलशाली आणि अविनाशी आहे. मनुष्याची वाणी आणि सामगायक इंद्राची स्तुती करतात. मंत्रांच्या सहाय्याने इंद्राची पूजा करतात. इंद्राचे अश्व मंत्रांच्या प्रभावानें रथाला जोडले जातात. इंद्र हिरण्यरूप आहे. सूर्य रूपानें तो मेघाचें विदारण करतो. हे इंद्रा, आम्ही तुझ्यासाठीं हा संस्कारित सोम आणला आहे. तूं या विस्तृत कुशासना-वर विराजमान हो आणि सोमपान कर. कारण तुझ्या उपासकांनीं हा सोमयाग संपन्न केला आहे. त्यासाठीं आम्ही तुला आवाहन करीत आहोत. तुझा सारथी रथाच्या दोन्ही बाजूला अश्व जोडतो आणि तुला इच्छित स्थळीं घेऊन जातो. हा सूर्यरूपी इंद्र अज्ञानी लोकांचें अज्ञान दूर करणारा, अंधःकारांत गडप झालेलें पदार्थ उजेडांत आणणारा असून तो आपल्या किरणांसहित उदयाला येत आहे. रात्र संपतांच चोर ज्याप्रमाणें पलायन करतात त्याप्रमाणें सूर्य उदयाला येतांच नक्षत्रें पळून जातात. या सूर्याचे दीप्तिमान किरण अग्नीप्रमाणें तेजस्वी आहेत. भवरूप सागरां-तून तारण करणारी तू नौका आहेस. हे सूर्या, मनुष्य आणि देवतां यांच्यासाठीं तूं उदयाला येतोस आणि सर्वांच्या समोर प्रकाशित होतोस.

पूर्वीच्या पुण्यवान पुरुषांनीं ज्या मार्गाचा अवलंब केला तो मार्ग तुझ्या कृपापथात आहे. तूं सर्वांना कृपादृष्टीनें पाहातोस. दिवस आणि रात्र निर्माण करतोस. आपल्या सप्त किरणरूपी अश्वांनी जातोस. वरुणाला तूं पाहातोस. प्राण्यांचें मागील जन्म पाहातोस आणि स्वतःच्या सामर्थ्यानें संचार करतोस.

४८. वनांत संचार करणारी गाय ज्याप्रमाणें आपल्या वत्साजवळ येते त्याप्रमाणें आमची वाणी समृद्ध होऊन आमच्याकडे येते. लहान मुलाची माता त्याचें रक्षण करण्याच्या निमित्तानें त्याला आपल्या हृदयाशीं कवटाळते त्याप्रमाणें आमची सुंदर स्तोत्रें इंद्राला अलंकृत करतात. हा इंद्र आम्हाला गाईकडून दूध, घृत आणि आयुष्य देववो. सूर्य पूर्वेला उदयास आला आणि त्यानें आपल्या किरणांनीं सर्व जीवांना आच्छादून टाकलें. स्वर्गातील पाणी खेचून आणलें. त्यामुळें वर्षा जलाला अमृत आणि ते खेचून आणणाऱ्याला गाय असें संबोधतात. प्राण अपान यांच्या व्यापारामुळें वायुरूप सूर्य प्राणिमात्राच्या शरीरांत संचार करतो. सूर्याच्या संचारामुळें रात्र, दिवस मुहूर्त निर्माण होतात. आमची वेदरूप वाणी पक्ष्याप्रमाणें त्याचा आश्रय करते.

४९. विद्वान लोक जेव्हां आपल्या समृद्ध वाणीनें स्तुती करतात तेव्हां देवता प्रसन्न होतात. शक्रशिष्ट मनुष्यास कठोर वाणीनें बोलूं नये. हे शक्रा, तूं कठोर वाणीनें बोलूं नकोस. हे यजमाना, हा इंद्र दुःखाचा नाश करणारा आणि सोमपानानें प्रसन्न होणारा आहे. तुझ्या यज्ञातील प्रसन्नतेसाठीं तूं इंद्राची स्तुती कर. सूर्य उदयाला येतांच गाई हंबरतात आणि आपल्या वत्साकडे धावत जातात त्याप्रमाणें आमच्या स्तुतीसहित आम्ही इंद्राकडे जातो. दुर्भिक्ष काळात, कन्दमुळांनीं संपन्न असलेल्या पर्वताची लोक स्तुती करतात त्याप्रमाणें आम्ही गाई आणि अन्य धनाची स्तुती करतो. रुद्राजवळ बलयुक्त अन्न मागतो. ज्या अन्नानें भृगु आणि कण्व ऋषींच्या कुलांत उत्पन्न झालेल्याचें रक्षण झालें त्या धनासाठीं आम्ही प्रार्थना करीत आहोत. ज्या बलानें तूं समुद्र भरून टाकलास तें बल आम्हाला कल्याणकारक फळ प्रदान करतें. याचा महिमा लोकांना माहीत नाहीं.

५०. मर्त्य मनुष्याला ज्यानें आकार दिला, वलवान केलें त्या इंद्राची स्तुती करा. हे इंद्रा, असा कोणता ऋषी आहे की जो तुझी स्तुती करीत नाहीं? सोमपानार्थ तुला आवाहन करीत नाहीं? सत्याची इच्छा धारण करणारें देवसुद्धां तुझी स्तुती करतात.

५१. सहस्रनेत्र, धन आणि अन्न प्रदान करणाऱ्या इंद्राच्या प्राप्ती-साठीं, हे स्तोत्यानों, तुम्ही उत्तमोत्तम स्तोत्रें तयार करा. पर्वतातून पाण्याचा प्रवाह वाहेर पडावा त्याप्रमाणें इंद्राच्या कृपाशैलातून ऐश्वर्याचा प्रवाह वाहेर पडतो आणि यज्ञीय यजमानाकडे जातो. त्या इंद्राची हे स्तोत्यांनों, तुम्ही पूजा करा. अगणित भोग्य पदार्थांमुळें पर्वत ज्याप्रमाणें समृद्ध वनतो त्याप्रमाणें इंद्र सोमपानानें समृद्ध होतो आणि यजमानाचें कल्याण करतो.

५२. हे इंद्रा, आम्ही तुझी स्तोत्रें गात आहोत. ऋत्विज तुला आवाहन करीत आहेत. तहान लागलेल्या वृषभाप्रमाणें सोम प्राशना-साठीं तूं इकडे ये. तुझ्यासाठीं आम्ही सोम तयार केला आहे. तूं महान शत्रूचा पराभव करून त्याच्या धनाचा स्वामी होतोस. आम्ही तुझ्याकडे गवादि धनाची याचना करतो.

५३. हर्षभरित मृग ज्याप्रमाणें मन मानेल त्या ठिकाणीं त्वरेनें जातो त्याप्रमाणें तूं आपल्या रथाच्या सहाय्यानें सर्वत्र संचार करतोस. तुला कोणी अडथळा करीत नाहीं. पति ज्याप्रमाणें वोलावणें करतांच पत्नीकडे जातो त्याप्रमाणें इंद्र आमच्या आवाहनानें आमच्याकडे येवो. हवीच्या सहाय्यानें प्रसन्न होऊन शत्रूची नगरें उद्ध्वस्त करणाऱ्या इंद्राला कोण जाणत नाहीं?

५४. सर्व सेनानी, अत्यंत वलवान आणि शत्रूला मूर्च्छित करणाऱ्या इंद्राला मान देतात. त्याच्या वज्राचें दर्शन होतांच त्याला वंदन करतात. ऋक्व नामक पितरांसहित या वज्राचें भय तुम्हाला व्यथित करणार नाहीं. सोमपान करणाऱ्या इंद्राची स्तोतें स्तुती करीत आहेत.

५५. हे इंद्रा, तूं धनवान्, वज्रधारी, युद्धामध्यें अग्रेसर, वलसंपन्न, स्तुत्य, स्वर्गाधिपति, ज्या वाहूंनीं राक्षसांचा पराभव करतोस त्याच हातांनीं यजमानाला दान देणारा, ऋत्विजांचें कल्याण करणारा आणि

स्तोत्यांना सुबुद्धी देणारा आहेस. तूं ज्या गाई आणि अश्वांना पुष्ट करतोस त्यानां तूं, तुला सोम अर्पण करणाऱ्या यजमानाला देऊन संतुष्ट करतोस.-

५६. सामर्थ्य आणि आनंद यांच्या प्राप्तीसाठीं वृत्राचा वध करणाऱ्या, पोलादी वज्र धारण करणाऱ्या, पृथ्वी आणि अंतरीक्ष यांना व्यापून टाकणाऱ्या आणि प्रसन्न होऊन भक्तांना संपत्ती प्रदान करणाऱ्या इंद्रा, आमच्या शत्रूंचा पराभव करण्यासाठीं आम्ही तुला आवाहन करीत आहोंत. हे शूर इंद्रा, आमचें सामर्थ्य तूं वृद्धिगत कर. अनेक प्रकारची इष्ट समृद्धी तूं आम्हाला प्रदान कर. तुला हवि अर्पण न करणाऱ्या लोकांचें धन तूं अपहरण कर आणि तुझ्या अविनाशी संपत्तीचा कांहीं भाग आम्हास देऊन आम्हाला वैभवसंपन्न कर.

५७. दूध काढण्यापूर्वी गाईला गोंजारणाऱ्या गवळ्याप्रमाणें सुन्दर कृत्ये करणाऱ्या, सोमप्राशक, संपत्तिमान व रक्षक इंद्रा, आम्ही यज्ञार्थ तुला आवाहन करीत आहोत. तूं ये. हा सोम प्राशन कर. तुझ्या जवळचे गुपित आम्हाला सांग. आमच्याखेरीज अन्यांना मात्र ते सांगू नकोस. हे इंद्रा, पंचजनामध्यें गायिले जाणारे तुझे पराक्रम आम्हाला देखील प्रिय आहेत. हविर्द्रव्यांनीं बलसमृद्ध होणाऱ्या, अजेय, आणि वज्र धारण करणाऱ्या इंद्रा, पृथ्वी अगर स्वर्ग लोकांतून तूं आमच्या यज्ञस्थळीं ये. युद्धांत निश्चल उभा राहणारा, लोकद्रष्टा सर्व बाजूंनीं आक्रमण करणाऱ्या शत्रूला पराभूत करणारा इंद्र आमचें पराजयाचें भय नष्ट करो. उत्तम हनुवटी असलेल्या, सोमानें तृप्त होणाऱ्या, शत्रूवर आक्रमण करणाऱ्या, स्तोत्यांनी आवाहन केलेल्या, तेजस्वी आणि बलसंपन्न इंद्रा तूं अन्य कोठेही न जातां आमच्याकडे ये. जलाचा प्रवाह सखल भागाकडे जातो त्याप्रमाणें नम्र होऊन स्तुती करणाऱ्या, वृषभाप्रमाणें गर्जना करणाऱ्या, सर्वगामी, सृष्टीचें निरीक्षण करणाऱ्या, आक्रमक, कण्व ऋषिकुलांत जन्म पावलेल्या स्तोत्यांनीं स्तविलेल्या इंद्रा, तूं आम्हास सुवर्णादि धन प्रदान कर.

५८. सूर्याचे किरण ज्याप्रमाणें सतत सूर्याच्या समवेत राहतात त्याप्रमाणें जलस्वामी इंद्रावरोवर सुद्धां राहतात. इंद्राच्या जलसंपत्तीचीं

वृद्धि व्हावी अशी आमची कामना आहे. इंद्राची स्तुती करणाऱ्यांनों, तुम्ही इंद्राचें हृदय प्रसन्न ठेवा. तो आपल्या उपासकांच्या कामना नेहमीच पूर्ण करतो. हे सूर्यरूपी इंद्रा, तूं सत्यरूप, महान आणि कीर्तिवान आहेस. हे सूर्या, तूं मूळचा मोठा आहेसच परंतु आमच्या हवीनीं तूं आणखी महान हो. राक्षसांचा तूं आपल्या मोठेपणानें पराभव करतोस.

५९. ही वाणी उत्तम स्तोत्रांचे गायन करते, ही वाणी धनप्रदायिनी असून शत्रूवर विजय प्राप्त करणारी आहे. रथ ज्याप्रमाणें स्वामीला इच्छित स्थळी घेऊन जातो त्याप्रमाणें आमची वाणी इंद्रापर्यंत त्याची स्तोत्रें पोहोचविते. कण्व आणि भृगु ऋषींच्या कुळांत उत्पन्न झालेल्या श्रेष्ठांनीं इंद्राला आवडणारी स्तोत्रें तयार केलीं. धाता, अर्यमा, वगैरे ज्याप्रमाणें इंद्राला मिळतात त्याप्रमाणें या स्तोत्यांची बुद्धी इंद्राला जाऊन मिळते. इंद्राला पाप हिंसित करीत नाहीं. इंद्राला सोम प्रदान करणाऱ्या यजमानाचें सामर्थ्य वृद्धिगत होतें. हे स्तोत्यांनों, अर्थरम्य, तेजगर्भ आणि दानकारक यज्ञीय मंत्रांचे पठण करा. त्या योगें तुम्हाला मुक्ती प्राप्त होईल.

६०. हे इंद्रा, तूं वीर आहेस. दुष्कर्म करण्याला तूं अडवतोस. तुझ्याजवळ अपरिमित धन आहे. तूं मला साहाय्य कर. यजमानाला पोषण शक्ती प्रदान कर म्हणजे तो दानशील होईल. तूं अन्नाचा स्वामी आहेस. संस्कारित सोम प्राशनानें तुला आनंद वाटतो. इंद्राची भूमी गाईचे वैभव वाढवणारी आहे. हविदात्या यजमानाचें रक्षण करण्यासाठीं हे इंद्रा, तूं आपल्या सर्व साधनांनीं त्वरेनें ये. तूं सोमपान करीत असतां ऋत्विज स्तोत्रें, उक्थ आणि शंख नामक स्तोत्रगायन करतात.

६१. शत्रूचा पराजय करणाऱ्या, अश्व आणि संपत्तियुक्त अभीष्ट वर्षक इंद्राचें आम्ही पूजन करतो. हे इंद्रा, ज्या सोमप्राशनामुळें ज्या मनाला तूं तेजसंपन्न केलेंस त्याच मनानें यजमानानें या ठिकाणीं पसरलेल्या कुशासनावर विराजमान हो. उक्थ गाणारा तुझा महिमा वर्णन करीत आहे. या स्तुतीनें आम्ही तुला प्रतिष्ठित करतो. ज्या इंद्राच्या मोठेपणामुळेंच द्यौ आणि पृथ्वी, बल, जल, पर्वत धारण करतात त्या इंद्राची पूजा करा. इंद्र सदा विजयी आहे. तो शत्रूचा नाश करतो.

६२. हे इंद्रा, तूं नित्य नवीन आहेस. अन्नाच्या कामनेनें आम्ही तुला आवाहन करतो. तूं आमच्या शत्रूकडे न जातां विजयासहित आमच्याकडे ये. कोणतेही कार्य करतांना आम्ही तुझाच आश्रय घेतो. तूं शत्रूला वश करण्यांत अत्यंत कुशल आहेस. तूं आमचा सखा हो. इंद्रानें आम्हाला गवादि धन प्रदान केलें आहे. अभीष्ट फलही त्यानें प्रदान केले आहे. इंद्र मानवांचा रक्षक आहे. सर्वांचा नियंत्रक आहे. त्याच्या रथाला हरित्‌वर्णाचे अश्व जोडलेले आहेत. हे स्तोत्यांनों, तुम्ही इंद्राची स्तुती करा. स्वर्गांतील देवता व आकाशांत संचार करणारा सूर्य, इंद्रा-मुळेंच तेजोवान झाले आहेत. आकाश, पृथ्वी, जल, पर्वत, वज्र, बल आणि स्वर्ग यांवर इंद्राचें वर्चस्व आहे. हे इंद्रा, तूं एकटा शत्रूला पराभूत करून विजयी होतोस. त्या विजयानें तुझें तेज वृद्धिगत होवो.

६३. हा इंद्र, आदित्यासहित येऊन आमचा यज्ञ, देह आणि प्रजा बलसंपन्न करो. देवत्वाच्या रक्षणासाठीं ज्या देवतांनी राक्षसांचा संहार केला, तो इंद्र आदित्य आणि मरुत् यांच्यासह आमचें रक्षण करणारा होवो. जो आपल्या सामर्थ्यानें सूर्याला दीप्तिवान करतो, पृथ्वीला अन्नवती करतो, वीरश्रींची प्रतिष्ठापना करतो हविर्दात्या यजमानाला धनवान करतो, अयाज्ञिकांना आपल्यापासून दूर ठेवतो, तो इंद्र, त्याची स्तुती करणाऱ्या पुरुषाला बलवान करो. जो इंद्र आपल्या बलानें असुरांचा विध्वंस करतो त्या बलानेंच दशग्न, अध्रिगु व स्वर्णर यांचे रक्षण करतो. ज्या बलानें इंद्र समुद्राला जलसमृद्ध करतो ते बल हे इंद्रा, तूं आम्हाला प्रदान कर. ज्या बलाच्या साहाय्यानें तूं पाण्याला प्रवाहित केलेंस आणि समुद्राला गमनशील केलेंस त्या बलानें तूं आम्हाला अमृताच्या मार्गावर आणून अग्रेसर कर.

६४. हे इंद्रा, तूं स्वर्गाप्रमाणें पवित्र आणि विशाल आहेस. आमचा तूं प्रेमानें स्वीकार कर. पृथ्वी आणि आकाश या दोन्ही ठिकाणीं तूं संचार करतोस.तूं स्वर्गाचा अधिपति असून सोम देणाऱ्यांचे मंगल करणारा आहेस. हे अध्वर्यूंनों, असुरांचा संहार करणाऱ्या इंद्राची मधुर शब्दांनी स्तुती करा. हे इंद्रा, तुझ्याइतकें मोठें यश अन्य कोणालाही प्राप्त होत नाही. आम्ही अन्नाच्या इच्छेनें, अन्नाचा ईश्वर असलेल्या इंद्राला आवाहन करीत

आहेत. यथासांग केलेल्या यज्ञादि क्रियांनीं इंद्राची वृद्धि होते.

६५. सर्व कर्मांची प्रेरणा देणाऱ्या, तेजस्वी, दर्शनीय, वाणीरूपी गाईला अडथळा न आणणाऱ्या इंद्राची, तो या ठिकाणीं यावा म्हणून मधापेक्षांही मधुर वाणीनें स्तुती करा. हा इंद्र वीर्यवान, दीप्तिमान आणि कार्यसाधक आहे.

६६. हे ऋत्विजांनों, आपल्या अश्वांना विश्रांतीसाठी मुक्त करून जो इंद्र या यज्ञस्थानीं बसला आहे त्याची या यजमानाच्या मांगल्या-साठीं स्तुती करा. आदित्य ज्याप्रमाणें आपल्या परिसराला जाणतो त्याप्रमाणे सदा तरुण आणि मेधावान इंद्र आपल्या सेवकांना जाणतो.

६७. सोमरस निष्पादक, आपला शत्रू आणि देवतांचे शत्रू यांचा पराभव करतो आणि विविध सांसारिक पदार्थांची दानासाठीं प्राप्ती करतो. हे मरुतांनों, तुम्हाला ताप देणारें तेज आम्हाला त्रास न देवो. तुमचे अविनाशी बल आमच्यामध्यें प्रस्थापित करा. अग्नि, उत्पन्न झालेल्या वस्तूंचा ज्ञाता, धनप्रदायक, देव, होता आणि बलवान आहे. आपल्या ज्वालांनी तो यज्ञ सुशोभित करतो. घृताहुतीची तो प्रतीक्षा करतो. हे मरुतांनो, तुम्ही साधकांना स्वर्गाला नेणारे आहांत. पृषती नामक अश्वांच्या साह्याय्यानें तुम्ही यज्ञामध्यें आगमन करतां. या कुशासनावर विराजमान होऊन तुम्ही हा सोम प्राशन करा. हे अग्ने, देवतांना तूं या यज्ञामध्यें घेऊन ये. तूं होता रूपाने त्यांचें पूजन करून याचा हविर्भाग त्यांना प्रदान कर आणि हा सोम प्राशन करून तृप्त हो. हे इंद्रा, हा सोम तुझ्या बलाची आणि तेजाची वृद्धि करणारा आहे. तुझ्यासाठीं तो तयार करण्यांत आला असून पात्रांत ठेवला आहे. आम्ही तुला आवाहन करतो. तुला दिलेला हा हवि ऐश्वर्य निर्माण करणारा आहे.

६८. दूध काढणाऱ्याला यजमान ज्याप्रमाणें पाचारण करतो त्याप्रमाणें आमच्या रक्षणासाठीं आम्ही इंद्राला वारंवार पाचारण करतो. हा इंद्र, ऐश्वर्यवान, आनन्दी आणि गोधन प्रदान करणारा आहे. हे इंद्रा, दिवसाच्या तीनही सवनाच्या वेळीं तूं या ठिकाणीं येऊन सोम प्राशन कर. आमची निंदा करणाऱ्यांना तूं थांबव. तुला कोणीही हिंसित करू शकत नाहीं. इंद्र मित्रांचे मंगल करतो. हे स्तोत्यांनों, तुम्ही इंद्राचा

आश्रय करा. आम्हाला इंद्र यशस्वी करो. इंद्राच्या कृपेने आम्ही शेती-मध्यें संपन्न होवो. हा इंद्र सर्व मनुष्यांना आनन्दित करतो. सुखानें प्रसन्न करतो. यज्ञाची शोभा वाढवितो. हे इंद्रा, तूं सोमपान करून आमचें रक्षण कर. तूं शेंकडो कार्य करणारा आहेस. मी आहुतीच्या साहाय्यानें तुला तृप्त करतो. आम्ही धनप्राप्तीसाठीं यज्ञ करतो. इंद्र धनाचा स्वामी आहे. धनाचा तो पालक आहे. हे स्तोत्यानों, तुम्ही इंद्राची स्तुती करा. हे इंद्रा, तूं या ठिकाणीं येऊन विराजमान हो. हे स्तोत्यांनों, इंद्र अत्यंत विशाल आहे. त्याची स्तुती करा.

६९. आम्ही ज्या वेळीं चितायुक्त होतो तेव्हां इंद्र आमच्या समोर अन्नासहित उपस्थित होतो. या इंद्राला आणि त्याच्या अश्वांना कोणीही वेढूं शकत नाहीं. हा दहीयुक्त सोम पवित्र आहे. इंद्रानें तो प्यावा म्हणून आम्ही त्याला तो अर्पण करतो. हे इंद्रा, तूं सोम प्राशनासाठीं त्वरेनें ये. आमची स्तुती तूं ऐक. ज्या इंद्रानें सहस्रावधि पराक्रम केले तो यज्ञाचें रक्षण करणारा आहे. आम्ही इंद्राचे सेवक आहोत. हे इंद्रा, आमच्या देहाची हिंसा करण्याचा विचार करूं नकोस. आमच्या नाशाचें कारण दूर कर. इंद्राच्या रथाला हरिदाश्व जोडले जातात. ते आकाश मार्गानें जातात आणि सर्व स्थावर-जंगम वस्तु ओलांडून जातात. मृत-धर्म्य मनुष्यांनों, अज्ञानी माणसाला ज्ञान देण्यासाठी व अंधारांत लपून राहिलेल्या पदार्थांना उजेडांत आणण्यासाठीं सहस्र किरणांसहित हा सूर्य उदयाला आला आहे. त्याचे दर्शन घ्या. हे मरुद्गण, हवि प्रदान करणाऱ्यांच्या उदरीं यज्ञीय नामानें येतात.

७०. उषेच्या नंतर अंधारांत कोंडलेल्या गायींची सुटका करणाऱ्या महान सामर्थ्यवान इंद्राची स्तुती करा. हे इंद्रा, तूं नेहमी मरुतांबरोबर जांतोस. त्यांच्याबरोबर असलास म्हणजे तूं प्रसन्न असतोस. तुमचें तेजही एकच आहे. तुझी इच्छा करणाऱ्यांचे यज्ञ मंगलप्रद होतात. ज्योतिर्मान स्वर्गाचा स्वामी असलेल्या इंद्राशीं आमच्या स्तुती एकरूप होतात. इंद्र, आकाशांत, पृथ्वीवर किंवा स्वर्गांत असला तरी आम्ही त्याला आवाहन करतो. यजमान इंद्राची पूजा करतात व स्तोते त्यांची स्तोत्रें गातात. मनुष्यांचें हित साधणारा इंद्र वज्र धारण करतो. याच इंद्रानें जगाला

सूर्याचें दर्शन प्रदीर्घकाल व्हावें म्हणून त्याला उत्पन्न केला. इंद्रानें युद्धामध्यें साधक वीरांचें रक्षण केलें. वृत्राला ठार करणाऱ्या इंद्राला आम्ही पाचारण करतो. कारण तो इष्ट फलवर्षक आहे. हे इंद्रा, कृषि संपादन करणाऱ्या शक्तीनें तूं फळें निर्माण करतोस. तुझा कोणीही तिरस्कार करीत नाहीं. हे इंद्रा, तूं सर्व ऐश्वर्यांचा स्वामी आहेस. तुझें अन्य कोणी प्राणि ध्यान करीत असतील तर त्यांनाही आम्ही बोलावतो. तूं आमच्या बलाचें रक्षण कर. शत्रूवर आम्हाला विजय प्राप्त करतां येईल असें कर. आमचे वीर सुरक्षित राहोत. त्यांच्या साहाय्यानें आमच्यावर आक्रमण करणाऱ्यांना आम्ही थोपवून ठेवूं.

७१. इंद्र महान आहे. त्याचा पराक्रम आकाशाप्रमाणें विशाल आहे. सोमप्राशन करणाऱ्या इंद्राचें उदर समुद्राप्रमाणें भरून जातें. यज्ञ करणाऱ्या यजमानांचें रक्षण करणारा, गायींची वृद्धि करणारी पृथ्वी आणि यज्ञासाठीं समिधा देणाऱ्या वृक्षशाखांना वृद्धिंगत करणारा, सोमपानाच्या वेळीं सामगायन ऐकणारा, सोमानें हर्षभरित होणारा, आणि दीप्तिमान इंद्र मनुष्यांचा हितैषी आहे. द्वेष करणाऱ्या स्त्रिया, वीर्यवान पुरुषाचासुद्धां ज्या प्रमाणें त्याग करतात त्याप्रमाणें आमची स्तोत्रें तुझा त्याग करणार नाहींत. हे सत्तावान आणि धनवान इंद्रा, आम्हाला ऐश्वर्यप्राप्तीची प्रेरणा दे. गोधन, हविसंपन्न यज्ञ, आम्हाला प्रदान कर आणि आम्हाला क्षीणायु: करूं नकोस. आम्ही धनपति, वसुपति, ऋग्प्रिय आणि यज्ञप्रिय इंद्राची पूजा करतो. इंद्रासाठीं न्योकसांत सोम पुन्हा पुन्हा निर्माण केला जातो. शत्रूसुद्धां इंद्राच्या बलाची प्रशंसा करतो.

७२. समृद्ध जलवर्षावाची याचना करणाऱ्या, विविध स्वर्गैश्वर्याची याचना करणाऱ्या, सर्व सवनामध्यें तुला आवाहन करणाऱ्या, नौकेप्रमाणें अन्नाच्या योगें रक्षणाची इच्छा करणाऱ्या आमची इंद्र कामनापूर्ती करतो. अन्नाची इच्छा करणाऱ्या दांपत्याला गाईंचें दान करण्याचे वेळीं तुझें त्यांच्यावर लक्ष असतें. ते तुझ्याजवळ फलयाचना करीत असतात. स्वर्गाला जाणाऱ्यांचें ज्ञान तुला आहे. सूर्याच्या आगमनाची सूचना देणारी उषा स्वर्गप्राप्तीसाठी हविर्दानाची प्रेरणा देते. तूं युद्धाची

इच्छा करणाऱ्या शत्रूच्या संहारासाठीं वज्र धारण करतोस. तूं आम्ही रचलेली नवीन स्तोत्रें श्रवण कर.

७३. हे इंद्रा, सर्व सवनें आणि यज्ञ तुझ्यासाठींच संपन्न केले जातात. त्या वेळीं म्हणण्यांत येणारे मंत्र तुझ्यासाठींच म्हणण्यांत येतात. सर्व लोक तुलाच आवाहन करतात. हे इंद्रा, तूं उग्र आहेस. तुझें दर्शन, वीर्य, महिमा अन्य कोणाला प्राप्त होत नाहीं. हे यजनकर्त्यांनों, हवींच्या योगें तुम्हीं इंद्राला तृप्त करा. तो तुम्हाला अभीष्ट फलांनीं संपन्न करील. सोम तयार होतांच हरिदाश्व जोडलेल्या रथानें इंद्र आमच्या यज्ञांत प्रवेश करतो. या रसानें आपल्या मिशा ओल्या करणारी पर्जन्यवृष्टि करतो. जो इंद्र दुष्कर्म करणाऱ्यांचा संहार करतो, विकृत वाणीच्या लोकांची वाणी मधुर करतो, पित्यासमान सर्वांवर प्रेम करतो त्या इंद्राच्या पराक्रमाची आम्ही स्तुती करतो.

७४. हे सोमपायी इंद्रा, आमच्या हजारो गाई आणि अश्वांना अमृतत्व प्रदान कर. कारण तूं अमृतत्वाचा स्वामी आहेस. हे धनपति इंद्रा, तूं शत्रूचा संहार करण्यास समर्थ आहेस. त्या सामर्थ्यानें आमच्या गाई आणि अश्व यांना संपन्न कर. आम्हाला सुखनिद्रा दे. आमच्या गाईंना आणि अश्वांनादेखील शांत निद्रा दे. हे धनेंद्रा, तूं आमचें घर, गाई आणि अश्वांनीं भरून टाक. शत्रूच्या बाबतींत आम्हाला जागृत ठेव. पापवृत्तीच्या राक्षसांना तूं ठार मार.

७५. स्वर्गाला जाण्याच्या इच्छेनें गोप्रदान करणारें दांपत्य इंद्राला आकर्षित करून घेते. शरद् ऋतूमध्यें निर्माण होणाऱ्या वस्तूंच्या रूपानें इंद्र स्वतः प्रकट होऊन शत्रूला ताप देतो. मनुष्यमात्रांना त्याचा प्रभाव माहीत आहे. ते इंद्राची पूजा करतात. जे लोक पूजा करून इंद्राचा गौरव करीत नाहींत त्यांना इंद्र शासन करतो. हे उदकांनों, तुम्ही आमच्या वीर्याचे संरक्षण करतां. तुम्ही नदीचा आश्रय करून राहातां. आम्हाला स्नानानें पवित्र करा आणि शुद्ध अन्न प्रदान करा.

७६. हा इंद्र मनुष्यांमध्यें श्रेष्ठ, सोम प्राप्त करणारा, वीरश्रेष्ठ, सत्याश्रयी आणि अश्विनीकुमारांनीं श्रेष्ठ मानलेला आहे. इंद्र उषेला ओलांडून जातो. पूर्वीच्या ऋषींनीं अशा अनेक उषा पाहिल्या. कुत्स

ऋषीनीं संसाररूपी रथाला अन्नसमृद्ध केलें. हे इंद्रा, तूं आम्हाला कोणता स्तोम अगर अश्व देणार आहेस? त्यांच्यावरोवर तूं ये. हवि प्रदान करून मी तुला तृप्त करीन. हे इंद्रा, तुझ्या आश्रयानें राहाणाऱ्या लोकांना तूं कसें प्रज्ञावंत करतोस. सर्वांचा सखा म्हणून तूं सर्वांना सुखी करतोस. तूं महान कीर्तिवंत आहेस. घृतयुक्त सोम तुला प्रिय वाटतो. त्या मधुर रसानें ही पात्रें भरून ठेविली आहेत. इंद्रा, तूं पृथ्वीवर पदार्पण करतोस. असंख्य वीर सख्य भावानें तुला वन्दन करतात. तूं आम्हाला कल्याणमयी बुद्धी प्रदान कर.

७७. इंद्राचे घोडे आमच्या दिशेनें येवोत. सत्यनिष्ठ, धनस्वामी व सोमपायी इंद्र या ठिकाणीं आगमन करो. विद्वान लोक इंद्राची स्तुती करण्यासाठीं शुचिर्भूत होतात. उशनाचार्यांप्रमाणें ते उक्थाचें उच्चारण करतात. इंद्र सर्व फलांचा वर्षाव करणारा आहे. जल वर्षावानें तो पृथ्वीला प्रसन्न करतो. या ठिकाणीं ऋत्विज यज्ञ करीत आहेत. सात स्तोते इंद्राची स्तुती गात आहेत. ज्या मंत्राच्या प्रभावानें स्वर्गाचें ज्ञान होतें, ज्या मंत्रानें सूर्य स्वतः प्रकाशवंत होतो, ज्या मंत्राच्या योगानें सूर्य फार दूरचा अंधःकार नाहीसा करतो त्या मंत्रानें इंद्र वलवान होतो. स्वतःच्या इच्छेनें आकाशांत संचार करणाऱ्या मेघांतून इंद्रानें जलवृष्टी केली. इंद्र आपल्या वज्राच्या शब्दाने पर्वतांचा भेद करतो तर पृथ्वीचें संरक्षण करतो व समुद्राचें पालन करतो. हे इंद्रा, वलमुळें तूं पृथ्वीचा स्वामी झाला आहेस. तुला अनेक यज्ञकर्ते आवाहन करतात. तूं जे जल प्रकट करतोस ते पाणी प्रवाहित होऊन वाहूं लागतें. तूं आम्हाला प्रसन्नपणें अन्न प्रदान करतोस.

७८. सोम संस्कारित होतांच हे स्तोत्यांनों, तुम्ही इंद्राची स्तुती करा. तो गाईंप्रमाणें सर्वांचें कल्याण करणारा आहे. इंद्रानें जर आमची स्तुती श्रवण केली तर तो गाईंसह संपन्न अन्न आम्हाला प्रदान करील. हे वृत्राला ठार करणाऱ्या इंद्रा, तूं आम्हाला समृद्ध कर.

७९. पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राच्या कामना पूर्ण करतो आणि त्याला प्रिय वाटणारी अभीष्ट वस्तू प्रदान करतो त्याप्रमाणें या संसारांत

अ...२६

लागणाऱ्या आणि आम्हाला इच्छा असणाऱ्या पदार्थांचें दान आम्हाला इंद्र करो. हे इंद्रा, आधिव्याधी आमच्यावर आक्रमण न करोत. आम्ही तुझ्या कृपेनें सर्वांच्या समवेत सुखी राहूं.

८०. हे इंद्रा, तूं आपल्या संपन्न तेजानें आम्हाला तेजोवान कर. वज्र धारण करणाऱ्या इंद्रा, तूं पृथ्वीला ज्यायोगें संपन्न करतोस तें धन तूं आम्हाला प्रदान कर. इंद्रा, तूं उग्र आहेस. भयाच्या कारणापासून तूं आम्हाला सतत दूर ठेव. ज्या बलानें शत्रु वश होईल असें बल तूं आम्हाला दे. आम्ही तुला आवाहन करीत आहोत.

८१. शेकडो आकाश आणि पृथ्वी इंद्राची बरोबरी करूं शकणार नाहींत. त्याच्याप्रमाणें बलसमृद्ध होऊं शकणार नाहींत. हे इंद्रा, आपल्या संरक्षण साधनांसहित आमचें रक्षण करून तूं आमचा महिमा वृद्धिंगत कर.

८२. हे इंद्रा, तुझ्यासारखें सामर्थ्य आणि सत्ता मला प्राप्त होऊं दे. मी धन प्रदान करणारा होवो. पापाचा आश्रय माझ्याकडून न होवो. मला इच्छा होईल त्या ठिकाणाहून उत्कृष्ट धनाची प्राप्ती होऊं दे. अशा प्रकारचें सामर्थ्य देणारा तुझ्याशिवाय कोण आहे ?

८३. हे इंद्रा, मला मंगलकारी घर प्रदान कर आणि हिंसात्मक शक्ती आमच्यापासून दूर कर. तूं ज्या बलानें शत्रूला संतप्त करतोस त्या बलानें आमचें रक्षण कर.

८४. चित्रविचित्र वर्णानें शोभणाऱ्या इंद्रा, तुझ्यासाठीं संस्कारित केलेला हा सोमरस प्राशन करण्यासाठीं तूं आमच्या यज्ञस्थानीं ये. सोम तयार करणाऱ्या विप्रांच्या आवाहनाचा आदर करून यज्ञस्थानीं येणाऱ्या इंद्रा, आम्ही तुला बुद्धीपूर्वक पाचारण केलें आहे. आपल्या हरित्‌वर्ण अश्वांच्या साहाय्यानें तूं या ठिकाणी ये. आमची स्तोत्रें श्रवण कर आणि प्रदान केलेला हवि भक्षण कर. हे इंद्रा, तूं त्वरेनें ये. तुझ्यासाठीं आम्ही हा सोम तयार, ठेवला आहे. हे प्रज्ञावंत ब्राह्मण तुला श्रेष्ठमानतात. मंत्रज्ञ विप्रांनों तुम्ही जवळ या. इंद्रा, तुझे अश्व, आमच्या स्तोत्रांच्या दिशेनें तुला घेऊन येवोत. आमचा हा संस्कारित सोम या ठिकाणीं आहे. तूं या ठिकाणीं येऊन थांब.

८५. सोमाचें हवन करणाऱ्या ऋत्विजानों, तुम्ही इंद्राशिवाय अन्य कोणत्याही देवतेची स्तुती करूं नका अगर दुसऱ्या कोणाची स्तोत्रेंदेखील गाऊ नका. तुम्ही इंद्राची स्तुती करा. वृषभाप्रमाणें स्वच्छंदपणें संचार करणारा, लोकपालक आणि शत्रुद्वेषी इंद्राला आम्ही आमच्या संरक्षणा-साठीं आवाहन करतो. हे इंद्रा, तूं त्वरेनें ये. विशाल अंतःकरण धारण कर. विद्वान लोक आणि यजमानाला, समृद्ध करणारें अन्न प्रदान कर.

८६. हे ज्ञानवान आणि विद्वान इंद्रा, युद्धामध्यें सहाय्य करणारें तुझे अश्वद्वय सुवर्णवर्णीय आहेत. प्रवास सुखमय करणाऱ्या रथास ते जोडले आहेत. त्यांच्या सहाय्यानें तूं सोमप्राशनार्थ आमच्या यज्ञस्थळीं ये.

८७. हे अध्वर्यूंनो, पृथ्वीवर जलवर्षाव करणाऱ्या, सोमाची इच्छा करणाऱ्या आणि पृथ्वीवर पदार्पण करणाऱ्या इंद्राला हे अध्वर्यूंनों, सोमाची आहुती अर्पण करा. इंद्रा, तूं आकाशांतसुद्धां अन्न धारण करतोस आणि ज्या ठिकाणीं यज्ञ असेल त्या ठिकाणीं सोमपानासाठीं जातोस. हे इंद्रा, तूं या सर्वांचें रक्षण कर. तूं प्रगट होतांच सोमाची इच्छा करतोस. संग्रामांत तूं धन जिंकून घेतोस आणि तें धन देवांना देतोस. तूं अंतरीक्षांत संचार करतोस. आपल्या वलानें संग्रामांत विजयी होतोस. हे इंद्रा, मी तुझ्या पूर्वीच्या पराक्रमाचें वर्णन करतो. मायावी राक्षसांना ठार केल्यामुळें तुला सोम प्राप्त झाला. हे पशुधन तुझें आहे. तूं त्याचे पालन करतोस. सूर्यरूपी नेत्रांनीं तूं पाहातोस. आपल्या उपासकाला फलसमृद्ध करतोस. हे बृहस्पते आणि इंद्रा, तुम्ही दोघेही पार्थिव धनाचे स्वामी आहांत. तुम्ही आपल्या शक्तीनें आमचें संरक्षण करा.

८८. ज्या बृहस्पतीनें आपल्या घोषानें पृथ्वीला स्तंभित केलें त्या बृहस्पतीचें पुरातन ऋषी वारंवार ध्यान करतात. बृहस्पतीची वाणी प्रसन्न आहे. प्रज्ञावंत लोक बृहस्पतीला पहिला मान देतात. जे ऋत्विज या बृहस्पतीला आपल्याकडे आकर्षित करून घेतात त्या अहिंसित व घृत-संपन्न ऋत्विजांचें हे बृहस्पते तूं रक्षण कर. हे बृहस्पते, हे सर्व ऋत्विज पर्वत सान्निध्यांत, घृत, मध वगैरे हविर्द्रव्यानीं यजन करीत आहेत. तुझ्यामुळें त्यांना प्रेरणा प्राप्त होते. हे बृहस्पते, आम्ही तुझ्यापासून

वीर्यवान आणि निरोगी संततीची इच्छा करतो. तुला आम्ही हवि अर्पण करून पूजा करतो.

८९. हे प्रज्ञावंतानों, मंत्ररूप आणि पवित्र वाणीनें तुम्ही इंद्राची स्तुती करा. तुमच्या मित्ररूप वाणीनें शत्रूला क्षीण करणाऱ्या इंद्राला तुम्ही आवाहन करा. शुद्ध सोमरस त्याच्यासाठीं तयार ठेवा. हे इंद्रा, तूं आम्हाला शत्रूप्रमाणें क्षीण करूं नकोस. मला धनसमृद्धि प्रदान कर. माझी बुद्धी कर्मानुसारिणी कर. जो कोणी तुला बोलावतो, तुला हवि अर्पण करतो, तुझ्या सख्यत्वाची इच्छा करतो, जो तुझ्यासाठीं सोम संस्कारित करतो, जो सर्वांचें अभीष्ट करतो, प्रज्ञावंत ज्याची नेहमी प्रशंसा करतात, जो तुला सदैव वंदन करतो त्याला तूं संरक्षण प्रदान करतोस. धनप्रतिष्ठित करतोस. ज्या इंद्रा जवळ सोम गमन करतो, जो असीम धन प्रदान करतो, जो इंद्र द्यूतामध्येंदेखील विजय प्राप्त करून देतो तो इंद्र दरिद्रयापासून यजमानाचें रक्षण करून त्याला भरपूर धन प्रदान करतो. जो शत्रू आमच्या वधरूप पापाची इच्छा करतो त्याचें त्या पापापासून रक्षण कर. बृहस्पती त्याला सर्व मित्रपरिवारांमध्यें श्रेष्ठ बनवतो.

९०. सर्वप्रथम जन्मास आलेला, मेघांना भेदणारा, सत्याचरणी अंगिरस बृहस्पती हवि प्राप्त करण्यास योग्य आहे. पृथ्वी आणि आकाश यांना नादानें भरून टाकणारा, वर्षा करणारा, पशूंवर विजय प्राप्त करणारा, सेनेची इच्छा करणारा, बृहस्पती सर्वत्र विजय प्राप्त करतो. तो जल प्रदान करण्यासाठीं स्वर्गात पदार्पण करतो आणि मंत्रांनीं शत्रूला नष्ट करतो.

९१. बृहस्पतीनें सत्याच्या प्रभावाने सप्तशीर्षा बुद्धी उत्पन्न केली. विश्वाच्या पसाऱ्यांत निर्माण झालेल्या अस्यास्थानें इंद्राला सांगून तुरीयाला जन्म दिला. सत्यवीर्यापासून उत्पन्न झालेल्या अंगिरा ऋषीला यज्ञांतील प्रथम स्थान दिलें जातें. मेघांचें विदारण करणारा बृहस्पती महान असल्याचें प्रत्ययाला येतें. अंधारांत प्रकाश पसरविणारा हा बृहस्पतीं महान आहे. तो समुद्राचा त्याग करीत नाहीं. आकाशांत संचार करणाऱ्या बृहस्पतीला उषा, सूर्य, मंत्र व गाय यांचें साहाय्य लाभतें. मेघ

हे कामधेनूचे पालक आहेत. इंद्र त्यांना छिन्न करतो. आपणास दहयाची प्राप्ती व्हावी म्हणून गाईच्या प्राप्तीसाठीं पणींना त्यानें शिक्षा केली. मेघ पृथ्वीला जलरूपी धन प्रदान करतात. इंद्र आणि बृहस्पती त्यांना प्रेरणा देतात. हे मेघ गाई आणि बैल यांच्याकडे जाण्याची इच्छा करतात. युद्धामध्यें सिंहाप्रमाणें गर्जना करणारा बृहस्पती आमच्या स्तुतीने प्रसन्न होतो. जेव्हां हें विश्व आकाशरूपी भवनाचा आश्रय करून अन्न प्रदान करतें तेव्हां ज्योति-रूपानें बृहस्पतीला प्रवृद्ध करतें. हे बृहस्पते, अग्नीला समृद्ध करणाऱ्या ऋचा श्रवण कर. हे आकाश आणि पृथ्वी आमची पोषणकर्ती आहेत.

९२. आपल्या सत्यनिष्ठ उपासकांचें रक्षण करणाऱ्या आणि गोधनाचा अधिपती असलेल्या इंद्राच्या जवळ जातां येईल या प्रमाणें हे ऋत्विजांनों, तुम्ही इंद्राचे पूजन करा. गाई ज्या वेळीं इंद्रासाठीं दूध देतात त्या वेळीं इंद्राला मधुर सोमाची प्राप्ती होते. वध्न्याच्या गृहरूपी स्वर्गामध्यें आम्ही इंद्रासह पदार्पण करूं. त्यानें एकवीस वेळां मधुर रसाचें सेवन करून इंद्राची मैत्री संपादन केली. हे स्तोत्यांनों इंद्राची उत्तम प्रकारें पूजा करा. या गाईंच्यामध्यें जो अविनाशी गुण-पदार्थ आहे त्याची इंद्राला सोमाबरोबर प्राप्ती होते. या पदार्थीचें सेवन अग्नि, इंद्र आणि विश्वेदेव यानीं पूर्वी केलें. हे वरुणा, तुझ्यापासून वर्षयन्ती, अम्रपत्नी, अश्वा, मेघपत्नी, त्रितुला आणि असन्धा या नद्या निघून आपल्या तरंगासहित सागराकडे गमन करीत आहेत. हे स्तोत्यांनो द्रुतगामी, भक्तगामी, दुष्टनाशक, नेतृत्वकुशल आणि देवश्रेष्ठ इंद्राचें रूप तुम्ही पाहा. सळसळणाऱ्या मेघांना छिन्न करणारा, गर्जनाकारी, शत्रूला उद्ध्वस्त करून त्यांना तुच्छ लेखणारा, पुष्ट, राजकुमार सदृश, पराक्रमी, शिरस्त्राणधारी सुवर्णरथावर आरूढ झालेला, गृहपती आणि स्वयंप्रकाशी इंद्राला स्तोत्रें आणि हवि अर्पण करणाऱ्या भक्तांना इंद्राचें भरपूर धन प्राप्त होतें. दर्भ तोडणारे, दानशूर आणि हवि प्रदान करणारे ऋषी इंद्राच्या प्राचीन निवासस्थानाचा आश्रय करीत आहेत. अप्रतिहत संचार करणाऱ्या सेनारक्षक, लोकाधिपती, रथारूढ व वृत्रहन् इंद्राचें मी स्तवन करतो. हे पुरुहन्मन ऋषे, सूर्याप्रमाणें शत्रूचा नाश करणारा, रौद्र आणि शांत

रूपें धारण करणाऱ्या आणि सर्वांचा आधार असणाऱ्या इंद्राला आह्वन कर. यज्ञामुळें इंद्र बलसंपन्न आणि अतुलनीय होतो. भक्त इंद्राची स्तुती करतात. हे वज्रधारी इंद्रा अनेक सूर्यांचें तेज तुझ्या तुलनेला पुरणार नाहीं. हे उदार, पराक्रमी आणि बलिष्ठ इंद्रा, आमच्या गोठ्यांचें तूं संरक्षण कर.

९३. वज्र धारण करणाऱ्या इंद्रा, आमची स्तुती तुला आनंदित करो. प्रज्ञावंतांचा द्वेष करणाऱ्यांना तूं नष्ट कर. पणींचें धन हिरावून घे आणि त्यांना ठार कर. तुला कोणीही प्रतिस्पर्धी नाहीं. हे इंद्रा, तूं संस्कारित सोम आणि मनुष्यांचा स्वामी आहेस. जलाची इच्छा करणारी आणि वीर्याची वृद्धी करणारी औषधी इंद्राची स्तुती करतात. हे इंद्रा, तूं आपल्या वर्षक सामर्थ्यासह आणि महान तेजासहित या ठिकाणीं आला आहेस. तूं अंतरीक्षांत संचार करणारा आहेस. तुला प्रिय वाटणाऱ्या मंत्राच्या साहाय्यानें आपलें वज्र धारण करतोस. सर्व उत्पन्न झालेल्या पदार्थांना तूं बलसंपन्न करतोस म्हणून तुला सर्व शक्तींचा स्वामी म्हणून गौरवितात.

९४. धनस्वामी, जलदगतीनें प्रवास करणारा आणि सदा हर्षपूर्ण असणारा इंद्र आपल्या शक्तीनें शत्रूला पराभूत करतो. हे इंद्रा, तुझ्या हातांत असलेले वज्र, तुझ्या रथाचे अश्व, स्वर्गाला जाणारा सुन्दर मार्ग व सोमपानाची इच्छा तुझ्या स्वाधीन आहे. सत्यानें बलवान झालेला इंद्र शत्रूचा संहार करतो. भक्तांना अभय देणाऱ्या धनदात्या इंद्रा, तूं आमच्या यज्ञस्थानीं विराजमान हो. देवलोकगामी, देवस्तोते कीर्तिवंत होतात. यज्ञरूपी नौकेचा आश्रय न करणारा पापी होऊन ऋणपंकांत बुडतो. द्यौ आणि पृथ्वीला बल प्रदान करणारा, धनवान, स्तुत्य आणि सोमप्रिय इंद्र भाषण करीत आहे. हे इंद्रा, दारिद्र्यप्राप्त दुर्बुद्धीपासून तूं आमचें रक्षण कर. आम्हास, धेनु-वृषभ, क्षुधाशामक गहू आणि धन जिंकण्याचें बल प्रदान कर. ऊर्ध्व, पश्चिम, अध आणि उत्तर दिशांकडील शत्रूंपासून बृहस्पती आणि पूर्व व मध्य दिशांकडील शत्रूपासून इंद्र आमचें संरक्षण करो.

९५. त्रिमद्रुक सोमयागामध्यें सोम प्राशन करणारा, यवा-

दिकांच्या साहाय्यानें तृप्ती पावणारा, भगवान विष्णूच्या कृपेनें निष्पन्न झालेल्या सोमावर अधिकार सांगणारा आणि प्राशनानें आनंदित होणारा इंद्र आमच्याशीं मित्रत्वानें नांदतो. सर्वांना कर्माची प्रेरणा देणाऱ्या देवांनीं माझें रक्षण केलें. पितृतुल्य आणि सामर्थ्यवान इंद्रा, मानसिक क्लेशापासून तूं आमचें रक्षण कर.

९६. सोम अर्पण केलेला, स्तोत्रस्तुत आणि सुखदाता इंद्र, सोम प्राशनाच्या निमित्तानें आपल्या रथाश्वांना मुक्त करतो. हे इंद्रा, सोम निर्माण करणाऱ्या भक्तांचा सोम तूं प्राशन कर. त्यांना विपुल धन दे. इतकेंच नव्हे तर त्यांच्या धनाचें रक्षण कर. भक्तांच्या शत्रूचा संहार कर. अश्व, धेनु आणि अन्न यांची कामना करणारे भक्त तुला आवाहन करीत आहेत.

लक्षांत न येणाऱ्या राजयक्ष्मा रोगानें किंवा भूतबाधेनें ग्रासलेल्या रुग्णा, तुझ्या शरीराला त्रास देणाऱ्या रोगापासून हवि प्रदान केलेलें इंद्र आणि अग्नि तुला मुक्त करोत. ज्याचें आयुष्य क्षीण झालें असून मृत्यु समीप आला आहे अशा रुग्णाला निर्ऋतीदेवी शतायुषी करो. सहस्राक्ष आणि शतायुषी इंद्र, या रुग्णाला शंभर वर्षांपर्यंत दुःखशून्य करो. इंद्र, अग्नि, सविता आणि बृहस्पती यांनीं शतायुषी आणि निरोगी रुग्णा, तूं शंभर वसंत, शरद् आणि हेमंत ऋतूंचे दर्शन घे. मृत्यूकडून परत आलेल्या दिव्यदेही आणि सर्वांगपूर्ण पुरुषा, तूं आमचा म्हणून आमच्याकडे ये.

हे स्त्रिये, वेदांच्या मंत्रांनीं तृप्त झालेला व राक्षसांचा संहार करणारा अग्नि, तुझ्या शरीरांतील गर्भाला पीडा देणारा रोग आणि मूळव्याधरूपी दोन राक्षसांना नष्ट करो. तुझ्या गर्भाशयांत असलेल्या रेतरूपी अर्ध्या दिवसाचा किंवा चलनवलनयुक्त पूर्ण दिवसांचा गर्भ नाश करणाऱ्या राक्षसाला मंत्राच्या सामर्थ्यानें पळवून लावतो. तुझ्या गर्भांत तुझ्या पतीनें जें रेत ठेवलें तें आपल्या जिव्हेनें चाटून घेणाऱ्या किंवा तुम्हा पति-पत्नींच्या मीलनसमयीं गर्भनाशाच्या इच्छेनें अडथळा करणाऱ्या राक्षसाला आम्ही नष्ट करतो. तुझ्याशीं मीलन करण्याच्या निमित्तानें पतीच्या अगर प्रियकराच्या रूपानें तुझ्याकडें येणाऱ्या

राक्षसाचा मी संहार करतो. तो गर्भनाशक राक्षस आता तुला बंदिस्त करूं शकणार नाही.

हे रुग्णा, तुझ्या नेत्र, नासिका, कर्ण, हनुवटी, मस्तक, जीभ, मेंदू, स्नायू, अस्थी, सांधे, बाहू, गुद, आंतडी, हृदय, यकृत, प्लीहा, मांड्या, गुडघे, चवडे, टांचा, कटि, लिंग, केंस, नखें, अंगप्रत्यंगें आणि अन्य शरीरांतील सर्व रोग मी दूर करतो. स्वप्नकालीन दुःस्वप्ननाशक देवतें, माझें मन संभ्रम आणि पाप यांच्यापासून दूर ठेव.

९७. हे स्तोत्यांनों, सोम प्राशनानें पुष्ट वनलेल्या, युद्धकुशल, वज्रधारी, भक्तांना साहाय्य करणाऱ्या आणि जन्मापासून कीर्तिवंत झालेल्या, इंद्रानें कोणता पराक्रम केला नाही ? तुम्ही त्याला सोम अर्पण करून आपल्याकडे आकर्षित करा.

९८. दूरदेशीं वास करणाऱ्या यदुतुर्वश राजांना स्वगृहीं आणणाऱ्या नास्तिकांनाही अन्न प्रदान करणाऱ्या, कृपाळू व पराक्रमी इंद्राचें प्रियत्व आम्हास प्राप्त होवो.

९९. अग्रमान दिलेल्या आणि सोम प्राशन करणाऱ्या इंद्रा, ऋभु आणि मरुत तुझे स्तवन करतात. पुरातन सोमप्राशक इंद्राच्या पराक्रमाचें त्याचे भक्त गौरवगान करतात.

१००. हे स्तुतियोग्य, वज्रधारी व शूर इंद्रा, प्रवाहात सांपडलेल्या पुरुषाप्रमाणें आमच्या सर्व इच्छा तुझ्याकडे धाव घेत आहेत. तूं त्यांचा उत्कर्ष कर. आम्ही तुझ्या रथाश्वांना चांगल्या शब्दांनीं बोलत रथाला जोडतो.

१०१. ही एक अग्नीची समृद्ध प्रार्थना आहे. अग्नि आणि प्रार्थना करणारा भक्त यांचे प्रियत्वाचे नातें या प्रार्थनेनें साधलें जातें.

अग्नि दूतं वृणीमहे होतारं विश्ववेदसम् ।
अस्य यज्ञस्य सुक्रतुम् ।।
अग्निमग्नि हवीमभिः सदा हवन्त विश्पतिम् ।
हव्यवाहं पुरुप्रियम् ।।
अग्ने देवाँ इहा वह जज्ञानो वृक्तबर्हिषे ।
असि होता न ईड्यः ।।

देवांना बोलावून आणणाऱ्या, सर्व धनांचा स्वामी आणि पराक्रमी अग्नीला आम्ही आमच्या यज्ञांत येऊन देवांचा दूत म्हणून काम करण्यासाठीं प्रार्थना करतो. देवांना हविर्भाग नेऊन देणाऱ्या, सर्वांना प्रिय वाटणाऱ्या, सर्वश्रेष्ठ अग्नीला हविर्द्रव्यें अर्पण करून आमच्यासाठीं आवाहन करीत आहोंत. आमच्यासाठीं देवांना आवाहन करणाऱ्या, पूज्य आणि नवजात अग्ने, आम्ही दर्भासनावर बसलों आहोंत. सर्व देवांना तूं आमच्याकडे घेऊन ये.

१०२. अंधःकाराचा नाश करणाऱ्या, प्रकाशवंत, गौरवीय, वंदनीय आणि बलवान अग्नीला मी प्रज्वलित करतो. अश्वांच्या द्रुत गतीनें तो यजमानासाठी देवांना यज्ञस्थानीं घेऊन येतो. यजमान त्याचें स्तवन करतात. त्यामुळें अग्नि अधिकच प्रकाशवंत, बलिष्ठ आणि प्रज्वलित होतो.

१०३. हे पुरुमीळहा प्रदीप्त, कीर्तिवंत आणि धनद अग्नीकडे तूं उत्तम निवासस्थानासाठीं प्रार्थना कर. देवपाचारक, यज्ञार्ह, अंगिरसानीं उत्पन्न केलेल्या, घृतवाह्य, बलपुत्र आणि भक्तांनीं गौरवगान केलेल्या अग्ने, तुला जवळ करण्यासाठीं घृताच्या आहुती अर्पण करतो. तुपानीं भरलेल्या यज्ञीय पळचा तुझ्याकडे धांव घेत आहेत.

१०४. अग्नीच्या ज्वालेप्रमाणें तेजोवान, भक्तस्तुत आणि बलसंपन्न इंद्रा, आमच्या स्तोत्रांनीं तूं वृद्धिगत हो. हजारो स्तोते सागराप्रमाणें विस्तीर्ण कीर्तीच्या इंद्राचा महिमा गात आहेत. युद्धस्तुत, यज्ञगामी, देवत्वदायी व दातृत्ववान, सत्यस्वरूप इंद्राला आमची स्तोत्रें प्रसन्न करोत. हे इंद्रा, तुझ्या वैभवाला शोभेल असें दान तूं आम्हाला दे.

१०५. शत्रुजेत्या इंद्रा, शत्रूचा संहार करून तूं भक्तांचे रक्षण करतोस. शत्रूचा थरकाप उडविणाऱ्या, सामर्थ्यवान, अजर, द्रुतगती, आणि उदकवर्धक इंद्रा, भीतीनें व्याकूळ झालेला पुत्र ज्याप्रमाणें मातेकडे जातो त्याप्रमाणें भयभीत झालेली द्यावा–पृथ्वी तुझ्याकडे जातात.

१०६. वज्र धारण करणाऱ्या, अंतरीक्ष आणि मेघांनीं गौरविलेल्या, मरुतांचें साहाय्य लाभलेल्या आणि पराक्रमी इंद्रा, भक्तांनी केलेलें यज्ञ आणि गायिलेली स्तोत्रें यांच्यामुळें तुझें सामर्थ्य वृद्धिगत

होतें इतकेंच नव्हे तर सर्वांचा आधार असलेला भगवान विष्णू, मित्र आणि वरुण हे देखील तुझे नेहमी गौरवगान करतात.

१०७. नद्या ज्याप्रमाणें सागराला शरण जातात त्याप्रमाणें इंद्राच्या क्रोधापुढें सर्व लोक नतमस्तक होतात. द्यौ आणि पृथ्वीला कमावलेल्या कातडयाप्रमाणें वळविणारा, सृष्टीला कंपायमान करणाऱ्या, सामर्थ्यसंपन्न आणि प्रकाशमान इंद्रानें आपल्या शतधारायुक्त वज्रानें वृत्राला छिन्न केलें. सूर्यरूपी, ब्रह्मोत्पन्न, उग्र, तेजस्वी, शत्रूचा संहार करून प्राणिमात्रांना आनंदित करणारा, सृष्टीला व्यापून टाकणारा, दस्यूंना भय उत्पन्न करणारा, वलोत्साहसंपन्न, सोमप्राशक, धनजेता, आक्रमक, भक्तस्तुत, आयुधधारी, सप्तासुरांचा नाश करणारा, राक्षसांची नगरे जिंकून घेणारा, सर्वेश्वर व हविर्दत्त इंद्र आमचे अन्न शुद्ध करतो, आम्हाला अविनाशी धन देतो आणि नवपरिणित दांपत्याला चांगलें अपत्य देतो. धेनुसंघादिपती, धेनुविमोचक, स्वर्गोपभोगी, इंद्राचे बृहद्दिव ऋषी स्तवन करीत आहेत. रश्मिपती, पूजनीय, मित्र, वरुण आणि अग्नि उदित होत आहेत. हा सूर्य सर्व प्राणिमात्रांचा आत्मा असून आपल्या श्रेष्ठत्वानें आकाश, अंतरीक्ष आणि पृथ्वी भरून टाकतो. हा रश्मिवान इंद्र सर्व दिशांतून प्रकाश निर्माण करतो तेव्हां अंधःकार-रूपी पाप लांब पळून जातें.

१०८. शत्रुसेनेचा संहार करणाऱ्या, कर्तृत्ववान, द्रष्टचा, बलवान आणि स्तोत्रांच्या साहाय्यानें गौरविलेल्या इंद्राकडे आम्ही बल आणि ऐश्वर्याची याचना करतो. हे इंद्रा, तूं आम्हास विलोभनीय धन प्रदान कर.

१०९. पराक्रमी इंद्रासमवेत भटकणाऱ्या गाई, सर्व शरीराला व्यापणारा, मधुर आणि उत्साहजनक सोमरस प्राशन करून, मत्त आणि शोभिवंत होतात. निरनिराळ्या वर्णांच्या धेनू यज्ञीय सोमामध्यें आपलें दूध मिसळतात. आणि इंद्राबरोबरच प्राणघातक शस्त्रें प्रक्षेपित करतात. त्या सामर्थ्यसंपन्न असल्या तरी नमस्कारपूर्वक इंद्राची उपासना करतात. इंद्राच्या पराक्रमांत या धेनूंचा वाटाही मोठा आहे. इंद्राच्या आज्ञेनें या धेनू भक्तांचे रक्षण करतात.

११०. आमची आणि प्रज्ञावंतांनीं गायिलेली इंद्राची स्तोत्रें सोमाचासुद्धा गौरव करोत. यज्ञीय सात ऋत्विजांना आपलें स्थान वाटतें अशा, तसेंच सृष्टीच्या सौंदर्याचें निवासस्थान अशा सोम प्राशन करणाऱ्या इंद्राला आम्ही आवाहन करतो. हे देवांनों यज्ञारंभी म्हटलेली आमची स्तोत्रें त्रिकद्रुक यज्ञाला समृद्धी प्राप्त करून देवोत.

१११. भगवान विष्णु, मित्र, आप्त आणि मरुत् यांच्यासहित सोम-पान करणाऱ्या, दूरदेशीं असलेल्या सोमाकडे प्रयाण करणाऱ्या, सोमप्रेमी, भक्तसहाय्यक, सज्जनरक्षक आणि स्तोत्र श्रवणाने प्रसन्न होणाऱ्या इंद्रा, आम्ही केलेल्या सोमदानाने तूं आमच्यावर प्रसन्न हो.

११२. वृत्राला ठार करणाऱ्या, उत्कर्षकारी, सज्जनांचा अधिपती, भक्तरक्षक व सूर्यस्वरूपी इंद्रा, पराक्रमाच्या सिद्धीसाठीं तूं उदित होतोस आणि ज्या ठिकाणीं सोम तयार ठेवलेला असेल अशा ठिकाणीं गमन करतोस.

११३. सामगायन आणि विविध स्तोत्रांच्या साहाय्याने प्रसन्न करण्यांत आलेल्या, सोमसमर्पित, बलशाली, द्यौ आणि पृथ्वी यांनीं सामर्थ्यसंपन्न केलेल्या, स्वयंप्रकाशी सोमाची सतत इच्छा करणाऱ्या इंद्रा, तूं स्वतःच्या सामर्थ्यानें देवांचा प्रमुख झाला आहेस.

११४. ज्याच्यावर कोणाचेंही नियंत्रण नाहीं, शत्रुरहित, पुरातन, धनवान, निर्धन भक्तांना धन प्रदान करणाऱ्या, नास्तिकांचा द्वेष करणाऱ्या, पितरांना बोलावून आणणाऱ्या इंद्रा, युद्धांतील विजयानंतर तूं मित्रत्व प्रस्थापित करतोस. पुत्र ज्या प्रमाणें पित्याला बोलावतो त्या प्रमाणें आम्ही तुला आवाहन करीत आहोत.

११५. सत्यप्रेमी इंद्राच्या कृपेने मला सूर्याप्रमाणें तेजस्वी होतां आलें. कण्व-कुलोत्पन्न पुरुषांनीं, इंद्राला सामर्थ्य प्रदान करणारी पुरातन स्तोत्रें रचिली त्यांनीं माझी वाणी सुशोभित झाली. नास्तिकांचा द्वेष करणाऱ्या इंद्रा, तूं माझ्या स्तोत्रांचा स्वीकार कर.

११६. अश्वयुक्त, धनवान, कीर्तिमान आणि नास्तिक नाशक इंद्रा, तुझा भक्त दरिद्री राहात नाहीं हे सिद्ध करण्यासाठीं तूं आम्हास धन प्रदान कर. नास्तिकांचा गायत्र साम तुला आवडतो.

११७. अश्वयुक्त सोमप्राशक, ग्रावन नावांच्या पाषाणांच्या साहाय्याने तयार केलेला सोम तुला हर्षभरित करो. हे सोमप्रेमी इंद्रा, वसिष्ठांच्या स्तोत्रांनीं, आमच्या यज्ञीय स्तोत्रांनीं आणि आम्ही समर्पण केलेल्या मदकारक व मधुर सोमाने तूं प्रसन्न हो.

११८. ऐश्वर्यवान, कर्मप्रेमी, शूर, कीर्तिमान, धनद, अश्व आणि धेनु भक्तांना प्रदान करणाऱ्या, सुवर्णाप्रमाणें सतेज आणि देवप्रमुख इंद्रा, अविनाशी संपत्ती तूं आम्हास प्रदान कर. युद्धामध्यें पराक्रम करणाऱ्या आणि जयाची इच्छा करणाऱ्या इंद्राची, स्तुति-स्तोत्रें गाऊन भक्तजन त्याच्याकडे धनाची याचना करतात. द्यौ आणि पृथ्वीचा विस्तार करणाऱ्या, सूर्याला कान्तिमान करणाऱ्या आणि त्रिभुवन नियंत्रक इंद्राला त्याचे भक्त त्याच्यासाठीं मुद्दाम तयार केलेला सोम समर्पण करतात.

११९. भक्तांना विपुल धन प्रदान करून समर्थ बनविणाऱ्या व आहुती समर्पित केलेल्या इंद्रा, तुझ्यामुळें स्वर्गीय सोमाचे बिन्दु आम्हाला प्राप्त झालें. हे स्तोत्रपाठकांनों, पुरातन आणि नवीन स्तोत्रें, त्याचप्रमाणें वृहती नामक सामदेखील तुम्ही या यज्ञस्थानीं पठण करा.

१२०. चारही बाजूंनीं आवाहित केलेल्या, शत्रूवर जय प्राप्त करणाऱ्या, रुम, रुशम, शावक आणि कृप यांचा मित्र म्हणून मिरवणाऱ्या इंद्राला कण्वकुलोत्पन्न ऋषी, अनु आणि तुर्वंश लोक आवाहन करीत आहेत.

१२१. स्तोत्र-श्रवणानें प्रसन्न झालेल्या, सूर्याप्रमाणें जगाला दीप्तिमान करणाऱ्या इंद्रा, उतारावर पाणी ज्याप्रमाणें वेगानें प्रवाहित होतें त्याप्रमाणें, अत्यंत वेगानें तूं ज्या ठिकाणीं असशील तेथून त्वरेनें आमच्याकडे ये आणि आम्हास विपुल धन प्रदान कर.

१२२. सोमपानानें स्फूर्ति प्राप्त झालेल्या, स्तुतिप्रिय, धैर्यवान, इंद्रा, उपासकाची आर्त जाणून तूं त्यांच्याकडे रथाच्या आसाच्या वेगानें धाव घेतोस आणि त्यांना अन्न व संपत्ती प्रदान करतोस.

१२३. सतत कष्ट करणाऱ्यांना विश्रांती मिळावी म्हणून, परोपकारी आणि देवतात्मा सूर्य आपल्या रथाला जोडलेले हरिदाश्व मुक्त

करून आपले तेजकिरण आवरून घेतो, तेव्हां रात्र आपलें साम्राज्य जगतावर पसरते. परंतु पुन्हा मित्रावरुणांच्या दर्शनासाठीं हा सूर्य द्युलोकाच्या क्षितीजावर अवतीर्ण होतो तेव्हां हरिदाश्व तेजोमय होतात तर रात्रीच्या वेळीं तें कृष्णवर्ण होतात.

१२४. ऐश्वर्य शिखरावर अधिष्ठित झालेल्या, भक्तसखा, स्तोतृरक्षक आणि बलवान इंद्रा, कोणत्या उपासनेनें तूं आमच्याकडे येशील? कोणत्या प्रकारच्या सोमानें शत्रूला पराजित करून त्यांचे धन हिरावून घेण्याची स्फूर्ति तुला प्राप्त होईल? हे इंद्रा, शतावधी रक्षणसाधनांसह तूं आमच्याकडे ये. इंद्र आणि विश्वेदेव आमचें रक्षण करोत. असुरांचा संहार करून देवांनीं आपलें देवत्व अबाधित ठेवलें. देवांच्या प्रियत्वासाठीं केलेल्या यज्ञांत म्हटल्या जाणाऱ्या स्तोत्रांच्या साहाय्यानें भक्तांना प्रवाहित जलाचें दर्शन घडतें. हे शत्रुसंहारक आणि विजयी अग्ने, वृष व पाथ्य ऋषींनीं तुला प्रज्वलित केलें.

१२५. शत्रूवर विजय संपादन करणाऱ्या शूर इंद्रा, चारही बाजूच्या शत्रूंना तूं पराभूत करून पळवून लाविलेस आणि आपल्या भक्तांना सुखी केलेंस. शेतकऱ्याप्रमाणें मुबलक धान्य देऊन तूं आपल्या भक्तांना संतुष्ट कर. हे शत्रुसंहारक, धनसंपन्न, सर्वविद्, निर्भय, भक्तरक्षक इंद्र आमच्यावर कृपा करो.

१२६. (ऋग्वेदाच्या १० या मंडलांत ८६ वे सूक्त या ठिकाणीं उद्धृत करण्यांत आलें आहे. या सूक्तामध्यें इंद्र, इंद्राणी, भगवान विष्णु यांचा एक संवाद आहे.)

इंद्र– सोमयाग करणाऱ्या स्तोत्रपाठकांनीं, इंद्ररूपी आदित्याऐवजीं भगवान विष्णूचें गौरवगान केलें. त्यामुळें विष्णु त्यांच्यावर प्रसन्न झाला.

इंद्राणी– हे इंद्रा, सोमपानासाठीं अन्य ठिकाणीं न जातां तूं भगवान विष्णूकडे काहीही विचार न करतां धाव घेतोस. त्या नीलवर्ण विष्णूनें तुझ्यासाठीं काय केलें आहे म्हणून तूं त्याला असीम ऐश्वर्य प्रदान करतोस? त्यांच्यापेक्षां तूं श्रेष्ठ आहेस. तूं हरतऱ्हेनें त्याचें रक्षण करतोस. शिकारी ज्याप्रमाणें सूकरकर्णाचा वेध घेणाऱ्या श्वानाना

नियंत्रित करतो त्याप्रमाणें तूं त्याला आपल्या नियंत्रणांत कां ठेवीत नाहींस. घृतमिश्रित, प्रिय आणि पवित्र असें माझें खाद्य अपवित्र करणाऱ्या विष्णूला मी शिक्षा करीन. इंद्रा, उत्कृष्ट संभोगसुख प्राप्त करून देणारी माझ्यासारखी सुन्दर आणि प्रसन्न अशी अन्य कोणती स्त्री आहे ? इंद्रा, तूंच मला श्रेष्ठ वाटतोस.

विष्णु– हे सुन्दर स्त्रिये, तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व काहीं होवो. तुझे सर्व अवयव आणि मधुरवाणी माझ्यापेक्षां श्रेष्ठ इंद्राला सर्व प्रकारचें सुख देवो.

इंद्र– चांगले हात आणि सर्वोत्तम बोटे असलेल्या, सुंदर आणि समृद्ध केशकलाप धारण करणाऱ्या, उत्तम जघन आणि कटि धारण करणाऱ्या आणि माझ्यासारख्या पराक्रमी पुरुषाची पत्नी असणाऱ्या स्त्रिये, तूं विष्णूवर अकारण रागावतेस.

इंद्राणी– वीरपत्नी आणि मरुताचें प्रियत्व लाभलेल्या तुझ्या पत्नीला हा पुत्रहीन म्हणतो. त्याला माहीत नाहीं कां मी पुत्रवती आहे. इतकेंच नव्हे तर भक्तांनीं गौरव केलेली मी इंद्रासमवेत संग्रामासारख्या कार्यांतसुद्धां त्याची सहभागी झालें आहे.

विष्णु– अजर आणि अमर इंद्राची तूं पत्नी आहेस हे महान भाग्य आहे.

इंद्र– हे इंद्राणी, विष्णु माझा मित्र आहे. मला त्याचा सहवास अत्यंत प्रिय आहे.

विष्णु– पुत्रयुक्त व गुणवान माते, तूं इंद्राची पत्नी आहेस. तुला अत्यंत सुखकारक आणि प्रिय वाटणारी हविर्द्रव्यें मी अर्पण करतो.

इंद्र– भक्तांनीं दिलेल्या समृद्ध अन्नानीं मी बलवान होतो. त्यांनीं प्रदान केलेल्या सोमानीं माझ्या दोन्ही कुशी सोमव्याप्त होतात.

इंद्राणी– सोमप्राशन केलेल्या इंद्रा, गाईंच्या मागून जाणाऱ्या आणि तीक्ष्ण शिंगे असलेल्या वृषभाप्रमाणें तूं मला संभोग सुख देऊन स्वतःही सुखी हो.

इंद्र– हे स्त्रिये मी तुला सुखी करतो.

विष्णू– हे इंद्रा, तूं मला काष्ठस्त्रुचा (लाकडी पळी) आणि चरू वगैरे दुर्लभ वस्तू दे.

इंद्र– सर्वोत्तम भक्तांना अभय देणारा, यजमानाकडे जाणारा, आणि सोमप्रिय असा मी तुझ्यासाठीं या ठिकाणीं अवतीर्ण झालों. हे विष्णो, जंगलात न जातां तूं आमच्याकडे ये. आमच्या घरी निवास कर. निद्रानाशक विष्णो, तू परत ये. मला सांग तूं इतके दिवस कोठे होतास ? कोणत्या दिशेला गमन केलें होतेस ?

विष्णु– मी अनेक पुत्रयुक्त आणि कल्याणमय व्हावे असें वाटतें. इंद्रा, तूं सर्वश्रेष्ठ आहेस.

१२७. हे स्तोत्यानों, आम्ही साठ हजार निष्क प्रदान करतो. अन्नप्राप्तीसाठीं शंभर व तीनशें अश्व, हजार गायी आणि दहा माळा मी तुम्हाला देतो. फळांनीं बहरलेल्या वृक्षावर बसलेला पक्षी ज्याप्रमाणें अत्यंत मधुर शब्द करतो त्याप्रमाणें तुम्हीही मधुर स्तोत्रे गा. यज्ञकर्म समाप्त झालें तरी तुमची स्तोत्रें मात्र तुम्ही समाप्त करूं नका. हा स्तोता वीर्यवान वृषभाप्रमाणें असून त्याचें घर, पुत्रपौत्र आणि गाई यांनीं भरलेलें आहे. बाणापासून ज्याप्रमाणें मनुष्य सुरक्षित राहातो त्याप्रमाणें ही मधुरवाणी स्तोत्यांना संरक्षण प्रदान करो. गाई आणि अन्य धन प्राप्त करणारी बुद्धी या स्तोत्यांना प्राप्त होवो. एखादी वाईट गोष्ट घडत असेल तर मंगलप्रद वैश्वानर अग्नीची स्तुती करावी. तो देवतांना कल्याणमयी बनवितो. परीक्षिताच्या राज्यांत पत्नी आपल्या पतीला विचारते कीं, तुझ्यासाठीं मी किती दही प्राप्त करूं आणि किती भक्षण करूं ? उदर भरेपर्यंत तें तूं भक्षण कर असे पती तिला सांगतो. परीक्षितीच्या राज्यांत असे लोक सुखी होते. आपली स्तुती करणाऱ्या स्तोत्याला इंद्र म्हणाला, उठ, उभा रहा, मनुष्यांमध्यें संचार कर. माझ्या कृपेनें तुला सर्व कर्मे करतां येतील. तुझा शत्रु तुझ्या समोर सर्व टाकून देऊन पळून जाईल. मनुष्य, अश्व, गायी उत्तम संततीला जन्म देवोत. सहस्र संख्यात्मक गणना करतां येईल अशी दक्षिणा प्रदान करणारा पूषन् या ठिकाणीं आसनावर अधिष्ठित आहे. हे इंद्रा या गायी व त्यांचा पालनकर्ता, यांचा नाश करू नकोस. चोर आणि शत्रूचा मात्र नाश कर.

तुझी स्तोत्रें आम्हाला आनंद देतात. तुझे शब्द आमचें कल्याण करतात. तूं आमची वाणी श्रवण कर. आमचा कधीही नाश करूं नकोस.

१२८. सोमरसउत्पादक, यज्ञकर्ता आणि सत्यज्ञ पुरुष, सूर्यलोकाला ओलांडून ऊर्ध्वंगतीनें पुढें जातात. देवतांनासुद्धां ही गोष्ट ज्ञात आहे. ज्या ब्राह्मणाचा पुत्र वीर्यवान आहे तो ब्राह्मण मधुर वचन बोलणारा असतो असें गंधर्व म्हणतात. जो देवतांना हविर्दान करीत नाहीं त्याला शाश्वत धीरता प्राप्त होत नाहीं. परंतु जो कोणी यज्ञ करून हविर्दान आणि धनदान करतो तो सूर्याप्रमाणें तेजस्वी होऊन स्वर्गांत गमन करतो. या ठिकाणी उत्पन्न झालेल्या वस्तूंमध्यें अनेक वस्तूंचा समावेश आहे. ज्यानें पर्वतांना स्थिर केलें, वृत्राचा शिरच्छेद केला, पाण्याला प्रवाहित केलें त्या इंद्राला आमचा नमस्कार असो. इंद्रानें उच्चैःश्रवा नामक अश्वाला आशीर्वाद दिला की, तुझें कल्याण होईल. लोक मालांच्या योगें तुला सुशोभित करतील. इंद्राच्या रथाच्या उजव्या बाजूला श्वेताश्व जोडले जातात. ते पूर्व दिशेला उल्लंघून जातात. देवता त्यांना वन्दन करतात.

१२९. हे अश्व या ठिकाणीं आगमन करीत आहेत. सुत्वा प्रतीपाला प्रसन्न करीत आहे. यामध्यें हरिक्न आहे. त्याची इच्छा साधुपुत्र प्राप्तीची आहे. या स्थानीं तीन शिंशिपा आहेत. हा अश्व तुमचें भलें करणारा आहे. पुरुष आणि पृथ्वी तुला निरिच्छ करील. हे बद्धपल्प, हें तुझें अन्न आहे. हा श्येनपती आहे. त्याची उपजीविका अनामय आहे.

१३०. आपण आपल्या अधिकारानें वाणीचें नियंत्रण करतो. असिधापय, अर्जुन्यापय किंवा कार्ष्णेयपय कोण आहेत तें कुहूला विचार. यतीप्रमाणें पृथ्वीशी एकरूप होऊन कुपायकु क्रोधित झाला. हे सूर्या, मी पापरूपी हवि समर्पण करतो. माझा मित्र तुला आणि मला परत लाभो. मी वशापुत्राला भेटतो. फिरश्वा अस्थिर आहे.

१३१. रात्रीच्याबरोबर वरुण गमन करतो. वाणीचे बल महान आहे. शंभर सुवर्णवर्ण अश्व, शंभर रथ, शंभर निष्क, शफाकडून वहन केले जातात. तो मला आनंदित करतो. तो वृक्षामध्यें स्थिर होतो. पिंपळ, खैर आणि वड या ठिकाणीं शयन करणारा मृतसम होतो. मी

पूषाची स्तुती करतो.

१३२. रामतुरई, कर्करी यांना खणून बाजूला काढणारा वायूलाही बाजूला करतो. उग्राची सेवा करतो. जो महान नाहीं त्याची सेवा करीत नाहीं. कर्करी आणि दुंदुभीवर कोण आघात करतों. जी शक्ति हिंसित करते ती कोणाची हिंसा करते. जो अकल्याणकारक आहे त्याची हिंसा होते. तिचा निवास सर्वत्र आहे. तिच्याजवळ तीन उंट, तीन हरणें आणि दोन बालकें असून निळा मोर तिचें वाहन आहे.

१३३. हे कुमारिके, हे दोन किरण विस्तृत आहेत. पुरुष त्याचें संग्रहण करतात. हे पुरुषा, असत्यापासून तूं दूर झाला आहेस. तुझ्या मातेनें याच दोन किरणांचा स्वीकार केला होता. ही कुमारिका आपल्या कानांना हात लावूं देत नाहीं. तूं शयनकाळीं निवासस्थानीं जातोस. तूं या पुरुषाला ज्याप्रमाणें समजतेस त्याप्रमाणें तो नाहीं. तुटलेले दांत आणि लवयुक्त शरीर ही कुमारीची अशुभ लक्षणें आहेत.

१३४. चारही दिशांकडून कराल-क्रूरता नाहीशी करा. हा वत्स पुरुष होण्याच्या इच्छेनें या ठिकाणीं बसला आहे. हा स्थालीपाक अत्यंत लीन होऊन मिळून जातो. पूर्व, पश्चिम आणि उत्तर दिशा अश्लिली पुच्छयुक्त आहेत.

१३५. हैं स्तुतीपाठकांनों, दुंदुभी वाजवणाऱ्या लोकांच्याबरोबर तुम्ही खेळ करा. पाय पादत्राणांत, धान्य कोठारांत आणि उत्तम वाहन रस्त्यांत सुरक्षित असतें. तुम्ही पृषातक, लोकीं, पिंपळ, वट, अश्वत्थ, गोशफ यांच्या पाठोपाठ बलाबरोबर क्रीडा करा. हे अध्वर्यूंनों, या ठिकाणीं संचार करणाऱ्या देवतांसाठीं तुम्ही मंत्रपठण करा, गाईप्रमाणें तुम्ही सत्यज्ञ आहांत. पत्नी पूजन करतांना दिसत आहे. तुम्ही भयावर विजय प्राप्त करण्याची इच्छा करा. तुम्हाला अंगिरा ऋषींनीं दक्षिणा प्रदान केली होती ती या ठिकाणी आणली आहे. ती तुम्ही ग्रहण करा. तुमच्यामुळें आम्हाला चेतना प्राप्त होते. तुम्ही श्वेत आणि आशुपत्व ऋचांच्या पठणानें युवावस्था प्राप्त करा. अंगिरस कुलोत्पन्न पुरुषांनों, आदित्य, वसु आणि रुद्र तुमच्यावर लवकर कृपा करतात. हे धन विशाल

अ...२७

आणि संपन्न आहे. देव तुम्हाला सर्व प्रकारचें साहाय्य करतात. हे इंद्रा, तूं या लोकीं आणि परलोकीं राहाणाऱ्या लोकांना हवि प्रदान कर. या पक्ष्यांसाठीं हे इंद्रा, तूं खाद्यपदार्थ आणि पाणी निर्माण कर.

१३६. पापाचा क्षय करणारी ऋधु क्षीण झाली. तिचे सर्व अवयव कंपित होत आहेत. ज्या वेळीं स्थूल वृषणावर आघात केला जातो तेव्हां गंधयुक्त वीर्य वाढूं लागतें. सुंदर गाईमध्यें प्रविष्ट झालेल्या देवतां आनंदित होतात त्या वेळीं अक्षिभूप्रमाणें ललनासुद्धां आनंदित होतात. महान अग्नि उच्चस्थानीं राहून कोणावर आक्रमण करीत नाहीं. तो तप्त होतो. आम्हाला शक्ती प्रदान करतो. उखळाला बाजूला करतांना अग्नि त्याला म्हणाला, तूं वनस्पतीपासून उत्पन्न झालें आहेस. तुझी उत्पत्ती पुन्हा पुन्हा होते. तुझ्यामुळें देवतांना हवि प्राप्त होतो. अग्नीचें असें सांगणें आहे कीं प्राणिमात्राचें वीर्य उत्तेजित करण्यांत आलें आहे. तेंच वनस्पतीमध्यें फल रूपानें साकारतें. कूक शब्द करणाऱ्याच्या मागून अग्नि वेगानें जातो. अग्नि इंद्रियांचा रक्षक आहे. तो दूधभात आणि दहींभात भक्षण करतो. हा अग्नि पीडा नाहीशी करणारा आहे. पिंपळ आणि कोरफड यांमध्यें अग्नि आहे. वसंत प्राप्त होतांच अग्नि त्यांचा औषधी गुण वाढवतो.

१३७. पूर्व दिशा रत्नमयी होऊन लोकांच्या हृदयांत प्रवेश करते त्या वेळीं इंद्राचे शत्रू नष्ट होतात. हे इंद्रा, तूं अन्नप्राप्तीसाठीं मनुष्यांना प्रेरणा दे. स्वतःचें रक्षण करणाऱ्या पुत्राची उत्पती करणारी स्फूर्ति दे. हे मनुष्यानों, सोमप्राशनासाठीं तुम्ही इंद्राला आवाहन करा. इंद्राने त्वरेनें यावे म्हणून आम्ही इंद्राच्या रथाला जोडण्यांत येणाऱ्या अश्वांची पूजा केली आहे. इंद्र आम्हाला देवांसारखे ऐश्वर्य देऊन आमचें जीवन सुखी करो. आनंदानें सोम प्राशन करण्यासाठीं हा सोम सुसंस्कारित करण्यांत येत आहे. गाळण्यांतून हा सोम थेंबाथेंबानें सोमपात्रांत एकत्रित होत आहे. हे इंद्रा, तुझी शक्ती देवतांना आनंद देणारी आहे. या संसारी जीवनाचा स्वामी वाचस्पति आपल्या तेजानें सर्वांच्या गौरवास पात्र झाला आहे. प्रत्येक स्तोत्राच्या पठणाबरोबर सोमाप्रमाणें हा धनेश्वर वाचस्पतिदेखील इंद्राचा मित्र होतो. हजारों किरणांनीं आपल्याकडे

आकर्षून घेणारा सूर्य पृथ्वीवर पदार्पण करतो आणि आपलें तेज सर्वत्र पसरतो. त्या तेजानें ज्या वेळीं पृथ्वीला त्रास होऊं लागला तेव्हां इंद्रानें आपल्या वलानें सूर्याला तेथून वाजूला केलें आणि त्याला पृथ्वीचें रक्षण करण्याची आज्ञा केली. शुक्राला सूर्याच्या जवळून संचार करतांना इंद्रानें पाहिलें. सूर्याप्रमाणें शुक्रदेखील आकाशांत निवास करतो. तो इंद्राश्रित असून युद्धामध्यें साहाय्य करणारा आहे. शुक्राला सूक्ष्मपणें सूर्यानें आपल्या शरीरांत प्रस्थापित केलें. वृहस्पतीच्या साहाय्यानें, इंद्रानें देवांची सत्ता न मानणाऱ्या प्रजेला शिक्षा केली. हे इंद्रा, तूं आकाश आणि पृथ्वीला स्पर्श करून आपलेसें केलेंस. सात शत्रूंचा नाश करून, विभववान भुवनांना जिंकलेस. तूं महान सामर्थ्यवान असुरांना ठार केलेस. हिंसात्मक साधनांचा नाश केलास आणि गाई प्राप्त केल्यास. विशालदेही वृत्रासुराचा नाश करणाऱ्या सर्वश्रेष्ठ इंद्राची मी स्तुती करतो. पापी लोकांना आपल्या नियंत्रणांत आणण्यासाठीं वलवान इंद्रानें त्यांना वंदिस्त केलें. तो इंद्र यज्ञांत पदार्पण करून अत्यंत आनंदित होतो. तो इंद्र अत्यंत तेजस्वी आहे. पर्वताला भेदून टाकणाऱ्या वज्राच्या साहाय्यानें अत्यंत वलवान झाला आहे. त्याचा पराभव कधीही होत नाहीं. आपल्या प्रिय यजमानासाठीं तो आपल्या शत्रूचें धन हिरावून आणतो.

१३८. इंद्र महान आहे. जलवर्षाव करणाऱ्या मेघांनीं तो संपन्न झाला आहे. हे अश्विनीकुमारानों, तुम्ही सत्याचें पालन करणाऱ्या प्रजेचें रक्षण करा. या प्रजेला अग्नि पुष्ट करतो. यज्ञ करणारे ब्राह्मण अग्नीच्या साहाय्यानें या प्रजेचें रक्षण करतात. कण्वकुलोत्पन्न ऋषींच्या स्तोत्रांनीं, साधनरूपी यज्ञ प्रतिष्ठित करण्यांत आला.

१३९. हे अश्विनीकुमारानों, या यज्ञकर्त्या यजमानाच्या पुत्रपौत्रादिकांना मुक्तपणें राहातां येईल आणि त्यांचें सर्व प्रकारें रक्षण होईल असें हिंसक प्राणिमात्रांरहित एक घर प्रदान करा आणि याच्या शत्रूंना पण दूर करा. अंतरीक्ष आणि स्वर्ग यांमध्यें जें धन आहे, ते तुम्ही आमच्याकडे प्रतिष्ठित करा. सर्व प्रज्ञावंत ब्राह्मण तुमच्या कार्याचा गौरव करतात. ही सर्व कर्मे कण्वकृत आहेत. हा संपन्न हवि, स्तोत्रांनीं स्पर्श केलेला असून अत्यंत मधुर आहे. या हवीच्या साहाय्यानें

तुम्ही वैराचा नाश करा. पाणी औषधी आणि वनस्पती यांमध्यें जें श्रेष्ठत्व आहे त्याची मला प्राप्ती होवो.

१४०. हे अश्विनीकुमारानों, तुम्ही द्रुतगामी चिकित्सक आणि कार्यकुशल आहांत. ज्या ठिकाणीं तुम्ही गमन करतां त्या ठिकाणीं तुम्हाला हवि प्रदान केला जातो. आपल्या उपासनेच्या प्रभावानें आणि बुद्धीच्या कुशाग्रतेनें ऋषींनी अश्विनीकुमारांची जवळीक केली आणि त्यांची स्तोत्रें गाईली. हे ऋत्विजानों, मधुर सोम तुम्ही तयार करा आणि अश्विनीद्वयांना प्रदान करा. ते दोघे द्रुतगामी रथावर आरूढ होऊन संचार करतात. हे अश्विनीकुमारानों, तुमच्यासाठीं जी स्तुती-स्तोत्रें पठण केली जातात त्यांना स्थिरता प्राप्त होते. उक्थाच्या माध्यमांतून आम्ही तुमचा आश्रय करतो. कण्वकुलोत्पन्न ऋषींची आमच्यावर कृपा आहे म्हणून आमची वाणी स्तुती-स्तोत्रें गाऊन तुमची सेवा करते. कक्षीवान, दीर्घतमा आणि व्यश्व या ऋषींनी तुम्हाला यज्ञाच्या वेळीं आहुती प्रदान केली. वेनपुत्र पृथू तुमच्या निवासस्थानीं आहे, म्हणून तुम्ही नेहमी चैतन्यपूर्ण राहातां.

१४१. हे अश्विनीकुमारांनों, तुम्ही आमचें संरक्षक आहांत. आमच्या घराचें रक्षण करण्यासाठीं तुम्ही या आणि आम्हाला दर्शन द्या. तुम्ही आमचें शरीर, आमचे पुत्र-पौत्रादिक आणि संसाराचें रक्षण करण्यासाठीं त्वरेनें आम्हाला प्राप्त व्हा. तुम्ही इंद्राच्या रथांत बसून त्याच्याबरोबर गमन करतां. वायूची साथ तुम्हाला लाभते. आदित्य आणि ऋभु हे तुमचे स्नेही आहेत. भगवान विष्णूंनीं त्रैलोक्य पादाक्रांत केलें. त्या पराक्रमांत सुद्धां तुमचें अस्तित्व होतें. हे अश्विनीकुमारांनों, तुम्ही त्वरेनें यजमानाकडे गमन करा. तुम्ही आपल्या महान रक्षण-शक्तीनें युद्ध करतां आणि शत्रूला वश करतां. अन्नाची प्राप्ती व्हावी म्हणून आम्ही तुम्हाला आवाहन करतो. ही हविर्द्रव्यें तुम्हाला हितकर आहेत. या ठिकाणीं असलेला सोम तुर्वश, यदु आणि कण्व यांनीं तयार केला आहे. तुम्ही या ठिकाणीं लवकर या. लांब अगर जवळ असलेली औषधें प्रदान करणाऱ्या मनाची शक्ती आम्हाला प्रदान करा. आम्ही तुमचें बालक आहोत. आम्हाला उत्तम निवास प्रदान करा.

१४२. हे अश्विनी-कुमारांनों, ज्ञान आणि वुद्धीनें तुम्ही संपन्न आहांत. तुमची प्रज्ञा आम्हाला वुद्धिवान करो आणि त्यावरोवर धनही प्रदान करो. हे स्तोत्यानों, पहाटेच्या वेळीं तुम्ही आपल्या स्तोत्रपठणानें या अश्विनीकुमारांना जागें करा. सत्य-देवते तूं त्यांचा गौरव कर. यज्ञीय होत्यानो या अश्विनीकुमारांची कीर्ती तुम्ही सर्वत्र पसरवा. अश्विनीकुमारांचा रथ आपल्या तेजानें पहाटे उषेला सामोरा जातो आणि सूर्याच्या वरोवर आकाशांत संचार करतो. सूर्याचे तेजोवान किरण मंद होऊन त्याच्या वरोवर जाऊं लागतात. संध्यासमयीं गाईंचें दोहन करणें चालू होतें. त्याच वेळीं ऋत्विज आपल्या वाणीनें अश्विनीकुमारांची स्तुती करीत असतात. हे अश्विनीकुमारांनों, तुम्ही महान ऐश्वर्यवान आणि मनुष्यमात्रांना वश करणारे आहांत. आम्हाला वल आणि कल्याणाची इच्छा आहे. ती इच्छा पूर्ण करण्यासाठीं आम्ही तुमचें गौरवगान करीत आहोत. तुम्ही वुद्धिमान आहांत. त्यामुळें तुमचा सन्मान केला जातो आणि कल्याणप्रद असल्यानें तुमची नेहमी प्रशंसा केली जाते.

१४३. हे अश्विनीकुमारानों, तुमच्या वेगवान रथाचें आम्ही आवाहन करीत आहोत. तुमचा रथ उंच सखल भागातून जातो आणि सूर्याला (अश्विनीकुमाराची पत्नी) घेऊन जातो. तो वाणीला वोलायला लावतो. सर्व वस्तू त्याला प्राप्त होतात. गाईचा तर तो सखासाथी आहे. अशा तुमच्या रथाला मी वोलावीत आहे. तुम्ही लक्ष्मीची, ऐश्वर्याची खाण– अधिष्टाची देवता आहात. आपल्या महान शक्तीनें तुम्ही तिचें नियंत्रण करतां. तिचें पतन होणार नाहीं अशी काळजी घेतां. तुमचा रथ वाहून नेणारे अश्व सतत तुमच्या समवेत असतात. अन्न तें देखील सतत तुमच्या समवेत असतें. कोणता हविर्दाता पुरुष, आपलें संरक्षण व्हावें म्हणून तुम्हाला आवाहन करीत आहे. मुद्दाम उत्तम प्रकारें तयार केलेला सोम प्राशन करण्यासाठीं तुम्हाला कोण आवाहन करीत आहे. यज्ञप्रिय इंद्राला आम्ही नमस्कार करतो. हे अश्विनीकुमारांनों तुम्ही तुमच्या सुवर्णाच्या आणि सुखमय रथानें या यज्ञीय स्थानीं आगमन करा. तुम्ही या ठिकाणीं सिद्ध करून ठेवलेला मधुर सोम प्राशन करा.

हा सोम प्रदान करणाऱ्या पुरुषाला तुम्ही विविध रत्नमय धन प्रदान करा. हे अश्विनीकुमारांनों तुमच्या स्वर्णमय रथानें तुम्ही आकाशातून पृथ्वीवर पदार्पण करा. तुमचे अन्य पूजक तुम्हाला अडवूं शकणार नाहींत. आम्ही सर्व तुमची स्तुती करीत आहोत. तुमची स्तुती करणाऱ्या यजमानाच्या निरोगी आणि सामर्थ्यसंपन्न वीर्यापासून त्याला पुत्र-पौत्रादि संपत्तीचा लाभ होवो. या यजमानाला तुम्ही अशी बुद्धी प्रदान करा कीं ज्यायोगें तो समबुद्धी होऊन त्याप्रमाणें आचरण करील. तो तुमच्यावर पूर्णपणें विश्वास ठेवील. या स्तोत्रपाठकांचे तुम्ही संरक्षण करा.

यापुढील दोन ऋचा मंगलत्वाचीं प्राप्ती व्हावी म्हणून अश्विनी-कुमारांजवळ केलेली एक रम्य प्रार्थना आहे. या वेदांतील ही शेवटची ऋचा आहे.

मधुमतीरोषधीर्द्याव आपो
मधुमन्नो भवत्वन्तरिक्षम् ।
क्षेत्रस्य पतिर्मधुमान्नो
अस्त्वरिष्यन्तो अन्वेनं चरेम ।।
पनाय्यं तदश्विना कृतं वां
वृषभो दिवो रजसः पृथिव्याः ।
सहस्रं शंसा उत ये गविष्टौ
सर्वाँ् इत ताँ् उप याता पिबध्यै ।।

हे अश्विनीकुमारांनों आमच्यासाठीं हे आकाश मधुमय होवो. हें अंतरिक्षदेखील मधुमय होवो. ह्या औषधी मधुमय (निरोगी करणाऱ्या) होवोत. क्षेत्रपती (शेतकरी, अध्यात्मिक अर्थ– आत्मा) आम्हाला मधुमय (सुखद) होवो. आम्हाला अमृतत्त्व प्राप्त होवो आणि आम्ही सदैव त्याच मार्गानें जावो. (पिढचान पिढचा आम्हाला अमरत्व लाभो), तुमच्यासाठीं केलेली सर्व कर्में आणि सर्व स्तोत्रें आमच्यावर फलांचा वर्षाव करणारी आहेत. तुम्ही सोमपान करून सहस्रावधी गाईंचे स्वामी होऊन त्या गाईंचा गौरव– आदर करतां.

ॐ इति शम् ।

# विषयबोधिनी

| क्र. नांव | सूक्तांक |
|---|---|
| २९ अमृतप्रदाता | ६।१ |
| ३० अमृतासु | ५।१ |
| ३१ अमावास्यः | ७।७९ |
| ३२ अमित्रदंभन | ६।५४ |
| ३३ अमित्रक्षयणम् | ४।२२ |
| ३४ अरातिनाशनम् | ५।७ |
| ३५ अरिष्टक्षयण | ६।२७ ते २९, ८० |
| ३६ अरिष्टनेमिः | ७।८५ |
| ३७ अलक्ष्मीनाशन | १।१८. २०।१३७ |
| ३८ अवनम् | १९।६५ |
| ३९ अविः | ३।२९ |
| ४० अश्व | १९।२५ |
| ४१ अश्विनौ | २०।१२५, १३९ ते १४३ |
| ४२ अस्तृतमणिः | १९।४६ |
| ४३ असुरक्षयणम् | ६।७. १९।६६ |
| आ. ४४ आकूति | १९।४ |
| ४५ आञ्जनम् | ४।९. १९।४५ |
| ४६ आत्मगोपनम् | ६।३,४ |
| ४७ आत्मनोऽहिंसनम् | ७।१०२ |
| ४८ आत्मरक्षा | ५।१० |
| ४९ आत्मविद्या | ४।२ |
| ५० आत्मा | ५।९. ७।१,२,३,५,६७,१११. ९।९,१०. १९।५१ |
| ५१ आदित्य | ७।७ |
| ५२ आनृण्यम् | ६।११७, ११८ |
| ५३ आपः | १।३३. ३।१३. ७।३९,८९. १९।२,६९ |
| ५४ आप्रीसूक्त | ५।१२,२७ |
| ५५ आयुर्वर्धन | १९।६३ |
| ५६ आयुष्यम् | ६।७६ |
| ५७ आस्त्रावस्य भेषजम् | २।३ |
| इ ५८ इडा | ७।२७ |

| क्र. | नांव | सूक्तांक |
|---|---|---|
| | ५९ इंद्रः | ६।३३. ७।७२. २०।१,२,३ ते १२, १४,१५,१७ ते ३९,४१ ते ४६,४७, ५० ते ५७, ५९ ते ६८ ८७, ८९, ९२ ते १००, १०४ ते १२२, १२४, १२५, १२६, १३७, १३८ |
| | ६० इंद्रजेता | ६।२ |
| | ६१ इंद्रत्राता | ७।८६ |
| | ६२ इंद्रः सुमात्रा | ७।९१,९२ |
| | ६३ इंद्रस्य वीर्याणि | २।५ |
| | ६४ इंद्राबृहस्पती | २०।१३ |
| | ६५ इंद्राविष्णु | ७।४४ |
| | ६६ इद्रो मरुतः | २०।४० |
| | ६७ इषुनिष्कासन | ६।९० |
| ई | ६८ ईर्षाविनाशन | ६।१८. ७।४५ |
| उ | ६९ उच्छिष्टब्रह्म | ११।७ |
| | ७० उन्मत्तामोचन | ६।१११ |
| | ७१ उन्मोचनम् | ६।११४ |
| | ७२ उषा | १९।१२ |
| ऊ | ७३ ऊर्जः प्राप्तिः | ६।७९ |
| ऋ | ७४ ऋतस्ययज्ञः | ५।१२ |
| | ७५ ऋषभः | ९।४ |
| ए | ७६ एकवीर | १९।१३ |
| | ७७ एको विभुः | ७।२१ |
| | ७८ एनो नाशनम् | ६।५१ |
| ओ | ७९ ओदनः | ११।३ |
| | ८० ओषधयः | ८।७ |
| | ८१ ओषधिः | ६।५९ |
| औ | ८२ औदुम्बरमणिः | १९।३१ |
| क | ८३ कामः | ९।२. १९।५२ |
| | ८४ कामस्य इषु | ३।२५ |

| क्र. | नांव | सूक्तांक |
|---|---|---|
| | ८५ कामात्मा | ६।८,९ |
| | ८६ कामिनीमनोऽभिमुखीकरणम् | २।३० |
| | ८७ काल: | १९।५३,५४ |
| | ८८ कासशमनम् | ६।१०५ |
| | ८९ कुन्तासूक्तानि | २०।१२७ ते १३७ |
| | ९० कुलपा कन्या | १।१४ |
| | ९१ कुष्टतक्मनाशन | ५।४ |
| | ९२ कुष्ट नाशनम् | १९।३९ |
| | ९३ कुष्टौषधि | ६।९५ |
| | ९४ कुहु | ७।४७ |
| | ९५ कृत्यादूषणम् | १०।१ |
| | ९६ कृत्यापरिहरणम् | ५।१४,३१ |
| | ९७ कृषि: | ३।१७ |
| | ९८ क्लिबत्वम् | ६।१३८ |
| | ९९ केवला पति: | ७।३८ |
| | १०० केशदृंहण | ६।१३६ |
| | १०१ केशवर्धनम् | ११।३७ |
| | १०२ केशवर्धिनी औषधि: | ६।२१ |
| | १०३ क्रिमिघ्नम् | ५।२३ |
| | १०४ क्रिमिजम्भनम् | २।३१ |
| | १०५ क्रिमिनाशन | २।३२. ४।३७ |
| ख | १०६ खिलम् | २०।४९ |
| ग | १०७ गंडमाला-चिकित्सा | ७।७४,७६ |
| | १०८ गर्भदोषनिवारण | ८।६ |
| | १०९ गर्भदृंहणम् | ६!१७ |
| | ११० गर्भसंस्राव | २०।९६ |
| | १११ गर्भाधान | ५।२५. ६।८१ |
| | ११२ गाव: | ४।२१ |
| | ११३ गोकर्णयोर्लक्ष्यकारणम् | ६।१४१ |
| | ११४ गोष्ठ: | ३।१४ |
| | ११५ गौ: | ६।३१. ७।१०४. ९।७. २०।४८ |

| | क्र. नांव | सूक्तांक |
|---|---|---|
| | २०५ भुवनेषुज्येष्ठः | ५।२ |
| | २०६ भैषजम् | ६।२२;५२,८३, १९।४४ |
| म | २०७ मणिबंधनम् | १०।६ |
| | २०८ मधुविद्या | १।३४, ९।१ |
| | २०९ मधुमदन्नम् | ६।११६ |
| | २१० मन्याविनाशनम् | ६।२५ |
| | २११ मन्युशमनम् | ६।४३ |
| | २१२ मरुत | २०।१,२,१३,४०;६७ |
| | २१३ महद्ब्रह्म | १।३२ |
| | २१४ मार्गस्वस्त्ययन | ७।५५ |
| | २१५ मूत्रमोचनम् | १।३ |
| | २१६ मृत्युंजय | ६।१३ |
| | २१७ मृत्युसंतरणम् | ४।३२ |
| | २१८ मेखलाबंधन | ६।३३ |
| | २१९ मेधा | १९।४० |
| | २२० मेधाजनन | १।१ |
| | २२१ मेधावर्धनम् | ६।१०८ |
| य | २२२ यक्ष्मनाशन | १।१२. ३।७, ३१. ६।२०,८५,९१, १२७. १२।२. १९।३८. २०।९६ |
| | २२३ यक्ष्मनिवारण | ९।८ |
| | २२४ यक्ष्मविवर्हण | २।३३ |
| | २२५ यशः प्राप्तिः | ६।५८ |
| | २२६ यज्ञः | ७।९७. १९।१,५८,५९ |
| | २२७ यातुधाननाशनम् | १।७,८ |
| | २२८ यातुधानक्षयणम् | ६।१२ |
| र | २२९ रम्यं गृहं | ७।६० |
| | २३० रक्षोघ्नम् | १।२८. ५।२९ |
| | २३१ रयिसंवर्धनम् | ३।२० |
| | २३२ राका | ७।४८ |
| | २३३ राजा | ६।८८,१२८ |
| | २३४ राज्याभिषेकः | ४।८ |

| क्र. नांव | सूक्तांक |
|---|---|
| २९९ शत्रुनिवारणम् | १।१९ ते २१. ३।२७. ६।१५, ७।११७. ११।९ |
| ३०० शत्रुपराजय | २।२७, ८।८ |
| ३०१ शत्रुवाधन | १।१६ |
| ३०२ शर्म | १९।१९ |
| ३०३ शर्मप्राप्तिः | १।२६ |
| ३०४ शान्तिः | ३।२१. १६।९,१० |
| ३०५ शापनाशन | ६।३७ |
| ३०६ शापमोचन | २।७. ७।५९ |
| ३०७ शाला | ६।१०६. ९।३ |
| ३०८ शालानिर्माण | ३।१२ |
| ३०९ श्वेतकुष्टनाश | १।२३, २४ |
| ३१० श्रेयः प्राप्तिः | २।११ |
| ३११ शंखमणिः | ४।१० |
| स ३१२ सत्यानृत समीक्षक | ४।१६ |
| ३१३ सपत्नक्षयणम् | ६।७५. ७।३५ |
| ३१४ सपत्नक्षयणो वरणमणिः | १०।३ |
| ३१५ समृद्धि प्राप्तिः | ३।२४ |
| ३१६ सर्वविष दूरीकरण | १०।४ |
| ३१७ सर्पविषनाशन | ५।१३. ७।८८ |
| ३१८ सर्पनिषनिवारणम् | ६।१२ |
| ३१९ सर्पेभ्योरक्षणम् | ६।५६ |
| ३२० सर्वप्रियत्वम् | १९।६२ |
| ३२१ सर्वतोरक्षणम् | ६।५३ |
| ३२२ सर्वाधार वर्णन | १०।७ |
| ३२३ सरस्वती | ७।१०,११,५७,६८ |
| ३२४ सरस्वान | ७।४० |
| ३२५ सविता | ७।१४ ते १६,२४ |
| ३२६ साम्मनस्यम् | ३।३७. ६।६४,७३,७४,९४. ७।५२,९४ |
| ३२७ सिनीवाली | ७।४६ |
| ३२८ सुपर्ण | ७।४१ |
| ३२९ सुकृत लोक | ६।१२०,१२१ |
| ३३० सुख | ७।६९ |
| ३३१ सुमंगलौ दन्तौ | ६।१४० |

| क्र. | नांव | सूक्तांक |
|---|---|---|
| | ३३२ सुरक्षा | २।१६. १९।१७,१८,२०,२७. |
| | ३३३ सूर्य | २०।४७,४८,५८,१०७,१२३ |
| | ३३४ सूर्यश्चंद्रमसौ | ७।८१ |
| | ३३५ सेनानिरीक्षणम् | ४।३१ |
| | ३३६ सेनासंयोजनम् | ४।३२ |
| | ३३७ सोमपावन | २०।१३७ |
| | ३३८ सौमनस्यम् | ६।५५,१२३ |
| | ३३९ सौभाग्यवर्धन | ५।१३९ |
| | ३४० संग्रामजयः | ६।९९ |
| | ३४१ संतरणम् | ७।१०७ |
| | ३४२ संनाति | ४।३९ |
| | ३४३ संपत्कर्म | ५।११ |
| | ३४४ संप्रोक्षण | ६।१० |
| | ३४५ समर | ६।१३० ते १३२ |
| | ३४६ स्वर्गौदन | १२।३ |
| | ३४७ स्वर्ज्योतिः प्राप्तिः | ४।१४ |
| | ३४८ स्वस्ति | ७।२८ |
| | ३४९ स्वस्तये प्रार्थना | ३।१६ |
| | ३५० स्वास्तिवाचन | ६।४८ |
| | ३५१ स्वस्त्ययनम् | १।२७. ६।९३ |
| | ३५२ स्वराज्ये राजः पुनः स्थापनम् | ३।३ |
| | ३५३ स्वापनम् | ४।५ |
| ह | ३५४ हवि | ७।९८ |
| | ६५५ हिरण्यधारणम् | १९।२६ |
| | ३५६ हृद्‌रोगकामिलाशमनम् | १।२२ |
| क्ष | ३५७ क्षत्रिय | ६।१०३ |
| | ३५८ क्षेत्रीयरोगनिवारण | २।८ |

